अ. वि. गृह प्रकाशन

# अर्थशास्त्राचा विकास

-- लेखक --

प्रा. व. गो. सहस्रबुद्धे,
एम्. ए., बी. ई. एस्.

अर्थशास्त्रांतील अभिजात वाङमयाचा आणि त्या वाङमयाची निर्मिति करणाऱ्या अर्थशास्त्रज्ञाचा परिचय करून देणारा व तो देता-देताच अर्थशास्त्राचा विकास कसा झाला ह्याचे सुबोध व सुरस विवेचन करणारा मराठीतील पहिलाच ग्रंथ.




शक १८७३ ] [ सन १९५१

किंमत सहा रुपये

# प्रकाशकाचें निवेदन

प्रा. व. गो. सहस्रबुद्धे याचें हें दुसरें पुस्तक विद्यार्थी व नागरिक याच्या हातीं आज आम्ही देत आहोंत. "सुलभ अर्थशास्त्र" या त्याच्या पहिल्या पुस्तकानतर सुमारे तीन वर्षांनीं "अर्थशास्त्राचा विकास" हें पुस्तक प्रसिद्ध होत आहे.

अर्थशास्त्रासारखा कठिण विषय मराठी भाषेंतून सुलभ रीतीनें समजावून देण्याची हातोटी प्रा. व. गो. सहस्रबुद्धे याना चागली साधली आहे, हें त्याच्या पहिल्या ग्रंथावरून वाचकाना दिसून आलेच आहे, शिक्षण मातृभाषेंतून दिलें जावें असा अनेक वर्षांपासूनचा विचारी शिक्षणतज्ज्ञाचा आग्रह आहे. लवकरच महाविद्यालयीन शिक्षणहि मराठी माध्यमाच्या द्वारें दिलें जाईल अशी आशा वाटू लागली आहे. नागपूर विद्यापीठानें मातृभाषेचा माध्यम म्हणून स्वीकार केलाच आहे. अर्थशास्त्रावरील महाविद्यालयातील विद्यार्थ्याना उपयुक्त होतील असे हे ग्रंथ प्रसिद्ध करण्यात आमचा हेतु हाच कीं, उद्या मराठी माध्यम झाल्यानंतर या पुस्तकाचा विशेष उपयोग होईलच; पण न समजलेला विषय सुलभ रीतीने समजून घेण्यासाठीं विद्यार्थ्यांना चागला उपयोग होईल.

राष्ट्रीय जीवनात अर्थशास्त्राचें महत्त्व दिवसेंदिवस वाढत आहे. या दृष्टीनें आज विशाल स्वरूप धारण करणाऱ्या अर्थशास्त्राचें प्रारंभींचें स्वरूप कसें होतें, त्यात पुढें कशी वाढ झाली, निरनिराळे

मतप्रवाह कसे उत्पन्न झाले इत्यादि अर्थशास्त्राच्या विकासाची या ग्रंथांत दिलेली माहिती जिज्ञासू वाचकांना व नागरिकाना उपयुक्त वाटेल असा आम्हास भरंवसा वाटतो.

अशा तऱ्हेचा ग्रंथ लिहून प्रा. व. गो. सहस्रबुद्धे यानीं पुणें अ. वि. गृह संस्थेस तो प्रकाशनार्थ दिला याबद्दल आम्ही त्याचे आभारी आहोंत.

१२ नोव्हेंबर १९५१
६२४, सदाशिव पुणें २.

**ग. श्री. खैर**
कार्याध्यक्ष
पुणें अ. वि. गृह

# लेखकाचें निवेदन

सुमारें तीन वर्षांपूर्वी 'सुलभ अर्थशास्त्र' हा अर्थशास्त्रविषयक माझा पहिला मराठी ग्रंथ पुण्याच्या अनाथ विद्यार्थी गृह ह्या सस्थेतर्फे प्रसिद्ध झाला. त्याच संस्थेमार्फत माझा हा दुसरा ग्रंथ मराठी वाचकांच्या हातीं देण्यांत मला आनद होत आहे. माझ्या पहिल्या ग्रथाचें मराठी वाचकाकडून, वृत्तपत्रांकडून व विशेषत विद्यार्थ्यांकडून जे स्वागत झालें त्यानेंच मला प्रस्तुत ग्रंथ लिहिण्यास प्रोत्साहन मिळाले, हे मी आभारपूर्वक नमूद करू इच्छितों. त्याखेरीज 'सुलभ अर्थशास्त्रा'शी ह्या ग्रथाचा आणखी एक निकटचा व महत्त्वाचा संबध आहे. त्या ग्रथारभीच्या निवेदनात मी असे सहज लिहून गेलों होतो की अर्थशास्त्रांत ज्याला विषयप्रवेश करावयाचा आहे त्याला अर्थशास्त्रांत आजमितीला मान्य असलेल्या कल्पनेपलीकडे जावयाचे कारण नाही; पण त्यानतर ज्याला विशेष अभ्यास करावयाचा आहे त्याला अर्थशास्त्रीय कल्पनांत बदल कसा झाला, कां झाला इत्यादि गोधळात स्वतःला पाडून घेतल्याशिवाय चालावयाचें नाहीं. कारण "असा गोंधळ झाल्याशिवाय व करून घेतल्याशिवाय कोणत्याहि विषयासंबधी खरेंखुरें ज्ञान मिळत नाही" ह्या वाक्यामुळेच प्रस्तुत ग्रथाची कल्पना मला सुचली. साराश, 'अर्थशास्त्राचा विकास' हा माझा ग्रंथ 'सुलभ अर्थशास्त्र' ह्या माझ्या ग्रथाचीच पुढली पायरी होय प्रस्तुत ग्रंथात १६३० ते १९५० ह्या ३२० वर्षांच्या काळात अर्थशास्त्रीय कल्पनात कसा बदल होत गेला हें मी सुमारे तेवढ्याच पानांत मागावयाचा प्रयत्न केला आहे. सुलभ अर्थशास्त्र वाचून अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वाशीं परिचय झालेल्या वाचकांना कोणताहि इंग्रजी शब्द न वापरता मराठीतून केलेले हें अर्थशास्त्राच्या विकासाचे विवेचन जड वाटणार नाही अशी मला आशा आहे

"ह्या पुस्तकाचा क्रमिक पुस्तक म्हणून उपयोग होण्यासारखा असला;—किंबहुना होईल अशी माझी अपेक्षा असली—तरी केवळ एखादे क्रमिक पुस्तक लिहावे ह्या उद्देशानें हे पुस्तक लिहिलें नसून

सामान्य वाचकानाहि अर्थशास्त्राची ओळख करून द्यावी ह्या उद्देशाने हें पुस्तक लिहिलें आहे " असेहि सुलभ अर्थशास्त्रारभीच्या निवेदनांत मी म्हटले होतें ह्या पुस्तकाविषयीहि तेच म्हणता येईल. ' अर्थशास्त्राचा विकास ' हा विषय पुणे विद्यापीठाच्या बी ए च्या परीक्षेच्या अभ्यासक्रमांत नुकताच समाविष्ट करण्यात आला आहे तो विषय घेणाऱ्या विद्यार्थ्यांना हा ग्रथ उपयुक्त होईल ग्रथ लिहिताना त्या विद्यार्थ्यांचा अभ्यासक्रम मुख्यत: माझ्या डोळ्यासमोर होता. मुबई राज्यातल्या इतर विद्यापीठात प्रस्तुत पुस्तकाचा विषय एम्. ए. च्या अभ्यासक्रमांत अतर्भूत आहे. पुणे विद्यापीठातहि एम्. ए. च्या विद्यार्थ्यांना तो घेण्याची सोय आहे. त्या विद्यार्थ्यांनाहि हा ग्रथ उपयोगी पडेल.

सामान्य वाचकाला अर्थशास्त्राच्या तात्त्विक बाजूविषयी फारसे आकर्षण नसले तरी विविध आर्थिक व्यवस्था व त्यांचे जीवनावर होणारे परिणाम जाणून घेण्याची उत्कठा असते व ते साहजिक आहे. कारण आर्थिक व्यवस्थेच्या स्वरूपांशी आपले सर्वच जीवन निगडीत झालेले आहे, अशी त्याला स्थूलमानाने का होईना पण जाणीव असते. लोकशाहीच्या ह्या युगात प्रत्येकाला आर्थिक व्यवस्था व त्यांचे स्वरूप कसे असणे इष्ट ह्याबद्दलच्या प्रचलित वादाचे ज्ञान असणे आणखी एका दृष्टीने अत्यावश्यक झाले आहे इतर गोष्टीप्रमाणेच आर्थिक व्यवस्था कशी असावी, ह्यासबधीचे निर्णय सामान्य नागरिकांकडूनच घेतले जावे अशी लोकशाहीची अपेक्षा असते. आज तर असे निर्णय तांतडीने घेण्याची जरुरी उत्पन्न झाली आहे. भाडवलशाही की समाजवाद की आणखी तिसरेच कांही ! ह्या स्वरूपांत आर्थिक व्यवस्थेचा प्रश्न भारतासह प्रत्येक राष्ट्रापुढें आहे आणि त्यावर निरनिराळ्या राष्ट्रातील नागरिकाकडून जे निर्णय घेतले जातील त्यावर जगाचें भवितव्य अवलबून आहे. ते निर्णय जाणतेपणे घेतले जावे आणि चुकीच्या निर्णयामुळे ओढवणारे अनवस्थाप्रसग टळावेत ह्यासाठी विविध आर्थिक व्यवस्था—विशेषत: त्यामागील तात्त्विक भूमिका व त्याचे परिणाम—ह्यासबंधी प्रत्येकाला ज्ञान असणें अगत्याचे झाले आहे. ह्या दृष्टीनें पूर्वतयारी म्हणून सामान्य नागरिकाना माझ्या प्रस्तुत ग्रंथाचा उपयोग होईल अशी माझी अपेक्षा आहे. आर्थिक

व्यवस्थेसंबंधीच्या आजच्या अर्थशास्त्रीय विचाराची माहिती शेवटच्या प्रकरणांत मी दिली आहे. ती ह्या दृष्टीने विशेष उपयुक्त व्हावी. अर्थात् ती माहिती असावी तेवढी विस्तृत नाही. त्याची कारणें पृष्ठसंख्येची मर्यादा व ह्या पुस्तकाचें कार्य मुख्यतः अर्थशास्त्राचा इतिहास सांगण्याचें असल्यानें प्रचलित वादांना ह्या पुस्तकात अधिक स्थान देणें शक्य नव्हतें ही आहेत. त्यामुळें आर्थिक व्यवस्थाचा सखोल अभ्यास करूं इच्छिणाऱ्याना माझ्या पुस्तकानें समाधान होणार नाही हें मी जाणून आहें. ते होऊ नये अशीच माझी इच्छा आहे. त्याच्यासाठी पुस्तकाच्या शेवटी जोडलेल्या सदर्भ ग्रथांची मी शिफारस करतो.

मराठीतून अर्थशास्त्र शिकणे व शिकवणे सुलभ आहे हा माझा विश्वास प्रस्तुत ग्रंथाच्या लेखनानें दुणावला आहे. मात्र ह्या ग्रथाने मराठी माध्यमाचा स्वीकार करताना इग्रजीमार्फत आतरराष्ट्रीय ज्ञानपोईशी आपला जो संबंध जोडला गेला तो सपूर्णपणे तोडून टाकणे किती धोक्याचे आहे हेहि वाचकाच्या मनावर ठसल्यास ते इष्टच होईल असें मला वाटते. कोणत्याहि विषयात मराठी माध्यमाचा स्वीकार केला जातांना त्या विषयाच्या शिक्षकाना व विशेष अभ्यासकाना आतरराष्ट्रीय ज्ञानाचो द्वारे खुली ठेवण्याची काहीतरी योजना होणें अत्यंत जरुरीचे आहे असें माझें मत आहे; हे येथें मुद्दाम सांगितले पाहिजे.

प्रस्तुत पुस्तकाच्या माडणीसंबंधी थोडेसे लिहिले पाहिजे. कोणत्याहि शास्त्राचा इतिहास सांगतांना कालानुक्रमाला महत्त्व द्यावें की, विचार-पंथांना महत्त्व द्यावे, असा सांगणाऱ्याला नेहमीच विचार पडतो. .पैकी विचारपंथांना अधिक महत्त्व आहे अशी माझी समजूत असल्यानें त्याच अनुरोधाने मी माडणी केली आहे. अर्थशास्त्राचा प्रत्येक सिद्धान्त घेऊन --उदा., मूल्यसिद्धान्त--त्याचा विकास सागावा असें काहींचें मत आहे. तें मला पटत नाही. कारण सूक्ष्म विचारान्ती असें आढळते की, कोणत्याहि संप्रदायाचे सिद्धान्त स्वतत्र नसून त्या सप्रदायाच्या तत्त्वज्ञानाच्या धाग्यांनीं एकसंध झालेले असतात. त्यासाठीं संप्रदायाच्या सिद्धान्ताचा समग्र विचार अधिक महत्त्वाचा असतो. विचारपंथाना महत्त्व देण्याचे ठरल्यास कोणत्याहि विचारपथांच्या जनकाला जेवढें महत्त्व तेवढेच

महत्त्व त्या पंथाच्या शेवटच्या प्रमुख प्रतिनिधीलाहि असतें. त्याच दृष्टीनें स्मिथ, मार्क्स ह्यांचा विचार असा मीं विस्तारानें दिला आहे तसाच मिल, मार्शल ह्यांचाहि विचार ह्या विषयावरील इंग्रजी ग्रंथांत आढळतो त्यापेक्षां अधिक विस्ताराने दिला आहे. योगायोग असा कीं मिल व मार्शल हे जसे विशिष्ट पंथाचे शेवटचे प्रतिनिधी होते त्याप्रमाणें विशिष्ट काल-खंडाचेहि प्रमुख प्रतिनिधी होते. १९ व्या शतकाच्या मध्याचा प्रमुख आर्थिक विचार प्रकर्षाने मिलमध्यें व १९ व्या शतकाच्या शेवटचा प्रमुख आर्थिक विचार प्रकर्षानें मार्शलमध्यें आढळतो. त्याहि दृष्टीनें त्याना महत्त्व आहे. जनकाला व शेवटच्या प्रतिनिधीला महत्त्व देण्याच्या धोरणानें काही प्रमुख अर्थशास्त्रज्ञावर--विशेषत: रिकार्डोवर--मजकडून थोडासा अन्याय झाला आहे हे मान्य केले पाहिजे. रिकार्डोवर अधिक पाने खर्च पडली नाहीत म्हणून त्याचे महत्त्व मी मानीत नाही असा कोणी गैरसमज करून घेऊं नये तसेंच ज्याचा उल्लेख ह्या ग्रथात मी केला नाही उदा., कॉर्नोट, लुईब्लॉ, कार्व्हेर, त्यांचे महत्त्व मला माहीत नाही असेहि समजू नये. नवसनातनवादातील अर्थशास्त्रज्ञाबद्दल हेच म्हणता येईल. त्यातील प्रत्येकाच्या चरित्राची व विचाराची माहिती अर्थशास्त्राच्या विशेष अभ्यासकाना असली पाहिजे. पृष्ठसख्येची मर्यादा लक्षात घेता ती माहिती विस्ताराने देणे मला शक्यच नव्हते. त्या प्रकरणात इतर प्रकरणांप्रमाणें वैयक्तिक अर्थशास्त्रज्ञाचे विचार सपूर्णपणे सागणे ह्या पद्धतीचा अवलंब न करता नवसना-तनवादाच्या प्रत्येक प्रमुख तत्त्वाची वाढ कशी झाली हे सागण्याची पद्धति मी स्वीकारली आहे, हे चाणाक्ष वाचकाच्या ध्यानांत येईलच. प्रत्येका-सबंधी विस्तृत लिहिणें शक्य नसल्याने त्या प्रकरणापुरती ती पद्धति मला विशेष सोयीची वाटली.

प्रस्तुत ग्रथाची माडणी करतांना विचार-विकास समजावून सांगा-वयाला मी अधिक महत्त्व दिले आहे निरनिराळ्या विचारप्रणालीवर टीका करण्याचे धोरण अजिबात ठेवलेले नाही व स्वमताचा उच्चार तर शक्य तेवढा टाळला आहे हेहि वाचकांना उमजेल असें वाटतें. लेखकाचें मत समजण्याचा अधिकार वाचकांना असलाच तर मी येथें एवढेंच सांगतों की, प्रचलित आर्थिक विचारांतील समाजवादी

आर्थिक विचारांशीं सहमत अशी माझी भूमिका आहे. ह्याचा अर्थ असा नाही की, समाजवादी नियोजनांत खाचखळगे आहेत ह्याची मला जाणीव नाही. पण आजची आर्थिक परिस्थिति व मोठ्या प्रमाणावरील उत्पादनानें भाडवलशाहीला प्राप्त झालेले आजचे स्वरूप पाहता समाजवादी नियोजनाशिवाय तरणोपाय नाही, किंबहुना समाजवादी नियोजन अटळ आहे असें मी मानतों. भांडवलशाहीची डागडुजी करता येईल किंवा मिश्र आर्थिक व्यवस्था यशस्वी होईल ह्यावर माझा विश्वास नाही. तेव्हां समाजवादी नियोजनातील अडचणी व गंभीर दोष कसे निवारतां येतील ह्यावर आता अर्थशास्त्रज्ञानीं लक्ष्य केन्द्रित करणें जरूर आहे, त्या प्रणालीच्या अर्थशास्त्रज्ञाकडून अर्थशास्त्राचा पुढील विकास होणार आहे अशी माझी कल्पना आहे. अर्थात् अनुभवाने अगर अधिक वाचनानें माझें हें मत बदलल्यास तसें करण्याची मला अर्थात् पूर्ण मोकळीक आहे. हे लोकशाहीच्या युगांत तरी लिहून ठेवण्याचे कारण आहे असे नाही. तरी पण वेळप्रसंगीं आधार घेतां यावा म्हणून तेहि लिहून ठेवतो. पारिभाषिक शब्दांबद्दल सुलभ अर्थशास्त्राच्या वेळी स्वीकारलेली माझी भूमिका कायम आहे. त्या ग्रंथाप्रमाणेच ह्याहि ग्रंथात जे शब्द सुचले तेच वापरले आहेत. त्या वेळेप्रमाणेंच ह्याहि वेळी मी वापरलेल्या शब्दांबद्दल माझा कोणत्याहि प्रकारचा आग्रह नाही.

शेवटी माझ्या ग्रथाच्या प्रकाशनाची जबाबदारी अगावर घेतल्याबद्दल पुणे अनाथ विद्यार्थी गृहाचे---विशेषतः त्या संस्थेच्या प्रकाशन विभागाचे प्रमुख श्री. शं दा. चितळे व त्याचे सहकारी ह्याचे---आभार मानणे मी माझे कर्तव्य समजतों. अर्थशास्त्रादि शास्त्रीय विषयांवर मराठी पुस्तके निघतील तेवढी हवीत असें आज सर्वत्र म्हणण्यांत येत असले तरी प्रकाशनाच्या दृष्टीनें अशा पुस्तकाना अजून व्हावें तसें "आर्थिक" स्वरूप प्राप्त झालें नाहीं ह्याची मला जाणीव आहे. अशा परिस्थितीतहि माझें पुस्तक आपुलकीने, तत्परतेने व उत्साहानें प्रकाशित केल्याबद्दल अनाथ विद्यार्थी गृहाच्या चालकाचे आभार मानून मी हें निवेदन पुरे करतों.

कर्नाटक कॉलेज, धारवाड
गांधीजयंति
२ ऑक्टोबर १९५१

व. गो सहस्रबुद्धे

*

# अर्थशास्त्राचा विकास घडविण्यास हातभार लावणाऱ्या प्रमुख ग्रंथांची यादी

| सन | लेखकाचें नांव | पुस्तकाचें नांव |
|---|---|---|
| १६३० | थॉमस मन् | England's Treasure by Foreign Trade. |
| १७५८ | क्विस्ने | Tableau Economique. |
| १७७६ | ॲडम स्मिथ | Wealth of Nations. |
| १७९८ | माल्थस | Essay on Population. |
| १८१३ | रॉबर्ट ओवेन | A New View of Society. |
| १८१७ | डेव्हिड रिकार्डो | Principles of Political Economy and Taxation. |
| १८४१ | फ्रेडरिक लिस्ट | National System of Political Economy. |
| १८४८ | जॉन स्टुअर्ट मिल | Principles of Political Economy. |
| १८६७ | मार्क्स | Capital. |
| १८७१ | जेव्हान्स | Theory of Political Economy. |
| १८७१ | मेजर | Untersuchungen. |
| १८७४ | वॉलरॉस | Elements of Pure Political Economy. (Translated) |
| १८९० | मार्शल | Principles of Economics. |
| १८९३ | विकसेल | Uber Wert Kapital Rente. |
| १९०६ | परेटो | Manualel di Economia Politica. |
| १९१० | विकस्डीड | Commonsense of Political Economy. |
| १९३५ | रॉबिन्स | The Nature and Significance of Economic Science. |
| १९३६ | कीन्स | General Theory of Interest, Employment and Money |

———————

*

# अनुक्रमणिका

मारक ठरते---विरोधविकासाचें तत्त्वज्ञान---आर्थिक व्यवस्था विरोधविकासतत्त्वाला अपवाद नाही---भांडवलशाहीअंतर्गत विरोधी प्रवाह---मार्क्सला हेगेलचें तत्त्व मान्य; पण तपशील अमान्य---इतिहासाची आर्थिक उकल---आर्थिक हितसंबंधावर समाजरचनेचा डोलारा उभा---उत्पादनव्यवस्था बदलली कीं समाजव्यवस्था बदलते---मार्क्सने समाजवादी विचाराला शास्त्रशुद्ध स्वरूप दिलें---मार्क्सनें अर्थशास्त्राचा व्याप वाढवला---मार्क्सने अर्थशास्त्राचे स्वरूप बदललें---मार्क्सने भांडवल-शाही अर्थशास्त्राचा डोलारा खिळखळा केला---मार्क्स-नंतरचा मार्क्सवाद---उपभोगाची कमतरता भांडवल-शाहीला मारक नाही---समाजवादी क्रान्ति अटळ नसून प्रयत्नसाध्य आहे---उत्तरपक्षाची भूमिका---लेनिनचीं मतें---साम्राज्यशाहीच्या खुणा---स्टॅलीन व ट्राट्स्की ह्यांचा वाद---मार्क्सवादाचें राजकीय व वैचारिक क्षेत्रांतील यश.

**नवसनातनवाद**

सनातनवादाची भूमिका मान्य; पण सिद्धान्त अमान्य---प्रमुख नवसनातनवादी अर्थशास्त्रज्ञ---सनातनी मूल्य-सिद्धान्ताविरुद्ध नवसनातनवाद्यांचे आक्षेप---वस्तूवर किती श्रमखर्च पडले हा विचार अप्रस्तुत---जेव्हॉन्सचा मूल्यसिद्धान्त---सुखवाद जेव्हॉन्सच्या विवेचनाचा पाया---उपभोग्यतेचा अर्थ---कडेची उपभोग्यता व मूल्य---मेंजर---आर्थिक व नार्थिक वस्तू---वॉलरॉस---नव्या मूल्यसिद्धान्ताचा अर्थशास्त्रावर परिणाम---नवा विभा-जनसिद्धान्त नव्या मूल्यसिद्धान्ताचीच पुढली पायरी---नव्या विभाजनसिद्धान्ताचें श्रेय मुख्यतः मेंजरला---मेंजरचें विभाजनतत्त्वाचें विवेचन---विभाजनतत्त्वांचा

विकास--क्लार्क ह्याचे विचार--उत्पादनतत्त्वांची पुनर्घटना—उत्पादनक्रियेमुळें असुखाची निर्मिति होते--अन्यवस्तूवर्जनसिद्धान्त—वैसरनें केलेली अन्यवस्तूवर्जन सिद्धान्ताची मांडणी--उत्पादनखर्चाची विकस्डीडनें केलेली व्याख्या--उत्पादनघटकाचें नवीन प्रकारें वर्गीकरण--उत्पादनातील भांडवलाचे कार्य--उद्योगपतीची कार्ये--एजवर्थचें उद्योगपतिविषयक विवेचन--घटत्या, वाढत्या व स्थिर फळाचे सिद्धान्त--घटत्या फळाचा सिद्धान्त म्हणजेच वाढत्या खर्चाचा सिद्धान्त--वाढत्या फळाचा सिद्धान्त--घटत्या व वाढत्या फळाचे सिद्धान्त एकमेकांच्या उलट नाहींत--उत्पादनफलसिद्धान्त--उपभोगतत्त्वप्रणाली--प्रत्येक वस्तूची कडेची उपभोग्यता सारखी करण्याची प्रवृत्ति--उपभोगतत्त्वांचें परेटोकृत नाविन्यपूर्ण विवेचन--परेटोच्या मतांचा अधिक पुरस्कार--अर्थशास्त्राच्या कार्याबद्दलच्या कल्पनांत क्रान्तिकारक बदल--प्रा. रॉबिन्स ह्यांची कामगिरी--अर्थशास्त्राची नवी व्याख्या--साकार वस्तु म्हणजे संपत्ति नव्हे--कल्याणाची उठाठेव अर्थशास्त्राला कशाला--द्रव्यनिधिसिद्धान्ताचे ठोकळेबाज स्वरूप--खरेदीशक्तिसमानता सिद्धान्त--सुवर्णपरिमाणाचा पुरस्कार--आलफ्रेड मार्शल--सनातनवाद व नवसनातनवाद ह्यांचा समन्वय--अर्थशास्त्राची व्याख्या, स्वरूप व कार्य--उपभोग--घटती उपभोग्यता व उपभोक्त्याचा वाढावा--उत्पादनाचें स्वरूप--घटत्या फळाचा सिद्धान्त--लोकसंख्यासिद्धान्त--संख्येपेक्षा दर्जाचा प्रश्न अधिक महत्त्वाचा—भांडवल--उत्पादनव्यवस्था—श्रमविभागणी व यांत्रिक उत्पादन--मोठ्या प्रमाणावरील उत्पादन—मूल्यविवेचन--बाजारी किंमत--दीर्घकालीन स्थिरताप्रस्थापक किंमत--उत्पादनखर्चविभाजनचिकित्सा--व्याज-नफा--नफ्याचें समर्थन—

सारा—आर्थिक प्रगतीचा परिणाम : उत्पादनावर—आर्थिक प्रगतीचा परिणाम. विभाजनावर—विभाजनावरील परिणामाचा तुलनात्मक विचार—पैसा—नवसनातनवादाची तात्त्विक भूमिका—नवसनातनवाद्याची अर्थशास्त्रीय कामगिरी.

**अर्थशास्त्रांतील आजचे विचारप्रवाह**

नवसनातनवाद ही भांडवलशाहीची प्रतिक्रिया—खुली व निर्भेळ चढाओढ व्यवहारात अशक्य—अशुद्ध चढाओढीचे अर्थशास्त्र—विकसित भांडवलशाहीचे अन्य दोष व नवसनातनवादाची भूमिका—मार्क्सवादाचें निर्मूलन करण्यात नवसनातनवाद अयशस्वी—आजच्या अर्थशास्त्रांतील चार प्रमुख संप्रदाय—भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांचा समाजवादावरील हल्ला—समाजवादात व्यक्तिस्वातंत्र्याचे अपहरण होतें—नियोजित आर्थिक व्यवस्था कार्यक्षम असणें अशक्य—नियोजित आर्थिक व्यवस्थेत प्रोत्साहनाचा अभाव—नियंत्रित भांडवलशाहीचा पुरस्कार—लॉर्ड कीन्स—कीन्स ह्याचा आर्थिक विचार—व्याजाचा दर व रोजगारी ह्यांचा संबंध—बेकारी नाहीशी करणे सरकारला सहज शक्य—संपत्तीची समान वांटणी उपकारकच—सामाजिक सुरक्षितता नियंत्रित भांडवलशाहीचा एक भाग—गांधीवादी आर्थिक विचार—गांधीवादी अर्थशास्त्रावरील दोन महत्त्वाचे आक्षेप—आजचा समाजवादी आर्थिक विचार—बाजार ही संस्था समाजवादातहि टिकवता येईल—बाजार ही संस्था समाजवादात अधिक कार्यक्षम—समाजवादात व्यक्तिस्वातंत्र्याचें अपहरण होते ही भीति निराधार—समाजवादांत प्रोत्साहन नाही हा आक्षेप फोल—नफ्याचे आमिष इष्टहि नाही व जरूरहि नाही—समाजवाद व आर्थिक प्रगति—भांडवलशाहीविरुद्ध समाजवाद हा वाद अर्थशास्त्र-प्रगतीला उपकारक.

# अर्थशास्त्राचा विकास

## १ : : प्रास्ताविक

कोणत्याहि शास्त्राचे, मग ते विज्ञानशास्त्र असो की राज्यशास्त्र असो, रसायनशास्त्र असो की मानसशास्त्र असो, प्राणिशास्त्र असो की समाजशास्त्र असो, आजचे स्वरूप व त्याच शास्त्राचे सुमारे शभर दीडशे वर्षापूर्वीचे स्वरूप ह्याची काळजीपूर्वक तुलना केली असता असे खात्रीने आढळेल की त्या शास्त्राचे स्वरूप बरेच पालटले आहे. काही शास्त्रात तर हा पालट इतका स्पष्ट आहे की त्याला कायापालटच म्हणावे लागते. कोणत्याहि शास्त्राच्या स्वरूपात सारखा बदल होत असतो जगात कोणतीहि गोष्ट स्थिरप्रकृति (Static) नाही ह्याला शास्त्रेहि अपवाद नाहीत एवढेच शास्त्रात होणाऱ्या बदलाचे कारण आहे असे म्हणून स्वस्थ असणे वरवर विचार करणाऱ्याला समाधानकारक वाटले तरी ज्याला शास्त्रीय दृष्टि आहे अगर ती आत्मसात् करून घ्यावयाची आहेत त्याने शास्त्रात होणारा बदल कशा स्वरूपाचा असतो व त्याचे निश्चित कारण काय ह्याचा अधिक खोलात जाऊन विचार केला पाहिजे.

**शास्त्रांतील बदलाचें स्थूल स्वरूप**

एखाद्या शास्त्रांत बदल होणें ह्याचा अर्थ त्या शास्त्राच्या सिद्धान्ताची संख्या अगर त्याचें स्वरूप बदलणे. एखाद्या शास्त्रातील सिद्धान्तांची संख्या वाढते ह्याचें मुख्य कारण त्या शास्त्रातील तज्ज्ञाना पूर्वी न सुचलेले प्रश्न एखाद्या नवीन शास्त्रज्ञाला सुचतात कित्येक वेळा हे प्रश्न नवीनच उद्भवलेले असतात व त्या प्रश्नाना अनुसरून नवीन सिद्धान्त शोधून काढावे लागतात. एखाद्या शास्त्रांतील सिद्धान्ताची संख्या घटते ह्याचे मुख्य कारण म्हणजे पूर्वीच्या शास्त्रज्ञाना महत्त्वाच्या वाटणाऱ्या कांही प्रश्नाचें महत्त्व अजिबात नाहीसे होते व त्यामुळे त्या प्रश्नासबधीच्या सिद्धान्ताना त्या शास्त्रात जागा देतां येत नाही. कोणत्याहि शास्त्रात असलेल्या सिद्धान्ताची संख्या कमीजास्त होण्याचें आणखी एक कारण म्हणजे त्या शास्त्राच्या व्याप्तीसबधी (Scope) त्या शास्त्रांतील तज्ज्ञांची कल्पना सारखी बदलत असते. असा बदल झाला

की त्या शास्त्रातील सिद्धान्तांची सख्या कमीजास्त होणे हें अपरिहार्य आहे कारण बदलत्या कल्पनेत जुने काही सिद्धान्त न बसणे व नव्या सिद्धान्ताचा समावेश होणें हे स्वाभाविक आहे

सिद्धान्ताच्या स्वरूपातहि सारखा बदल होत असतो. कारण आज जे बरोबर वाटते ते उद्या वाटेलच असे नाही आणि आज ज्या गोष्टी चूक वाटतात त्या उद्या चूक वाटतीलच असे नाही. हे असे होणे स्वाभाविक आहे. कारण ज्या सामग्रीच्या (Data) आधारें सिद्धान्त बसविले जातात त्या सामग्रीन व ज्या पद्धती (Methods) वर सिद्धात आधारलेले असतात त्या पद्धतीत सारखा फरक पडत असतो. ह्या सर्व गोष्टी विचारात घेता असे म्हणता येईल की, सर्वसाधारणपणे शास्त्रीय सिद्धान्तात होणारा बदल चुकीची दुरुस्ती ह्या स्वरूपाचा असतो. असें न होईल तरच नवल, कारण शास्त्रीय पद्धतीमध्ये सारखी सुधारणा होत आहे व उपलब्ध होणाऱ्या माहितीत सारखी भरच पडत आहे

**कोणत्याहि शास्त्राच्या इतिहासाच्या अभ्यासाचे महत्त्व**

एखाद्या शास्त्राच्या स्वरूपात सारखा बदल होत असतो हे एकदा मान्य केल्यानतर त्या त्या शास्त्राच्या अभ्यासकानी आपल्या शास्त्रात तज्ज्ञ व्हावयाचे असल्यास आपल्या शास्त्राच्या इतिहासाचाहि अभ्यास केला पाहिजे हे ओघानेच येते. एखाद्या शास्त्राच्या इतिहासाचा, त्या शास्त्राच्या विकासाचा, अभ्यास करणे हे नुसते महत्त्वाचेंच नव्हे तर मनोरंजकहि असते. अशा अभ्यासाने त्या शास्त्रात कशी कशी वाढ होत गेली, त्या शास्त्रातील चुकीच्या कल्पना कालौघात त्याज्य ठरून नव्या कल्पना त्या ठिकाणी कशा आल्या ह्याची तर माहिती कळतेच पण निरनिराळ्या काळातील परिस्थितीवर, त्या कालातील विचारसरणीवर, त्या काळांतील शास्त्रीय पद्धतीवर, त्या काळात शास्त्रज्ञाचें मत आकर्षण करणाऱ्या प्रमुख प्रश्नांवर विदारक व अर्थपूर्ण असा प्रकाश पडतो. कारण शास्त्राचा इतिहास हा केवळ शास्त्राचा इतिहास नसून सदैव बदलत्या समाजस्थितीचे वर्णनहि असतो. त्या त्या वेळच्या समाजाचें, त्या समाजाच्या आकांक्षेचें व मर्यादाचें प्रतिबिंब शास्त्ररूपी आरशात आढळते असा दावा शास्त्रांच्या शास्त्राचा अभ्यास करणारे अलीकडील काही शास्त्रज्ञ पुढे मांडत असतात. हा दावा अगदीच अनाठायी

नाही हें शास्त्राच्या इतिहासाच्या अभ्यासाने स्पष्ट होण्याजोग आहे ह्या-मुळेच की काय कोणत्याहि शास्त्राच्या विकासाचा अभ्यास मनोरंजक ठर-ण्याचाहि पुष्कळ वेळा सभव असतो.

शास्त्राच्या अगर शास्त्राच्या इतिहासाच्या अभ्यासाचा आणखी एक मोठा फायदा आहे तो असा की, अशा अभ्यासाने शास्त्राच्या अभ्यासकाना जरूर असणारी दृष्टि प्राप्त होते कोणत्याहि शास्त्राच्या अभ्यासकाला आपल्या व आपल्या शास्त्राच्या मर्यादाची जाणीव हवी ही जाणीव होण्या-करितां त्याला हे अवश्य कळावयास हवे की शास्त्र हे कधीच पूर्णावस्थेला पोचत नाही. प्रत्येक शास्त्रात, अगदी नियमबद्ध अशा शास्त्रातहि, सुधार-णेला नेहमीच जागा असते ही गोष्ट कोणत्याहि शास्त्राच्या इतिहासाच्या अभ्यासाने आपोआप लक्षात येते ही गोष्ट लक्षात आली की कोणत्याहि शास्त्राच्या अभ्यासकाला 'ग' ची बाधा होत नाही अगर त्याच्यात पोकळ समाधानाची वृत्तिहि निर्माण होत नाही शास्त्राचा इतिहास शास्त्राच्या अभ्यासकाला दोन गोष्टीची सारखी जाणीव करून देत असतो त्या दोन गोष्टी म्हणजे (१) त्या शास्त्राची सद्य परिस्थिति त्या शास्त्रातील पूर्वीच्या अभ्यासकाच्या श्रमाचें फळ आहे व त्यात विद्यमान अभ्यासकाचा वाटा फार थोडा आहे आणि असे असले तरी (२) त्या शास्त्राची सद्य परिस्थिति त्या शास्त्राच्या पूर्णावस्थेची द्योतक नाही. कारण पूर्वी जशी त्या शास्त्रात सुधारणा झाली तशी पुढे होणेहि शक्य आहे. म्हणजेच त्या शास्त्रात प्रय-त्नाला अजून वाव आहे. ह्या दोन्ही गोष्टीची जाणीव कोणत्याहि शास्त्राच्या अभ्यासकाला अवश्य हवी आणि म्हणूनच आपल्या शास्त्राच्या इतिहासाचे मनन करणें प्रत्येक शास्त्राच्या अभ्यासकाला आवश्यक आहे

वरील विवेचन कोणत्याहि शास्त्राला लागू पडणारे आहे. ह्या पुस्त-काचा विषय असलेले अर्थशास्त्र अर्थातच त्याला अपवाद नाही आणि म्हणूनच अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्याला अर्थशास्त्राच्या विकासाची, पर्यायाने अर्थशास्त्राची, घडण ज्या परिस्थितीत होत गेली त्या परिस्थितीची माहिती असणे अग त्याचें आहे कालाच्या ओघात अर्थशास्त्र ह्या शास्त्रांत बदल कसा व कां होत गेला हें सांगणें हा या ग्रथाचा हेतु आहे. थोडक्यात हा ग्रथ म्हणजे अर्थशास्त्राची जन्मकथा व विकासकथा आहे

# २ : : अर्थशास्त्राच्या उदयाचीं पूर्वचिन्हें

**अर्थशास्त्रीय विचार ह्या शब्दप्रयोगाचा अर्थ**

इग्लड ह्या देशाला अर्थशास्त्राची जन्मभूमि मानण्यात येते. कारण अर्थशास्त्राचा जनक म्हणून ममजला जाणारा ॲडॅम स्मिथ हा इग्लिश मनुष्य होता ॲडॅम स्मिथचा अर्थशास्त्रावरील प्रमुख ग्रथ 'राष्ट्राची सपत्ति' (Wealth of Nations) इ. स. १७७६ मध्ये प्रसिद्ध झाला. तेच वर्ष अर्थातच अर्थशास्त्राचे जन्मवर्ष असे मानण्यास हरकत नाही. इ. स. १७७६ हे अर्थशास्त्राचे जन्मवर्ष असले तरी ज्याला अर्थशास्त्रीय विचार असे म्हणता येईल असे काही इ स १७७६ पूर्वी नव्हतेच असे म्हणणे मात्र धाडसाचे होईल. फक्त त्या विचाराला शास्त्राचे स्वरूप आले नव्हते इतकेच ॲडॅम स्मिथपूर्वीच्या अर्थशास्त्रीय विचाराला अर्थशास्त्र म्हटले नाही तरी त्या विचारात अर्थशास्त्राच्या जन्माची पूर्वचिन्हे दिसत होती असे त्या विचारासबधी सामान्यपणे म्हणावयास काहीच हरकत नाही. ही पूर्वचिन्हे कोणती होती हे समजण्यापूर्वी अर्थशास्त्रीय विचार म्हणजे काय हे स्पष्टपणे समजून घेतले पाहिजे. ॲडॅम स्मिथला अर्थशास्त्राचा जनक मानल्यास त्याच्या अर्थशास्त्राच्या व्याप्तीबद्दल ज्या कल्पना होत्या त्या कल्पनात असणारा विचार म्हणजे अर्थशास्त्रीय विचार असे स्थूलमानाने म्हणता येईल 'सपत्ति कशास म्हणावे ? त्या संपत्तीचें कार्य काय? राष्ट्रातील सपत्तीचे उत्पादन व तिची मर्यादा कशी ठरली जाते? एकूण राष्ट्रीय सपत्तीची राष्ट्रातील निरनिराळ्या वर्गांत विभागणी कशी होते? सपत्तीत अंतर्भूत होणाऱ्या गोष्टीची बाजारांत व व्यक्तीला वाटणारी किमत कशी ठरते?' इत्यादि प्रश्नाचा विचार अर्थशास्त्राने करावा अशी स्मिथची अर्थशास्त्राच्या व्याप्तीबद्दल कल्पना होती असें त्याच्या वर उल्लेख केलेल्या पुस्तकावरून दिसते.

**स्मिथपूर्व आर्थिक विचारांतील दोन प्रमुख संप्रदाय**

अर्थशास्त्राच्या व्याप्तीबद्दल स्मिथच्या कल्पना लक्षात घेता, स्मिथच्या पूर्वी अस्तित्वात असलेल्या दोन सप्रदायाचा (Schools of Thought)

प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. त्या संप्रदायाच्या लोकानी वरील प्रश्नाची उत्तरें देण्याचा आपापल्या परीने प्रयत्न केला आहे. त्यापैकी कालानुक्रमे पहिला संप्रदाय म्हणजे व्यापारवाद (Mercantilism) कालानुक्रमे दुसरा पण जास्त महत्त्वाचा असा संप्रदाय म्हणजे निसर्गवाद (Physiocracy). थॉमस मन् (१५७१-१६४१) हा व्यापारवादाचा प्रमुख प्रवक्ता होता तर क्विस्ने व टर्गोट हे निसर्गवादाचे नेते होते. ह्या दोन्ही संप्रदायातील लोकांच्या विचाराला अर्थशास्त्राच्या उदयाची पूर्वचिन्हे असें म्हणता येत असल्यामुळे ह्या दोन्ही संप्रदायाचे विशेष विवेचन ह्या प्रकरणात केले आहे.

**व्यापारवाद**

१६ व्या शतकाच्या शेवटी शेवटी व १७ व्या शतकाच्या सुरवातीला व्यापारवादी विचारसरणी फार जोरदारपणे पुढे मांडण्यात येत होती इतकी की त्या सुमाराचे इग्लंडचे आर्थिक धोरण सर्वस्वी ह्या विचारसरणीवरच उभारलें होते असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही व्यापारवादाचे मुख्य सूत्र म्हणजे 'पैसा हीच संपत्ति' हे सूत्र एकदा लक्षात आले की व्यापारवाद्यांच्या अर्थकारणावर ताबडतोब प्रकाश पडतो. व्यापारवाद्याचे अर्थकारण प्रामुख्याने मन्च्या 'परराष्ट्रीय व्यापारापासून इग्लडला होणारा फायदा' (England's Treasure by Foreign Trade) ह्या १६३० साली लिहिलेल्या ग्रथात व्यक्त झाले आहे.

**व्यापारवादाचें अर्थकारण**

व्यापारवाद्याचे अर्थकारण पुढीलप्रमाणे होते. पैसा म्हणजेच संपत्ति. तेव्हा राष्ट्रातील संपत्ति वाढवावयाची असेल तर राष्ट्रातील पैशाच्या साठ्यात म्हणजेच द्रव्यनिधीत वाढ झाली पाहिजे. पैशाच्या साठ्यात वाढ करावयाची असेल तर त्याचे मार्ग दोन. पहिला मार्ग म्हणजे पैसा म्हणून वापरण्यात येणाऱ्या वस्तूचें अधिकाधिक उत्पादन व संरक्षण करणें, व दुसरा मार्ग म्हणजे ती वस्तु परदेशाहून मिळवून पैशाच्या साठ्यात भर टाकणे. ह्या दोन मार्गापैकी पहिला मार्ग सर्व देशाना सारख्याच सुलभतेने अवलंबिता येईल असे नाही कारण पैसा म्हणून वापरण्यात येणाऱ्या वस्तूचें उत्पादन होण्यास सर्व देशांतील भौगोलिक अगर अन्य परिस्थिति अनुकूल असेलच

असे नाही. उदाहरणार्थ, सोने, चांदी ह्या पैसा म्हणून वापरण्यांत येणाऱ्या प्रमुख धातूचे उत्पादन सर्व देशात होऊं शकत नाही. कारण ते शक्य असणें वा नसणें हे मानवी प्रयत्नावर अवलंबून नसून मुख्यत: निसर्गाच्या कृपेवर अवलंबून असते अशा परिस्थितीत, ज्या देशात ह्या धातू सांपडत नाहींत त्यांना पैसा वाढवण्याचा पहिला मार्ग जवळजवळ असून नसल्यासारखाच आहे. पैशाचा साठा वाढविण्याच्या दुसऱ्या मार्गाचे मात्र तसें नाहीं. पैसा म्हणून वापरात असणाऱ्या वस्तूचे उत्पादन करणाऱ्या व न करणाऱ्या देशानाहि परदेशाहून ती वस्तु मिळविण्याचा सर्वसामान्य मार्ग म्हणजे आपल्या देशातून निर्यात (Export) होणाऱ्या मालाचे पैशातील एकूण मूल्य (Value) आपल्या देशात आयात (Import) होणाऱ्या मालाच्या पैशातील एकूण मूल्यापेक्षा अधिक असेल अशी खबरदारी घ्यावयाची. निर्यात मालाची एकूण किमत आयात मालाच्या एकूण किमतीपेक्षां जास्त असली म्हणजे दोहोंतील फरक परदेशाना पैशाच्या रूपाने म्हणजेच पैसा म्हणून वापरण्यात येणाऱ्या धातूच्या रूपाने भरून द्यावा लागतो व अशा रीतीने देशातील पैशाच्या साठ्यात भर पडते भर पडलेला पैसा देशातच राहू द्यावयाचा असेल तर आयातीची एकूण किमत निर्यातीच्या एकूण किमती-पेक्षा कधीहि जास्त होऊ देता कामा नये.

**व्यापारवादाचे आर्थिक धोरण**

व्यापारवाद थोडक्यात समजावून सांगावयाचा असल्यास असे म्हणता येईल की पैसा हीच संपत्ति व निर्यातीला उत्तेजन देऊन व आयातीला आळा घालून स्वदेशाचा परराष्ट्रीय व्यापार वाढविणे आणि हाच स्वदेशातील संपत्ति वाढविण्याचा सर्वोत्तम मार्ग आहे, हा त्या विचार-सरणीचा गाभा आहे ही विचारसरणी पत्करणाऱ्या सरकारचे आर्थिक धोरण काय असावे हे ताबडतोब लक्षात येते. ही विचारसरणी पत्करल्यास सरकारने स्वदेशाचा परराष्ट्रीय व्यापारातील फायदा जास्तीत जास्त वाढविणे हे साध्य डोळ्यापुढे ठेवून परदेशातून मालाला ज्याची मागणी आहे अशा स्वदेशातील उद्योगधंद्याची वाढ होण्यास मदत केली पाहिजे, परदेशांतून येणाऱ्या वस्तूवर संरक्षक अगर मारक असे कर बसविले पाहिजेत इत्यादि गोष्टी स्पष्टच आहेत. ही विचारसरणी प्रसृत करणाऱ्या लोकाना 'व्यापार-

वादी ' हे नाव योग्यच आहे असे कोणीहि मान्य करील. कारण व्यापारवाद स्वीकारल्यास निर्यात होणाऱ्या वस्तूचा व्यापार करणाऱ्या स्वकीय व्यापाऱ्याना फार महत्त्व प्राप्त होते. ते नुसते व्यापारी रहात नसून देशातील संपत्ति वाढविणारा एकुलता एक वर्ग असे स्थान त्यास प्राप्त होते. व्यापाऱ्यांना राष्ट्रीय संपत्तीचे निर्माते बनविण्याच्या विचारसरणीला व्यापारवाद व त्या विचारसरणीच्या लोकाना व्यापारवादी ही नावे अर्थातच शोभून दिसतात

**व्यापारवाद व आजचा आर्थिक राष्ट्रवाद**

व्यापारवादाला आर्थिक राष्ट्रवाद ( Economic Nationalism ) हेहि नाव शोभून दिसते असे काही लोकांचे मत होण्याचा सभव आहे कारण आज प्रचलित असणाऱ्या आर्थिक राष्ट्रवादातील काही गोष्टी व्यापारवादामध्ये अतर्भूत आहेत. उदाहरणार्थ, स्वदेशात उत्पादन होणाऱ्या वस्तुना सरक्षण, परदेशी वस्तुवर जबर कर, ह्या दोन्ही गोष्टी व्यापारवाद व आजचा आर्थिक राष्ट्रवाद ह्याना सारख्याच प्रमाणात मान्य आहेत. असे असलें तरी व्यापारवाद व आर्थिक राष्ट्रवाद ह्या दोन्ही गोष्टी एकच आहेत असे एकदम म्हणणे चुकीचे होईल. व्यापारवादाचे पैसा हीच सपत्ति हे जे सूत्र त्याला आधुनिक आर्थिक राष्ट्रवादात काहीच स्थान असण्याचे कारण नाही. ह्याच्या उलट राष्ट्रीय स्वयपूर्णतेला (Economic Self-sufficiency) आजच्या आर्थिक राष्ट्रवादात असलेले स्थान व्यापारवादात आढळणार नाही इतकेच नव्हे तर आर्थिक स्वयपूर्णता व्यापारवादाला मारक ठरते हे थोडयाशा विचाराती लक्षात येण्याजोगे आहे. तरीसुद्धा व्यापारवादात आधुनिक आर्थिक राष्ट्रवादाची बीजे होती असे म्हणण्यास मात्र कोणतीच हरकत नाही राष्ट्राच्या--व्यक्तीच्या नव्हे-- आर्थिक उन्नतीला प्राधान्य व त्या सबधात सरकारवर टाकलेली फार मोठी जबाबदारी ह्या दोन गोष्टीना व्यापारवाद व आधुनिक आर्थिक राष्ट्रवाद ह्या दोहोत सारखेच महत्त्व दिले गेले आहे व्यापारवादामध्ये असलेली आर्थिक राष्ट्रवादाची बीजे पाहून त्याला आर्थिक राष्ट्रवादाची जनी आवृत्ति असे कोणी म्हटले तर ते फारसे चूक ठरणार नाही.

व्यापारवादाने जवळजवळ तीनशे वर्षे इंग्लडवर राज्यच केले असे

म्हटले पाहिजे. कारण ह्या काळातील इग्लडच्या आर्थिक धोरणा व्यापारवादामधील प्रमुख कल्पनाचा पूर्णपणें पगडा बसला हो व्यापारवादी तत्त्वाचे वजन पडल्यामुळे इग्लंडच्या सरकारने केले गोष्टीपैकी काही पुढीलप्रमाणे होत्या —(१) नाणी अगर ती धातूंची केलेली असत त्या धातू ह्याच्या निर्यातीला बदी. (२) आय होणाऱ्या मालावर प्रतिबधक अशा जकाती व निर्यातीस मदत (३) क तपासणी सुकर व्हावी म्हणून आयात-निर्यात व्यवहार काही बदरांतू व्हावा अशी व्यवस्था. ह्या गोष्टींवरून व्यापारवादाच्या अमदानीतं आर्थिक धोरण कशा प्रकारचे होते ह्याची योग्य कल्पना येऊ शकेल

**व्यापारवादावर स्मिथची टीका**

व्यापारवाद ह्या आर्थिक विचारसरणीला व त्यातून उद्भवणा आर्थिक धोरणाला सुरुग लावण्याचे काम मुख्यत अॅडॅम स्मिथनेच के त्याने व्यापारवादावर आपल्या पुस्तकात फार कडक टीका केली अ व्यापारवादाचा धुव्वा उडविण्याचे काम स्मिथला फारसे जड गेले ना कारण पैसा म्हणजेच सपत्ति हे व्यापारवादाचे मुख्य तत्त्व मुळा चुकीचे आहे. मनुष्य पैशाच्या मागे असतो ही गोष्ट जरी सत्य अस तरी पैसा हे त्याचे अतिम साध्य असते असे केव्हाहि म्हणता यावय नाही. पैशाच्या योगाने त्याला हव्या असणाऱ्या इतर गोष्टी मिळू शकत म्हणूनच तो पैशाकरितां धडपडतो. तेव्हा पैसा हे साध्य न इतर गोष्टी मिळवण्याचे नुसते साधन आहे. अगदी चिक्कू असणा लोकाची गोष्ट सोडली असता, जवळचा पैसा नुसता वाढल्याने कोणत्य माणसाला समाधान लाभावयाचे नाही ज्याचा उपयोग होत नाही तो असून नसून सारखाच अशा परिस्थितीत सपत्ति हा शब्द पैशाच्या बाबतीत वापरता पैशाने मिळावयाच्या इतर गोष्टीच्या बाबतीत वापरला पा असें स्मिथने आग्रहाने प्रतिपादले. पैसा ही खरी सपत्ति नसून ती फ खरीखुरी सपत्ति मिळविण्याचे साधन आहे असे त्याचे म्हणणे हो सबध देशाच्या दृष्टीने विचार केला तर पैशाला इतर वस्तूचे उत्पादन त्या उत्पादनाची वाटणी सुकर होण्याकरितां, तसेच त्या वस्तूंच्या मूल्य मापन करण्याकरिता वापरण्यांत आलेली एक वस्तु ह्यापेक्षा जा

अशी काहीच किमत नाही. राष्ट्राला आवश्यक वाटणाऱ्या वस्तूंचे एकूण उत्पादन पैशापेक्षा इतर गोष्टीवर, उदाहरणार्थ, राष्ट्रावर निसर्गाची मर्जी कितपत आहे, राष्ट्रातील लोकांची संख्या व आरोग्य कसें आहे, त्यांच्याजवळ भांडवल आहे किंवा नाही ह्यावर अवलंबून असते. तेव्हां पैशाची एकूण मर्यादा ह्याला राष्ट्रीय संपत्तीच्या दृष्टीने काहीच किंमत नाही पैशात भर टाकून त्या संपत्तीत आपोआप वाढहि होणार नाही किंवा पैसा कमी झाल्याने ती कमीहि होणार नाही असे स्मिथने दाखवून दिले. स्मिथने आपल्या पुस्तकात एके ठिकाणी असे म्हटले आहे की उत्पादनकेंद्राकडून बाजाराकडे धान्य वाहतूक सुकर करणाऱ्या रस्त्याशी पैशाची तुलना करता येईल रस्ता असल्याने धान्याचे उत्पादन वाढत नाही अगर नसल्याने ते कमी होत नाही रस्ता धान्याची ने-आण सुलभतेनेहोण्याला मदत करतो इतकेच उत्पादित वस्तूच्या अदलाबदलीत ( Exchange ) सुलभता निर्माण करणे एवढेच पैशाचे काम आहे असे त्याचे मत होते ह्याच्याहि पुढे जाऊन एके ठिकाणी तर जास्त पैसा असणे हें चांगले तर नाहीच पण त्रासदायक आहे असे मत त्याने प्रकट केले आहे. ह्या बाबतीत पैशाला यंत्रात घालावयाच्या तेलाची उपमा एका अर्थशास्त्रज्ञाने दिली आहे त्याची आठवण होते तेलामुळे यंत्र व्यवस्थितपणे चालण्यास मदत होते हेंखरे. पण यंत्रात फार तेल घालणे ही गोष्ट त्रासदायक होण्याचा संभव असतो असो. सारांश, पैशाला संपत्ति म्हणणें ह्याचा अर्थ साध्य व साधन ह्याची गफलत करणे असे दाखवून देऊन स्मिथने व्यापारवादाचा गाभा मुळापासून उखडून टाकला आहे. पैसा हीच संपत्ति नसली तरी देशातील व्यवहाराकरिता पैसा लागतो. असे असले तरी मौल्यवान धातूचे उत्पादन ज्या देशात होत नाही त्या देशातसुद्धा व्यापारवादी आर्थिक धोरण स्वीकारण्याचे कारण नाही. निरनिराळे देश परस्पराशी व्यापारी संबंध ठेवू लागले असता जगातील मौल्यवान धातूचे अशा प्रकारे वाटप होते की, देशादेशातील किंमतीमान समान पातळीवर यावे त्याकरिता जरूर असणाऱ्या पैशापेक्षा जास्त पैसा देशात झाला की, किंमतीमान वाढते व त्यामुळे निर्यात कमी होऊन, आयात वाढते व जास्त पैसा बाहेर जातो जरूरीपेक्षा कमी पैसा देशांत झाला कीं, किंमतीमान कमी होते. त्यामुळे

निर्यात वाढून आयात कमी होते, व देशात पैसा येतो. तेव्हा जरूर तेवढा पैसा मिळविण्याकरिता आतरराष्ट्रीय व्यापार चालू असणें एवढीच गोष्ट जरूर आहे. त्याकरिता एकतर्फी व्यापार वाढविण्याच्या धोरणाची अजिबात गरज नाही. अशा परिस्थितीत मौल्यवान धातूचे उत्पादन ज्या देशात होत नाही त्या देशानाहि एकतर्फी व्यापार वाढविण्याचे धोरण अनावश्यक ठरते.

पैसा हीच सपत्ति हे व्यापारवादाचे मुख्य तत्त्व चूक आहे, हे दाखविल्यानतर व्यापारवादामध्ये अतर्भूत केलेले इतर सिद्धान्त चुकीचे आहेत हे आपोआपच सिद्ध होते. कारण ते सिद्धान्त बहुताशी पैसा हीच सपत्ति ह्या सिद्धान्तावर आधारलेले आहेत. पैसा हीच सपत्ति नसेल तर स्वदेशाचा परराष्ट्रीय व्यापार एकतर्फी वाढविण्यानेच देशांतील सपत्ति वाढते असे मानण्याचे काहीच कारण नाही. स्वदेशात होणाऱ्या वस्तूची निर्यात अर्थातच वाढविली पाहिजे. पण ती पैसा मिळविण्याकरिता न वाढविता तिच्या मोबदल्यात स्वदेशात ज्याचें सुलभतेने उत्पादन होऊ शकत नाही अशा वस्तू जास्तीत जास्त प्रमाणात मिळविता याव्यात म्हणून वाढवली पाहिजे. शिवाय आयात कमी करून फक्त निर्यात वाढविण्याचे धोरण असे आहे की, ते एखाद्या देशाने स्वीकारले तरच यशस्वी होऊ शकते. सर्वांनी ते धोरण अवलबिल्यास कोणासहि यश न मिळता केवळ आतरराष्ट्रीय व्यापार कमी होणे एवढीच गोष्ट त्यातून निघते. थोडक्यात म्हणजे आतरराष्ट्रीय व्यापारात आयातीपेक्षा निर्यात जास्त होईल असा प्रयत्न कोणत्याहि देशाने करण्याचे कारण नाही. आपल्याला जरूर वाटणाऱ्या आयात मालाचा मोबदला देण्यास पुरे होईल इतका माल स्वदेशातून निर्यात झाला म्हणजे पुरे. त्यातहि बारकावा असा की, आयात मालाचा मोबदला वस्तूतच दिला पाहिजे असेहि नाही. देशादेशाच्या आर्थिक व्यवहारात केवळ वस्तूच अतर्भूत होत नसून भाडवलाची देवाण-घेवाण, मानवी श्रमाची देवाण-घेवाण इत्यादि गोष्टीहि अतर्भूत होतात. ही विचारसरणी मान्य झाल्यास व्यापारवाद व त्यावर उभारलेल्या आर्थिक धोरणाचा डोलारा कोलमडून पडतो यात शंकाच नाही

**व्यापारवादासंबधींचे प्रचलित विचारप्रवाह**

पैसा हीच सपत्ति हा व्यापारवादाचा पाया मुळातच कच्चा असल्यामुळे अॅडॅम स्मिथच्या जोरदार हल्ल्यामुळे व्यापारवाद टिकाव धरू शकला नाही. स्मिथनतर व्यापारवादामध्ये अतर्भूत होणारी विचारसरणी जवळजवळ नामशेष व्हावी व स्मिथनंतर बरीच वर्षे अर्थशास्त्राच्या अभ्यासकाना ती विचारसरणी म्हणजे शुद्ध पोरकटपणा वाटावा ह्यात आश्चर्य वाटण्याचे काही कारण नाही. अलीकडे अलीकडे मात्र ही परिस्थिति पालटली असून अर्थशास्त्राच्या विद्यमान अभ्यासकात व्यापारवादाबद्दल अधिक सहानुभूति आढळते. आधुनिक अर्थशास्त्राचे अध्वर्यु लॉर्ड कीन्स ह्याची व्यापारवादाबद्दलची मते सहानुभूतिजन्य अशीच होती

व्यापारवादाबद्दल अर्थशास्त्राच्या आजच्या अभ्यासकाना वाटत असलेल्या सहानुभूतीची मुख्यत. दोन कारणे आहेत त्यातील पहिले कारण असे की, पैसा हीच सपत्ति हे व्यापारवाद्याचे म्हणणे साफ चुकीचे असले तरी देशांत अधिक सोने, चादी का असावे ह्यासबधी व्यापारवाद्यानी दिलेली कारणे तपासली तर असे दिसून येईल की केवळ पैशाकरिता पैसा अशी सर्वत्र व्यापारवाद्याची वृत्ति नसून पैशाचा साधन म्हणून उपयोग होऊ शकतो अशी जाणीव अधुक व अस्पष्टच का होईना पण त्यातील काहीना तरी होती देशाला जरूर असलेला पैसा केवळ आतरराष्ट्रीय व्यापार चालू असल्याने मिळेल ह्या म्हणण्यात काही अर्थ नाही असे आता सिद्ध झाले आहे देशात किती पैसा आहे ह्याला आर्थिक दृष्ट्या फार महत्त्व आहे हे आजच्या अर्थशास्त्रज्ञाना पटलेले आहे. देशातील पैशाच्या प्रमाणाला महत्त्व आहे ह्याचे कारण देशातील पैशाची एकूण मर्यादा (द्रव्यनिधि i.e Quantity of Money) व किमतीमान (Price Level) व पर्यायाने उत्पादन ह्याचा फार घनिष्ठ सबध आहे देशातील पैसा वाढला की किमतीमान वाढते, किमतीमान वाढले की काही काळपर्यंत तरी उत्पादनातील फायद्याचे प्रमाण वाढते, फायद्याचे प्रमाण वाढले की उत्पादनाला उत्तेजन मिळन देशातील एकूण उत्पादन त्यापूर्वीच ते परमोच्च बिंदूला पोचलेले नसल्यास वाढते. ह्याच्या उलट पैसा कमी झाला की किमतीमान खाली घसरते, किमतीमान खाली घसरल्यामुळे फायदा कमी होऊन उत्पादन घटते. ह्यावरून असे मानता येईल की, जोपर्यंत

देशात बेकारी असून एकूण उत्पादन वाढविण्याला वाव आहे व तशी शक्यता आहे तोपर्यंत देशात किती पैसा आहे, त्याचा किमतीमानावर काय परिणाम होत आहे इत्यादि गोष्टीकडे अजिबात दुर्लक्ष करून चालत नाही. थोडक्यात म्हणजे देशात जास्त पैसा असावा हा व्यापारवादाचा आग्रह अगदी चुकीचा होता असे म्हणता यावयाचे नाही.

व्यापारवादाबद्दल हल्ली वाटणाऱ्या सहानुभूतीचें दुसरें कारण म्हणजे व्यापारवाद्याच्या काही कल्पना चुकीच्या असल्या तरी देशांतील पैसा वाढविण्याची त्याची इच्छा त्याच्या वेळच्या परिस्थितिनुरूपच होती. ह्या ठिकाणी हे लक्षात घेतले पाहिजे की व्यापारवाद ही विचारसरणी जेव्हा जास्त जास्त प्रसारात येत होती त्या वेळेला इग्लंडमध्यें पैशावर आधारलेली अर्थव्यवस्था नुकतीच जन्माला आलेली होती अर्थातच त्या अर्थव्यवस्थेला आपले आसन स्थिर करण्याकरिता अधिकाधिक पैशाची जरुरी होती. तसेच ते दिवस व्यापारी क्रांतीचे होते. वाढत्या व्यापाराला वाढता पैसा हवा होता आणि म्हणूनच व्यापारवाद हे साहजिकच त्या वेळच्या व्यापारी वर्गाचे आर्थिक तत्त्वज्ञान बनले होते. व्यापारवादांतील प्रमुख लोक स्वतः व्यापारी होते व त्यामुळे व्यापाराचे महत्त्व त्यांना विशेष जाणवत होते हे यासबंधात विशेष लक्षात ठेवण्याजोगे आहे. व्यापारवादाचा प्रमुख मन् हा त्याच्या मृत्यूपर्यंत ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालकमंडळात होता हे येथे मुद्दाम सांगितले पाहिजे त्या वेळची राजसत्ता व्यापारवादाला सहज बळी पडू शकेल अशीच होती. त्या वेळच्या राजसत्तेची मुख्य नड पैशाचीच होती. राजाना अर्थातच युद्धे करण्याकरिता व आपल्या इतर निकडी भागविण्याकरिता पैसा हवा होता. अशा तऱ्हेने वाढता पैसा ही त्या वेळची मुख्य गरज होती व ह्या गरजेतून पैसा हीच राष्ट्राची संपत्ति हे ब्रीदवाक्य उद्‌भवणे व त्याला जवळजवळ तत्त्वज्ञानाचे स्वरूप येणे हे साहजिकच होते. वाढता पैसा ही गरज असणाऱ्या इंग्लंडसारख्या देशाने पैसा मिळविण्याचे एकमेव साधन म्हणून निर्यात व्यापार वाढविणें ह्याला महत्त्व द्यावे हे साहजिकच होते. यामुळे दोन कामे साधता येत होती निर्यात व्यापार वाढविण्यानें इंग्लिश व्यापाऱ्याच्या वाढत्या आकांक्षेला वाव

मिळू शकत होता आणि शिवाय देशात जास्त पैसा खेळणे हीहि गोष्ट शक्य होत होती. शिवाय सोने, चांदी इत्यादि धातूचाच जेव्हा पैसा म्हणून उपयोग होत होता तेव्हा इंग्लडला त्या धातू मिळविण्याचे अन्य साधन उपलब्धच नव्हते. कारण त्या धातू इंग्लडमध्ये सापडत नाहीत.

साराश, पैसा हीच सपत्ति व निर्यात व्यापार वाढविणे हाच ती सपत्ति मिळविण्याचा उपाय ह्या व्यापारवादाच्या दोन्ही विधानात आज फारसा अर्थ उरलेला नसला तरी देशात वाढता पैसा असावा ही कल्पना त्या वेळची परिस्थिति लक्षात घेता अगदी चुकीची नव्हती तसेच पैसा हीच सपत्ति नसली तरी ज्या अर्थव्यवस्थेत वस्तूच्या मूल्याचे मापन करण्याकरिता पैसा वापरला जातो व ज्या अर्थव्यवस्थेत किमतीमानातील बदलाचे उत्पादनावर अनुकूल वा प्रतिकूल परिणाम होतात त्या अर्थव्यवस्थेत देशात पैसा किती खेळतो आहे ह्याला महत्त्व असल्यामुळे व्यापारवाद्यानी पैशाला दिलेले महत्त्व योग्य होते असे म्हणणे भाग आहे. ते महत्त्व सागण्याच्या भरात साध्य व साधन ह्याच्यात त्याच्याकडून गफलत झाली व पैसा म्हणजेच सपत्ति असें अतिरजित विधान त्यानी केले. पैसा व इतर वस्तूचे उत्पादन ह्याचा सबध त्या वेळेस त्याच्या लक्षात येणे शक्य नसल्यामुळे पैशाला त्याच्याकडून दिल्या गेलेल्या महत्त्वाला शास्त्रीय स्वरूप काहीहि नसून ती एक केवळ त्यांना सहजस्फूर्त बरोबर वाटणारी अशी गोष्ट होती

**निसर्गवाद**

व्यापारवादानतरचा पण ॲडॅम स्मिथपूर्वीचा दुसरा अर्थशास्त्रीय विचार म्हणजे निसर्गवाद. हा विचार सागणाऱ्याना निसर्गवादी असे म्हणता येईल निसर्गवादाचा उद्भव फरान्समध्ये १८ व्या शतकाच्या सुरुवातीला झाला निसर्गवाद्याचा प्रमुख क्विस्ने (१६९४–१७७४) हा होता. त्याच्या व टर्गोट याच्या ग्रथामधून निसर्गवाद्याची अर्थशास्त्रीय विचारसरणी प्रामुख्याने सागितली आहे. ती विचारसरणी कोणती हे पुढील विवेचनावरून समजून येईल

**निसर्गवादाचा गाभा**

निसर्गवाद ह्या अर्थशास्त्रीय विचारसरणीची मध्यवर्ती कल्पना ही की शेती हेंच संपत्तीचे मूळ. निसर्गनिर्मित शेतकी वस्तू हीच खरोखुरी सपत्ति व ह्या वस्तू मिळविण्याकरितां खर्च पडणारे म्हणजेच शेतकऱ्याचे श्रम

हेच खरेखुरे उत्पादकश्रम. ह्यावरून शेतकी हाच उत्पादक, एकमेव मानाचा धंदा हे ओघानेच आले. केवळ शेतकीलाच उत्पादक धंद्याचे निसर्गवाद्यांनी स्थान दिले ह्याला दोन कारणे होती. एकतर जीवनाला अत्यावश्यक अशा धान्यादि वस्तू शेतीपासून मिळतात हे त्यांना स्पष्ट दिसत होते. त्या वेळच्या जीवनाला अत्यावश्यक अशा जरूरीच्या वस्तूचे प्राधान्य असलेले राहणीमान, ग्रामीण व निसर्गाच्या सान्निध्यातील जीवन लक्षात घेता जीवनाचा आधारस्तंभ असें ज्यांना यथार्थतेने म्हणता येईल व ज्यांच्या निर्मितीत निसर्गाचे कार्य अधिक आहे असे वाटण्याजोगी परिस्थिति असतें अशा शेतीपासून प्राप्त होणाऱ्या वस्तू म्हणजेच संपत्ति असे त्यांना वाटावे हे साहजिकच होते अर्थात् त्यांनी ज्याला संपत्ति म्हटलें त्या वस्तू उत्पादित करणारा शेतीचा धंदा हाच एकमेव उत्पादक धंदा असें त्यांना वाटावे हे त्यांच्या दृष्टीने योग्यच होते. शेतीला मानाचें स्थान देण्याचे त्यांचें दुसरे कारण असे की शेती ह्या धंद्यातच संपत्तीची वृद्धि करून वाढावा (Surplus) निर्माण करण्याची कुवत आहे असे त्यांचें मत होते. शेतीत वृद्धि अशा अर्थाने होते की शेतकीवस्तूचे उत्पादन करावयास लागणाऱ्या भांडवलापेक्षा म्हणजे साधनभूत संपत्तीपेक्षा किती तरी जास्त संपत्तीचे उत्पादन शेतीमध्ये होऊ शकते व शेतकीवस्तू उत्पादन करण्यास लागणारी साधनभूत संपत्ति म्हणजे मुख्यतः बी बियाणे व उत्पादनकालात शेतकी करणाऱ्याच्या उदरनिर्वाहाकरिता लागणाऱ्या धान्यादि जरूरीच्या वस्तू. शेतकीपासून होणारे उत्पादन व त्या उत्पादनाकरिता लागणारा वस्तूंचा साठा ह्या दोहोंमध्ये फार मोठी तफावत असते हे उघडच आहे पेरलेले बी जेवढे असते त्या मानाने होणारे उत्पादन कितीतरी अधिक असते. उत्पादनाच्या कालात शेतकरी जेवढे खातो त्याच्या कितीतरी पट धान्य उत्पादन होण्यास तो त्या कालात हातभार लावतो. ह्या तफावतीस उद्देशूनच वाढावा असा शब्दप्रयोग करून निसर्गवाद्यांनी शेतकीला मानाचे स्थान दिले. त्यांची ही विचारसरणी लक्षात घेता जीवनाला अत्यावश्यक अशा वस्तू पुरविण्याचें व संपत्ति वाढविण्याचे एकमेव साधन म्हणून ते शेतकीकडे पाहात असत हे कळून येईल. ह्या दोन्ही गोष्टी साध्य करण्याचें श्रेय अर्थातच निसर्गाकडे जातें आणि म्हणूनच त्यांना निसर्गवादी हे नाव प्राप्त झालें असावे.

**शेतीशिवाय अन्य व्यवसाय अनुत्पादक**

शेती हाच एकमेव उत्पादक व्यवसाय असे म्हटल्यानंतर इतर व्यवसायाना म्हणजे व्यापार, औद्योगिक वस्तूची निर्मिति इत्यादि व्यवसायाना निसर्गवाद्यानी अनुत्पादक (Unproductive) किंवा त्याच्याच शब्दात सागावयाचे असेल तर नपुसक (Sterile) म्हणावे हे क्रमप्राप्तच होते. उद्योग धद्याला त्यानी अनुत्पादक हे विशेषण लावले ह्याचे कारण उद्योगधदा म्हणजे कोणत्याहि नव्या वस्तूची निर्मिति नसून निसर्गाने पूर्वीच पुरविलेल्या एखाद्या वस्तूला केवळ वेगळा आकार देणे म्हणजेच उद्योगधदा अशी त्याची कल्पना होती. लाकडाला विशिष्ट आकार देऊन त्याचे टेबल खुर्च्यात रूपातर करणें किंवा कापसाचे कापडात रूपातर करणे ह्यात नवीन निर्मिति ती कसली व नवीन निर्मिति नसेल तर त्याला उत्पादन तरी का म्हणावयाचे असा प्रश्न त्याना पडत असे. उद्योगधद्याची जर ही गोष्ट तर व्यापाराला ते उत्पादनक्रिया म्हणतील हे शक्यच नव्हते. व्यापारी म्हणजे केवळ उत्पादकाने उत्पादिलेले उपभोगकाला पोहोंचविणारा मध्यस्थ. ही क्रिया करीत असता तो स्वत:ची अशी काहीच भर मूळच्या उत्पादनात टाकत नाही ह्या मुद्यावर व्यापाराला उत्पादक श्रमाचा हुद्दा देण्याचे निसर्गवादी स्पष्टपणे नाकारीत असत. उद्योगधंद्यात व व्यापारांत वस्तूची किमत वाढत असे हे निसर्गवाद्याना अर्थातच समजत होते. पण त्यावर त्याचे म्हणणे असे की उद्योगधदा करणारे कामगार व व्यापारी ह्याना चरितार्थाच्या वस्तू मिळविता येणे शक्य व्हावे इतक्या प्रमाणातच त्या वस्तूची किमत उद्योगधद्यांत व व्यापारात वाढते (त्यापेक्षा जास्त वाढल्यास ती वाढ अयोग्य असे म्हणावयास त्याची तयारी होतीच.) व त्या दृष्टीने पाहता औद्योगिक कामगार व व्यापारी हे शेतकीवरील एक भारच असे त्याचे म्हणणे होते. अनुत्पादकश्रम करणारा वर्ग समाजात असणें अपरिहार्य आहे असे ते जरी मानीत असले तरी त्या वर्गातील लोकाची संख्या शक्य तितकी कमी असणे हे संपत्तीचे उत्पादन व वाढ ह्याकरिता अवश्य आहे अशी त्यांची विचारसरणी होती. थोडक्यात म्हणजे व्यापार व उद्योगधदा ह्या आवश्यक पण तरीहि अनुत्पादक अशा गोष्टी आहेत अशी त्यांची व्यापार व उद्योगधंदा ह्यांकडे पाहण्याची दृष्टि होती.

**सरंजामदारादि लोकांचा वर्गहि शेतकीवर भारच पण तरीहि उत्पादक**

उत्पादक शेतकरी वर्ग व अनुत्पादक व्यापार-उद्योगादि व्यवसाय करणाऱ्याचा वर्ग ह्या दोन वर्गव्यतिरिक्त आणखी एक विशेष वर्ग निसर्गवाद्यानी मानला होता. तो वर्ग म्हणजे सरदार, जमीनदार राजेरजवाडे इत्यादि लोकाचा. ह्या वर्गातील लोकाचे व अनुत्पादक वर्गातील लोकाचे एक विशेष साधर्म्य निसर्गवाद्यानी दाखविले आहे ते म्हणजे ह्या वर्गातील लोकाचा उदरनिर्वाहाचा बोजा अनुत्पादक लोकाच्याप्रमाणेच शेतकी व्यवसाय करणाऱ्या लोकाच्यावरच पडतो. असे असले तरी ह्या वर्गातील लोकाना अनुत्पादक म्हणण्याची मात्र निसर्गवाद्याची तयारी नव्हती. प्रत्यक्ष संपत्तीचे उत्पादन करणारे ह्या अर्थाने ह्या वर्गातील लोक उत्पादक नाहीत एवढे जरी निसर्गवाद्याना मान्य असले तरी एका विशेष अर्थाने ह्या वर्गातील लोकाची गणना उत्पादक वर्गातच केली पाहिजे असे त्याना वाटत असे. मालक ह्या नात्याने भूमीच्या रक्षणाची व पोषणाची अंतिम जबाबदारी ह्या वर्गावर आहे व त्यामुळे भूमीपासून होणाऱ्या उत्पादनाची जबाबदारी फार मोठ्या प्रमाणात ह्या वर्गातील लोकाकडे जाते असे ते म्हणत असत. आणि त्याच विशेष अर्थाने ह्या वर्गातील लोकाना निसर्गवादी उत्पादक म्हणत असत. ह्या वर्गाची समाजाला अत्यंत जरूर आहे ह्याबद्दल अर्थातच निसर्गवाद्यांच्या मनात मुळीच संशय नव्हता. प्रत्यक्ष श्रम करणारे कारखानदार, व्यापारी ह्याना अनुत्पादक ठरवून स्वस्थ बसून केवळ मालकी हक्क गाजविणाऱ्या सरंजामदाराना विशिष्ट अर्थाने का होईना पण उत्पादक ठरविण्यांत निसर्गवाद्याची थोडीशी विसंगति होती हे स्पष्ट दिसते. त्या विसंगतीचा खुलासा एवढाच की, सरंजामदाराचे त्या वेळच्या समाजातील स्थान व सत्ता पाहता त्याना अनुत्पादक म्हणण्याचे धाष्टर्य निसर्गवादात नव्हते. शिवाय शेतीशी दूरचा संबंध असणारेहि उत्पादकच अशी त्यांच्यापैकीं काहीची प्रामाणिक समजूत होती

**व्यापारवाद्यांचा संपत्तिसंचलनाबद्दलचा सिद्धान्त**

सरदार, जमीनदारादि लोक व व्यापार उद्योगादि व्यवसाय करणारे लोक ह्याचा बोजा शेवटी शेतकी व्यवसाय करणाऱ्या लोकाच्यावरच पडतो, ह्या निसर्गवाद्याच्या कल्पनेतच त्याचा संपत्तिसंचलनाचा

सिद्धान्त (Theory of circulation of Wealth) मांमावलेला आहे शेतकीचा व्यवसाय करणाऱ्याकडूनच फक्त संपत्तीची निर्मिति होते व त्या संपत्तीमुळेच इतरांना उदरनिर्वाह करणे शक्य होते असे एकदा प्रतिपादल्यानंतर शेतकी व्यवसाय करणाऱ्याकडून उत्पादिलेल्या धान्यादि वस्तु इतराकडे कशा जातात ह्यासंबधी काही खुलासा करणे निसर्गवाद्यांना भागच होते. त्यांनी केलेला खुलासा म्हणजेच त्यांनी प्रतिपादिलेला संपत्ति-संचलनाचा सिद्धांत. ह्या सिद्धांताला क्विस्नेच्या Tableau Economique (१७५८) ह्या ग्रंथात प्रमुख स्थान देण्यात आले आहे. हा सिद्धांत काय आहे ते पाहू.

संपत्ति संचलनाचा सिद्धान्त –समाजांत उत्पादकांचा म्हणजे शेतकी व्यवसायात राबणाराचा, जमीनदाराचा व व्यापार उद्योगादि अनुत्पादक व्यवसाय करणाऱ्याचा असे तीन वर्ग असतात. हा सिद्धांत निसर्गवाद्याच्या कल्पनेवर आधारलेला आहे तो सिद्धांत सांगण्याकरिता क्विस्नेने काल्पनिक आकडेवारी घेऊन चलनक्रियेचे विवेचन केले संचलनक्रियेचे क्विस्नेकृत वर्णन पुढीलप्रमाणे आहे.—कोणत्याहि वर्षाच्या उत्पादनाची पैशातील किमत एकूण पाच कोटी आहे असे धरून चालले तर त्यातील दोन कोटी प्रथमच मागील वर्षाचा उत्पादनखर्च आणि म्हणूनच पुढील वर्षाच्या उत्पादनास लागणारे खेळते भांडवल (Circulating Capital) म्हणून वगळले जातात ह्या दोन कोटीतच अर्थात बी-बियाणे इत्यादिकांचा खर्च व शेतकीकरिता राबणाऱ्याचा चरितार्थ खर्च ह्याचा समावेश होतो ते दोन कोटी वगळता तीन कोटीचे उत्पादन शिल्लक उरते ह्या तीन कोटीच्या उत्पादनापैकी एक कोटीचे उत्पादन उद्योगधंद्यास लागणाऱ्या कच्च्या मालाच्या स्वरूपात व बाकीचे म्हणजे दोन कोटीचे धान्याच्या स्वरूपात असते ह्या तीन कोटीच्या उत्पादनाशिवाय मागील वर्षातील व्यवहारामुळे आलेली दोन कोटीची रक्कम शेतकऱ्याकडे असते तीच रक्कम ते जमीनदारांना सारा (Rent) म्हणून देतात. ह्या साऱ्यापैकी एक कोट रक्कम खर्च करून जमीनदार शेतकऱ्याकडून धान्य घेतात आणि त्या रूपाने साऱ्याचा अर्धा भाग शेतकऱ्यांना परत मिळतो साऱ्यापैकी उरलेली एक कोट रुपयांची रक्कम जमीनदार वर्ग अनुत्पादक वर्गाकडून औद्योगिक वस्तू विकत घेण्याकरिता खर्च करितो. त्याच रकमेचा

उपयोग अनुत्पादक वर्ग शेतकऱ्याकडून धान्य खरेदी करण्याकरितां करतो आणि अशा तऱ्हेने साऱ्याचा उरलेला भागहि शेतकऱ्याकडे परत येतो. त्याचाच उपयोग करून शेतकरी वर्ग अनुत्पादक वर्गाकडन औद्योगिक वस्तू खरेदी करतो. पण तरीसुद्धा ती रक्कम त्याच्याकडून कायमची जात नाही. कारण त्याच रकमेचा उपयोग करून अनुत्पादक वर्ग औद्योगिक वस्तूच्या निर्मितीकरिता लागणारा कच्चा माल शेतकऱ्याकडून घेतात व त्या रूपाने ती रक्कम परत शेतकऱ्याकडे पाठवितात. ह्या ठिकाणी संचलनक्रिया थाबते. ती थाबल्यावेळी जी शेतकऱ्याजवळ दोन कोटीची रोख रक्कम जमते तीच पुढील वर्षी सारा द्यावयास उपयोगी पडते. सचलनक्रिया थाबल्यावेळी मूळ उत्पादिलेल्या पाच कोटीच्या धान्यापैकी दोन कोटीचें धान्य शेतकऱ्याकडे, एक कोटीचें जमीनदारांकडे, एक कोटीचे अनुत्पादक वर्गाकडे असते व मूळ उत्पादिलेला एक कोटीचा कच्चा माल त्याची ज्याना जरुरी आहे त्यांच्याकडे म्हणजे अनुत्पादक वर्गाकडे गेलेला असतो (मूळच्या उत्पादनाची वाटणी विशिष्ट सचलनक्रियेनुसार होत असल्यामुळे निसर्गवाद्यांच्या सचलनाबद्दलच्या कल्पनात त्याच्या सपत्तीच्या विभाजनाच्या कल्पनाहि समाविष्ट आहेत असे म्हणण्यास हरकत नाही.) सचलनक्रिया पूर्ण झाल्यावेळी आणखी एक उल्लेखनीय गोष्ट झालेली असते. ती म्हणजे अनुत्पादक वर्गाजवळ एक कोटीचे धान्य व एक कोटीचा कच्चा माल जमा झालेला असतो. त्या आधारावर ते औद्योगिक वस्तू तयार करतात व त्याची किमत दोन कोटी होते. हे दोन कोटी पुढील वर्षी कसे वसूल होतात व त्याचा उपयोग पुन्हा कसा केला जातो हे सचलनक्रियेवरून स्पष्ट होईलच.

**निसर्गवाद्यांच्या अर्थशास्त्रीय प्रमुख कल्पना**

वर सांगितलेला सपत्तीच्या सचलनासंबधीचा सिद्धान्त हा विवस्नेच्या चातुर्याचा पुरावाच आहे कारण त्यात निसर्गवाद्याच्या अर्थशास्त्रविषयक सर्व प्रमुख कल्पना एकत्रित व स्पष्टपणे व्यक्त झाल्या आहेत. त्या कल्पना व त्याच्यावरील सिद्धान्तांत झालेला अतर्भाव साराशरूपाने पुढीलप्रमाणे सागता येईल. (१) सपत्तीची वृद्धि शेतकीमध्येच होते वरील सिद्धांतात दोन कोट किमतीच्या धान्यावर आपला चरितार्थ चालविणाराकडून पाच कोटीचा माल

उत्पादित होतो असे दाखविले आहे. तीन कोटी रुपयाच्या शेतकी वस्तू म्हणजेच शेतकीत प्राप्त होणारी जादा कमाई. (२) औद्योगिक व्यवसाय करणाऱ्याचा वर्ग अनुत्पादक असतो. शेतकऱ्याकडूनच घेतलेल्या कच्च्या मालाला निराळा आकार देण्याचेच काम त्या वर्गातील लोकाकडून होत असल्याने तो वर्ग नवीन काही निर्माण करीत नाही. शिवाय त्या व्यवसायात जादा कमाईहि नाही. औद्योगिक वस्तूची किमत, कच्च्या मालाची किमत व औद्योगिक व्यवसाय करणाऱ्याच्या चरितार्थाकरिता लागणारा खर्च ह्याच्या बेरजेइतकीच असते हे क्विस्नेच्या सपत्तिसंचलनक्रियेत मुद्दाम दाखविण्यांत आले आहे. (३) शेतकीशिवाय अन्य व्यवसाय करणाराचा बोजा शेवटी शेतकीवरच पडतो. तो बोजा पेलणे शेतकीला त्यामध्यें जादा कमाई म्हणजे सपत्तीची वृध्दि होत असल्यामुळे शक्य होते. क्विस्नेच्या सिद्धान्तात २ कोटीच्या शेतकीत ३ कोटीची जादा कमाई कशी होते व त्या कमाईतून जमीनदार, राजे-रजवाडे ह्या वर्गाचा व औद्योगिक व्यवसाय करणाराचा चरितार्थ कसा चालतो आणि उद्योगधद्याला कच्च्या मालाचा पुरवठा कसा होतो हे मोठ्या कुशलतेने दाखविण्यात आले आहे. (४) पैसा ही सपत्ति नसून केवळ अदलाबदलीचे साधन आहे. क्विस्नेने प्रतिपादिलेल्या सचलनक्रियेमध्ये होणारे व्यवहार पैशात होत असले तरी पैसा हे त्या व्यवहारावर घातलेले केवळ आवरण आहे. ते आवरण बाजूला केल्यास ते व्यवहार म्हणजे दुसरे तिसरे काही नसून वस्तूची एका वर्गाकडून दुसऱ्या वर्गाकडे होणारी आवकजावक आहे असे दिसून येते. पैशाच्या आवरणाखालून धान्य शेतकऱ्याकडून जमीनदाराकडे औद्योगिक व्यवसाय करणाऱ्याकडे, कच्चा माल शेतकऱ्याकडून औद्योगिक व्यवसाय करणाराकडे व औद्योगिक वस्तू त्या तयार करणाराकडून जमीनदाराकडे व शेतकऱ्याकडे जात असतात. त्याची हालचाल सुलभ करणे एवढेच पैशाचे कार्य. ह्या पलीकडे पैशाला आर्थिक व्यवस्थेत महत्त्व नाही असे क्विस्नेचे म्हणणें होतें व ते त्याच्या सिद्धान्तात चागल्या प्रकारे व्यक्त झाले आहे.

**निसर्गवादामागील सामाजिक व राजकीय मतप्रणाली**

निसर्गवाद्याच्या आर्थिक विचारसरणीचे विवेचन वर केले आहे. ते विवेचन सपविण्यापूर्वी निसर्गवाद्याच्या आर्थिक विचारसरणीमागे काही विशिष्ट सामाजिक व राजकीय मतप्रणाली होती का आणि अर्थशास्त्रातील

त्याचे स्थान काय ह्या प्रश्नाची उत्तरे द्यावी लागतील. पहिल्या प्रश्नाचे उत्तर होकारार्थीच आहे. निसर्गवाद्याचे आर्थिक लिखाण काळजीपूर्वक तपासून पाहिल्यास असे दिसून येईल की त्याचा मध्ययुगीन समाजरचनेवर (Medieval Social System) म्हणजे ज्या समाजरचनेत सरदार-जमीनदार ह्या वर्गाला मोठे मानाचे स्थान आहे, शेतकी हाच मुख्य व्यवसाय आहे आणि व्यापारउद्योगादि व्यवसायाना व ते करणाऱ्याना कनिष्ठ स्थान आहे अशा समाजरचनेवर फार विश्वास होता व ती समाजरचना सर्वथैव योग्य असेच त्याना वाटत होते. सरदारजमीनदारादि लोकाना विशेष अर्थाने उत्पादक ठरविण्याची त्याची धडपड. व शेतकी हाच उत्पादक व्यवसाय असे सिद्ध करण्याचा त्याचा अट्टाहास ह्या गोष्टी त्या भावनेच्याच निदर्शक आहेत. मध्ययुगीन समाजरचनेवर निसर्गवाद्याचा जसा विश्वास होता तसाच निसर्गनियमाच्या (Laws of Nature) अचूकतेवर व आदर्शत्वावरहि त्याचा विश्वास होता. निसर्गवाद्याच्या मते मानवी जीवन हे निसर्गाच्या नियमानी बद्ध आहे. हे नियम बदलणें मनुष्याच्या शक्तीबाहेरचे आहे ह्या नियमानुसार चाललेल्या गोष्टीत अडथळा आणण्याचा प्रयत्न मनुष्याने केल्यास त्याचे फळ मनुष्यालाच भोगावे लागते; तेव्हा तसा प्रयत्नहि न करता निसर्गनियमाचे ज्ञान करून घेऊन त्यानुसार वागणे हेच मनुष्याचे कर्तव्य आहे ह्या कर्तव्याचे पालन मनुष्याला हितकारक ठरते. कारण निसर्गनियम मनुष्याला उपकारक व्हावे ह्या दृष्टीनेच ईश्वराने प्रस्थापित केले आहेत. मनुष्याच्या आर्थिक जीवनाला लागू पडणारा मुख्य निसर्गनियम हा की, मनुष्य आपल्या नैसर्गिक प्रवृत्तीनुसार स्वत चे सरक्षण, पोपण व्हावे व प्रजोत्पादनाचे कार्यहि व्यवस्थित चालावे ह्या उद्देशाने नेहमी स्वहित साधण्याचा प्रयत्न करीत असतो. आणि निसर्गाची करणी अशी की अनेक व्यक्तीची 'स्वहिते' एकमेकाच्या आड तर येत नाहीतच पण त्यानिमित्त मनुष्याला एकमेकाशी सहकार्य करावेच लागते. तेव्हां आपले हित साधण्याचे अनिर्बध स्वातत्र्य व्यक्तीला देणे कोणत्याहि परिस्थितीत व कोणच्याहि दृष्टीने अनिष्ट ठरत नाही.

वरीलप्रमाणे निसर्गवाद्याचे निसर्गनियमासबधाचे तत्त्वज्ञान होते. हे तत्त्वज्ञान क्विस्नेच्या सर्वच लिखाणांत जागोजाग विखुरले आहे. त्याच्या सपत्तिसकलनाच्या सिद्धान्तांत ते गर्भित आहे. त्या सिद्धान्तात समाजातील तीन वर्ग परस्परावलबी असतात. तसेच सपत्तिसंचलन अशा प्रकारे

होतें कीं आर्थिक व्यवस्था आपमूक चालू राहाते असे जे दाखविले आहे तें निसर्गवाद्याच्या तत्त्वज्ञानानुसारच आहे

निसर्गवाद्याच्या मध्यकालीन समाजरचनेवरील व निसर्गनियमाच्या अचूकतेवरील विश्वासावरच त्याची राजकीय मतप्रणाली उभारलेली आहे. राजकीय दृष्टचा सरदारजमीनदारादि वर्गाच्या वर्चस्वाखाली असणारी पण आर्थिक व्यवस्थेत शक्य तेवढी कमी ढवळाढवळ करणारी शासनसंस्था निसर्ग-वाद्यांना आदर्श वाटत असे व्यक्तिस्वातंत्र्याच्या त्यांच्या पुरस्काराचा व लोकशाहीचा मात्र काही संबध नव्हता. तसे असते तर सरंजामी वर्गाचा त्यांनी पुरस्कार केला नसता.

**निसर्गवाद्यांची अर्थशास्त्रीय कामगिरी**

अर्थशास्त्राच्या दृष्टीने पाहता दोन गोष्टीबद्दल निसर्गवाद्याना श्रेय द्यावे लागते. पहिली गोष्ट त्यानी केली ती ही की व्यापारवादामुळे फैलावलेला पैसा हीच संपत्ति व परराष्ट्रीय व्यापार हेच संपत्तीचें साधन, ह्या समजाला त्यानी मूठमाती दिली जीवनोपयोगी वस्तूंनाच संपत्ति समजले पाहिजे आणि अशा प्रकारच्या संपत्तीचे उत्पादन व विभाजन सुलभ होण्यास अदलाबदलीचे साधन होऊन मदत करणे एव-ढेच आर्थिक व्यवस्थेत पैशाचे कार्य आहे. ह्या आजच्या अर्थशास्त्राने मान्य केलेल्या कल्पना प्रथम जोरदारपणें मांडलेल्या अशा निसर्गवाद्याच्या लिखाणात आढळतात. ह्या दिशेने विचार केल्यास निसर्गवादाला व्यापार-वादाची प्रतिक्रियाच म्हणावे लागेल. तत्त्वाच्याच नव्हे तर धोरणाच्या बाबतीतहि निसर्गवाद व्यापारवादाची प्रतिक्रिया होता. कारण व्यापारवाद अमलात आणल्यामुळे गेलेली शेतकीची प्रतिष्ठा शेतकीला परत आणून देण्याचा उद्देश निसर्गवाद्याच्या सर्वच लिखाणात प्रामुख्याने होता. हें कार्य निसर्गवाद्यानी चागले केले व ते करताकरताच अर्थशास्त्रातील काही मूलभूत कल्पनाच्या घडणाला मदत केली यात शंका नाही.

निसर्गवाद्याची दुसरी कामगिरी ही की, अर्थशास्त्राचा आजचा सागाडा बहुताशी त्यानीच तयार केला. संपत्ति म्हणजे काय संपत्तीच्या उत्पादनाचें व विभाजनाचे नियमन कोणत्या तत्त्वानुसार होते ह्यासबधीचे विवेचन अर्थशास्त्रात प्रामुख्याने आढळते. हे प्रश्न निसर्गवाद्याच्या लिखाणात

र्चिलेले आढळतात, मग त्यांचे विवेचन बरोबर असो किंवा चूक असो, हे कबूल करणे भाग आहे मात्र अर्थशास्त्राचा सागाडा पूर्णपणे त्याच्या लिखाणात आला नाही (अर्थशास्त्रात मध्यवर्ती मानल्या गेलेल्या मूल्याच्या प्रश्नाला त्यानी स्पर्शसुद्धा केला नाही त्या प्रश्नाची जाणीवच त्याना नसावी). शिवाय वर सागितल्याप्रमाणे विशिष्ट समाजरचनेला पोषक असे लिखाण करणें हा त्याचा हेतु असल्यामुळे अर्थशास्त्राची तर्कशुद्धताहि त्याच्या लिखाणात आढळत नाही. तर्कशुद्धतेला महत्त्व त्यांनी दिले असते तर कदाचित् व्यापार, उद्योग करणाराना अनुत्पादक ठरवून सरदार-जमीनदाराना उत्पादक ठरविले नसते निसर्गवाद्याच्या आर्थिक विचारसरणीने १८ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास चागलेच मूळ धरले होते आणि क्विस्नेच्या मृत्यूच्या सुमारास (१७७४) तर निसर्गवादाला चागलीच लोकप्रियता लाभली होती. त्याच वर्षी निसर्गवादाचा एक चाहता टर्गाट हा फरान्सचा फडणीस झाला आणि त्याने निसर्गवादावर आधारलेल्या कांही सुधारणा अमलांतहि आणल्या. निसर्गवादाची लोकप्रियता अल्पकालीनच ठरली. १७७६ हे वर्ष निसर्गवादाला मारक ठरले त्या वर्षी टर्गाटला फडणीसपदावरून काढण्यात आले आणि त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे अर्थशास्त्राचा जनक म्हणून समजल्या गेलेल्या अॅडॅम स्मिथचें 'राष्ट्राची सपत्ति' (Wealth of Nations) हे पुस्तक बाहेर आले. ह्या पुस्तकात केलेल्या निसर्गवादावरील हल्ल्याने निसर्गवाद पुरा नामशेष झाला. निसर्गवादावरील स्मिथच्या हल्ल्याचे स्वरूप काय होते हे पुढील प्रकरणावरून स्पष्ट होईलच. ह्या ठिकाणी निसर्गवाद्यांची सपत्तीची व्याख्या कशी चूक होती ते स्मिथने दाखविले व त्यामुळे त्या व्याख्येवरच आधारलेले निसर्गवाद्यांचे अर्थशास्त्र गडगडले; एवढे सुचविले असता पुरे होईल. निसर्गवादाला नामशेष करणाऱ्या व अर्थशास्त्राचा जनक समजला जाणाऱ्या अॅडॅम स्मिथच्या विचाराचे विवेचन पुढील प्रकरणात केले आहे.

---

# ३ : : अर्थशास्त्राचा जनक अॅडम स्मिथ व त्याचे विचार

अर्थशास्त्राचा जनक अॅडम स्मिथ (१७२३–१७९०). ह्याचा जन्म १७२३ मध्ये स्कॉटलडमधील एका खेडयात झाला. वयाच्या १४ व्या वर्षी त्याने ग्लासगो विद्यापीठात प्रवेश केला तेथे त्याने नैतिक तत्त्वज्ञानाचा (Moral Philosophy) अभ्यास केला व त्याच विद्यापीठात त्याने १७५१ पासून १७६३ पर्यंत काही वर्षे नैतिक तत्वज्ञानाचा प्राध्यापक म्हणून काम केले. त्याच काळात म्हणजे १७५९ मध्ये त्याचे 'नैतिक भावनाचे तत्व' (Theory of Moral Sentiments) हे पहिले पुस्तक प्रसिद्ध झाले त्या पुस्तकाने त्याला बरीच कीर्ति मिळाली. त्यामुळेच एका प्रसिद्ध व तरुण सरदाराचा वैयक्तिक शिक्षक म्हणून त्याची नेमणूक झाली त्या सरदारा-बरोबरची बरीच वर्षे त्याने युरोपातील इतर देशाचा प्रवास करण्यांत घालवली फरान्समध्ये त्याचा क्विस्ने आणि इतर फ्रेच अर्थशास्त्रज्ञाशी परिचय झाला. १७७६ मध्ये त्याचे जगद्विख्यात पुस्तक 'राष्ट्रांची सपत्ति' (Wealth of Nations) हे प्रसिद्ध झाले. ह्या पुस्तकाचे प्रकाशन म्हणजेच अर्थशास्त्राचा जन्म असे सर्वसामान्यपणे समजले जाते. ह्या पुस्तकाचे सपूर्ण नाव 'राष्ट्राच्या सपत्तीच्या स्वरूपाची व कारणाची चौकशी' (An Inquiry into the Nature and Causes of the Wealth of Nations) असे आहे १७८७ मध्ये ग्लासगो विद्यापीठात 'लॉर्ड रेक्टर' ह्या जागेकरिता त्याची निवडणूक झाली. १७९० मध्ये तो मरण पावला. अॅडम स्मिथच्या चरित्रासंबधी एवढी माहिती करून घेतल्यानंतर त्याच्या अर्थशास्त्रीय विचारसरणीकडे वळण्यास हरकत नाही.

व्यापारवादी व निसर्गवादी ह्याच्याप्रमाणेंच स्मिथने संपत्ति म्हणजे काय व तिचा उगम कशांत आहे ह्याच प्रश्नाने आपल्या विचाराचा प्रारभ केला. पण ह्या प्रश्नाचें त्याचे उत्तर मात्र अगदी भिन्न होते. व्यापारवाद्या-माणें पैसा हीच संपत्ति किंवा निसर्गवाद्याप्रमाणे शेतकीवस्तू हीच

संपत्ति असे न प्रतिपादता स्मिथने मानवी जीवनाला जरूर असणाऱ्या व मनुष्याला सुखसोयी मिळवून देणाऱ्या अशा सर्व वस्तू म्हणजे संपत्ति अशी संपत्तीची ऐसपैस व्याख्या केली. त्याच्या संपत्तीच्या व्याख्येला एकच मर्यादा होती. ती अशी की ज्या वस्तू साकार अशा आहेत अशा वस्तूचाच त्याच्या व्याख्येत अंतर्भाव झाला होता. संपत्तीच्या उगमस्थानाच्या बाबतीतहि स्मिथ बराच पुढे गेला. व्यापारवाद्याप्रमाणे व्यापारात—विशेषत: परराष्ट्रीय व्यापारात—संपत्तीचे उगमस्थान न शोधता किंवा निसर्गवाद्याप्रमाणे संपत्तीच्या निर्मितीचें श्रेय निसर्गाला न देता त्याने सर्व प्रकारचे उत्पादक मानवी श्रम (Labour) हे संपत्तीचे उगमस्थान आहे असे आग्रहाने प्रतिपादन केले. म्हणजेच पर्यायाने त्याने संपत्तीच्या निर्मितीचे सर्व श्रेय मनुष्याला दिले. ज्या श्रमापासून साकार वस्तूची निर्मिति होत नाही तेवढे श्रम वगळता उरलेल्या सर्व मानवी श्रमप्रकाराचा अंतर्भाव त्याने उत्पादक श्रमात केला होता. स्मिथच्या उत्पादक श्रमाच्या विशिष्ट व्याख्ये-मुळे शिक्षक, वकील, डॉक्टर, राजकारणी पुरुष ह्यांना अनुत्पादक ठरावे लागले. कारण समाजाला ह्या लोकांची अत्यंत गरज असते हे जरी खरे असले तरी ह्या लोकांकडून कोणत्याच साकार वस्तू (Material Goods) निर्माण केल्या जात नाहीत. शिक्षकाने दिलेले शिक्षण, वकिलाने दिलेला कायद्याचा सल्ला, राजकारणी पुरुषांनी प्रस्थापिलेली शांतता ह्या गोष्टी महत्त्वाच्या खऱ्या पण साकार नव्हेत. त्या दृश्य नाहीत किंवा स्पर्श्यहि नाहीत, पण स्मिथच्या संपत्तीच्या व्याख्येचा तो तर्कशास्त्राला धरून होणारा परिणाम असल्याने तो परिणाम अपरिहार्यच आहे. असो. अशा रीतीने सर्व साकार वस्तू ही संपत्ति व मानवी श्रम हा त्या संपत्तीचा उगम हा स्मिथच्या अर्थशास्त्रीय विचारसरणीचा श्रीगणेशा होता. उत्पादक मानवी श्रम हे संपत्तीचे उगमस्थान, असे ठरल्यानंतर मानवी श्रमाची उत्पादनशक्ति वाढविणे व उत्पादक स्वरूपाचे श्रम करणाऱ्यांची संख्या वाढविणे हे संपत्ति वाढविण्याचे दोन मार्ग आहेत असे स्मिथला ओघानेच म्हणावे लागले. कामगारांची उत्पादनशक्ति व उत्पादक कामगारांचे एकूण मानवी श्रम कर-णाराशी प्रमाण ह्या दोहोंमुळे कोणत्याहि राष्ट्रात एका वर्षात उत्पादित होणाऱ्या संपत्तीची मर्यादा ठरते हे आपले मत स्मिथने आपल्या पुस्तकाच्या

प्रारंभीच व्यक्त केले आहे. आणि आपल्या पुस्तकाचा फार मोठा भाग ह्या दोन गोष्टीच्या विवेचनावर म्हणजे कामगाराची उत्पादनशक्ति कशामुळे ठरते व वाढते, तसेच उत्पादक श्रमाचे एकूण श्रमाशी असलेले प्रमाण कशावर अवलंबून असतें ह्या दोन प्रश्नाची उत्तरे देण्याकरिता खर्च केला आहे.

**श्रमविभागणीचें तत्त्व व फायदे**

श्रमविभागणी ( Division of Labour ) हे स्मिथच्या मते कामगाराची उत्पादनशक्ति व उत्पादनकुशलता वाढण्याचे सर्वात मोठे कारण आहे. श्रमविभागणीचें वर्णन स्मिथने मानवी श्रमाच्या उत्पादन-शक्तिसंबंधाची सर्वात मोठी सुधारणा ह्या शब्दानी केले आहे श्रम-विभागणीचे फायदे किती असतात ह्याचे वर्णन टाचण्याचे उत्पादन उदाहरणादाखल घेऊन स्मिथने मोठ्या उत्साहाने केले आहे टाचणी दिसावयास लहानशी असली तरी तिचे उत्पादन अठरा कामगारात विभागता येते स्मिथने पाहिलेल्या एका कारखान्यात हे काम दहा काम-गारात विभागण्यात आले होते. म्हणजेच श्रमविभागणी जितकी तात्त्विक दृष्ट्या करता येणे शक्य होते तितकी करण्यात आली नव्हती. तरीसुद्धा त्या कारखान्यात दरदिवशी ४८००० टाचण्यांचे उत्पादन होत असे म्हणजे दर दिवशी दर माणशी ४८०० टाचण्या झाल्या त्या दहा कामगारानी स्वतंत्रपणे म्हणजे श्रमविभागणीचा अवलंब केल्याशिवाय टाचण्याचे उत्पादन केले असते तर जास्तीत जास्त दरमाणशी दिवसाला २० टाचण्याचे उत्पादन झाले असते श्रमविभागणीचे महत्त्व ठरविण्याकरिता स्मिथने हा आपला अनुभव सांगितला आहे.

श्रमविभागणीमुळें कामगाराची उत्पादनशक्ति वाढते ह्याची स्मिथने तीन कारणे दिली आहेत ती अशी :—(१) प्रत्येक कामगाराच्या काम कर-ण्याच्या कुशलतेत वाढ होते एकाच प्रकारचे काम जन्मभर करण्याचा साहजिक होणाराच हा परिणाम आहे. कांही काही क्रियाच्या बाबतीत सवयीने कामाचा वेग इतका वाढतो की प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय मनुष्याचे हात इतके जलद काम करू शकतील ह्यावर विश्वास बसत नाही असें स्मिथने ह्या संबधात लिहिले आहे (२) एका प्रकारचे काम बंद करून

दुसऱ्या प्रकारचें काम सुरू करण्यात जाणारा वेळ वाचतो व त्या वेळाचा उत्पादनकार्यास उपयोग होऊं शकतो. नवीन काम ताबडतोब सुरू केले तरी त्या कामाबद्दल लगेच उत्साह वाटत नाही व यावा तसा त्या कामाला वेगहि येत नाही. ज्या कामगाराच्या कामाचे स्वरूप व आयुधे दिवसांतून अनेक वेळा बदलतात ते कामगार जास्त आळशी असतात व अत्यत जरुरीच्या वेळीसुद्धा जोरदारपणें काम करण्याची त्याची शक्ति नाहीशी होते असे मत स्मिथने ह्या सबंधात लिहिताना व्यक्त केलें आहे. (३) एकाच कामात आपले सारे लक्ष घालणारा कामगार ते काम करण्याच्या जास्त जास्त सोप्या व जलद पद्धति शोधून काढण्याची कोशीस करतो व ह्या कामगाराच्या प्रवृत्तीतूनच मनुष्याला मदत करणारी अनेक यंत्रे जन्मास आली आहेत. एकच काम कामगारास करावयास लावणाऱ्या श्रमविभागणीचा हा मोठाच फायदा म्हणावयाचा. ह्या फायद्यासंबंधी लिहिताना बहुतेक यांत्रिक शोध सामान्य कामगाराकडूनच झाले आहेत असा शेरा स्मिथने मारला आहे. यंत्राचें उत्पादन हा जेव्हा स्वतत्र धंदा होतो तेव्हा त्या धंद्यातील लोकहि यात्रिक शोध लावतात हें स्मिथने कबल केले आहे. पण यंत्राच्या धद्यांतील श्रमविभागणीच त्या गोष्टीलाहि कारणीभूत होते ही गोष्ट त्याने मुद्दाम दाखविली आहे. श्रमविभागणीच्या फायद्याची कारणें देऊन श्रमविभागणीमुळे उत्पादनात जी वाढ होते त्यामुळे समाजाच्या अगदी खालच्या थरापर्यत सुबत्ता जाऊन पोचू शकते असे मत स्मिथने व्यक्त केले आहे. ह्यावरून श्रमविभागणीबद्दल स्मिथला वाटणारा उत्साह किती होता हे चागलेच लक्षात येते.

ज्या श्रमविभागणीमुळे सुबत्ता निर्माण होते ती श्रमविभागणी मानवी जीवनांत आली तरी कशी हा प्रश्न स्मिथला पडणे साहजिक होते. ह्या प्रश्नाचे उत्तर स्मिथने असे दिलें आहे की, श्रमविभागणीमुळे सुबत्ता निर्माण होणार ह्याची मनुष्याच्या बुद्धीला आगाऊ जाणीव झाली. म्हणून मनुष्याने आपणहून श्रमविभागणी स्वीकारली असे नसून अदलाबदल करणें म्हणजे एक वस्तु देऊन तिच्या मोबदल्यांत दुसरी मिळविणे ह्या मनुष्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीचा तो एक परिणाम आहे. त्या प्रवृत्तीनुसार मनुष्य वागतो तेव्हा त्याचे परिणाम किती दूरगामी असतात ह्याची त्याला जाणीव नसते

ज्या वेळेस अदलाबदल होते तेव्हा तिच्यांत भाग घेणाऱ्याना स्वतःच्या तात्पुरत्या फायद्याशिवाय दुसऱ्या कशाची जाणीव नसते. आपला मुद्दा पटवून देण्याकरिता स्मिथने शिकाऱ्याच्या व धनगराच्या टोळयाचे उदाहरण घेऊन अदलाबदलीची नैसर्गिक प्रवृत्ति श्रमविभागणी कशी निर्माण करते हे दाखवून दिले आहे. ते दाखवतां दाखविताच मनुष्यामनुष्यातील मूळात असलेली भिन्नता (निरनिराळे व्यवसाय करण्याची लायकी ह्या अर्थाने) श्रमविभागणीमुळे कशी उजेडात येते व वाढीस लागते हेहि त्याने दाखविले आहे. अदलाबदलीच्या मनुष्यातील नैसर्गिक प्रवृत्तीमुळे मनुष्यामनुष्यातील बुद्धीच्या भिन्नतेचा एकमेकाना उपयोग होतो.

श्रमविभागणीविषयक आपले सुदर व विस्तृत विवेचन सपविण्यापूर्वी कोणत्याहि वस्तूच्या बाजाराच्या (Market) म्हणजे पर्यायाने मागणीच्या विस्तारावर त्या वस्तूच्या उत्पादनात श्रमविभागणी कोणत्या थरापर्यंत पोचू शकते हे अवलबून असते असे दाखवून दिले आहे. बाजार जितका विस्तृत तितकी श्रमविभागणीला सधि अधिक मागणी थोडी असली म्हणजे मनुष्याला एकाच प्रकारच्या वस्तुचे उत्पादन करणे परवडत नाही कारण त्या वस्तूच्या उत्पादनातील स्वतःच्या जरुरीपेक्षा असलेला भाग देऊन अदलाबदलीत इतराच्या वस्तू मिळवण्याची संधि त्या मानाने कमी असते. अदलाबदलीच्या प्रवृत्तीतून श्रमविभागणी उपजत असल्यामुळे अदलाबदलीच्या शक्याशक्यतेनुसार श्रमविभागणीची मर्यादा ठरविली जावी हे सरळच आहे असें स्मिथचें म्हणणें होते.

श्रमविभागणी आर्थिक व्यवस्थेत एकदा पुरती भिनली की अदलाबदल हा आर्थिक जीवनाचा रोजचाच एक भाग होऊन बसतो. तसे झाले म्हणजे एक अडचण उपस्थित होते व एक प्रश्न उपस्थित होतो. अडचण अशी की दोन व्यक्तीजवळ नेमक्या एकमेकाकरिता हव्या असणाऱ्याच वस्तू असतीलच असे नाही आणि त्या असल्या तरी दोघांची एकमेकाकरिता गरज एकाच वेळीं उपस्थित होईल असेहि नाही. अशा परिस्थितीत अदलाबदल होणें कठीण आहे. दोन व्यक्तीकडे एकमेकांना हव्या असणाऱ्या वस्तू असणें व त्या वस्तूकरिता असलेली एकमेकांची गरज एकाच वेळी उपस्थित होणें ही परिस्थिति अदलाबदल घडून येण्यास आवश्यक आहे

प्रश्न हा की अदलाबदलीची परिस्थिति जेव्हां असेल तेव्हांसुद्धा अदलाबदल होण्यापूर्वी दोन वस्तूचे परस्परातील मूल्य (Value) ठरावे लागते. ते कसें ठरते ? स्मिथच्या चाणाक्ष नजरेतून वरील अडचण व वरील प्रश्न अर्थातच सुटली नाहीत. वरील अडचणीवर तोडगा म्हणूनच पैशाचा उद्‌भव आर्थिक व्यवस्थेत झाला आहे आणि वरील प्रश्नामुळेच अर्थशास्त्रात मूल्य ठरण्याच्या क्रियेला महत्त्व आले आहे. साहजिकच श्रमविभागणीचे पाठोपाठच स्मिथला पसा ही संस्था व मूल्य ठरण्याची क्रिया ह्याचे विवेचन करावे लागलें.

**पैशाचा उद्‌भव**

वर निर्देश केलेल्या अडचणीतूनच पैशाचा उद्‌भव झाला असे त्याने स्पष्टपणे नमूद केले आहे. वरील अडचणीमुळे निर्माण होणारी गैरसोय टाळण्याकरिता कोणीहि शहाणा मनुष्य आपण उत्पादित केलेल्या वस्तूशिवाय अशी एखादी वस्तु जवळ ठेवण्याचा प्रयत्न करतो की जी कोणालाहि केव्हाहि नकोशी वाटू नये. म्हणजेच जिच्या अदलाबदलीत दुसरी कोणतीहि वस्तु केव्हाहि मिळावी. निरनिराळ्या वस्तूचा आतापर्यंत ह्या कामाकरिता उपयोग झाला आहे असे दाखवून स्मिथ म्हणतो की बहुतेक सर्व देशात शेवटी लोकाना धातूची, विशेषत चांदी सोन्याचीच निवड करणे भाग पडले. स्मिथच्या मते कोणत्याहि वस्तूपेक्षा धातू जास्त प्रमाणात अविनाशी असतात व त्यांचे कितीहि बारीक तुकडे करता येतात व ते तुकडे परत जोडता येतात हे मुख्यत: दोन गुण धातूची ह्या कामाकरिता निवड होण्यास कारणीभूत आहेत. प्रथम प्रथम सोने, चांदी ह्या धातू मोठ्या मोठ्या तुकड्याच्या स्वरूपात वापरल्या जात असत; पण त्यामुळे त्या तुकड्याचे प्रत्येक खेपेस वजन करण्याची अडचण उपस्थित होत असे. ही अडचण टाळण्याकरिता तसेच लबाडी करण्याची शक्यता नाहीशी करण्याकरितां सर्व देशात सरकारी शिक्कामोर्तब असणारी नाणी वापरण्याची प्रथा सुरू झाली व अशा तऱ्हेने नाण्याची संस्था अस्तित्वात आली. ऱ्या संस्थेमुळे अदलाबदलीची क्रिया सुलभ होऊन व्यापार-उद्योगाला मोठेंच उत्तेजन मिळाले असें मत स्मिथनें व्यक्त केले आहे. पेढ्यानीं निर्मिलेल्या कागदी पैशाचा वापर ही गोष्टहि स्मिथला परिचित होती. धातुरूपी पैशाची बचत

करणे हे कागदी पैशाचे कार्य आहे. कागदी पैशाला स्वतंत्र अस्तित्व काही नसून केवळ सोयीसाठी धातुरूप पैशाऐवजी तो वापरला जातो. तेव्हा कागदी पैशामुळे देशाच्या द्रव्यनिधीत भर पडते असे समजण्याचे काही कारण नाही असे स्मिथचे कागदी पैशासंबंधी विचार होते. पैशासंबंधीचे आपले विवेचन संपविताना स्मिथ म्हणतो की, सर्व सुधारलेल्या देशात पैसा हे ज्याच्या मध्यस्थी-मुळे सर्व प्रकारच्या वस्तू विकल्या जातात अगर विकत घेतल्या जातात अगर एकमेकाच्या मोबदल्यात दिल्या घेतल्या जातात असे व्यापाराचे साधन झाले आहे अदलाबदलीचे साधन ह्यापलीकडे पैशाला जास्त महत्त्व देण्याचे काहीहि कारण नाही अदलाबदलीमुळे उपस्थित होणाऱ्या मूल्याच्या प्रश्नाचा विचार स्मिथने स्वतंत्रपणेच केला आहे. त्या विचाराला स्मिथने सांगितलेली वस्तूमूल्य ठरण्यासंबंधीची तत्त्वे किंवा स्मिथचा वस्तुमूल्य सिद्धांत (Theory of Value) असे म्हणता येईल. तो सिद्धांत काय आहे ते आता पाहू.

**स्मिथचा मूल्यसिद्धान्त**

प्रत्यक्षात आढळणाऱ्या एका विरोधाभासाकडे वाचकाचे लक्ष वेधून घेऊन स्मिथने वस्तूमूल्याचे आपले विवेचन सुरू केले. तो विरोधाभास असा की जीव-नाला अत्यंत उपयुक्त वस्तूचे बाजारातील मूल्य अत्यंत अल्प असते. क्वचित् प्रसंगीं त्यांना मूल्य नसतेच. ह्याच्या उलट सकृद्दर्शनी जीवनदृष्ट्या ज्याची उपयुक्तता अत्यंत कमी अशा वस्तूंना बाजारात बराच भाव असतो. पहिल्या प्रकारच्या वस्तूंपैकी पाण्याचा, व दुसऱ्या प्रकारच्या वस्तूंपैकी हिऱ्याचा स्मिथने उदाहरणादाखल उल्लेख केला. उपरोक्त विरोधाभासाकडे लक्ष वेधून घेण्यात स्मिथचा उद्देश असा होता की मूल्य ठरण्याच्या क्रियेत उपयुक्ततेला (हल्लीच्या अर्थशास्त्रातील शब्द वापरायचा असला तर उपभोग्यतेला) स्थान नाही हे स्पष्ट व्हावें उपयुक्ततेवर (Use Value) वस्तूचे मूल्य अवलंबून नसले तर कशावर असते हा प्रश्न ताबडतोब उद्‌भवतो ह्या प्रश्नाला स्मिथने सहजस्फूर्त असे जे उत्तर दिले तें असें होते की, एखाद्या वस्तूच्या निर्मितीकरता पडणाऱ्या कष्टावर व त्रासावर त्या वस्तूचें मूल्य अवलंबून असते. ह्या विधानाचा खुलासा त्याने पुढीलप्रमाणे केला.

श्रमविभागणीच्या तत्त्वावर आर्थिक व्यवस्था पूर्णपणे अधिष्ठित झाली की प्रत्येक व्यक्तीला आपल्या गरजेच्या वस्तूकरिता बहुतांशी दुसऱ्याच्या श्रमावर अवलंबून राहावें लागते. हे दुसऱ्याचे श्रम मिळविण्याकरिता त्याला

आपल्याजवळील स्वत च्या उपभोगाकरिता नको असणारी वस्तु द्यावी लागते. त्या वस्तूच्या मोबदऱ्यात दुसऱ्याचे श्रम जितके मिळविता येतील तितके श्रम ही त्या वस्तूची अदलाबदलीतील किमत (Exchange Value) असे म्हणण्यास हरकत नाही. म्हणजेच कोणत्याहि वस्तूच्या अदलाबदलीतील किमतीचे मानवी श्रम हेच खरेखुरे मोजमाप आहे. कोणतीहि वस्तु मिळविण्याकरिता द्यावी लागणारी किमत ही पैशाच्या अगर वस्तूच्या स्वरूपात देण्यात आली तरी ती शेवटी मानवी श्रमांच्या रूपानेच दिली जाते. व्यवहारात मानवी श्रम हे मोजमाप धरताना एक अडचण उपस्थित होते. ती अशी की, निरनिराळ्या प्रकारच्या श्रमात होणारे कष्ट व लागणारी बुद्धि ह्या गोष्टी सारख्या नसतात. त्यामुळे एक तासाचे कठीण काम व दोन तासाचें सोपे काम ह्यांची तुलना करता येत नाही. कोणत्याहि श्रमाचा कठीणपणा किवा त्या श्रमाला लागणारी बुद्धि ह्याचें मापन करता येत नाही. श्रमाच्या स्वरूपातील फरक तर लक्षात घेणे जरूर असते प्रत्यक्ष व्यवहारात बाजारातील घासाघिसीच्या द्वारा हे कार्य केले जाते.

आणखी एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. ती ही की, व्यवहारात कोणत्याहि वस्तूची अदलाबदलीतील किमत पैशात ठरली जाते. मानवी श्रमाच्या भाषेंत ठरली जात नाही. आणि पैसा हा स्वस्त महाग होऊं शकतो. कारण इतर वस्तूप्रमाणेच सोने-चादी ह्या धातूंचे अदलाबदलीतील मूल्य ठरीव नाही. ह्याचाच अर्थ असा की एखाद्या वस्तूकरिता लागणाऱ्या मानवी श्रमात बदल न झाला तरी त्याची पैशातील किमत बदलू शकते असा बदल जेव्हा होतो तेव्हा वरवर पाहाणाऱ्यास मानवी श्रमाचे मूल्य बदलले आहे असा भास होतो. पण तो भासच ! कारण मानवी श्रमाची पैशातील किमत बदलली तरी इतर वस्तूतील म्हणजेच दुसऱ्याच्या श्रमातील किमत बदलत नाही. ही गोष्ट समजण्याकरिता मानवी श्रमाचे खरे मूल्य व नामधारी मूल्य ह्यांच्यात स्पष्ट फरक केला पाहिजे. खरे मूल्य म्हणजे केलेल्या श्रमाच्या मोबदल्यात मिळणाऱ्या पैशाशिवाय इतर वस्तू. नामधारी मूल्य म्हणजे त्या श्रमाच्या मोबदल्यात मिळणारा पैसा नामधारी मूल्य तेच राहूनहि खरे मूल्य कमीजास्त होऊ शकते. किवा खरे मूल्य न बदलता नामधारी मूल्य बदलू शकते, तेव्हा खऱ्या मूल्यातच मानवी श्रमाची

किमत करणें योग्य आहे. ही गोष्ट लक्षात ठेवल्यास निरनिराळ्या वस्तूची मूल्ये ठरविण्यास मानवी श्रम हेंच योग्य साधन आहे हे अधिकच स्पष्ट होते.

वरील तत्त्वे बरोबर असतील तर वस्तूंच्या किमती त्या वस्तूंच्या उत्पादनाकरिता लागणाऱ्या मानवी श्रमांच्या प्रमाणावरून ठरावयास हव्या; म्हणजे दोन दिवसांच्या किंवा दोन तासाच्या श्रमानें उत्पादित झालेल्या वस्तूची किमत एका दिवसाच्या अगर एका तासाच्या श्रमानें झालेल्या वस्तूच्या किमतीच्या दुप्पट असावयास हवी. तसेच वस्तूची सर्व किमत ही त्या उत्पादन करणाऱ्या कामगाराचें उत्पन्न व्हावयास हवी. पण स्मिथच्या मतें असें फक्त समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत म्हणजे जीत मानवीश्रम हाच उत्पादनाचा घटक असतो त्या अवस्थेंत होते. ह्या बाबतीत स्मिथनें शिकारी अवस्थेतील मानवांच्या व्यवहाराचें उदाहरण दिलें आहे. त्या अवस्थेंतील समाजात निरनिराळ्या जनावरांच्या शिकारीला किती कष्ट पडतात ह्यावरून त्या जनावराचें मूल्य ठरत असलें पाहिजे. वाघाच्या शिकारीला हरणाच्या शिकारीच्या दुप्पट श्रम करावे लागत असले तर एका वाघाचें मूल्य दोन हरिणाइतके होत असले पाहिजे. प्राथमिक अवस्था संपून समाजांत एकदां भांडवलाची वाढ झाली आणि तें भांडवल व निसर्गाची देणगी जी जमीन ती काही व्यक्तीच्याच खाजगी मालकीखाली आली की मूल्य ठरण्याच्या क्रियेंत निराळे प्रवाह उत्पन्न होतात. त्यामुळे वस्तूच्या मूल्यात कच्च्या मालाची किमत व मजुरी ह्यांशिवाय भांडवल पुरवणाऱ्याचा फायदा व जमीनदाराचा सारा ह्याची भर पडते थोडक्यांत म्हणजे मजुरी, नफा व सारा हे वस्तूच्या किमतीचे स्वतत्र तीन भाग होतात. मजुरी, सारा व नफा ह्या तिन्हींचे दर निरनिराळ्या धद्यात सामान्यपणें ठरलेले असतात. ह्या दरानुसार मजुरी, नफा व सारा ह्याची जी बेरीज असेल ती उत्पादित वस्तूची नैसर्गिक किमत. ह्या किमतीला जेव्हा वस्तु विकली जाईल तेव्हां त्या वस्तूची किमत उत्पादनखर्चाइतकी (नफा धरून) होते. असे नेहमी होईलच असें नाही; कारण बाजारांतील कोणत्याहि वेळेची किमत वस्तूचा पुरवठा व नैसर्गिक किमत द्यावयास तयार असणाऱ्या लोकांची मागणी ह्याच्या प्रमाणानुसार ठरते नैसर्गिक किमत द्यावयास तयार असणाऱ्या लोकाच्या मागणीला परिणामकारक मागणी ( Effectual Demand )

असें म्हणतां येईल. ज्या वेळेस बाजारात आलेला वस्तूचा पुरवठा परिणामकारक मागणीपेक्षां कमी असतो तेव्हा सर्वांची मागणी भागवतां येत नाही. त्यामुळे चढाओढ सुरू होते व बाजारातील किमत नैसर्गिक किमतीपेक्षा अधिक होते. ह्याच्या उलट, वस्तूचा पुरवठा परिणामकारक मागणीपेक्षा जेव्हा जास्त असतो तेव्हा विक्रेत्याच्या चढाओढीमुळें बाजारांतील किमत नैसर्गिक किमतीपेक्षा कमी होते. पुरवठा कमी अधिक असण्याचा परिणाम सर्व वस्तूवर सारखाच होत नाही. लवकर नष्ट होणाऱ्या वस्तूची किमत टिकाऊ वस्तूपेक्षा अधिक प्रमाणांत कमी होते. जेव्हां पुरवठा व परिणामकारक मागणी सारखी असते तेव्हा नैसर्गिक किमत बाजारात प्रस्थापित होते

नैसर्गिक किमत व बाजारातील किमत ह्यांतील भिन्नता फार वेळ टिकत नाही. बाजारातील किमत जास्त असल्यास पुरवठा वाढून व उलटपक्षी तो कमी होऊन नैसर्गिक किमतीइतकी बाजारांतील किमत होऊं पाहाते. नैसर्गिक किमत हा मध्यबिंदु असून बाजारातील किमत त्याच्या भोंवती घोटाळत असते असे म्हणण्यास हरकत नाही.

वस्तुमूल्याबद्दल स्मिथने केलेल्या विवेचनावरील विस्तृत सारांशावरून असें दिसते की वस्तूमूल्याच्या उत्पादनखर्चतत्त्वावरच (Cost of Production Theory of Value) स्मिथचा विश्वास होता. वस्तुमूल्याच्या विवेचनाच्या आरंभी मानवी श्रम हेच किमतीचे मोजमाप आहे व निरनिराळ्या वस्तूत मानवी श्रम किती आहेत ह्यावरून त्याचे मूल्यमापन केले जाते हे मत इतक्या जोरदारपणें पुढे मांडले आहे की काही लेखकाना स्मिथ मूल्याच्या श्रमतत्त्वाचा (Labour Theory of Value) पुरस्कर्ता होता असे जे वाटत होते त्याबद्दल आश्चर्य वाटू शकत नाही. पण मूल्याचे श्रमतत्त्व समाजाच्या प्राथमिक अवस्थेंतच लागू पडतें आणि हे तत्त्व समाजांत भांडवल व जमीन खाजगी मालकीखाली आहेत त्या समाजाला लागू पडत नाही. ही गोष्ट स्मिथने इतक्या स्पष्टपणें लिहिली आहे कीं श्रमतत्त्वानुसार वस्तुमूल्य ठरतें ही कल्पना त्यानें पूर्णपणें सोडून दिली असावी असें मानण्यास भरपूर जागा आहे. अर्थात् अशी शंका आल्यावांचून राहात नाही की जे तत्त्व सद्य:स्थितीला लागू पडत नाही असें स्मिथला वाटत होते ते तत्त्व इतक्या जोरदारपणे स्मिथनें पुढें

कां मांडावें ? ह्यावर एवढाच खुलासा करता येण्याजोगा आहे की, मानवी श्रम हेच संपत्तीचे एकमेव उगमस्थान आहे असें स्मिथची बुद्धि त्याला सागत **होती; पण वस्तुस्थितीशी** त्याचा त्यास मेळ घालता येत नव्हता आणि म्हणून तो एक प्रकारच्या विचारसभ्रमात सांपडला होता. वैचारिक सभ्रम एवढाच स्मिथच्या मूल्यविषयक लिखाणाचा दोष नसून त्याचा वैचारिक गोधळहि झाला होता असेहि दिसून येतें. वस्तूवर खर्च होणारे मानवी श्रम व वस्तूच्या मोबदल्यात मिळणारे मानवी श्रम ह्या दोहोचा मूल्याचें माप म्हणून त्याने वेगवेगळ्या प्रसंगी उल्लेख केला आहे. ह्या दोन्ही गोष्टी एकच आहेत अशी त्याची समजूत असावी. त्या तशा एक नाहीत. एखाद्या वस्तूवर खर्च होणाऱ्या मानवी श्रमांत यत्किंचितहि बदल न होतां त्या वस्तूच्या मोबदल्यांत मिळणाऱ्या इतर वस्तूच्या प्रमाणांत बदल होऊं शकतो. वरील दोन्ही गोष्टी एकच आहेत ही स्मिथची समजूत त्याच्या वैचारिक गोधळाचीच निदर्शक आहे. मूल्यविषयक विचारातील सभ्रम व गोधळ स्मिथला बराच नडला; कारण त्याच्या इतर विचारावरहि त्या गोंधळाचा परिणाम झाला. तो कसा हें पुढें स्पष्ट होईलच. इतकेच नव्हे तर स्मिथच्या अर्थशास्त्रांतील स्थानालाहि किंचित् बाधा आली. अर्थशास्त्राची सुरुवात जरी स्मिथनें केली तरी अर्थशास्त्रांतील काही जाणते लोक अर्थशास्त्राच्या पितृत्वाचा मान स्मिथला न देता रिकार्डोला द्यावे अशा मताचे आहेत. हे मत जरी अयोग्य असलें तरी स्मिथचा वैचारिक सभ्रम व गोधळ ह्याच्यामुळेच हे मत पुढें आलें हें विसरतां येत नाही.

**स्मिथचें संपत्तीच्या वांटणीसंबंधींचें विवेचन**

वस्तुमूल्याचे विवेचन करून स्मिथने असा निष्कर्ष काढला की कोणत्याहि वस्तूच्या नैसर्गिक मूल्याचे तीन भाग होतात. मजुरांची मजुरी (Wages). भांडवलवाल्यांचा नफा (Profits) व जमीनदारांचा सारा (Rent) हे तीन भाग होत. ह्या निष्कर्षामुळें हे तीन भाग कसे ठरतात ह्याचें विवेचन करणें स्मिथला जरूर पडलें हें विवेचन म्हणजेच उत्पादनाच्या वांटणीचें विवेचन. कारण प्रचलित आर्थिक व्यवस्थेंत घटकांपासून मिळणाऱ्या पैशांतील उत्पन्नानें घटक मालकांचा एकूण उत्पादनांतील वांटा ठरत असतो,

**मजुरीबाबत मत**

मजुरीच्या बाबतीत स्मिथचे असें मत होतें की, स्वकष्टानें कामगार जें उत्पादन करतो तें सर्व उत्पादन (अथवा त्याची पैशांतील किमत) ही कामगाराची मजुरी असली पाहिजे. पण हें भांडवलाची वाढ व जमिनी-वरील खाजगी मालकी होण्यापूर्वींच शक्य होतें. त्यानंतर बहुशः कामगारांना जमीन व भाडवल ह्यांकरितां दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागतें. त्यांना पगारी कामगार म्हणून काम करावे लागतें. ह्या परिस्थितींत मालकांशीं केलेल्या करारानुसार कामगाराची मजुरी ठरते. करार करतेवेळी मालकांची बाजू अधिक जोरदार असते. कारण त्याची थांबण्याची शक्ति जास्त असते. त्यामुळें मजुरी जास्त असण्यापेक्षां कमी असण्याची शक्यता असते. पण एका ठराविक मर्यादेखालीं मजुरी जाऊं शकत नाही. कामगाराला काम करावयाचें असेल तर त्याला जगता आलें पाहिजे. किमान निर्वाह (Subsistence) शक्य झाला पाहिजे. त्याकरितां आवश्यक असणारी मजुरी त्याला मिळालीच पाहिजे. ती मजुरी म्हणजेच मजुरीची किमान मर्यादा होय. जेव्हा मजुराकरितां असणारी मागणी वाढती असते तेव्हां कामगा-राना ह्या मर्यादेपेक्षां जास्त मजुरी मिळणें शक्य होतें. मजुराकरितां अस-णाऱ्या मागणीच्या वाढीला मर्यादा ही अर्थातच असते. मजुरांकरितां अस-णारी मागणी, मजुरांवर खर्च होणारा भांडवलाचा भाग किंवा दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर मजुरी-निधि (Wage–Fund) किती आहे ह्या-वरून ठरते. हा निधि ज्या देशाची राष्ट्रीय संपत्ति वाढती आहे त्या देशात वाढता असल्यामुळे अशा देशांत मजुरी वाढती असते. वाढत्या मजुरीमुळें लोकसंख्याहि वाढते. कारण कामगारांची कुटुंबाचें पोषण करण्याची शक्ति वाढवून त्याच्याकडून साहजिकच अधिक प्रजोत्पादन होतें. वाढत्या लोक-संख्येमुळें मजुरांकरितां असणारी वाढती मागणी भागणे शक्य होते. त्यामुळे मजुरीच्या वाढीला खीळ बसते. पण जेव्हां मजुरी-निधि सतत वाढत असतो तेव्हां ही भीति फारशी नाही. वाढती मजुरी ही वाढत्या राष्ट्रीय संपत्तीचा परिणाम व वाढत्या लोकसंख्येचें कारण असल्यामुळें त्यांत वाईट असें कांहीं नाहींच. शिवाय मजुरी वाढती असली म्हणजे मजुराची उत्पादनशक्ति वाढती असते हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे.

मजुरीविषयक स्मिथच्या मताचा पाया मूल्याचा श्रमसिद्धान्त असावा असें वाटतें. कारण भाडवल व जमीन ही थोडयाच्या मालकीखाली आल्यानंतर मजुराना त्यांनी उत्पादिलेले सर्व मिळू शकत नाही; त्यातूनच सारा व नफा वजा करावा लागतो असे स्मिथने स्पष्ट म्हटले आहे. ह्या म्हणण्यात सर्व उत्पादन हें कामगाराच्या कामाचें फल आहे हा अर्थ अभिप्रेत आहे. असो. कामगाराच्या जगण्याला आवश्यक असलेल्या वस्तूची किमत ही मजुरीची किमान मर्यादा आहे व ह्या मर्यादेपर्यंत जाण्याची मजुरीची वृत्ति असते असें स्मिथचें मत असलें तरी ह्या मुद्याला त्याने फारसे महत्त्व दिलेलें दिसत नाहीं. (त्यामुळें स्मिथला मजुरीचा किमान निर्वाह सिद्धांन मान्य होता कीं मजुरी-निधि सिद्धांत मान्य होता हें कोडें शेवटपर्यंत उलगडलें नाहीं. त्याच्या शिष्यांपैकी ज्यानें त्याने आपल्या सोयीचा सिद्धात उचलला ) तें न देण्याचें कारण असे असावें की वाढत्या सपत्तीच्या देशांत वाढत्या लोकसख्येला न जुमानताहि मजुरी वाढती असणे शक्य असतें असें त्याला वाटत होते. स्मिथच्या वेळची इग्लंडची परिस्थिति तशी होती हे लक्षात ठेवण्याजोगे आहे.

**नफ्याचा खुलासा**

उद्योगपतीच्या नफ्याचा खुलासा करतांना स्मिथनें त्याचा सबध व्याजाच्या दराशी लावून टाकला. तसे करण्याला त्याने कारण असें दिलें कीं, नफा हा इतका अस्थिर असतो की, उद्योगपतीना सरासरी फायदा किती होतो हे त्याचे त्यांनासुद्धा सागता येत नाही. पण एवढें निश्चित की जेव्हा नफा जास्त होतो तेव्हा व्याज जास्त द्यावयास उद्योगपति राजी असतात. जेव्हां नफा कमी होतो तेव्हा ते व्याजहि कमी देतात. असे असल्यामुळे व्याजाच्या दरावरून नफ्याची कल्पना करता येते. त्यानुसार अंदाज घेतला तर असें दिसून येते की भांडवलाची जशी वाढ होते तसा नफ्याचा दर कमीकमी होतो. ( मजुरी मात्र भांडवलात वाढ झाल्यास वाढते.) नफा कमी होतो ह्याचें कारण वाढती चढाओढ. तसेच वाढत्या भांडवलामुळें कमी फायदेशीर गोष्टी कराव्या लागतात. नफ्याच्या बाबतींत आणखी एक गोष्ट सांगतां येते. कांही झालें तरी नफ्याचा सामान्य दर मधूनमधून होणारे तोटे भरून निघतील इतका तर असतोच. ही नफ्याची

किमान मर्यादा व किमान मजुरी देऊन व सारा अजिबात न देतां जो नफा उरू शकेल ती नफ्याची कमाल मर्यादा.

**सारा**

साऱ्याबद्दल लिहिताना स्मिथनें असे प्रतिपादले की, जमिनीचा केवळ उपयोग करण्याकरिता म्हणून दिलेला सारा ही किमत आहे. ती किमत किती दिली जाते हे रयत जमिनीच्या वापरासाठीं किती किमत देऊ शकते ह्यावरूनच ठरते. सामान्य म्हणजे किमान फायदा धरून जो उत्पादनखर्च असेल त्यापेक्षा धान्याची किमत जास्त असेल तरच रयत जमीनदाराला सारा देऊं शकेल आणि त्या साऱ्याचे प्रमाण, किमत व उत्पादनखर्च ह्यांच्यामधील तफावतीइतकेंच राहील. उत्पादनखर्चापेक्षा किमत जास्त नसेल तर जमिनीच्या मालकाला सारा मिळणार नाही. उत्पादनखर्चापेक्षां किमत जास्त आहे की नाहीं ते मागणीवरून ठरते. स्मिथच्या ह्या प्रतिपादनाचा आशय असा की, सारा हा उत्पादनापेक्षा किमत जास्त असण्याचा परिणाम आहे. नफ्याप्रमाणे व मजुरीप्रमाणे सारा उत्पादनखर्चाचा भाग नाही. स्मिथने आपल्या साऱ्यासबधीच्या विवेचनाचा शेवट करताना असे प्रतिपादन केले की काही वस्तूच्या उत्पादनाच्या बाबतीत सारा हे उत्पन्न जमीनदाराला मिळतेच. उदा०, धान्य. धान्याकरिता मागणी नेहमी वाढतीच असते. त्याचा परिणाम उत्पादनाखर्चापेक्षां किमत अधिक असण्यात व त्याचा परिणाम सारा हे उत्पन्न निर्माण होण्यात होतो.

वर दिलेले स्मिथचे विभाजनाबद्दलचें विवेचन पाहिले तर असें स्पष्टपणे म्हणावेसे वाटते, की तें विवेचन हा भोगळपणाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. त्या विवेचनात मूल्याच्या श्रमसिद्धातावरील स्मिथचा विश्वास पदोपदी दिसून येतो. वस्तुमूल्यासबधीचें विवेचन करतांना मजुरी, सारा, नफा हे मूल्याचे स्वतत्र घटक आहेत हे स्वतःच त्याने लिहिले होते. सारा, नफा ही उत्पन्ने शेवटी मजुराला जें वास्तविक मिळायला पाहिजे त्यातूनच वजा झालेली असतात. हे लिहितांना त्याला विसर पडलेला दिसतो. नफा व व्याज ह्यांमधील तात्त्विक फारकत स्मिथला दाखवितां आली नाही वास्तविक मजुराला जें मिळावयाचे त्यांतूनच सारा वजा जातो हे म्हटल्यानंतर उत्पादनखर्चापेक्षां किमत जास्त असेल तरच

सारा उद्भवतो हे म्हणणें सुसगत कसें ह्याचा उलगडा स्मिथने केला नाही. ही सारीं स्मिथच्या भोगळपणाचीच उदाहरणे आहेत. स्मिथचा हा भोगळपणा मूल्याचा श्रमसिद्धात खरा की उत्पादनखर्च-सिद्धात खरा ह्यासबधीच्या स्मिथच्या वैचारिक सभ्रमातून उद्भवलेला आहे.

कामगाराची उत्पादनशक्ति कशामुळें ठरते व उत्पादक श्रमाचे एकूण श्रमाशी असलेले प्रमाण कसें ठरते ह्या दोन प्रश्नाच्या विवेचनाकरिता स्मिथने आपलें बहुतेक सर्व पुस्तक खर्च केले आहे असे ह्या प्रकरणाच्या सुरुवातीसच सागितले आहे. त्यापैकी पहिल्या प्रश्नाचे उत्तर देण्याकरिता म्हणून स्मिथने श्रमविभागणीचें विवेचन केले व त्या विवेचनातूनच मूल्य ठरण्याच्या क्रियेचे व सपत्तीच्या विभाजनाचे विवेचन उद्भवले. त्यानतर त्याने दुसरा प्रश्न हाताशी घेतला. त्या दुसऱ्या प्रश्नाच्या विवेचनातून त्याचे भाडवलासबधीचे विवेचन उद्भवले.

**भांडवल ह्या घटकावरील स्मिथचें भाष्य**

स्मिथच्या भाडवलासंबंधीच्या विवेचनाच्या सुरुवातीलाच त्याने असे सागितलें की श्रमविभागणी पूर्व आर्थिक व्यवस्थेत भाडवलाची गरजच नव्हती. कारण गरज उद्भवली की व्यक्तीने श्रम करून ती ताबडतोब भागवायची हा तेव्हांचा खाक्या होता. श्रमविभागणीचे तत्त्व अंमलात आल्यानंतर स्वत उत्पादित करीत असलेल्या वस्तूचे उत्पादन पुरें होऊन तिची विक्री झाल्याशिवाय व्यक्तीला आपल्या गरजा भागवता येत नाहीत. त्यामुळें दरम्यानच्या काळाकरिता तरतूद म्हणून व्यक्तीला निरनिराळया वस्तूंचा साठा करून ठेवण्याची जरुरी पडते. ह्या सांठ्यामध्यें अर्थातच त्याला लागणाऱ्या वस्तूंचा समावेश होतो. त्याशिवाय ह्या साठ्यात उत्पादनासाठी लागणाऱ्या आयुधाचाहि समावेश केवळ होतो. स्वश्रमावरच विसबून न राहातां उत्पादनासाठी आयुधाचा उपयोग करून घेण्याची प्रवृत्तीहि श्रमविभागणीसमवेतच येते. शोध व श्रमविभागणी ह्याचा निकटचा संबंध स्मिथने श्रमविभागणीच्या फायद्यात दाखविलाच होता. श्रमविभागणी जसजशी वाढत जाते व नवी नवी यंत्रसामग्री जसजशी उपयोगांत आणली जाते तसतशी जास्त जास्त सांठ्याची जरुरी उत्पन्न होते. अशा रीतीनें निर्माण झालेल्या सांठ्यांचे दोन भाग पडतात. ताबडतोब उपभोगाकरितां लागणाऱ्या वस्तू पहिल्या भागांत

पडतात आणि ज्याचा आणखी उत्पादन वाढवण्याकडे उपयोग केला जातो त्या वस्तू दुसऱ्या भागात पडतात. दुसरा भाग म्हणजेच भांडवल (Capital). भांडवलाचे दोन भाग करता येतात; ते म्हणजे फिरते अथवा खेळते भांडवल (Circulating Capital) व स्थिर भांडवल (Fixed Capital). फिरते भांडवल म्हणजे ज्या भांडवलाची अवस्था सारखी बदलत असते व जे त्याच त्याच अवस्थामध्ये पुन पुन येत असते असें भांडवल. उदा०, पैसा, तयार झालेल्या पण न विकलेल्या वस्तू, कच्चा माल इत्यादि स्थिर भांडवल म्हणजे ज्या भांडवलाची अवस्था बदलत नाही असे भांडवल उदा०, यंत्रसामग्री, इमारती, कायम स्वरूपाच्या सुधारणा इत्यादि.

स्मिथने भांडवलासंबंधी विवेचन व उत्पादक श्रमाचे एकूण श्रमाशी असलेले प्रमाण कसे ठरते ह्या प्रश्नाचे उत्तर ह्याचा संबंध लावला आहे. कारण भांडवल वाढले की उत्पादक श्रम करणाऱ्याच्या चरितार्थास उपयोगी पडणारा निधि वाढून उत्पादक श्रम करणाऱ्याची संख्याहि वाढू लागते असे स्मिथचे मत होते. अशा तऱ्हेने उत्पादक श्रम करणाऱ्याचे प्रमाण व एकूण भांडवल ह्याची सांगड घातली आहे. ह्या संबंधात स्मिथने उत्पादक श्रम ही आपली कल्पना स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रयत्न म्हणण्याचे कारण एवढेच की आपली कल्पना स्पष्ट करताना स्मिथनें उत्पादक श्रम म्हणजे जे श्रम वस्तूचे मूल्य वाढवितात ते श्रम, उत्पादक श्रम म्हणजे जे श्रम साकार वस्तू निर्माण करतात ते श्रम आणि उत्पादक श्रम म्हणजे जे श्रम श्रमिकाच्या किमान निर्वाहाला लागणाऱ्या संपत्तीपेक्षा जास्त संपत्ति उत्पादितात; म्हणजेच ज्याच्यामुळे संपत्तीची वृद्धि होऊन वाढावा निर्माण होतो असे श्रम, अशा तीन कल्पना एकदमच सांगितल्या आहेत. ह्या तीन कल्पना एकमेकींशी जुळत्या नाहीत. उदाहरणार्थ, नृत्यगायन, काव्य करणाऱ्या कलाकाराचे उत्पन्न किमान निर्वाहापेक्षा अधिक असेल; पण ते साकार वस्तू निर्माण करीत नाहीत. म्हणजे ते स्मिथच्या एका कल्पनेप्रमाणे उत्पादक तर दुसऱ्या कल्पनेप्रमाणे अनुत्पादक ठरावयास हवेत. स्मिथनें त्यांना व तत्सम लोकांना अनुत्पादक ठरविले आहे. ह्यावरून साकार वस्तू करणारे कामगार म्हणजे उत्पादक कामगार ह्या कल्पनेनें त्याची अधिक पकड घेतली होती असें दिसते.

स्मिथच्या आर्थिक विचारसरणीचें विवेचन संपवण्यापूर्वी दोन गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. एक म्हणजे त्याची सरकारच्या

अर्थव्यवस्थेवरील मते व दुसरी म्हणजे त्याचा खुल्या व्यापाराचा (Free Trade) पुरस्कार.

**सरकारच्या अर्थव्यवस्थेसंबंधीं स्मिथचीं मतें**

स्मिथची सरकारच्या अर्थव्यवस्थेबाबतची मते, त्याने घातलेल्या सरकारच्या खर्चावरील मर्यादा व त्याने सांगितलेल्या करयोजनेच्या कसोटया (Canons of Taxation) ह्यांबद्दल उल्लेखनीय आहेत. त्याच्या मते सरकारची कर्तव्ये अशी तीनच. ती म्हणजे सरक्षण, न्यायदान व समाजोपयोगी पण एकटयादुकटया व्यक्तीला वैयक्तिक फायद्याच्या तत्त्वावर करता न येण्याजोगी अशी कामे. ह्या कामात स्मिथने व्यापाराला उपयोगी अशा कामाचा म्हणजे रस्ते, पूल, बदरे इत्यादि कामाचा, किमान शिक्षणदानाचा, धार्मिक शिक्षणाचा अतर्भाव केला आहे. सरकारचा खर्च ह्या कर्तव्यापुरताच मर्यादित असावा. ही सर्व कर्तव्ये खर्चाच्या बाबतीत शक्य तेवढी स्वयपूर्ण असावी, म्हणजे त्याकरता लागणारा पैसा शक्य तितके करून वरील कामे करून मिळणाऱ्या उत्पन्नातून फेडता येण्याजोग्या कर्जाच्या रूपाने लोकाकडून वसूल करण्यात यावा असे स्मिथला वाटत होते. म्हणजेच शक्य तितका कमी पैसा लोकावर कर लादून मिळवावा असे त्याचे मत होते असें म्हणता येईल.

**करयोजनेच्या कसोटया**

जरूर तितका पैसा कराच्या रूपाने घेण्याला स्मिथचा अर्थातच विरोध नव्हता. पण तो घेतानाहि काही तत्त्वें पाळण्यात यावीत असे मात्र त्याने आग्रहाने प्रतिपादन केले. स्मिथने सागितलेली तत्त्वे अर्थशास्त्रात करयोजनेच्या कसोटया म्हणून प्रसिद्ध पावल्या आहेत. स्मिथने चार कसोटया सागितल्या त्या पुढीलप्रमाणे होत्या. समतेची कसोटी, खात्रीची कसोटी, सोयीची कसोटी आणि काटकसरीची कसोटी. सर्व प्रजाजनानी आपल्याला परवडेल त्या प्रमाणात म्हणजेच आपल्या उत्पन्नाच्या प्रमाणांत कर दिला पाहिजे ह्या शब्दात स्मिथने समतेची कसोटी सागितली आहे लोकाच्या करदानाच्या पात्रतेनुसार त्याच्यावर कर बसवावा असा ह्यातून अथ निघतो पण समता ह्या शब्दाचा आधार घेऊन सर्वांवर सारखा कर असावा असाहि ह्याच्यातून पुढे अर्थ निघाला. ह्याशिवाय कराचे प्रमाण सर्वांना सारखें असावें व जास्त उत्पन्नवाल्याची करदानशक्ति जास्त असते

म्हणून वाढत्या प्रमाणात कर घेण्यात यावे असेहि अर्थ त्यांतून काढले गेले. स्मिथच्या मनात कोणताहि अर्थ अभिप्रेत असो, त्यानें सांगितलेली समतेची कसोटी महत्त्वाची आहे ह्यात शका नाही. कर देण्याची वेळ, पद्धति, रक्कम ही देणाऱ्याला आगाऊ स्पष्ट केलेली असावी हा त्याच्या दुसऱ्या कसोटीचा अर्थ आहे. कर देण्याची वेळ व पद्धति अशा तऱ्हेने ठरविली गेली पाहिजे की त्यात देणाराची सोय व्हावी हा त्याच्या तिसऱ्या कसोटीचा अर्थ आहे. चवथ्या म्हणजे काटकसरीच्या कसोटीचा त्याने सागितलेला अर्थ विशेष लक्षात ठेवण्याजोगा आहे. करापासून सरकारला प्रत्यक्ष मिळणारे उत्पन्न व लोकावर पडलेला कराचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष बोजा ह्यात फरक शक्य तितका कमी असावा असा त्याने काटकसरीची कसोटी ह्याचा अर्थ दिला त्याचा खुलासा करताना त्याने असे सागितले की करवसुलीचा खर्च कमी असावा, करापासून उद्योगधद्याला धोका येऊ नये, कर चुकवण्याचा मोह अधिक होईल असा कर असू नये व अन्य कोणत्याहि तऱ्हेचा त्रास कर भरणाऱ्याला होऊ नये इतके अर्थ काटकसरीच्या कसोटीत अभिप्रेत आहेत. वरील खबरदाऱ्या न घेतल्यास कराचा पैशातील व अन्य प्रकारचा बोजा निष्कारण वाढतो असे स्मिथचे म्हणणें होते.

कर कशावरहि बसवलेला असो पण त्याचा बोजा शेवटी व्यक्तीच्या उत्पन्नावर पडतो हे स्मिथने दाखवून दिले. व्यक्तीचे उत्पन्न स्मिथच्या संपत्ति विभाजनाच्या सिद्धातांतील वर्गीकरणाप्रमाणे, मजुरी, नफा, किंवा सारा ह्या स्वरूपाचें असते. म्हणजे कर मजुरीतून, नफ्यांतून किंवा साऱ्या-मधून भरले जातात. ह्या तिन्हीपैकी साऱ्यावर बोजा पडणाऱ्या करांना स्मिथ विशेष अनुकूल होता. त्याचें असें म्हणणें होतें की सारा हे उत्पन्न जमीनदाराला विशेष कांही केल्याशिवाय मिळतें. अशा उत्पन्नांतून कर-रूपानें सरकारनें कांहीं घेतलें तर उद्योगधंद्याचें कोणत्याहि प्रकारचें नुकसान होत नाहीं व एकंदरींत कांहीं बिघडत नाही. मजुरी व नफा ह्यांवरील कर शेवटीं गिऱ्हाइकालाच भरावे लागण्याचा धोका असतो. तसें न झालें तर त्याचे अन्य दुष्परिणाम होतात. मजुरीवरील कराचा बोजा उद्योगपतीवर पडला तर मजुराकरितां असलेली मागणी कमी होण्याचा व त्यामुळें बेकारी होण्याचा संभव असतो. नफ्यावरील करामुळें

उद्योगधद्यात येणारे भाडवल कमी होण्याचा संभव असतो. ह्या व अशाच प्रकारच्या कारणामुळे मजुरीवरील व नफ्यावरील कर स्मिथला फारसे पसत नव्हते.

**स्मिथचें आर्थिक तत्त्वज्ञान**

स्मिथची आर्थिक विचारसरणी वर विस्तृतपणे सांगितली आहे. त्या विचारसरणीइतकेंच किंबहुना त्याहिपेक्षा जास्त महत्त्व स्मिथच्या तत्त्वज्ञानाला व त्या तत्त्वज्ञानाला अनुसरून त्याने पुरस्कारिलेल्या राजकीय व आर्थिक धोरणाला आहे. स्मिथने आपल्या तत्त्वज्ञानाला 'राष्ट्राची सपत्ति' ह्या आपल्या पुस्तकात स्वतत्र असे स्थान दिलेले नाही. पण जेथें जेथे सधि मिळेल तेथे तेथें आपल्या तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करण्यास त्याने कमी केले नाही. त्याचें तत्त्वज्ञान पुस्तकात ठिकठिकाणी विखुरलेले आढळते. ह्या पद्धतीमुळे त्याच्या तद्विषयक विवेचनाला विस्कळितपणा आलेला असला तरी त्यामुळें त्यातील आकर्षकत्व मुळीच कमी झालेले नाही! किंबहुना त्यामुळेच ते तत्त्वज्ञान स्मिथमध्ये किती भिनले होते हे स्पष्ट दिसून येतें स्मिथच्या लिखाणात निरनिराळ्या ठिकाणी हे तत्त्वज्ञान व्यक्त स्वरूपात तर आले आहेच; पण त्याच्या प्रत्येक मतात त्याचे तत्त्वज्ञान गर्भित आहे.

**स्वार्थ व परमार्थ एकच**

निसर्गप्रणीत व्यवस्था व त्या व्यवस्थेंतील, (अर्थात् निसर्गनिर्मित,) एकतानता (Harmony) ह्यावर जबर विश्वास व तदनुषगानें आलेला जबर आशावाद ही स्मिथच्या तत्त्वज्ञानाची दोन प्रमुख वैशिष्टचें होती. ही वैशिष्टचे असलेलें स्मिथचें तत्त्वज्ञान सूत्ररूपानें पुढीलप्रमाणे सांगतां येईल. आपल्या हिताकरितां झटावे ही मनुष्याची नैसर्गिक मन:प्रवृत्ति आहे. ह्या प्रवृत्तीला शक्य तितका वाव देणें हें कोणत्याहि प्रकारें चूक नाहीं; कारण आपलें हित कशांत आहे हें ज्याचें त्यालाच समजतें आणि एका अज्ञात शक्तीच्या प्रभावामुळे व्यक्तिहित व समाजहित, स्वहित व परहित ह्यांत विरोध राहूं शकत नाही. स्वहित साधण्याचा प्रयत्न करणारी व्यक्ति अजाणतां समाजहित साधत असते. स्वार्थ व परमार्थ ह्यांत विरोध नाही. कारण स्वार्थांतच परमार्थ व परमार्थांतच स्वार्थ समाविष्ट आहे. थोडक्यांत वैयक्तिक स्वार्थ

एकदर मानवी जीवनाला उपकारकच ठरतो आणि म्हणून जात्याच स्वार्थी असणाऱ्या मनुष्याचें भवितव्य उज्ज्वलच आहे असा मनुष्य व त्याचें ऐहिक जीवन ह्याकडे पाहण्याचा स्मिथचा दृष्टिकोण होता.

वैयक्तिक स्वार्थ एकदर मानवी जीवनाला उपकारक ठरतो हा स्मिथचा विचार त्याच्या श्रमविभागणी व पैसा ह्या दोन आर्थिक सस्थाच्या जन्मासबधी त्याने केलेल्या विवेचनांत आपोआपच व्यक्त झाला आहे. श्रमविभागणी व पैसा ह्या दोहोचे मनुष्याच्या आर्थिक जीवनावर झालेले परिणाम क्रातिकारक स्वरूपाचे आहेत ह्यात तिळमात्र सशय नाही. अशा ह्या बहुमोल सस्थाचा जन्म मनुष्याच्या स्वार्थीपणातूनच झालेला आहे असे स्मिथचे म्हणणे होते आपल्या गरजा जास्त प्रमाणात भागवणे श्रमविभागणीमुळे शक्य होईल ही जाणीव व्यक्तीला स्वत.चे हित कळत असल्यामुळे होते व ही जाणीव अनेक व्यक्तीना जेव्हा होते तेव्हा त्या जाणिवेतूनच श्रमविभागणी निर्माण होते जी गोष्ट श्रमविभागणीची तीच गोष्ट पैशाची श्रमविभागणीच्या पाठोपाठ अदलाबदल येणे अपरिहार्य आहे किबहुना अदलाबदलीच्या इच्छेतूनच श्रमविभागणी येते. प्रत्यक्ष अदलाबदलीच्या अडचणी जेव्हा व्यक्तीना कळून येतात तेव्हा स्वहित कळणारी व्यक्ति सर्वमान्य होण्याजोगी अशी एखादी वस्तु सदा जवळ ठेवण्याचा प्रयत्न करते व अशा प्रयत्नातूनच पैसा जन्मास येतो. अशा तऱ्हेने स्वहित साधण्याचे वैयक्तिक प्रयत्न, श्रमविभागणी व पैसा ह्याचा सबध स्मिथने जोडलेला आहे. स्मिथच्या मते वैयक्तिक स्वार्थ साधण्याच्या प्रयत्नांतून आणखी एक चागली गोष्ट निर्माण होते; ती म्हणजे चढाओढ. चढाओढीच्या बुडाशी वैयक्तिक स्वार्थाचीच भावना असते. चढाओढीमुळेंच उत्पादनखर्चाइतकी किमत खाली येते हा स्मिथच्या मूल्यसिद्धान्तांतील एक मोठा भाग आहे. असो. वैयक्तिक स्वार्थाची भावना समाजहितविरोधी नाही. कारण निसर्गनिर्मित व्यवस्थेमध्ये मनुष्याला सहकार्याशिवाय जगणें अशक्य आहे व स्वार्थाची भावना परस्पर सहकार्यालाच मनुष्याला प्रवृत्त करते असा स्मिथचा एकंदर विवेचनाचा सूर होता. सहकार्याची जरुरी भासवणारी निसर्गनिर्मित व्यवस्था ह्यालाच उद्देशून स्मिथनें अज्ञात शक्ति किंवा बरोबर त्याचेच शब्द वापरावयाचे

असल्यास अदृश्य हात (Invisible Hand) असा शब्दप्रयोग केला आहे

**स्मिथचा आशावाद**

स्मिथचें वरील तत्त्वज्ञान पाहाता स्मिथ जबर आशावादी असावा ह्यात आश्चर्य वाटण्याजोगें कांहीच नाही वैयक्तिक स्वार्थामुळे समाजहित होते. स्वार्थाची भावना त्या भावनेबरोबरच मनुष्यस्वभावात वास करीत असणाऱ्या सहानुभूति, स्वातंत्र्याची आवड. कामाची सवय इत्यादि भावनामुळे इष्ट अशा स्वरूपांतच नेहमी व्यक्त होते (अशी वस्तु-स्थिति आहे असे मत स्मिथने आपल्या नैतिक भावनाची तत्त्वे ह्या पुस्त-कातच व्यक्त केले होते.) त्यामुळे स्वार्थाच्या भावनेने कार्यप्रवृत्त होणाऱ्या मनु-ष्याची उत्तरोत्तर प्रगतीच होते. निरनिराळ्या वर्गाचे हितसबध विरोधी नाहीत व मनुष्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीना योग्य वाव दिल्यास मनुष्याचे ऐहिक जीवन अधिकाधिक समृद्ध होणार असे स्मिथचे मत असल्याचे त्याच्या लिखाणावरून स्पष्ट दिसते. स्मिथचा आशावाद त्याच्या श्रमविभागणीमुळे निर्माण होणाऱ्या समृद्धतेच्या विवेचनात, वाढती मजुरी, वाढती लोकसख्या, वाढती राष्ट्रीय सपत्ति ह्याचा एकमेकाशी त्याने लावलेल्या सबधात योग्य प्रकारें व्यक्त झाला आहे.

**स्मिथकृत खुल्या व्यापाराचा पुरस्कार.**

आपले हित कशात आहे हे ज्याचे त्यालाच कळते व आपल्या हित-सबधांचे रक्षण व पोषण करण्यास व्यक्तीला पूर्णपणे वाव दिला तर त्यात समाजाचा फायदाच असतो हा ज्याच्या तत्त्वज्ञानाचा पाया आहे त्या स्मिथची शासनसस्थेच्या राजकीय व आर्थिक धोरणासंबधीची मते काय असतील ह्याची कल्पना सहज करतां येण्याजोगी आहे. शासनसंस्थेने ठराविकच कामे करावीत व व्यक्तिस्वातंत्र्यावर अनुचित अशा कोणत्याहि मर्यादा घालू नयेत हे स्मिथच्या त्यासबधीच्या मतांचें सार म्हणून सांगतां येईल. ज्यामुळें आर्थिक स्वातंत्र्याला बाध येतो अशा आर्थिक धोरणाचा व असें आर्थिक धोरण सुचविणारांचा स्मिथने निषेधच केला. व्यापारवादावर स्मिथने हल्ला चढवला तो याच भावनेने. व्यापारवादामुळे ज्यायोगें देशांत पैसा येतो अशा व्यापाराला सवलती देणे व ज्यामुळें देशांतील पैसा जातो अशा व्यापारावर निर्बंध घालणे हे सर-

कारचे धोरण होऊन बसले होतें, उदाहरणार्थ, व्यापारवादाचा पगडा जेव्हां इग्लडच्या आर्थिक धोरणावर पडला होता तेव्हां फरान्सशी होणाऱ्या इग्लंडच्या व्यापारावर अनेक निर्बंध घालण्यात आले होते. त्याचे कारण एवढेच होते की, त्या वेळी फरान्सचा माल इग्लडमध्ये जेवढा येत असे तेवढा इंग्लडचा माल फरान्समध्ये जात नसे हे निर्बंध स्मिथला पसत पडणे कधीच शक्य नव्हते स्मिथने ह्या निर्बंध घालण्याच्या धोरणावर कडकडून टीका केली व त्या निमित्ताने आपली खुल्या व्यापाराची विचारसरणी पुढे मांडली· खुल्या व्यापाराला अनुकूल म्हणून त्यानें पुढे माडलेले मुद्दे तत्कालीन परिस्थितीत बिनतोड असेच होते कोणत्याहि कुटुबातील प्रमुख व्यक्ति जी वस्तु घरी करावयास अधिक खर्च येतो ती वस्तु विकत घेणेच जास्त पसत करते. कौटुबिक अर्थशास्त्राच्या दृष्टीने ही गोष्ट योग्य असेल तर आपल्या देशात ज्या वस्तु उत्पादन करण्यास त्या परदेशी घेऊन स्वदेशी आणण्याच्या खर्चापेक्षा अधिक खर्च येतो त्या वस्तु परदेशातून खरेदी करण्यात अयोग्य असे काही नाही त्यामुळे देशातील उद्योगधद्याला बाध येतो असें म्हणण्यात काही अर्थ नाही. कारण देशातील उद्योगधद्याची एकदर स्थिति उद्योगधद्यात गुतवलेले भाडवल किती आहे ह्यावर अवलबून असते. त्यामुळें जर काही होत असेल तर ते हेच की देशातील भाडवलाचा ओघ ज्या वस्तू उत्पादन करण्यास परिस्थिति अधिक अनुकूल आहे त्या वस्तूकडे वळतो. हा परिणाम इष्ट असाच आहे. हा परिणाम होऊं न देण्यात देशाचा तोटाच होतो. कारण त्यामुळें देशातील भांडवल ज्या वस्तूच्या उत्पादनास देशांतील परिस्थिति अनुकूल नाही त्या वस्तूंच्या उत्पादनांत गुतले जाऊन भांडवलाचा अपव्यय होतो, इत्यादि मुद्दे स्मिथनें मांडून खुल्या व्यापाराचा पुरस्कार केला. देशाच्या सरक्षणाला जरूर असतील तेवढेच उद्योगधंदे खुल्या व्यापाराला अपवाद ठरवण्यास स्मिथची तयारी होती. श्रमविभागणीविषयीं अत्यंत उत्साह स्मिथला वाटत होता हें पहातां त्यानें खुल्या व्यापाराचा पुरस्कार करावा हें अपेक्षितच समजलें पाहिजे. खुल्या व्यापाराचें तत्त्व सर्व देशांनी स्वीकारल्यास प्रत्येक देशांत सर्व वस्तूचें उत्पादन न होतां त्या त्या देशांत ज्या वस्तूंच्या उत्पादनाला परिस्थिति अनुकूल आहे अशाच वस्तु उत्पादित होतात. म्हणजेच एक प्रकारची

प्रादेशिक श्रमविभागणी अंमलांत येते. ह्या श्रमविभागणीमुळे जगातील सर्व देश परस्परावलंबी होऊन जागतिक ऐक्याची व सहकार्याची भावना निर्माण होते. त्याशिवाय श्रमविभागणीचे सर्व फायदे उपलब्ध होऊन उत्पादन-वृद्धि होते तें निराळेच. हे सर्व फायदे मिळवावयाचे असल्यास खुल्या व्यापाराचे तत्त्व स्वीकारण्यावाचून गत्यतर नाही असे स्मिथचे स्पष्ट मत होते. खुल्या व्यापाराचा पुरस्कार हा स्मिथचा आर्थिक विचारातील अत्यत महत्त्वाचा भाग आहे. हा पुरस्कार तत्कालीन इंग्लडला विशेष मानवण्याजोगा होता. वाढत्या उद्योगाला वाढती बाजारपेठ व स्वस्त कच्चा माल ह्यांची गरज होती. ह्या गरजा देशाच्या उभयपक्षीय खुल्या व्यापारानेचा भागण्याजोग्या होत्या.

परदेशीय व्यापारावर घातलेल्या निर्बंधाप्रमाणेच स्मिथचा उत्पादनाला ज्यामुळें बाध येतो असे कर, वैयक्तिक अगर सांघिक मक्तेदारी ह्यांनाहि स्मिथचा विरोध होता ह्या गोष्टीमुळें नैसर्गिक किंमतीपेक्षा वस्तूची किंमत वाढते आणि त्या प्रमाणात त्याचा उपभोग करण्याची संधि थोडयाच लोकांना मिळून देशातील सुबत्ता कमी होते असा स्मिथचा दावा होता. परदेशीय व्यापारावरील निर्बंध, आर्थिक व्यवस्थेंत सरकारची अकारण ढवळाढवळ, मक्तेदारी, ह्याना विरोध करण्याच्या स्मिथच्या धोरणामुळेच स्मिथ हा आर्थिक स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता समजला जातो. आर्थिक स्वातंत्र्याचा स्मिथकृत पुरस्कार निसर्गवाद्याच्या त्याबद्दलच्या पुरस्कारापेक्षा अधिक जोरदार होता. कारण निसर्गवाद्यानी केलेला पुरस्कार शेतकीपुरताच मर्यादित होता आर्थिक स्वातंत्र्याचा पुरस्कार हा स्मिथच्या तत्त्वज्ञानाचा साहजिक होणारा परिणाम आहे.

**स्मिथला मिळालेल्या मानमान्यतेचें रहस्य**

स्मिथचें सुदैव असें कीं ज्या वेळी व ज्या भूमीत त्याने निसर्गप्रणीत विश्वरचनेचा व आर्थिक स्वातंत्र्याचा जयघोष केला ती वेळ व ती भूमि त्या जयघोषाला नुसती अनुकूलच नव्हे तर आतुरहि होती. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात इग्लंडमध्ये स्मिथने आर्थिक स्वातंत्र्याचा पुरस्कार केला. त्या वेळेस इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रातीला बहर येण्याची चिन्हें दिसू लागलीं होतीं. पण ह्या चिन्हांना दृश्य फळ येण्याकरितां आर्थिक

स्वातंत्र्याची व आर्थिक क्षेत्रात ढवळाढवळ न करणाऱ्या शासनसंस्थेची अगत्यानें जरुरी होती. औद्योगिक क्रांति हा शास्त्रज्ञाच्या संशोधक वृत्तीचा व नव्यानेच निर्माण झालेल्या उद्योगपति ह्या वर्गातील लोकांच्या धाडशी वृत्तीचा संयुक्त परिणाम होता. ही क्रांति यशस्वी होण्याकरिता संशोधन व धाडशी वृत्ति ह्याना वाव मिळणे जरूर होते. त्याकरितां जुने ते सोनें ह्या वृत्तीने चालणारी पूर्वीची आर्थिक व्यवस्था कोलमडून पडणे अवश्य होते. ती कोलमडून पडण्यानेच उद्योगपतीना पूर्ण वाव देणारी व मोठ्या प्रमाणावरील उत्पादन व खाजगी फायद्याचें तत्त्व ह्यांना प्राधान्य देणारी अशी नवी आर्थिक व्यवस्था उभारली जाणें शक्य होणार होते. नव्या आर्थिक व्यवस्थेपासून ज्याचा फायदा होणार होता त्यानी जुन्या आर्थिक व्यवस्थेविरुद्ध बंड पुकारले होतेच. पण त्यांना ह्या बडाला बौद्धिक पाया मिळाला तर हवा होता. ही त्याची बौद्धिक भूक स्मिथच्या तत्त्वज्ञानानें व त्या तत्त्वज्ञानाच्या आधारावर त्याने केलेल्या आर्थिक स्वातंत्र्याच्या विवेचनाने भागविली गेली. त्यामुळें थोड्याच अवधीत स्मिथ हा त्या वर्गाच्या गळ्यांतील लाडका ताईत बनला असल्यास नवल नाही. ह्या वर्गाच्या हातांत जेव्हां शासनसंस्थेची सूत्रे आली तेव्हा अर्थातच स्मिथचा आर्थिक कार्यक्रम धडाक्याने अमलात आणला गेला. परराष्ट्रीय व्यापारावरील निर्बंध काढून खुला व्यापार सुरू करणे, सरकारचें कार्यक्षेत्र जरुरीच्या गोष्टीपुरते मर्यादित करणें, औद्योगिक चढाओढीला पोषक अशी परिस्थिति निर्माण करणें, कोणत्याहि वस्तूच्या अगर उत्पादन–घटकाच्या बाजारांत व एकंदरीत सर्वच आर्थिक व्यवस्थेत कोणत्याहि प्रकारची ढवळाढवळ न करणे ह्या गोष्टी केल्या गेल्या त्या गोष्टी ज्यानी केल्या त्यानी ज्याच्यामुळें त्याना ह्या गोष्टी करावयास स्फूर्ति मिळाली व ज्याने त्यांच्या आकांक्षा आपल्या लिखाणात तत्त्वज्ञानाच्या रूपाने व्यक्त केल्या त्या स्मिथचा योग्य तो मानमरातब केला. स्मिथच्या चहात्यांमध्ये इंग्लडचा प्रमुख मुत्सद्दी पिट ह्याचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. स्मिथचा तो वेळोवेळी सल्ला घेत असे आणि तो इमानाने पाळतहि असे. मला स्वतःला माझ्या कल्पना जेवढ्या समजतात त्याहिपेक्षां अधिक त्या पिटला समजतात असे उद्‌गार स्मिथनें एका प्रसंगी काढले

होते. असो. एकदरीत विचार करता ॲडॅम स्मिथचे लिखाण हे कोणत्याहि काळातील परिस्थितीचा आर्थिक विचारसरणीवर कसा परिणाम होतो व कोणत्याहि काळातील मान्यता पावलेल्या आर्थिक विचारसरणीचा आर्थिक धोरणावर कसा परिणाम होतो ह्याचे उत्कृष्ट उदाहरण आहे. स्मिथचें अर्थशास्त्र हे औद्योगिक क्रातीनतर अस्तित्वात आलेल्या आर्थिक व्यवस्थेचेच अर्थशास्त्र होते. स्मिथचे तत्त्वज्ञान व त्यानुसार त्याने सुचविलेले आर्थिक धोरण हे नवीन आर्थिक व्यवस्थेतील प्रबल अशा वर्गाच्याच आकाक्षा व्यक्त करणारे होतें. त्याच्या लिखाणामुळे इग्लंडचे आर्थिक धोरण आमूलाग्र बदलून गेले. व्यापारवादावर आधारलेल्या आर्थिक धोरणाचा अवशेषहि तेथे राहूं शकला नाही.

**स्मिथला अर्थशास्त्राचा जनक कां मानण्यांत येतें ?**

स्मिथला अर्थशास्त्राचा जनक समजण्यांत येतें हे ह्या प्रकरणाच्या सुरुवातीलाच सांगितले आहे. हा मान स्मिथला कां देण्यांत येतो ह्यासंबंधी हे प्रकरण संपविण्यापूर्वी थोडें लिहिलें पाहिजे. अर्थशास्त्राचें पितृत्व स्मिथकडे आहे असे समजण्यांत येतें ह्याची दोन कारणें सांगतां येतील. ती अशी (१) स्मिथनें अर्थशास्त्राची व्याप्ति व स्वरूप ही निश्चित केली. राष्ट्राची सपत्ति हा अर्थशास्त्राचा विषय ठरवून राष्ट्राच्या सपत्तीचा उगम कशांत आहे, संपत्तीचें उत्पादन कशावर अवलंबून असते, उत्पादनांत वाढ होण्याची कारणें कोणती, श्रमविभागणीमुळे अदलाबदल ही गोष्ट अपरिहार्य कशी होऊन बसते, अदलाबदलीमुळें प्रत्येक वस्तूचें मूल्य ठरलें जाण्याची जरुरी कशी निर्माण होते, वस्तूचें मूल्य कसे ठरलें जाते, अदलाबदलीच्या पाठोपाठ पैसा ही सस्था आर्थिक व्यवस्थेंत कशी शिरते, पैशाची आर्थिक व्यवस्थेतील कार्ये कोणती, पेढ्याकडून कागदी पैसा कसा व कां निर्मिला जातो, कागदी पैशामुळें पैसा ह्या सस्थेवर कांहीं परिणाम होतो का, संपत्तीचें विभाजन कोणत्या तत्त्वानुसार होते, सरकारची कार्यें कोणती, त्या कार्यांना लागणारा पैसा मिळवताना व मिळवलेला पैसा खर्च करतांना सरकारनें कोणत्या तत्त्वांचें पालन केलें पाहिजे ह्या प्रश्नांचा विचार स्मिथनें आपल्या अर्थशास्त्राच्या पुस्तकांत केला. आजकाल लिहिलेलें अर्थशास्त्राचें कोणतेहि पुस्तक वरवर चाळून पाहिलें तरीहि

असे दिसून यईल कीं हेच प्रश्न त्यांत प्रामुख्याने चर्चिले गेले आहेत. स्मिथनतर त्याने उपस्थित केलेल्या प्रश्नांत भर पडली असेल तर ती स्मिथच्या प्रश्नातूनच निघणाऱ्या उपप्रश्नाचीच. मूळ प्रश्न व त्यांचे महत्त्व ह्या गोष्टी जशाच्या तशा कायम राहिल्या आहेत असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही स्मिथनंतर अर्थशास्त्राचे उपभोग, उत्पादन, विभाजन, मूल्यतत्त्व, पैसा, परराष्ट्रीय व्यापार, सरकारची अर्थव्यवस्था असे भाग पाडण्यात आले. ह्यापैकी उपभोग हा भाग वगळतां इतर सर्व भाग स्मिथच्या पुस्तकात आढळतात. हें सर्व लक्षांत घेऊनच अर्थशास्त्राची व्याप्ति मुख्यतः स्मिथपासून ठरली गेली असें म्हणण्यांत येतें. हें झाले अर्थशास्त्राच्या व्याप्तीसंबंधी. अर्थशास्त्राच्या स्वरूपाकडेहि पाहिलें असतां असें दिसून येते की अर्थशास्त्राच्या आजच्या स्वरूपालाहि स्मिथच बराचसा जबाबदार आहे. अर्थशास्त्र हे शास्त्र आहे ते सामाजिक शास्त्र आहे व ते सत्यशोधक शास्त्र आहे असे अर्थशास्त्राच्या आजच्या स्वरूपाचे वर्णन करतां येईल. अर्थशास्त्राला हे स्वरूप प्राप्त होण्यांत स्मिथचा वाटा मोठा आहे हे सहज दाखवता येईल. शास्त्र म्हणजे कोणत्याहि विषयाचा शास्त्रीय पद्धतीने म्हणजेच कार्यकारणभाव शोधून काढण्याच्या दृष्टीने केलेला सागोपाग अभ्यास. राष्ट्रांची सपत्ति हा विषय घेऊन त्याचा सागोपाग अभ्यास म्हणजेच अर्थशास्त्र ही कल्पना स्मिथनेंच प्रथम पुढें माडली असें म्हणणें चूक ठरणार नाही. स्मिथपूर्वी निसर्गवाद्यानीं व व्यापारवाद्यानी संपत्ति कशास म्हणावे ह्याचा विचार केला होता पण त्या विचारानतरचे त्याचे अर्थशास्त्र म्हणज केवळ सपत्तीच्या त्याच्या व्याख्येचा विस्तृत ऊहापोहच होता. स्मिथची गोष्ट तशी नव्हती. निरनिराळ्या देशाच्या आर्थिक स्थितीचा व आर्थिक विकासाचा अभ्यास करून अर्थशास्त्रविषयक काही सिद्धान्त त्यानें बसवले. त्याच्या लिखाणात वस्तुस्थितिदर्शक उदाहरणाची खैरात आढळते. (अर्थशास्त्राला केवळ तर्कप्रधानशास्त्र असे जे स्वरूप आलें ते स्मिथनतर आलें. त्याला स्मिथ मुळीच जबाबदार नाही निरीक्षण, विश्लेषण इत्यादि शास्त्रीय पद्धतीचा त्याने भरपूर उपयोग केला. श्रमविभागणी हा त्याने वर्णिलेल्या आर्थिक व्यवस्थेचा पाया असल्यामुळें अर्थशास्त्राला आपोआपच सामाजिक शास्त्राचें स्वरूप प्राप्त झालें. सत्यशोधन हा अर्थशास्त्राचा प्रमुख हेतु आहे असें त्याला

वाटत असल्याचें त्याच्या लिखाणावरून स्पष्ट दिसते. हा त्याने मानलेला अर्थशास्त्राचा हेतु त्याने आपल्या पुस्तकाला दिलेल्या राष्ट्राच्या सपत्तीच्या स्वरूपाची व कारणाची चौकशी ह्या नावातील चौकशी ह्या शब्दात चांगलाच व्यक्त झाला आहे. स्मिथचें लिखाण सर्वस्वी तर्कशुद्ध नव्हते. एक प्रकारच्या वैचारिक सभ्रमाची बाधा त्याच्या लिखाणाला झाली होती. ह्या गोष्टी लक्षात घेऊनहि त्याने शास्त्रीय अर्थशास्त्राचा पाया घातला हे नाकारता येत नाही. कोणताहि विचार सुरुवातीपासूनच तर्कशुद्ध असावा अशी अपेक्षा करणे चुकीचे ठरेल. तसे झाले तर शास्त्राच्या विकासाला जागाच उरणार नाही

(२) स्मिथनतर अर्थशास्त्रात उद्भवलेल्या विचारप्रवाहांची बीजे ह्या नाही त्या रूपाने स्मिथच्या लिखाणात आढळतात. स्मिथनतर अर्थ-शास्त्रात प्रसृत झालेले व आजमितीला तेथे टिकून राहिलेले प्रमुख विचारप्रवाह दोन. मूल्याच्या श्रमसिद्धान्तांवर आधारलेला मार्क्सवादी विचारप्रवाह आणि उपभोग्यता हा मूल्याचा पाया मानून त्यावर अर्थ-शास्त्राचें आपले विवेचन बसविणारा विचारप्रवाह ह्या दोन्हीना अनुकूल असा मजकूर, वस्तुमूल्याच्या विवेचनातील वैचारिक गोंधळामुळे, स्मिथच्या लिखाणात आढळतो. मानवी श्रम हेच मूल्याचें माप, ह्या स्मिथच्या आग्रही प्रतिपादनाचा मार्क्सवादी उपयोग करून घेतात, तर मानवी जीवनाला अत्यावश्यक पण विपुल असलेल्या हवेला व्यवहारांत कांहीहि मूल्य दिले जात नाही, ह्या स्मिथने दर्शविलेल्या विरोधा-भासाचा उपयोग उपभोग्यतेला महत्त्व देणारे लोक करून घेतात. भांडवल-दार व जमीनदार ह्या वर्गाचें उत्पन्न म्हणजे मजुराना मिळावयाच्या वाजवी उत्पन्नांतील कपातच हे त्याचें विधान, आणि जमीन, भाडवल, श्रम हे तिन्ही वस्तुमूल्याचे स्वतंत्र भाग आहेत, हे त्याचे विधानहि परस्पर-विरोधी आहे. त्याचा परस्परविरोधीपणा अर्थशास्त्रांतील परस्परविरोधी विचार सांगणाऱ्यांच्या पथ्यावरच पडला आहे. ज्याला जें परवडेल तें त्यानें स्मिथमधून उचलावें अशी परिस्थिति आहे. ही स्थिति चांगली असो अगर वाईट असो; स्मिथचा वैचारिक गोंधळ, अर्थशास्त्राची स्मिथ-नंतरची वाढ व त्या वाढीच्या निरनिराळया दिशा ठरण्यास कारणीभूत

ठरला हे निर्विवाद. अर्थशास्त्रांतील भिन्नभिन्न विचारप्रवाह सोडून दिले तरी अर्थशास्त्रांत पुढें रेखीव स्वरूप घेतलेल्या प्रमुख सिद्धान्तांचीं बीजेंहि स्मिथमध्येंच आढळतात. किमत, मागणी व पुरवठा ह्यांचे एकमेकांवर होणारे परिणाम दर्शविणारे सिद्धान्त, किंमतींतील फरकाचा मागणीवर होणारा परिणाम सर्वच वस्तूंच्या बाबतीत सारखा नसतो, हा मागणीच्या लवचिकपणाचा सिद्धान्त, संपत्तीत वाढ झाली कीं लोकसंख्येंत वाढ होते हा माल्थसचा सिद्धान्त, रिकार्डोचा साऱ्याचा सिद्धान्त, इत्यादि सिद्धान्तांच्या अर्थशास्त्रात होणाऱ्या आगमनाची जाणीव स्मिथला होती. त्या सिद्धान्तांचा आशय त्याच्या लिखाणांत आला आहे, हें ह्या प्रकरणांत सांगितलेल्या त्याच्या आर्थिक विचारांवरून दिसून येईल. अशा तऱ्हेनें अर्थशास्त्राची व्याप्ति व स्वरूप निश्चित होण्याला स्मिथ जबाबदार असल्यामुळें व त्याच्यानंतरच्या आर्थिक विचारसरणीची व आर्थिक सिद्धान्तांची पूर्वसूचना त्याच्या लिखाणांत आढळत असल्यामुळे अर्थशास्त्राचा जनक ही स्मिथला मिळालेली पदवी सार्थच वाटते.

**स्मिथचें योग्य वर्णन : सनातनवादी अर्थशास्त्राचा अध्वर्यू**

सामान्यार्थानें अर्थशास्त्राचा जनक हे स्मिथचें वर्णन बरोबर असलें तरी स्मिथचें अर्थशास्त्रांतील विशिष्ट स्थान अगदी योग्य असें व्यक्त करावयाचें असल्यास अर्थशास्त्रातील सनातनवादाचा अध्वर्यू असें त्याचें वर्णन करणें अधिक बरोबर होईल. अर्थशास्त्रांतील अभिजात अथवा सनातन संप्रदायाचा ( Classical School of Thought ) पाया स्मिथनें घातला. त्यांतच भर घालून त्याच्यानतरच्या कांहीं अर्थशास्त्रज्ञानी त्या संप्रदायाला ठोकळेबाज स्वरूप प्राप्त करून दिलें. स्मिथचें अर्थशास्त्रांतील निश्चित स्थान समजण्याकरितां अर्थशास्त्रातील सनातनवादाच्या मूलतत्त्वांचा परिचय असणे जरूर आहे. म्हणून त्याचा गोषवारा पुढील परिच्छेदांत दिला आहे. तो वाचीत असतांच स्मिथनें सनातनवादाचा पाया घातला असें कां म्हणण्यांत येतें तें लक्षांत येईल.

**सनातनवादाचीं मूलतत्त्वें**

सनातनवाद ह्या अर्थशास्त्रातील सर्वांत जुन्या संप्रदायाच्या विचारसरणीला उद्देशून वापरलेल्या शब्दप्रयोगानें अनेक गोष्टी प्रतीत होतात.

अर्थशास्त्रात सनातनवाद हा शब्दप्रयोग उच्चारला की, खाजगी माल-कीच्या तत्त्वाला जिच्यात मान्यता दिली आहे म्हणजेच उत्पादनाची साधनें व उपभोगाच्या वस्तू वैयक्तिक मिळकतीत अनिर्बंध समाविष्ट करण्याची जिच्यात मुभा आहे अशी व्यक्तिनिष्ठ आर्थिक व्यवस्था. ती आर्थिक व्यवस्था मनुष्याने रानटीपणाची अवस्था एकदां ओलांडली की, नैसर्गिक व अतएव शाश्वत आहे अशी समजूत; ती आर्थिक व्यवस्था स्वयप्रणीत नियमानुसार आपोआप चालू शकते अशी भावना; ती आर्थिक व्यवस्था केवळ नैसर्गिकच नव्हे तर योग्य अशीच आहे; कारण ज्याचे हित त्यालाच समजते व समाजात हितविरोधापेक्षां हितसाम्यता अधिक असल्या-मुळें व्यक्तिहित व समाजहित ह्या गोष्टी एकमेकीपासून भिन्न नाहीत असे तत्त्वज्ञान; व्यक्तीला आचार-स्वातंत्र्य दिल्यास मनुष्याचें भवितव्य उज्ज्वलच आहे असा दुर्दम्य आशावाद; ज्यायोगें मनुष्याच्या आचार-स्वातंत्र्यावर निर्बंध पडतील अशा गोष्टींना विरोध; खाजगी मालकीचें तत्त्व अबाधित राहून आर्थिक स्वातंत्र्याला कोणत्याहि प्रकारची अडचण येणार नाही असें जिचें धोरण आहे तीच आदर्श शासनसस्था असें प्रतिपादन; शासनसंस्थेने म्हणजे व्यवहारांत सरकारनें आपले कार्यक्षेत्र शक्य तितकें सकुचित करावे व स्वहित साधण्यास भावनेने केलेल्या चढाओढीला उत्तेजन देण्यासाठी अशा चढाओढीला बाधक ठरणाऱ्या गोष्टीचा बीमोड करावा ह्या विचाराचा पुरस्कार; इतक्या गोष्टी डोळ्यांसमोर समुच्चयाने उभ्या राहतात.

वरील गोष्टींनी युक्त असा सनातनवाद हा स्मिथने जें जें लिहिलें त्याचा आत्माच होता हें स्मिथच्या ह्यापूर्वी सांगितलेल्या विचारसरणी-वरून, त्याच्या तत्त्वज्ञानावरून, सरकारच्या आर्थिक धोरणासंबंधी त्यानें दिलेल्या सल्ल्यावरून लक्षांत येईलच. ह्या पुस्तकात ह्यापुढें केलेल्या विवेचनावरून हेहि लक्षात येईल की, सनातनवादाच्या मूलतत्त्वांवरील विश्वास स्मिथमध्यें जितका आढळतो तितका दुसऱ्या कोणातच आढळत नाहीं. स्मिथनंतर सनातनवादाची अभिवृद्धि झाली ही गोष्ट खरी; पण स्मिथनंतरच्या सनातनवाद्यांत सनातनतत्त्वासंबंधी स्मिथ-तकी एकनिष्ठता आढळत नाही. त्यामुळें सामान्यतः सनातनी समजल्य

गेलेल्या अर्थशास्त्रज्ञांकडून वरील तत्त्वापैकी एखाद दुसऱ्या तत्त्वाबद्दल साशकता व्यक्त केलेली आढळते.

**स्मिथनतरच्या अर्थशास्त्राची रूपरेषा**

अर्थशास्त्राचा आद्य पुरुष व त्या शास्त्रातील सनातनवादाचा पिता ॲडॅम स्मिथ ह्याचा आर्थिक विचार सांगून झाला. स्मिथनतर अर्थशास्त्राला अर्थातच फाद्या फुटल्या. फाद्या हे विकासचिन्ह समजले जाते. स्मिथनतरच्या अर्थशास्त्रज्ञात दोन स्थूल गट पडल्याचे स्पष्ट दिसून येते. एक गट स्मिथपासून स्फूर्ति मिळालेल्या सनातनवाद्याचा व दुसरा गट सनातनवादाच्या विरोधकाचा स्मिथनतरच्या सनातनवाद्यानी स्मिथच्या अर्थशास्त्राला बाधेसूदपणा आणण्याचे कार्य मुख्यत केले. हे कार्य करीत असताना त्यानी स्मिथच्या अर्थशास्त्रविषयक सिद्धान्तापेक्षा स्मिथच्या अर्थशास्त्राची पार्श्वभूमि असणाऱ्या सनातनवादाच्या मूलतत्त्वानाच अधिक महत्त्व दिले. त्यामुळे प्रसंगी स्मिथने सांगितलेले अर्थशास्त्राचे काही सिद्धान्त बाजूस सारून अगदी नवीनच सिद्धान्त सांगण्यास त्याच्या काही अनुयायांनी कमी केले नाही. ह्या भानगडीत स्मिथच्या अनुयायातहि पुढे दोन उपगट पडले. एक गट स्मिथचे अर्थशास्त्र व त्याचे तत्त्वज्ञान बहुताशी स्वीकारून केवळ त्यालाच अधिक शास्त्रीय व बाधीव स्वरूप प्राप्त करून देणाऱ्याचा व दुसरा गट स्मिथप्रणीत अर्थशास्त्राचे स्वरूप बदलून त्याच्या तत्त्वज्ञानाला अधिकच बळकटी आणणाऱ्यांचा. ह्या दुसऱ्या गटाची आर्थिक विचारसरणी सनातनवादाला झालेल्या विरोधाची प्रतिक्रिया असून ती नव-सनातनवाद ह्या नावानें ओळखली जाते. सनातनवाद-विरोधकाच्या गटातील अर्थशास्त्रज्ञानी सनातनवादाच्या मूलतत्त्वांतील अपुरेपणा व कच्चेपणा उघडकीस आणण्याचे कार्य केले. त्याच्यातहि अनेक उपगट आढळतात. सनातनवादाच्या निरनिराळ्या मूलतत्त्वाना वेगवेगळ्या प्रमाणात विरोध केल्यामुळे हे उपगट पडलेले आहेत.

स्मिथनंतर अर्थशास्त्राचा विकास कसा झाला ह्याची रूपरेषा वर दिलेली आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या उरलेल्या भागांत त्या विकासाचे विस्तृत विवेचन केलें आहे. ह्यापुढील प्रकरणांत स्मिथचें अर्थशास्त्र व तत्त्वज्ञान स्वीकारून केवळ त्याला रेखीव स्वरूप देणाऱ्यांनी स्मिथप्रणीत सनातनवादाची अभिवृद्धि कशी केली माहिती दिली. ही पुढील दोन प्रकरणांत सनातनवादाच्या विरोधकाची विचारसरणी सांगितली असून त्यानंतर त्या विरोधाची प्रतिक्रिया म्हणून उदयास आलेला नव-सनातनवाद सांगितला आहे.

# ४ : : : स्मिथप्रणीत सनातनवादाची अभिवृद्धि

**डेव्हिड रिकार्डो**

स्मिथनंतरचा सनातनवादी अर्थशास्त्राचा प्रमुख प्रवक्ता म्हणजे डेव्हिड रिकार्डो ( १७७२–१८२३) हा इंग्लिश अर्थशास्त्रज्ञ होय रिकार्डो हा एका श्रीमंत ज्यू व्यापाऱ्याचा मुलगा होता त्याचा जन्म लंडनमध्यें झाला. शालेय शिक्षणापलीकडे त्याला शिक्षण मिळाले नाही आणि वयाच्या चवदाव्या वर्षीच त्याने आपल्या वडिलांच्या धंद्यात लक्ष घाला-वयास सुरुवात केली. पुढे ज्यू नसलेल्या एका स्त्रीशी वडिलांच्या इच्छेविरुद्ध विवाह केल्यामुळे तो आपल्या बापापासून वेगळा झाला; तरी त्याने व्यापारी जीवन मात्र सोडले नाही. व्यापारांत तो इतका यशस्वी झाला की, वयाच्या पंचविसाव्या वर्षीच त्याची स्वकष्टाने श्रीमंत झालेल्या व्यक्तीत गणना होऊ लागली. आपल्या व्यापारी जीवनात त्याने अतोनात पैसा कमाविला रिकार्डोच्या जीवनात लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट ही की, सुस्थितीमुळे मिळणाऱ्या उसंतीचा ऐषआरामात अपव्यय न करता त्याने शास्त्रीय अभ्यासाकरितां उपयोग करून घेतला. त्याला कोणत्याहि प्रकारचे विश्वविद्यालयीन शिक्षण मिळालेले नव्हते हे लक्षात घेतां ह्या गोष्टीचें विशेषच कौतुक वाटतें. त्यानें शास्त्रीय अभ्यासात लक्ष घातले एवढेच नव्हे तर त्यांत स्वतंत्र बुद्धि चालवून उच्चपद प्राप्त करून घेतले. अर्थशास्त्राचें सुदैव असे की, त्याच्या शास्त्रीय दृष्टीचा फायदा त्या शास्त्राला झाला. सुदैव म्हणण्याचें कारण एवढेच की, प्रथम भूगर्भशास्त्र हा त्याचा आवडीचा विषय होता. पण सहजगत्या हाती पडलेल्या स्मिथच्या ग्रंथामुळे अर्थशास्त्रांत लक्ष घाल-ण्याची त्याला स्फूर्ति झाली सोन्याच्या वाढलेल्या किंमतीसंबंधीची त्याची पुस्तिका (१८१०), धान्याच्या उतरलेल्या किंमती व त्याचा फायद्यावर होणारा परिणाम ह्यावरील त्याचा निबंध (१८१५), स्थिर व काटकसरी चलनाची योजना (१८१७), शेतकीसंरक्षण (१८२२) व राष्ट्रीय पेढीच्या स्थापनेची योजना (१८२४), इत्यादि त्याच्या प्रसिद्ध झालेल्या अर्थशास्त्रीय वाङ्मयाला बरीच मानमान्यता मिळालेली आहे. रिकार्डोच्या प्रकाशित अर्थशास्त्रीय वाङ्मयापैकी सर्वांत महत्वाचें वाङ्मय म्हणजे ' अर्थशास्त्र

व करयोजना ह्याचीं तत्त्वें' (Principles of Political Economy and Taxation) हा त्याचा १८१७ मध्यें प्रकाशित झालेला ग्रंथ.

**रिकार्डोचें अर्थशास्त्राच्या इतिहासांतील स्थान**

आपल्या वाङमयाने अर्थशास्त्राच्या इतिहासात रिकार्डोनें मिळविलेलें स्थान इतकें मोठे व महत्त्वाचें आहे की, स्मिथने आपला ग्रथ लिहिला तेव्हा रिकार्डो चार वर्षांचा होता व स्मिथच्या मृत्यूनतर २७ वर्षांनी रिकार्डोचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. असें असूनहि अर्थ-शास्त्राच्या इतिहासाचे कित्येक समीक्षक अर्थशास्त्राच्या पितृत्वांत स्मिथच्या बरोबरीनें रिकार्डोला भागीदारी देतात. कालानुक्रम लक्षांत घेतला व स्मिथच्या लिखाणाचा दर्जा व पल्ला पाहिला तर असे करणें अर्थातच चूक ठरतें; पण त्यांतला ग्राह्याश एवढाच घ्यावयाचा की, रिकार्डो हा केवळ स्मिथच्या पाउलावर पाऊल ठेवणारा नव्हता तर स्वतंत्र प्रज्ञेचा असा एक लेखक होता. सामान्यतः स्मिथचा सनातनवादी संप्रदाय त्याने पुढे चालविला असला तरी त्याच्या स्वतत्र प्रज्ञेमुळे त्याने स्मिथच्या वैचारिक गोंधळातून वाट काढून सनातनवादी अर्थशास्त्राला तर्कशुद्ध व तर्कबद्ध असे स्वरूप प्राप्त करून दिलें. शिवाय त्यानें अर्थशास्त्राला नवें वळण दिले. ते परिणामतः इतकें मूलग्राही होते की सनातन संप्रदायांतील पुढील लेखकांवर स्मिथपेक्षां रिकार्डोचाच अधिक पगडा बसलेला दिसतो. कालानु-क्रम लक्षात घेतां रिकार्डोला अर्थशास्त्राच्या जनकत्वातला वांटा देणें योग्य नसले तरी अर्थशास्त्राला बाळसें आणण्याचे कार्य त्याने केले असें म्हणणें अयोग्य होणार नाहीं.

**रिकोर्डोनें विभाजनावर विशेष भर दिला**

रिकार्डोने आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत अर्थशास्त्राच्या कार्या-बद्दलची आपली कल्पना स्पष्ट केली आहे. त्याच्या मते उत्पादनाच्या वांटणीसंबधाचे सिद्धान्त (Laws of Distribution) शोधून काढणें हें अर्थशास्त्राचें मुख्य कार्य आहे. संपत्तीच्या वांटपावर रिकार्डोने दिलेला भर लक्षांत ठेवण्याजोगा आहे. स्मिथने विभाजनाचा प्रश्न चर्चिला असला तरी त्यानें उत्पादनाच्या प्रश्नावर अधिक भर दिला होता. वांटणीच्या प्रश्नावर रिकार्डोने दिलेला भर हा त्यानें अर्थशास्त्राला

दिलेल्या विशिष्ट वळणाचा जसा निदर्शक आहे, तसाच तो बदलत्या परिस्थितीचाहि निदर्शक आहे. स्मिथने आपला ग्रथ लिहिला तेव्हा औद्योगिक क्रांति अजून बाल्यावस्थेत होती आणि साहजिकच उत्पादनांतील वाढ हा तेव्हाचा प्रमुख प्रश्न होता. रिकार्डोचा ग्रंथ प्रसिद्ध होण्याच्या वेळेस इंग्लंडांतील औद्योगिक क्रांतीनें प्रौढावस्था गाठली होती. उत्पादनात भरपूर वाढ झाली होती आणि त्यामुळे वांटणीच्या प्रश्नाला अधिक महत्त्व आलें होते. तत्कालीन परिस्थितीच रिकार्डोने विभाजनाच्या प्रश्नाला प्रामुख्य द्यावें याला जबाबदार होती असें दिसते.

उत्पादनाच्या वाटणीचा प्रश्न वस्तुमूल्य कसे ठरतें ह्या प्रश्नाशी अगदी निगडीत आहे. कारण वस्तूला मूल्य प्राप्त होण्यांत कोणाकोणाचा वांटा आहे हें मूल्य ठरण्यातील प्रवाहावरून अजमावतां येते. वस्तुमूल्यांत ज्यांचा वांटा असेल त्याच्यांतच त्या वाटचांच्या प्रमाणात वस्तूची किंमत विभागली जावी हे उचित आहे. असें होते की नाही हे कळून घ्यावयाचें असल्यास वांटणीचा प्रश्न चर्चिण्याच्या आधी वस्तुमूल्याचा प्रश्न चर्चिला जाणें हे तर्कशास्त्राला धरूनच आहे. वस्तुमूल्याचें अर्थशास्त्रातील महत्त्व जाणूनच रिकार्डोने तोच प्रश्न प्रथम हाताळला. रिकार्डोचे हे करणें त्याच्या एकदर तर्कशुद्धतेला साजेसेंच होते.

**रिकार्डोचा मूल्यसिद्धान्त**

वस्तूचे विनिमय-मूल्य (Exchange Value) कशावर अवलबून असते ह्याबद्दल रिकार्डोच्या मनात तिळमात्र संदेह नाही. स्मिथच्या वैचारिक गोंधळापासून तो पूर्णपणे अलिप्त आहे. कोणत्याहि वस्तूचे मूल्य म्हणजे अदलाबदलीच्या वेळी त्या वस्तूच्या मोबदल्यात मिळणारे इतर वस्तूचें प्रमाण. कोणत्याहि वस्तूचे मूल्य त्या वस्तूच्या उत्पादनाकरितां आवश्यक असणाऱ्या मानवी श्रमाच्या प्रमाणावरून ठरतें; त्या वस्तूच्या मोबदल्यात तेवढ्याच श्रमांत उत्पादित होणारें इतर वस्तूचें प्रमाण मिळते असें रिकार्डोचे म्हणणें होते. हा विचार रिकार्डोने अगदी स्पष्टपणे पुढे माडला आहे. हा विचारच मूल्याचा श्रमसिद्धान्त म्हणून अर्थशास्त्रात प्रसिद्ध झाला आहे. हा सिद्धान्त स्पष्टपणें व जोरदारपणें पुढें माडण्याचे श्रेय रिकार्डोलाच दिले पाहिजे. स्मिथच्या लिखाणांत हा सिद्धान्त आढळतो.

इतकेच नव्हे तर ह्या सिद्धान्तानुसार वस्तुमूल्य ठरले जाते, असा आग्रहहि त्याच्या लिखाणात आढळतो. पण ह्या सिद्धान्ताच्या स्मिथने केलेल्या प्रतिपादनांत जरूर ती तर्कशुद्धताहि नव्हती किंवा ह्या सिद्धांताला तो शेवटपर्यंत चिकटूनहि राहिला नाही.

वस्तुमूल्यविषयक आपल्या विवेचनाला सुरुवात रिकार्डोने वस्तूची उपयुक्तता व वस्तूचे मूल्य ह्यामध्ये स्मिथने दाखविलेल्या फरकाचा उल्लेख करून केली. आर्थिक व्यवहारात अधिक उपयुक्तता असणाऱ्या वस्तूंना कमी मूल्य तर कमी उपयुक्तता असणाऱ्या वस्तूंना अधिक मूल्य अशी परिस्थिति असते असें स्मिथने दाखविले होते. वस्तूची उपयुक्तता व तिचे मूल्य ह्यांच्यांतील हा फरक जमेस धरून रिकार्डोने असे प्रतिपादन केले की, हा फरक म्हणजे वस्तूच्या उपयुक्ततेवरून तिचे मूल्य ठरत नाही ह्या गोष्टीचा पुरावा आहे. मात्र थोडीतरी उपयुक्तता असल्याशिवाय वस्तूला मूल्य असणार नाही हें त्याने कबूल केले आहे आणि म्हणूनच उपयुक्ततेमुळें वस्तूला मूल्य प्राप्त होत असले तरी वस्तूची उपयुक्तता कमीजास्त असण्यावर वस्तूचे मूल्य कमीजास्त असणें अवलंबून नसते असे मत त्यानें व्यक्त केले. थोडक्यांत उपयुक्तता ही मूल्याची पार्श्वभूमि असली तरी ती मूल्याचे माप होऊं शकत नाही.

वस्तूचें निश्चित मूल्य उपयुक्ततेमुळें ठरत नसेल तर ते कशामुळें ठरले जाते ? वस्तूची टंचाई व वस्तूच्या उत्पादनाकरिता जरूर असणारे मानवी श्रम असें रिकार्डोचें ह्या प्रश्नाला उत्तर होते. मात्र टंचाईला विशेष महत्त्व देण्यास तो तयार नव्हता. श्रम करूनहि ज्याचा पुरवठा वाढवितां येणें शक्य नाही अशा दुर्मिळ पुस्तकें, चित्रें, पुतळे इत्यादि काही थोड्या वस्तूंच्या बाबतीतच टंचाईनें मूल्य ठरलें जातें पण बाजारात येणाऱ्या एकदर वस्तूंच्या मानाने ह्या वस्तू अगदीच थोड्या असतात; तेव्हा त्या विचारांत घेण्याचें कारण नाही असें त्याचे मत होतें. राहतां राहिले मानवी श्रम. मानवी श्रमच, ज्या वस्तूंचा पुरवठा श्रम करून वाढवितां येतो व ज्यांचे मूल्य निर्बंधविरहित चढाओढीच्या क्रियेने ठरले जाते अशा, बाजारात येणाऱ्या असंख्य वस्तूंचें निश्चित मूल्य ठरलें जाण्यास कारणीभूत होतात असे रिकार्डोनें अगदीं स्पष्टपणें प्रतिपादिलें. हें प्रतिपादन करण्याच्या ओघांतच

त्याने वस्तूच्या उत्पादनाकरिता लागणारे मानवी श्रम व वस्तूच्या मोबदल्यात मिळणाऱ्या इतर वस्तूतील मानवी श्रम ह्याच्यात स्मिथने केलेल्या गफलतीचा उल्लेख करून ह्या दोन्ही गोष्टी एक नाहीत असें त्याने सप्रमाण दाखविले. ह्या बाबतीत रिकार्डोने उपस्थित केलेल्या मुद्याचा आशय असा की, वस्तूच्या उत्पादनाकरिता लागणाऱ्या मानवी श्रमात काहीहि फरक न पडतां त्या वस्तूच्या मोबदल्यांत मिळणाऱ्या इतर वस्तूच्या प्रमाणात फरक पडू शकेल. उदाहरणार्थ, कापडाच्या उत्पादनाकरितां लागणारे मानवी श्रम तितकेच राहिले व यात्रिक सुधारणामुळे धान्याच्या उत्पादनाकरितां लागणारे मानवी श्रम कमी राहिले तर कापडाच्या मोबदल्यात पूर्वीपेक्षा अधिक धान्य मिळू लागेल. ह्या परिस्थितीत मोबदल्यात मिळणाऱ्या वस्तू हे मूल्याचे माप धरले तर कापडाचें मूल्य वाढले असे म्हणावे लागेल. ह्याच्या उलट वस्तूच्या उत्पादनाकरिता लागणारे मानवी श्रम हे मूल्याचे माप धरल्यास धान्याचे मूल्य कमी झाले असे म्हणावे लागेल. वर्णनातील हा फरक दोन्ही मापें एकच नाहीत हेच दर्शवितो. मोबदल्यांत मिळणाऱ्या वस्तू हे माप धरणें रिकार्डोला पसंत नव्हते. जी गोष्ट दुसऱ्या कशावर तरी (म्हणजे श्रमावर) अवलंबून असल्यामुळें स्वतःच स्थिर नाही ती दुसऱ्या कशाचें तरी माप म्हणून कशी स्वीकारता येईल अशी त्याची विचारणा होती. वस्तूच्या उत्पादनाकरितां लागणारे मानवी श्रम माप म्हणून स्वीकारण्यांत हा दोष राहात नाही असे त्याचे ह्या मापाचें समर्थन होतें.

**श्रमसिद्धान्तावरील आक्षेपांना रिकार्डोचें उत्तर**

मूल्याच्या श्रमसिद्धान्तातील मोठी अडचण श्रमाचा दर्जा व श्रमाचा काळ ह्याचा मेळ कसा घालावयाचा ही होय. निरनिराळ्या दर्जाचे एक तासाचे मानवी श्रम सारखेच समजावयाचे की कसे ? ते सारख्या योग्यतेचे समजणे हे योग्य होईल का ? ते सारख्या योग्यतेचे नसतील तर दर्जाला माप नाही हे लक्षात घेता त्याची तुलना करणें कसे शक्य आहे ? ह्या अडचणीला रिकार्डोनें एवढेच उत्तर दिले की, व्यवहारात ही अडचण फारशी जाणवत नाहीं. कारण बाजाररूपी तागडीत निरनिराळ्या दर्जाच्या एका तासाच्या वा दिवसाच्या कामाचे 'वजन' केले जाऊन तासांच्या भाषेंत त्यांचा परस्परसबंध ठरतो. हा सबध एकदा ठरला म्हणजे

सहसा बदलत नाही. सोनाराचें एका दिवसाचे काम सामान्य कामगाराच्या एका दिवसाच्या कामापेक्षा जास्त महत्त्वाचे असेल तर बाजारांत त्याची योग्य ती दखल घेतली जाते. निरनिराळ्या दर्जाच्या कामांचें महत्त्व-मापन एकदां झालें की, तें सहसा बदलत नसल्यामुळें निरनिराळ्या काळातील मानवी श्रमाची तुलना करणें अवघड जात नाही असे रिकार्डोचें म्हणणें होतें.

मूल्याचा श्रमसिद्धान्त स्मिथने भाडवलपूर्व आर्थिक व्यवस्थेपुरताच मर्यादित केला होता. भाडवलाचा आर्थिक व्यवस्थेंत मानवी श्रमांना साहाय्यक म्हणून प्रवेश झाल्यानंतर व जमीन हा उत्पादनाचा घटक खाजगी मालकीखाली आल्यानतर भाडवल व जमीन ह्या घटकांच्या वस्तुमूल्यावर होणाऱ्या परिणामामुळे असें करणें जरूर आहे असें स्मिथचें त्या सबंधांतील समर्थन होतें. भांडवल व जमीन ह्या दोन घटकामुळे निर्माण होणारी अडचण, रिकार्डोला श्रमसिद्धांत कोणत्याहि परिस्थितीत लागू पडतो असा आग्रह धरण्यापासून परावृत्त करूं शकली नाही. भाडवल म्हणजे मानवी श्रमाना साहाय्यक होणाऱ्या वस्तू. त्या पूर्वी केलेल्या मानवी श्रमांतूनच निर्माण झालेल्या असतात. ह्याचा आधार घेऊन रिकार्डोनें असें प्रतिपादन केले की, वस्तूचें मूल्य निश्चित करतांना वस्तूच्या उत्पादनाकरितां लागणाऱ्या मानवी श्रमाबरोबरच त्या वस्तूच्या उत्पादनास साहाय्यभूत होणाऱ्या भाडवलाच्या निर्मितीकरता लागणारे मानवी श्रमहि लक्षांत घेतले जातात. हा मुद्दा समजावून सागण्याकरिता त्याने पायमोजांचे उदाहरण घेतले. पायमोजाचे मूल्य ठरवितांना पायमोजे तयार करण्याचे श्रम तर मोजले जातातच. पण कापूस उत्पादन करण्याचे, तो कापूस पायमोजाच्या उत्पादनाच्या जागीं नेण्याचे, कापूस वाहून नेणारी बोट व कारखान्याची इमारत बाधण्याचे इत्यादि जे श्रम असतात त्या श्रमाचा काही भागहि त्यांत मिळवला जातो. अशा तऱ्हेनें भांडवलाची दखल घेतली जाते. भांडवलावर मालकी कोणाची हा प्रश्न वस्तूचे मूल्य ठरवण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचा नसून त्या मूल्याची वाटणी होण्याचा जेव्हा प्रसंग येतो तेव्हाच तो उपस्थित होतो असेंहि रिकार्डोचें म्हणणें होतें. हें झाले भांडवलासंबंधी. जमीन ह्या घटकाचा वस्तुमूल्यांवर कांहींहि परिणाम होत नाही असा रिकार्डोचा सिद्धान्त होता. तो त्यानें आपल्या साऱ्यासंबंधींच्या विवेचनात स्पष्ट केला

आहे. अशा तऱ्हेनें रिकार्डोने भांडवल व जमीन ह्या उत्पादनाच्या घटकांमुळे होणारी अडचण दूर केली.

**श्रमसिद्धान्ताच्या रिकार्डोप्रणीत मर्यादा**

निरनिराळ्या प्रकारच्या श्रमांच्या दर्जातील भिन्नता, भाडवल व जमीन हे उत्पादनाचे घटक, ह्यामुळें उपस्थित होणाऱ्या अडचणी निवारणाऱ्या रिकार्डोलाहि शेवटी श्रमसिद्धांताला एक मर्यादा घालावी लागली. ती अशी की, दोन वस्तूवर सारखेच श्रम खर्च पडले असूनहि त्याच्या उत्पादनांत लागणाऱ्या स्थिर भांडवलांचे प्रमाण कमीजास्त असल्यामुळे त्यांच्या उत्पादनास कमीजास्त वेळ लागत असेल तर त्यांची किमत सारखी होणार नाही. म्हणजेच श्रमसिद्धान्तांत थोडा फरक करावा लागणार. रिकार्डोनें घातलेली श्रमसिद्धान्तावरील मर्यादा स्पष्ट होण्याकरितां रिकार्डोने घेतलेलेच उदाहरण घेऊ. समजा दोन उद्योगपतीनी शभर शंभर कामगार अनुक्रमे यंत्र व धान्य उत्पादन करण्याकरिता एक वर्षपर्यंत नेमले. ह्या परिस्थितींत श्रमसिद्धाताप्रमाणें धान्य व यत्र ह्यांची किमत सारखी होईल; कारण दोन्ही गोष्टी शभर लोकांच्या एक वर्षाच्या श्रमाचें फळ आहे. येथपर्यंत ठीक झाले. पण समजा पुढे त्याच यत्रापासून कापड उत्पादन करण्याकरितां उपयोग करून वर्षभर शभर कामगारांकडून कापडाचे उत्पादन करविलें. ह्या परिस्थितीत धान्य व कापड ह्याच्या किमतीचा सबध काय राहील? श्रमसिद्धाताप्रमाणे कापडाची किमत धान्याच्या दुप्पट असली पाहिजे. कारण धान्य निर्माण करण्याकरितां १०० कामगार वर्षभर खपले आहेत आणि कापडाचे उत्पादन करण्याकरितां दोनशे कामगार वर्षभर खपले आहेत (१०० यंत्रांचें उत्पादन करण्याकरितां, १०० कापडाचे उत्पादन करण्याकरितां). कापडाची किमत दुप्पट झाली तर श्रमसिद्धान्त लागू पडल्यासारखे होईल. पण रिकार्डोचें म्हणणें असे की कापडाची किमत दुप्पटीपेक्षां अधिक होईल; कारण कापडाच्या उत्पादकांना फायदा मिळविण्यासाठी दोन वर्षे वाट पहावी लागेल. धान्याच्या उत्पादनांत वर्षाकांठीच जो फायदा त्यांच्या हातांत पडला असता तो फायदा भाडवल म्हणून गणला जाऊन त्या फायद्यावर पुढील वर्षांत आणखी फायदा त्याना मिळाला तरच ते दोन वर्षे थाबतील. तो मिळण्यास कापडाची किमत दुप्पटीपेक्षां अधिक हवी हे साध्या

गणिताने कोणासहि स्पष्ट समजेल. कापडाच्या उत्पादनात स्थिर भाडवल म्हणजेच लवकर वसूल न होणारे भांडवल लागले व धान्याचें उत्पादन खेळत्या भाडवलावरच साधले म्हणजेच दोन वस्तूंच्या उत्पादनातील स्थिर व खेळत्या भाडवलाचे प्रमाण सारखे नव्हते म्हणून हा फरक पडला असे रिकार्डोने लिहिले आहे गुतवलेले भाडवल किती काळात वसूल होते ह्याच्यावर जर वस्तूचे मूल्य अवलबून असेल तर निरनिराळ्या वस्तूच्या उत्पादनाकरिता वापरलेले व सामान्यत स्थिर म्हणून समजलेले भाडवल-सुद्धा कमीजास्त टिकाऊ असल्यासहि किमतीत फरक पडू शकेल असेहि रिकार्डोने दाखविले आहे. ह्या बाबतीत रिकार्डोच्या लिखाणाचा आशय असा की स्थिर भांडवल (यत्रे, इमारती, वगैरे) जितके जास्त टिकाऊ तितका त्याच्यावरील मानवी श्रमाचा खर्च कमी. टिकाऊ वस्तूपासून उत्पादिलेल्या वस्तूची किंमत कमी असली तर त्याचे कारण मानवी श्रमांत शोधण्यापेक्षां यंत्राच्या टिकाऊपणांतच शोधणे योग्य होईल.

श्रमसिद्धांतावर आपण घातलेल्या मर्यादा लक्षात घेऊन शेवटी रिकार्डोने असा निष्कर्ष काढला कीं, कमीजास्त टिकाऊ अशा भाड-वलाचा आर्थिक व्यवस्थेत प्रवेश झाल्यानतर वस्तूच्या उत्पादनाकरितां लागणारे मानवी श्रम कमीजास्त होण्याबरोबरच फायद्याचे प्रमाण कमी-जास्त झाल्यामुळेसुद्धा वस्तूची किमत बदलू शकते मात्र कमी महत्त्वाचे ह्या शब्दांत ह्या दुसऱ्या कारणाची बोळवण करून रिकार्डोनें मानवी श्रमा-लाच महत्त्व दिले आहे.

रिकार्डोच्या वस्तुमूल्याविषयीच्या कल्पना समग्रपणे वर दिल्या आहेत. त्या पाहिल्या म्हणजे एक विचार मनात येतो तो असा की, सकृत्-दर्शनीं रिकार्डोचे विवेचन स्मिथच्या विवेचनापेक्षा अधिक सुसगत वाटत असले तरी रिकार्डोचा श्रमसिद्धान्त सांगण्याचा प्रयत्न फारसा यशस्वी झाला नाही भिन्नभिन्न दर्जाच्या मानवी श्रमाची दखल कोणत्या प्रकारे घ्यावयाची ह्याबद्दलचे त्याचे उत्तर समाधानकारक नाही. बाजारात त्याचें मापन कसेंबसे केले जाते व एकदां ते झाले म्हणजे त्यांत बदल होत नाही हे शास्त्रीय दृष्टीला पटत नाही. त्याहिपेक्षा महत्त्वाचा मुद्दा असा कीं, शेवटी त्याने घातलेल्या मर्यादामुळें श्रमसिद्धान्त जवळजवळ साफ

घुऊन निघाला आहे. स्थिर भांडवलाचे प्रमाण, त्याचा टिकाऊपणा ह्या गोष्टीमुळे श्रमसिद्धान्तावर मर्यादा पडते असे म्हणणे म्हणजे भांडवल ह्या घटकात मानवी श्रमापेक्षाहि काही तरी जास्त आहे व त्याचा मूल्यावर परिणाम होतो असे कबूल करण्यासारखेच आहे. भांडवलप्रधान उत्पादन हा ज्या आर्थिकव्यवस्थेचा विशेष आहे अशा प्रचलित आर्थिक व्यवस्थेत हा मुद्दा अधिक महत्त्वाचा आहे. अशा आर्थिक व्यवस्थेला श्रमसिद्धात ागू होत नाही ही स्मिथची कबुली प्रामाणिकपणाची वाटते.

**भाजनाबाबतच्या रिकार्डोच्या कल्पना**

विभाजनाच्या तत्त्वाचें विवरण करणे हा अर्थशास्त्राचा प्रधानहेतु ाहे असे रिकार्डोला वाटत होते तरीसुद्धा त्या प्रश्नाला कदम हात न घालता त्याने वस्तुमूल्य कसे ठरते हा श्न आधी घेतला. कारण आपल्या विभाजनाच्या कल्पना पुढें ांडण्यास तसें करणे आवश्यक आहे असे त्याला वाटत होते. त्याने ीकारलेला हा मार्ग बरोबर होता हे त्याच्या विभाजनाच्या कल्पना पाहता दिसून येईल. त्याच्या विभाजनाच्या कल्पनांचा त्याने प्रतिपादिलेला मूल्याचा श्रमसिद्धान्त हा पायाच आहे असें म्हटले तरी चालेल. निराळ्या शब्दात हीच गोष्ट अशी सागतां येईल की, रिकार्डोचीं विभाजन-तत्त्वें त्याच्या मूल्यसिद्धाताचा तर्कशुद्ध विकासच आहे वस्तुमूल्याला म्हणजे व्यावहारिक भाषेत वस्तूच्या किमतीला कामगार सर्वस्वी जबाबदार आहे असा त्याचा मूल्यसिद्धान्ताचा साराश सांगतां येईल. हा सिद्धान्त ग्राह्य धरावयाचा असल्यास उद्योगपतीचा नफा, जमीनदाराचा सारा ही उत्पन्नें वस्तूच्या किमतीत स्वतंत्रपणें भर टाकणारे भाग असें धरतां येत नाही. ती उत्पन्ने वस्तुमूल्यबाह्य अशीं अगदी स्वतत्र स्वरूपाचीं आहेत असें तरी दाखविले पाहिजे किंवा मानवी श्रमाने उत्पन्न केलेल्या मूल्यातच तीं समाविष्ट आहेत आणि मजुरीतील घटवजा त्याचें स्वरूप असतें असें तरी दाखविलें पाहिजे. साऱ्याच्या बाबतींत रिकार्डोनें पहिला मार्ग स्वीकारला. सारा हें उत्पन्न वस्तुमूल्यावर कोणत्याहि तऱ्हेचा परिणाम करीत नसून वस्तुमूल्य ठरण्याच्या ठराविक स्वरूपाच्या क्रियेंतून तें उद्‌भवते; म्हणजेच तें मूल्याचा अंतर्गत भाग नसून मूल्यबाह्य असें कांहींतरी आहे असें त्याने प्रतिपादिलें.

रिकार्डोचा साऱ्याचा सिद्धान्त फारच प्रसिद्ध पावला आहे. हा सिद्धान्त ही रिकार्डोनें अर्थशास्त्राला दिलेली देणगी असें समजण्यांत येतें. नफ्याच्या बाबतींत रिकार्डोनें वरीलपैकी दुसरा मार्ग स्वीकारला. वस्तूला आलेली किमत श्रमसिद्धान्ताप्रमाणें सर्वस्वीं मजुरी असावयास पाहिजे; पण भांडवलावर जेव्हां कांही व्यक्तींची मालकी प्रस्थापित होते तेव्हां ठराविक दरानें नफा मजुरीतून वजा केला जातो असें त्याने दाखविलें. नफा वजा केल्यानंतर जें राहील ती मजुरी, ही त्याची मजुरीसंबंधीची कल्पना, असें रिकार्डोच्या विभाजनासबंधीच्या कल्पनांचें स्वरूप आहे. त्याच्या कल्पनाचें—विशेषतः त्याच्या साऱ्यासंबधीच्या सिद्धान्ताचे—विस्तृत विवेचन खालीं केलें आहे. रिकार्डोनें आपल्या पुस्तकांत सारा, मजुरी व नफा हा क्रम अनुसरला. खालील विवेचनांत तोच स्वीकारला आहे.

**रिकार्डोचा सारा–सिद्धान्त**

भूमीच्या नैसर्गिक व अविनाशी शक्तीचा (Natural and Indestructible powers of the soil) उपयोग करून देण्याबद्दल जमिनीच्या मालकाला दिलेला उत्पादनाचा भाग म्हणजे सारा अशी रिकार्डोने साऱ्याची व्याख्या केली. सारखेच मानवी श्रम व भाडवल खर्च करूनहि निरनिराळ्या जमिनीपासून होणाऱ्या उत्पादनांत जो फरक असतो तोच फरक साऱ्याच्या स्वरूपात जमिनीच्या मालकाला दिला जातो, असा ह्या व्याख्येचा खुलासा त्यानें केला. रिकार्डोच्या म्हणण्याप्रमाणें निरनिराळ्या जमिनीपासूनच्या उत्पादनांत फरक पडण्याचा व तो दृष्टोत्पत्तीस येण्याचा प्रसंग उद्भवतो. कारण जमिनीजमिनीचा दर्जा सारखा नसतो आणि चागल्या जमिनीचा पुरवठा अमर्यादित नसतो. लोकसख्या वाढली की जमिनीपासून होणाऱ्या उत्पादनाला मागणी वाढते आणि तसे झाले की कमी दर्जाची जमीन उपयोगांत आणावी लागते. त्या जमिनीपासून होणारे उत्पादन अर्थातच आधी वापरात आलेल्या जमिनीपासूनच्या उत्पादनापेक्षां कमी असते. दर्जादर्जांतील भिन्नतेमुळे उत्पादनांत जो फरक पडतो तो फरक जमिनीच्या मालकाला जमिनीच्या उपयोगाची दिलेली किमत ह्या स्वरूपात व्यक्त होतो. उपयोगात आणलेल्या सर्वांत कमी प्रतीच्या जमिनीपासून होणाऱ्या उत्पादनाच्या अनुरोधाने वेगवेगळ्या प्रतीच्या जमिनीमुळें उत्पा-

दनांत पडणारा फरक मापला जातो. चांगल्या जमिनीची विपुलता असती तर पाणी, हवा ह्यांना जशी त्याच्या विपुलतेमुळें किंमत दिली जात नाही तशी जमिनीकरतांहि किंमत दिली गेली नसती असे रिकार्डोनें दाखवून दिलें. साऱ्याला तो निसर्गाच्या अनुदारतेचें फळ म्हणत असे.

**साराविरहित जमीन**

साऱ्याची व्याख्या करून तो उद्‌भवतो कसा हे विशद करतानाच धान्याच्या किंमतीवर साऱ्याचा परिणाम होत नसून धान्याची किंमत ठराविक पातळीवर ठरल्यामुळे साऱ्याची निर्मिति होते असें रिकार्डोने मोठ्या चतुराईने दाखविलें. त्याने प्रतिपादिलेल्या मूल्याच्या श्रमसिद्धान्ताप्रमाणे वस्तूचे मूल्य वस्तूच्या उत्पादनाला लागणाऱ्या मानवी श्रमामुळेच ठरतें. आपल्या ह्या सिद्धान्ताचा आधार घेऊन कमी दर्जाच्या जमिनीपासून होणाऱ्या उत्पादनाचे मूल्य अधिक असते; कारण त्या जमिनीवर चांगल्या जमिनीपेक्षां अधिक मानवी श्रम खर्च करावे लागतात असे त्यानें प्रतिपादिले. धान्याचे मूल्य अगदी कमी दर्जाच्या जमिनीमुळे ठरलें जाते असे रिकार्डोचें म्हणणे. ह्या जमिनीला, जिच्यामुळे सारा हे उत्पन्न उद्‌भवत नाही अशी, म्हणजे साराविरहित जमीन (No rent land) असें नांव दिलें. ही जमीन साराविरहित म्हणण्याचे कारण ह्या जमिनी-पासूनचे उत्पादन व ह्या जमिनीपेक्षा जास्ती दर्जाच्या जमिनीपासूनचें उत्पा-दन ह्याच्यातील फरक म्हणजे सारा असल्याने ह्या जमिनीपासूनच्या उत्पा-दनात साऱ्याचा भाग अजिबात नसतो. उत्पादन-खर्चाच्या दृष्टीनें विचार करतां जमिनीची प्रत जसजशी कमी होत जाते तसतसा उत्पादनखर्च वाढतो; कारण श्रम व भांडवल तेवढेंच असून उत्पादन कमी होतें. वाप-रांतील सर्वात कमी प्रतीच्या जमिनीपासूनच्या धान्याचा खर्च सर्वांत अधिक असतो. सर्वांत अधिक असणारा उत्पादनखर्च मूल्य ठरण्यास कारणीभूत होत असल्यामुळे त्यापेक्षा कमी उत्पादनखर्च असणाऱ्या जमिनी-पासून मूल्य व खर्च ह्यांच्यांत जो फरक उद्‌भवतो तोच साऱ्याच्या रूपानें जमीनदारांना दिला जातो. साराविरहित जमिनीच्या बाबतीत मूल्य व उत्पादनखर्च ही सारखीच असतात. अशा प्रकारें वस्तुमूल्य ठरण्याच्या विशिष्ट क्रियेमुळें सारा ठरतो. साऱ्यामुळें मूल्य ठरत नाहीं. अशा प्रकारचा

रिकार्डोचा साऱ्याचा सिद्धान्त आहे. रिकार्डोचा हा सिद्धान्त त्यानेंच सागितलेल्या घटत्या फळाच्या सिद्धान्तावर आधारलेला आहे. घटत्या फळाचा सिद्धान्त (Law of Diminishing Returns) फार पूर्वीपासून अर्थशास्त्रज्ञाना ज्ञात झाला आहे. उत्पादनाचा कोणताहि एक घटक मर्यादित असता उत्पादनाच्या इतर घटकात वाढ केल्यास उत्पादन वाढतें; पण उत्पादनात वाढ होण्याचा दर मात्र हळूहळू कमी होत जातो, हा त्या सिद्धान्ताचा आशय आहे. आजचे अर्थशास्त्रज्ञ हा सिद्धान्त उत्पादनाच्या सर्वच घटकाना लावत असले तरी पूर्वीचे अर्थशास्त्रज्ञ तो फक्त जमीन ह्या उत्पादन घटकाला लावीत व जमिनीची मर्यादा शेतकीत विशेष जाणवत असल्यामुळे शेतकीत तो सिद्धान्त लवकर व प्रामुख्याने अनुभवास येतो असे मानीत. शेतकीत गुतवलेले भाडवल दुप्पट केले म्हणून उत्पादन दुप्पट होत नाही; ते दुप्पटीपेक्षा कमी होते ह्या निसर्गवादी टर्गोटच्या विधानांत हा सिद्धान्त अभिप्रेत आहे. जमिनीत वाढ न होता केवळ भांडवल व श्रम ह्यातच वाढ झाली तर ज्या प्रमाणांत भांडवल व श्रम वाढतात त्या प्रमाणात उत्पादन न वाढतां कमी प्रमाणात वाढते असे स्वरूप त्या सिद्धान्ताला दिले गेले. उच्च प्रतीच्या जमिनीवर घटतें फळ मिळूं लागले की कमी प्रतीची जमीन उपयोगांत आणावी लागते, असे दाखवून घटत्या फळाच्या सिद्धान्ताशी साऱ्याचा संबंध रिकार्डोने जोडला.

रिकार्डोची साऱ्याची कल्पना अगदीं नवीन नसली व त्या कल्पनेची बीजे स्मिथमध्ये आढळतात हें खरे असलें तरी, साऱ्याची कल्पना सिद्धान्ताच्या स्वरूपात माडण्यांत त्या व सिद्धान्ताला घटत्या फळाच्या सिद्धान्ताचा पाया देण्यात, तसेंच सारा मूल्यबाह्य दाखवून श्रमसिद्धान्त तर्कशुद्ध करण्यांत रिकार्डोनें मोठीच प्रगति केली ह्यांत शंका नाहीं.

**रिकार्डोच्या मतें मजुरी कशी ठरते ?**

कामगाराच्या मजुरीच्या बाबतीत लिहितांना इतर वस्तूंची किंमत ठरण्याची जी क्रिया असते ती मजुरीला म्हणजे मानवी श्रमालाहि कशी लागू पडते तें रिकार्डोनें अगदीं व्यवस्थितपणें दाखविले. इतर वस्तूंप्रमाणेंच मानवी श्रमांनाहि नैसर्गिक व बाजारी अशा दोन प्रकारच्या किंमती असतात, असें सुरुवातीलाच सांगून नंतर मानवी श्रमाची नैसर्गिक किंमत

म्हणजे काय, त्याची बाजारी किमत कशी ठरते, नैसर्गिक किमत व बाजारी किमत ह्यांचा परस्परसबंध काय ह्याची सविस्तर चर्चा त्याने केली.

रिकार्डोच्या मतें कामगाराची नैसर्गिक किमत म्हणजे जगण्यास व एकदर कामगाराची सख्या कमी अगर जास्त न होईल अशा बेतानें प्रजोत्पादन करण्यास जरूर असलेलें वेतन थोडक्यात : कामगार व त्याचें कुटुंब ह्याना लागणारे धान्य, अन्य जरुरीच्या वस्तु व सवयीमुळें कामगार-वर्गाला जरूर वाटणाऱ्या काही आरामाच्या वस्तू ह्याची एकूण किमत ही मानवी श्रमाची नैसर्गिक किमत. कामगाराच्या राहणीमानात समाविष्ट होणाऱ्या वस्तूची किमत वाढली म्हणजे मानवी श्रमाची नैसर्गिक किमत वाढते. मानवी श्रमाची बाजारी किमत इतर वस्तूप्रमाणेंच मागणी पुरवठा ह्याच्या सबंधाने ठरते. मानवी श्रमाचा पुरवठा जेव्हा कमी असेल तेव्हा त्याची किमत वाढते, जेव्हा तो विपुल असेल तेव्हा त्याची किमत कमी होते. मानवी श्रमाची नैसर्गिक किमत व बाजारी किमत ठरण्याचीं कारणे अगदी भिन्न असली तरी इतर वस्तूच्याप्रमाणेच मानवी श्रमाच्या बाबतीतहि बाजारी किमतीमध्ये नैसर्गिक किमतीकडे आकर्षिली जाण्याची वृत्ति आढळते बाजारी किमत जेव्हां नैसर्गिक किमती-पेक्षा अधिक असते तेव्हा कामगाराची स्थिति सुखी व भरभराटीची असते. त्यामुळे त्याच्या प्रजोत्पादनाच्या कार्याला जोर चढून कामगाराची संख्या व त्याबरोबरच मानवी श्रमाचा पुरवठा वाढतो. ह्याचा परिणाम मानवी श्रमाची बाजारी किमत नैसर्गिक किमतीच्या बाजूकडे झुकण्यांत होतो. ह्याच्या उलट बाजारी किमत जेव्हां नैसर्गिक किमतीपेक्षां कमी असते तेव्हा कामगाराना जरुरीच्या गोष्टीहि मिळू शकत नसल्यामुळें त्यांची स्थिति खालावलेली अशी असते. ह्या आपत्तीचा परिणाम जेव्हा त्यांची संख्या कमी होण्यात होतो तेव्हां बाजारी किमत नैसर्गिक किमतीच्या बाजूकडे चढते. रिकार्डोचा सिद्धान्त पुढे मजुरीचा निर्वाह सिद्धान्त ( Subsistence Theory of Wages ) म्हणून प्रसिद्ध झाला. हा सिद्धान्त माल्थसच्या लोकसंख्या सिद्धान्तावर उभारलेला आहे. कामगारांच्या दृष्टीनें हा सिद्धान्त अगदीं निराशावादी आहे. कारण ह्या

सिद्धान्ताप्रमाणे केवळ जगण्यालाच अगदी आवश्यक असलेल्या मजुरीपली-कडे कामगारांचे उत्पन्न जात नाही. रिकार्डोच्या विवेचनात मात्र त्याचा निराशावादीपणा तितकासा व्यक्त झाला नाही. कारण सुधारणेच्या मार्गावर असलेल्या समाजात कामगाराकरिता असणारी मागणी सारखी राहून अमर्यादित काळपर्यंत बाजारी किमत नैसर्गिक किमतीच्या पुष्कळ वरच्या पातळीवर राहू शकते असेहि त्याचे मत होते.

**नफ्याबद्दलचे रिकार्डोचे विचार**

वर सांगितल्याप्रमाणे साऱ्याप्रमाणे नफ्याला रिकार्डोने मूल्यबाह्य असे काहीतरी मानले नाही. वस्तुमूल्याचा नफा हा एक अंतर्गत भाग असून वस्तूला मूल्य प्राप्त करून देण्याची जबाबदारी सर्वस्वी कामगारावर असली तरी भांडवल खाजगी मालकीखाली आल्यानंतर वस्तुमूल्याचे फायदा व मजुरी हे दोन भाग पडतात, असें रिकार्डोचे म्हणणे होते. नफ्याची ही कल्पना व मजुरीचा वरील सिद्धान्त ह्या गोष्टी मान्य केल्यास फायदा म्हणजे मूल्यातील कामगाराचे वेतन वजा करून उरलेला भाग म्हणजे नफा, असे म्हणता येईल. ह्या म्हणण्याचा आधार घेऊन रिकार्डोने असा सिद्धान्त प्रतिपादिला की, मजुरीत वाढ झाली की नफा कमी होतो. ह्या बाबतीत त्याने असें दाखवून दिले की धान्याची किमत वाढली की मजुरीत वाढ होते, पण मजुरीत वाढ झाली की, औद्योगिक वस्तूंच्या किमतीत वाढ होत नाही. कारण धान्याच्या किमतीत वाढ झाली, ह्या कारणाने औद्योगिक वस्तूच्या उत्पादनाकरिता लागणाऱ्या मानवी श्रमांत काही वाढ होत नाही. मानवी श्रमात वाढ होत नाही म्हणजेच त्या वस्तूच्या किमतीत वाढ होत नाही. किमतीत वाढ न झाल्यास वाढलेली मजुरी द्यावयाची कोठून ? अर्थात् नफ्यावर तिचा बोजा पडतो. हे झाले औद्योगिक वस्तूविषयी. शेतकी वस्तूच्या बाबतींतहि किमत वाढली कीं मजुरी वाढते अगर सारा वाढतो. केवळ मजुरी वाढते असें नव्हे; तर अधिक मजूर कामास लावावे लागतात. (अधिक मानवी श्रम लागत असल्यामुळेंच किंमत वाढलेली असते.) म्हणजे वाढलेली किमत सारा आणि नव्यानें लागणाऱ्या कामगारांची मजुरी ह्यावरच खर्च होऊन पूर्वी कामावर असणाऱ्या कामगारांच्या वाढत्या मजुरीचा बोजा नफ्यावरच पडतो. ह्या सर्व गोष्टी

दाखवून व त्याचें विस्तृत विवेचन करून रिकार्डोनें असे सिद्ध केले की, मजुरी वाढली की नफा कमी झालाच पाहिजे नफा व मजुरी ह्याचा व्यस्त संबंध दाखवून देण्याशिवाय सर्व वस्तूच्या उत्पादनात सारखा होण्याची नफ्याची वृत्ति असते, इतकेंच नव्हे तर नफ्यातील फरक एकाच दिशेने व सारख्याच प्रमाणात होतो असेहि त्याने दाखविले आहे.

वाटणीसंबंधाचे रिकार्डोकृत विवेचन वाचीत असता त्याच्या तर्कशुद्धते-बद्दल सारखे कौतुक वाटते मूल्याच्या श्रमसिद्धान्तावर त्याचे सर्व विवेचन आधारलेले आहे. त्या सिद्धान्तापासून आपल्या वाटणीच्या विवेचनात तो मुळींच ढळला नाही.

**आर्थिक प्रगतीचा विभाजनावर होणारा परिणाम**

वाटणीसबधाच्या आपल्या विवेचनाच्या ओघातच रिकार्डोने आपल्या आर्थिक वृद्धीसंबधीच्या कल्पना पुढे माडल्या ह्या कल्पना त्याने केलेल्या वाटणीसंबंधाच्या विवेचनाच्या ओघातच आल्या आहेत कारण तें विवेचन करताना केवळ सारा, मजुरी, नफा ही उत्पन्नें कशी ठरतात ह्याचेंच विवेचन करून तो थाबला नाही. तर आर्थिक प्रगतीच्या प्रवाहाचा ह्या तीन प्रकारच्या उत्पन्नावर काय परिणाम होतो ह्याचेहि त्यानें विवेचन केले. हे विवेचन अर्थातच विखुरलेल्या स्वरूपात आहे. ते सर्व एकत्रित करून त्याचा साराश पुढीलप्रमाणे सागता येईल आर्थिक प्रगति होत असते तेव्हां मानवी श्रमाकरितां असलेली मागणी वाढती राहून मजुरीत वाढ होत असते पण त्याच कारणामुळे लोकसख्येची व त्याच प्रमाणांत कामगारांच्या संख्येची वाढ होते. लोकसंख्येची वाढ झाल्यामुळे धान्यादि वस्तू अधिक लागू लागतात. त्यामुळें कमी प्रतीची जमीन उपयोगांत आणावी लागते व सारा ह्या उत्पन्नाचा उगम होतो. हाच प्रकार चालू राहिला म्हणजे अधिकाधिक कमी प्रतीची जमीन उपयोगांत आणली जाते व त्याचा परिणाम चांगल्या जमिनीपासून मिळणाऱ्या साऱ्यात वाढ होऊं लागते. अशा तऱ्हेनें आर्थिक प्रगतीच्या प्रवाहामुळें जमिनीच्या मालकांची चलती झाली तरी समाजांतील इतर घटकांवर त्याचा परिणाम अनिष्ट असाच होतो. धान्यांच्या किंमतीत वाढ झाल्यामुळे मजुरींत वाढ होते; पण

त्याचा फायदा कामगारांना होत नाही. कारण वाढती मजुरी धान्याच्या वाढत्या किमतीवरच खर्ची पडते. इतर वस्तूच्या उत्पादकाचा तर तोटाच होतो. कारण धान्याच्या किमती वाढल्यामुळे मजुरीत वाढ झाली तरी इतर वस्तूच्या किमतीत वाढ न झाल्यामुळे नफ्याचे मान कमी होते थोडक्यात म्हणजे आर्थिक प्रगति ह्याचा रिकार्डोकृत अर्थ वाढता सारा, स्थिर मजुरी (पैशातील मजुरी वाढली तरी कामगाराचे राहणीचे मान वाढत नाही, म्हणजे स्थिरच रहातें ह्या अर्थाने) आणि घटता नफा असा होतो

**जमीनदारांचे हितसंबंध इतरांपासून भिन्न**

आर्थिक प्रगतीचा रिकार्डोने केलेला अर्थ नि.सशय निराशावादी आहे. तथाकथित आर्थिक प्रगतीनें मूठभर जमीनदाराशिवाय कोणाचाच फायदा नाही असा त्याचा अर्थ होतो. पण त्याहिपेक्षा महत्त्वाची गोष्ट अशी की, रिकार्डोच्या आर्थिक प्रगतीच्या कल्पनेने समाजातील निरनिराळ्या वर्गांचे आर्थिक हितसबध एकच असतात ही कल्पना समूळ नष्ट झाली. रिकार्डोचा आर्थिक प्रगतीचा अर्थ मान्य केल्यास जमीनदार व समाजातील इतर लोक ह्याचे हितसबंध भिन्न असतात असें कबूल करावे लागतें. रिकार्डोने असे स्पष्टच लिहिले आहे की, जमीनदार आणि समाजातील इतर लोक ह्याच्यातील व्यवहार दोघाना फायदेशीर नसून एका बाजूला फायद्याचे व दुसऱ्या बाजूला पूर्णपणे नुकसानकारक असे असतात. त्याच्या मते जमीनदार वर्गाचे हितसबध नेहमीच उपभोगक व औद्योगिक वस्तूचे उत्पादक ह्याच्या हितसबधाशी विरोधक असतात. तसेंच मजुरी वाढली की, नफा कमी होतो, हें त्याचे प्रतिपादन मान्य केल्यास कामगारवर्ग व भांडदलदार, उद्योगपतिवर्ग ह्याचे हितसबंधहि परस्परविरोधी ठरतात. आर्थिक प्रगतीची रिकार्डोकृत मीमासा स्मिथप्रणीत सनातनवादावर एक प्रकारचा आघात होता. कारण जबर आशावादाला व समाजातील निरनिराळ्या वर्गांचे हितसंबंध एकमेकांत गुंतलेले असतात, ह्या तत्त्वाला स्मिथप्रणीत सनातनवादांत प्रमुख स्थान होते.

**खुल्या व्यापाराचा उत्साही पुरस्कार**

मात्र त्यामुळें रिकार्डो हा सनातनवादीच होता इतकेंच नव्हे तर त्या पंथांतील एक प्रमुख अर्थशास्त्रज्ञ होता, ह्या विधानाला मुळीच बाध येत

नाही. कारण कालातरानें रिकार्डोचा निराशावाद सनातनवादातच पचून गेला. शिवाय धान्याची किमत वाढल्यामुळे जमीनदारवर्ग गबर झाला तरी समाजांतील इतर लोकाची स्थिति खालावते; ह्या आपल्या तत्त्वाचा उपयोग करून त्याने धान्यावर बसविलेल्या आयात करावर जोरदार हल्ला चढविला व स्वस्त धान्य मिळवण्याचा एकच उपाय म्हणून खुला व्यापार ह्या सनातनवादात समाविष्ट असलेल्या आर्थिक धोरणाचें समर्थन केलें. परराष्ट्रीय व्यापारामुळें देशांत उपभोगास उपलब्ध होणाऱ्या वस्तूची विपुलता व वैचित्र्य वाढतें आणि बऱ्याच वस्तू स्वस्त मिळाल्याने खर्च वांचून बचतीला मदत होते हे त्याला मान्य होते. पण परराष्ट्रीय व्यापारामुळे नफ्याचे मान नेहमी वाढतें ह्या मताचें त्यानें खडन केलें. मात्र धान्यादि वस्तूची स्वस्त आयात झाल्यास नफ्याचे मान वाढते हे सांगण्यास तो विसरला नाहीं. अशा प्रकारें खुल्या व्यापाराचा पुरस्कार करून त्याने सनातनवादाची सेवा केली खुल्या व्यापाराच्या पुरस्कारांत स्मिथपेक्षाहि त्याने अधिक उत्साह दाखविला कारण स्वस्त धान्याच्या आयातीबद्दल त्याला विशेष आस्था होती. रिकार्डोच्या सनातनवादांतील आणखी एक महत्त्वाचा भाग म्हणजे जे. बी. से ह्या फ्रेंच अर्थशास्त्रज्ञाने प्रतिपादिलेल्या 'वाजवीपेक्षा जास्त उत्पादन कधीच होऊ शकत नाही' ह्या तत्त्वाला त्याने दिलेली मान्यता. हा सिद्धान्त पुढे येईलच. तेव्हा त्याची अधिक चर्चा येथे नको.

रिकार्डोच्या उरलेल्या अर्थशास्त्रविषयक लिखाणात त्याचें पैसा ह्या संस्थेसंबधींचें विवेचन व त्याच्या करयोजनेसबधीच्या कल्पना हे दोन महत्त्वाचे भाग आहेत. हे दोन्ही प्रश्न त्याच्या वेळच्या अर्थकारणांत महत्त्व पावलेले होते व तत्कालीन झगड्यांचा त्याच्या लिखाणावर साहजिकच थोडा फार परिणाम झालेला होता. रिकार्डोचा निरोप घेण्यापूर्वी पैसा ह्या संस्थेसंबधीचे त्याचे सिद्धान्त व त्या सिद्धान्तांतून निघालेले आतरराष्ट्रीय देण्याघेण्यासबंधी त्यानें केलेले विवेचन व तसेच करयोजनेबद्दलचे त्याचें विवेचन ह्याची माहिती करून घेणे इष्ट आहे.

**सुवर्ण परिमाणाला मान्यता**

रिकार्डोच्या विवेचनाप्रमाणे पैशाचें मूल्य (म्हणजेच पैशाची खरेदी-शक्ति, म्हणजेच पैसा व इतर वस्तू ह्यांचा सबंध) पैसा म्हणून वापर-

लेल्या वस्तूचे उत्पादन करण्याकरितां लागणाऱ्या मानवी श्रमावरून ठरते. सोन्याची किमत चादीपेक्षा अधिक असली तर ती सोन्याचें उत्पादन करण्यास अधिक मानवी श्रम लागतात म्हणूनच. पैशाच्या खरेदीशक्तीला रिकार्डोच्या विवेचनात विशिष्ट स्थान आहे. कारण पैशाच्या खरेदीशक्तीवर कोणत्याहि देशाला किती द्रव्यनिधि (Quantity of Money) लागतो हें अवलंबून असते; असे त्याचे मत होते. सोन्याचा पैसा म्हणून उपयोग केला असता कमी पैसा देशात असला तरी पुरतो. कारण सोन्याची खरेदीशक्ति जास्त असते. कारण सोने उत्पादण्यास अत्यंत श्रम करावे लागतात.

वस्तुमूल्य-मापनासाठी सोन्याचा उपयोग त्याला पसत असला तरी व्यवहारात कागदी पैशाचाच उपयोग करणे त्याला अधिक पसंत असे. कागदी पैशाच्या गुणावर तो इतका लुब्ध होता की दुरुपयोगाच्या भीतीनें कागदी पैसा नकोच असें म्हणणाऱ्याशी त्याचा तीव्र मतभेद होता. अर्थात् कागदी पैसा काढण्यास सोपा असल्यानें तो काढण्याच्या सत्तेचा दुरुपयोग होईल; नव्हे मागील अनुभव पाहता तो होतोच; ह्याची त्याला जाणीव होती. त्यावर कागदी पैशाचें ठराविक दराने सोन्यात रूपांतर केव्हाहि करतां येईल, अशी हमी त्या पैशाच्या निर्मात्यांनी देणें हाच रामबाण उपाय तो सुचवी. तसें केल्यानेच कागदी पैशाला सोन्याचे मूल्य प्राप्त होतें, असें त्याचे म्हणणे होते ज्या चलनव्यवस्थेत कागदी पैशाचा सर्रास वापर आहे, पण कागदी पैशाच्या ठराविक दराने सोन्यांत केव्हाहि रूपांतर करतां येईल अशी व्यवस्था आहे आणि अशा प्रकारे ज्या चलनव्यवस्थेंत सोन्याचा अपव्ययकारक वापर टाळूनहि मूल्यमापन सोन्याच्याद्वारां केले जातें त्या चलनव्यवस्थेला रिकार्डो आदर्श समजत असे. आदर्श चलनव्यवस्थेचें रिकार्डोकृत वर्णन सुवर्णचलनविरहित सुवर्णपरिमाण (Gold Bullion Standard) ह्या चलनव्यवस्थेशी जुळते आहे हे सहज ध्यानात येईल.

### सुवर्णपरिमाण, द्रव्यनिधिसिद्धान्त व आंतरराष्ट्रीय आर्थिक व्यवहार

देशातील पैसा वाढला की, किमती वाढून पैशाचे मूल्य कमी होते; उलटपक्षीं पैसा कमी झाला की, किंमती कमी होऊन पैशाचे मूल्य वाढतें; हा पुढे अत्यंत रेखीव स्वरूप प्राप्त होऊन द्रव्यनिधिसिद्धान्त (Quantiyt

Theory of Money) म्हणून ओळखला जाणारा सिद्धांत रिकार्डोला मान्य होता. त्यावरच त्याचें आंतरराष्ट्रीय देण्याघेण्यासंबधींचे विवेचन आधारलेलें असून त्यातहि सुवर्णपरिमाणाला गर्भित मान्यता आहे. तें विवेचन येणेप्रमाणें :—ज्या वेळेस कोणत्याहि राष्ट्राला केव्हाहि हव्या असलेल्या सोन्याचा चलन म्हणून उपयोग होत असतो तेव्हा पैशाची खरेदीशक्ति आपोआप स्थिर राखली जाते. त्यासाठी आंतरराष्ट्रीय आर्थिक व्यवहाराची अत्यंत मदत होते. एखाद्या देशांत किमती वाढून पैशाचे मूल्य कमी झाल्यास इतर देशांतील किमती कमी असल्यानें त्या देशांतील आयात वाढते. आयातीची एकूण किंमत थोड्या अवधीतच निर्यातीच्या एकूण किंमतीपेक्षां अधिक होते. दोहोंतील फरक सोन्याच्या रूपाने भरून द्यावा लागत असल्यामुळे सोने बाहेर जाते. त्यामुळे पैशाचा पुरवठा कमी होऊन पैशाचे मूल्य वाढते. ह्याच्या अगदी उलट प्रकार पैशाचे मूल्य कमी झाले असता होतो. तेव्हा निर्यात वाढून देशात बाहेरून सोने येऊन पैशाचे मूल्य वाढते. पैशाची खरेदीशक्ति स्थिर राखण्याकरिता उपयोगी असलेला हा तोडगा केवळ कागदी पैसा अस्तित्वात असतो तेव्हा उपलब्ध असत नाही; तरीसुद्धां पेढयानी सोन्याची आंतरराष्ट्रीय हालचाल लक्षात घेऊन पैशाच्या निर्मितिसंबधाचे धोरण ठरविल्यास म्हणजे देशात सोन्याचे आगमन झाल्याबरोबर कागदी पैशाचा पुरवठा वाढविल्यास आणि सोने देशाबाहेर गेल्याबरोबर पैशाचा पुरवठा कमी केल्यास तो रामबाण उपाय लागू पडतो असे त्याने दाखविले व तसें पेढयांनी धोरण ठेवावें असे सुचविले.

## करयोजनेचें विवेचन

त्यानें आपल्या ग्रंथाला "राजकीय अर्थशास्त्र व करयोजना" असे नाव दिलेले असलें तरी त्या मानाने त्याचें करयोजनासंबधीचे विवेचन थोडें आहे व ते विशेष महत्त्वाचे नाही. सरकारने लोकावर लादलेले कर भांडवलातून अगर उत्पन्नातून दिले जातात असे सांगून कर वाढल्याबरोबर जर लोकाचें उत्पन्न व उत्पादनशक्ति ह्या गोष्टी वाढल्या नाहीत तर ताबडतोबीच्या काळात लोकांचे राहणीमान आणि भावी काळातील उत्पादन कमी होतें असें त्यानें दाखविलें. अर्थातच भांडवलावरच ज्यांचा बोजा पडेल

असे कर सरकारने टाळावेत असें त्यानें सुचविलें. इग्लंडच्या सरकारने ही खबरदारी घेतली नाहीं म्हणून त्यानें त्या सरकारला दोषहि दिला.

### रिकार्डोनें अर्थशास्त्राला लावलेलें विशिष्ट वळण

रिकार्डोच्या अर्थशास्त्राची वरील विवेचनावरून कल्पना येईलच. रिकार्डोच्या अर्थशास्त्राची माहिती करून घेतल्यानतर रिकार्डोचें अर्थशास्त्रात स्थान काय हा प्रश्न मनात येतो कालानुक्रमें अर्थशास्त्राचा जनक म्हणून स्मिथची व त्याची बरोबरी करता आली नाही तरी रिकार्डोच्या लिखाणाचा पुढील अर्थशास्त्रावर व सरकारच्या आर्थिक धोरणावर झालेला परिणाम पाहिला तर स्मिथची व रिकार्डोची बरोबरी निःसंशय करतां येईल. एवढेच नव्हे तर अर्थशास्त्रावर झालेल्या परिणामाच्या बाबतीत रिकार्डोचे पाऊल स्मिथच्या पुढे होतें असें म्हणणे भाग आहे. रिकार्डोचें लिखाण व स्मिथचें लिखाण ह्यांची तुलना करून पाहिलें असता असें दिसून येईल की, रिकार्डोच्या लिखाणात तर्कशुद्धता अधिक असून ऐतिहासिक सत्याच्या आधारे अर्थशास्त्रीय सिद्धान्त मांडण्यापेक्षां सहजसिद्ध अशा कांही गृहीत तत्त्वावर अर्थशास्त्राच्या सिद्धान्ताची उभारणी करणें व अशा सिद्धान्ताच्या पायावर सबध अर्थशास्त्राची व पर्यायाने आर्थिक धोरणासबधीच्या सूचनांची इमारत उभारणें ही प्रवृत्ति अधिक दिसून येते. ही प्रवृत्ति म्हणजेच रिकार्डोनें अर्थशास्त्राला लावलेले नवे वळण. ह्या वळणाने रिकार्डोनें अर्थशास्त्राला अधिक **अमूर्त** (Abstract) स्वरूप प्राप्त करून दिलें असें म्हणता येईल. निराळ्या शब्दात हीच गोष्ट अशी सांगता येईल की, रिकार्डोपासून अर्थशास्त्र हे वैचारिक किंवा तर्कप्रधान शास्त्र बनले. अर्थशास्त्राला शास्त्राचें स्वरूप प्राप्त व्हावयाचें असेल तर अर्थशास्त्राला असे वळण लागणें अपरिहार्यंच होते कारण प्रयोगशाळापद्धतीचा अर्थशास्त्राला अवलंब करतां येत नसल्यामुळे ह्या वळणानें जाऊनच आपली वाढ करणे अर्थशास्त्राला शक्य आहे. प्रायोगिक शास्त्र बनणें कठीण असल्यामुळें अर्थशास्त्राला वैचारिक शास्त्र बनणें भाग आहे. ह्या दृष्टीने रिकार्डोनें अर्थशास्त्राला बाळसें आणलें, असें त्याच्या कार्याचें जें वर्णन करण्यांत येतें तें योग्यच आहे असेंच कोणीहि म्हणेल. रिकार्डोने अर्थशास्त्राला लावलेलें वळण कायमचेंच ठरलें.

### रिकार्डोचें सनातनी स्वरूप

रिकार्डोनें अर्थशास्त्राला स्मिथपेक्षा निराळें वळण लावलें ही गोष्ट खरी असली तरी सनातनवादी अर्थशास्त्रज्ञ ह्या दृष्टीनें त्याच्या लिखाणाचा विचार केल्यास त्याला स्मिथचाच अनुयायी म्हणावे लागेल. स्मिथचा जबर आशावाद त्याच्यांत नव्हता व समाजातील निरनिराळ्या वर्गांचे हितसबध एकच आहेत, ही गोष्ट त्याला मान्य नव्हती हे लक्षात घेऊनहि असें विधान करतां येईल. ह्या गोष्टी सनातनवादातच पचून गेल्या हे ह्यापूर्वीच स्पष्ट करण्यात आले आहे. रिकार्डोच्या नतर सनातनवाद म्हणजे अमूर्त स्वरूपाचे अर्थशास्त्र, सनातनवाद म्हणजे व्यक्तिवादाचा पुरस्कार, सनातनवाद म्हणजे अर्थशास्त्राचे सिद्धान्त अटळ व जागतिक स्वरूपाचे असतात असा विश्वास, सनातनवाद म्हणजे चढाओढीला उत्तेजन, खुला व्यापार, सुवर्ण परिमाण ह्यानी युक्त अशा आर्थिक धोरणाचा पुरस्कार असे समीकरण बनले. योगायोग असा की, सनातनवादी रिकार्डोच्या लिखाणाचाच पुढें क्राति-कारक उपयोग मार्क्सप्रभृति लेखकाकडून करण्यात आला योगायोग म्हणण्याचें कारण असे की ज्या क्रांतीच्या पुरस्कारासाठी रिकार्डोच्या लिखाणाचा उपयोग करून घेतला गेला त्या क्रातीला रिकार्डोने स्वप्नात सुद्धा मान्यता दिली नसती त्याचे अर्थशास्त्र एका विशिष्ट वर्गाचेच अर्थशास्त्र होतें. तत्कालीन परिस्थितीचें व त्या वेळच्या समाजातील निर-निराळ्या वर्गाच्या भिन्नभिन्न हितसंबधाचे बरोबर प्रतिबिब रिकार्डोच्या अर्थशास्त्रात आढळते रिकार्डोच्या वेळी भाडवलदार वर्ग जोरदार झाला होता. आपल्या हितसबधाला विरोधी असणाऱ्या वर्गाचा बीमोड करावा व आपल्याला अनुकूल असे धोरण सरकारकडून स्वीकारले जावे अशी त्याची धडपड चालू होती. ह्या धडपडीला त्याला शास्त्रीय पाठिबा हवा होता. ही गरज रिकार्डोने जमीनदारवर्गाचे हितसंबध समाज-विरोधी आहेत असे प्रतिपादन करून, खुल्या व्यापाराचा पुरस्कार करून, वस्तूच्या किमती स्थिर राहतील अशी चलनव्यवस्था व उत्पादनाला धक्का न लागेल अशी करयोजना सरकारनें अमलात आणावी अशी विचारसरणी पुढें मांडून व त्या विचारसरणीला आपल्या परीने शास्त्रीय आधार ठेवून रिकार्डोने भागविली. समाजांतील प्रबल वर्गांच्या गरजाचेच शास्त्रीय समर्थन

रिकार्डोच्या लिखाणात आढळत असल्यामुळें भांडवलशाहीच्या चलत्या काळात रिकार्डोच्या अर्थशास्त्राचे स्वागत झाले असल्यास व परिणामाच्या दृष्टीने तें यशस्वी झाले असल्यास नवल नाही.

* * *

**माल्थस**

रिकार्डोनंतर ज्याचा उल्लेख केला पाहिजे असा अर्थशास्त्रज्ञ म्हणजे थॉमस रॉबर्ट माल्थस (१७६६-१८३४), माल्थसचा जन्म १७६६ मध्यें झाला. वयाच्या १९ व्या वर्षी त्याने केंब्रिज विश्वविद्यालयात प्रवेश केला. तेथील जीझस महाविद्यालयातच त्याचें पदवीपरीक्षेपर्यंत शिक्षण झाले. पदवी घेण्यापूर्वीच त्याच्या हुषारीचा बोलबाला झाला होता. अर्थातच सन्माननीय रीत्या तो पदवीपरीक्षेत उत्तीर्ण झाला हे सांगणें नकोच ! पदवीपरीक्षेनंतर त्याने चर्चमध्ये प्रवेश केला. नंतरच्या काळांत तत्कालीन सामाजिक प्रश्नानी त्याचें लक्ष वेधून घेतले. ह्या तत्कालीन सामाजिक व आर्थिक परिस्थिती-संबंधी त्याने केलेल्या विचारातून त्याचा ' लोकसंख्येवरील निबंध ' निघाला. ह्या ग्रंथाची पहिली निनावी आवृत्ति १७९८ मध्ये प्रसिद्ध झाली. ह्या ग्रंथाने लोकांचे लक्ष इतके वेधून घेतले गेले की, त्या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध होण्याचा योग तर आलाच; पण प्रसिद्धीविरहित राहू इच्छिणाऱ्या माल्थसला आपलें नाव जाहीर करणे भाग पडले माल्थसच्या ग्रंथाच्या ज्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या आहेत त्यापैकी १८०३ मध्यें प्रसिद्ध झालेली आवृत्ति विशेष महत्त्वाची होती. कारण ह्या आवृत्तीत पहिल्या आवृत्तीच्या जवळजवळ चौपट मजकूर तर होताच; पण त्याशिवाय लोकसंख्येविषयीचें पहिल्या आवृत्तींतील विवेचन बहुतांशी त्याने बदलले. माल्थसच्या मतात झालेला बदल व त्याच्या लोकसंख्येविषयीच्या ज्ञानांत पडलेली भर हा मध्यंतरीच्या कालांत माल्थसने युरोपभर केलेल्या प्रवासाचा परिणाम होता. लोकसंख्येच्या निबंधानें माल्थसची अर्थशास्त्रज्ञ म्हणून कीर्ति पसरली. त्यामुळे १८०५ मध्ये ईस्ट इंडिया कंपनीने आपल्या नोकरीत शिरू इच्छिणाऱ्या तरुणाकरितां काढलेल्या हेलबरी महाविद्यालयात इतिहास व अर्थशास्त्राचा प्राध्यापक म्हणून त्याची नेमणूक झाली. त्यानंतर त्यानें अर्थशास्त्रावर बरेंच लिखाण केले. त्यापैकी ' धान्यासंबंधींच्या कायद्यांचे परिणाम ' (१८१८), साऱ्याचें स्वरूप (१८१५), अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें (१८२०) हे ग्रंथ प्रमुख आहेत.

१८२१ मध्यें लंडनमध्यें स्थापण्यात आलेल्या अर्थशास्त्रसमाजाच्या स्थापनेत त्याने रिकार्डोबरोबरीने भाग घेतला होता.

**माल्थसचा लोकसंख्या सिद्धान्त**

माल्थसनें सांगितलेल्या लोकसंख्येच्या सिद्धान्ताला अर्थशास्त्रात बरीच प्रसिद्धि मिळालेली आहे. माल्थसचा सिद्धान्त म्हणून तो ओळखला जातो. त्यामुळेंच असा गैरसमज पसरला आहे की, लोकसंख्येचा सिद्धान्त माल्थसलाच प्रथम उमजला आणि त्या सिद्धान्ताशिवाय माल्थसमध्ये उल्लेखनीय असें काही नाही. ह्यापैकी पहिला भाग खोटा आहे; कारण माल्थसपूर्वीहि काही लेखकानी त्या सिद्धान्ताची जाणीव दर्शविणारे लिखाण केलें होते. दुसरा भाग खोटा आहे हे पुढे समजेलच. एवढी गोष्ट खरी की त्याच्या लोकसंख्येवरील लिखाणाइतकी त्याच्या इतर लिखाणाला प्रसिद्धि मिळाली नाही. त्याचे कारण कदाचित् असे असावे की, त्याचा लोकसंख्येचा सिद्धान्त त्या वेळी लोकप्रिय असणाऱ्या सनातनवादात समाविष्ट होण्याजोगा होता आणि त्याचे इतर लिखाण सनातनवादाला अनुकूल नव्हते. पुढील विवेचनात प्रथम लोकसंख्येचा सिद्धान्त व नंतर त्याचे लिखाण हा क्रम स्वीकारला आहे. माल्थसनें आपल्या लोकसंख्येवरील ग्रंथाचा उद्देश मानवी जीवन सुखी होण्याच्या मार्गांतील कांटे कोणते व ते कांटे दूर कसे करता येतील ह्याबद्दलचें संशोधन करणे असा आहे, असे प्रथमच सांगितले. त्यानंतर सर्व मानवी सुखाच्या आड येणाऱ्या सर्व गोष्टींचा विचार करणे एकट्यादुकट्या व्यक्तीच्या शक्तीच्या पलीकडचे आहे, असें म्हणून त्यानें एकदमच लोकसंख्येच्या प्रश्नाला हात घातला. असें करण्याचे त्याने असे समर्थन केले की, उपलब्ध जीवनसत्त्वाच्या मर्यादेच्या पलीकडे प्रजोत्पादन वाढविण्याची सर्वच प्राण्यात व म्हणूनच मनुष्यातहि आढळणारी वृत्ति हा मानवी प्रगतीच्या मार्गांतील सर्वांत मोठा कांटा आहे. नवलाची गोष्ट अशी की समाजाच्या सुरुवातीपासून ह्या कांट्यामुळें होणारा अडथळा जाणवत असला आणि तोच समाजातील दुर्गुणांना व हलाखीला मोठ्या प्रमाणावर जबाबदार असला तरी त्याकडे जावें तसे लक्ष गेलें नाहीं. आपले हे मत सांगितल्यानंतर ह्या मतात उल्लेखिलेल्या वृत्तीचें विस्तृत विवेचन माल्थसने आपल्या ग्रंथात केलें. ते सारांशरूपाने पुढें दिलें आहे.

**माल्थसच्या विवेचनाचा सारांश**

डॉ फ्रँकलिन ह्या लेखकाने असे दाखविले आहे की वनस्पति व प्राणी ह्याच्या वाढीला गर्दीमुळे होणारा त्रास व अन्नाकरिता करावी लागणारी धडपड ह्याशिवाय दुसरी कोणतीहि मर्यादा नाही, ही गोष्ट अगदीं खरी आहे. वनस्पति व प्राणी ह्याच्यात प्रजोत्पादनाची नैसर्गिक इच्छा अतिशय प्रबल असते आणि भावी पिढीची काळजी ह्या भावनेला अजिबात स्थान नसते. तेव्हा असें होणे साहजिकच आहे. अर्थातच त्याची वाढ जागेचा अभाव व अन्नाचा अभाव ह्यामुळेच मर्यादित राखली आहे. इतर प्राणिजीवनाला व वनस्पतिजीवनाला जो नियम लागू आहे त्यापासून मनुष्यहि सुटत नाही. कारण लैंगिक सुखाची हांव मनुष्यात इतर प्राण्यांइतकीच प्रबळ असते. पण मनुष्यप्राण्याच्या बाबतीत एक महत्त्वाची गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. ती अशी की, मनुष्यात असलेल्या विचारशक्तीमुळे जिच्या उपजीविकेची सोय करता येणार नाही अशी प्रजा निर्माण करणें इष्ट आहे की कसें असा विचार त्याला सुचतो. मात्र त्यामुळें त्याला सुखाचा मार्ग सापडतो असें नाही. कारण वरील विचाराप्रमाणें त्याच्याकडून कृति झाली तर समाजात दुराचार वाढतो. वरील विचाराकडे त्याने दुर्लक्ष केलें तर उपजीविकेच्या साधनाच्या मर्यादेपलीकडे लोकसख्या वाढते व त्यामुळें अन्न मिळविण्यास जो त्रास पडतो त्याचा परिणाम मृत्यूत वाढ होऊन लोकसख्या मर्यादित केली जाण्यात होतो. एकुण काय? हलाखीची स्थिति अगर ती स्थिति प्राप्त होण्याची भीति ह्या परिस्थितीत मनुष्यप्राण्यानें सदैव राहिलें पाहिजे.

**लोकसंख्या भूमितिश्रेणीनें वाढते**

वरील विधाने सिद्ध करण्यापूर्वी लोकसख्येच्या वाढीवर कोणतेहि नियत्रण नसलें आणि लोकसंख्येच्या वाढीला पूर्ण वाव मिळाला तर लोकसख्या किती वाढेल हें पाहणें बोधप्रद होईल. लोकसंख्येच्या वाढीला पूर्ण वाव अर्थात् कोठेच दिला जात नाही हे लक्षात ठेवणे जरूर आहे. उशीरा केलेले विवाह, एकाच स्त्रीशी विवाहित होण्याचे सामाजिक वा धार्मिक बधन, रोगराई उत्पन्न करणारी परिस्थिति असले काही अडथळे लोकसख्येच्या वाढीच्या

मार्गीत असतात. ते नसते तर दहापधरा वर्षातच लोकसंख्या पुष्कळ झाली असती असें काही लेखकांचे मत आहे. ते लक्षात घेता किमानपक्षी कोणताहि अडथळा न आल्यास २५ वर्षांत लोकसख्या दुप्पट होईल. म्हणजेच लोकसंख्येतील वाढ भूमितिश्रेणीने होते असें म्हणणे अवास्तव होणार नाही.

**धान्योत्पादन गणितश्रेणीनें वाढतें**

भूमीपासून होणाऱ्या उत्पादनाचा वाढीचा दर काय असेल हे ठरविणें कठीण असले तरी तो लोकसख्येतील वाढीच्या दरापेक्षा भिन्न आहे हे निश्चित. उपलब्ध असणारी सर्व सुपीक जमीन एकदा वापरात आली की जमिनीची सुपीकता हा एक प्रकारचा ठेवाच होऊन बसतो आणि तो सावकाश कमी होणारा असतो. ही गोष्ट लक्षात घेता धान्योत्पादन उत्पादनाला अगदी अनुकूल परिस्थिति असलेल्या वेळीहि जास्तीत जास्त गणितश्रेणीने वाढते असे म्हणण्यात काही चूक नाही थोडक्यात--लोकसख्या १, २, ४, ८, १६, ३२, ६४, १२८, २५६, ह्या प्रमाणात वाढली तर धान्योत्पादन हे १, २, ३, ४, ५, ६, ७, ८, ९ ह्या प्रमाणात वाढते. त्यामुळें लोकसख्या व धान्योत्पादन ह्याच्यांत फरक पडणे व तो फरक वाढत जाणें अपरिहार्य आहे. त्याबरोबरच वाढता नैसर्गिक सहार हे लोकसख्या मर्यादित करणारे अस्त्र म्हणून आपोआप प्रभावी होणे हेहि अपरिहार्य आहे.

**नैसर्गिक संहाराचें अस्त्र**

हे अस्त्र कोणत्या प्रकारें आपले कार्य करते हे तपासणें जरूर आहे. लोकसंख्येच्या वाढीवरील अंतिम बधन अन्नाचा अभाव हे असले तरी प्रत्यक्ष दुष्काळाची वेळ खेरीजकरून इतर वेळीं अन्नाचा अभाव ह्या परिस्थितींतून उद्भवलेली इतर बंधनेंच लोकसंख्या मर्यादित करण्याचे कार्य करतात. ह्या बंधनांचें प्रतिबंधक बंधनें ( Preventive checks ) व आपत्तीवजाबंधने ( Positive checks ) असें वर्गीकरण करता येईल. प्रतिबंधक बंधनें ही स्वखुषीनें स्वीकारलेलीं बंधने असल्यामुळें ती फक्त मनुष्यप्राण्यांतच आढळतात. आपल्या विचारशक्तीच्या जोरावर मनुष्य प्रजोत्पादनाचे स्वत:वर व आपल्या मुलांबाळांवर काय परिणाम होतील ह्याचा

अंदाज घेऊं शकतो. मनुष्याला असलेल्या हृया विचारशक्तीमुळेंच सुधारलेल्या समाजात कितीतरी लोक उशीरां विवाहासारखे नैतिक दृष्टचा श्रेष्ठ मार्ग आपण होऊन स्वीकारीत असल्याचे दिसून येते. ह्या मार्गाचा स्वीकार हे लोकसख्येच्या वाढीवरील प्रतिबधक बंधन आहे. हृयाशिवाय वेश्यागमन आणि अनैसर्गिक मार्गांनी गर्भपात इत्यादि गोष्टीसुद्धा प्रतिबधक बधनाच्या सदरात पडतात पण त्यामुळें अनीतीत वाढ होऊन मानवी श्रेष्ठत्वाला उतरती कळा लागते. आपत्तीवजा बधनें निरनिराळ्या प्रकारची असून त्यांमध्ये अतिशय गरिबी, मुलाची आबाळ, मोठमोठी शहरें, युद्धे, सामान्य रोगराई, प्रमुख सासर्गिक रोग, दुष्काळ हृयाचा अतर्भाव होतो. हृया आपत्तीवजा बधनापैकी नैसर्गिक रीत्या उद्भवणारी बधने हृया खऱ्याखुऱ्या आपत्ति होत. युद्धासारख्या मानवी प्रयत्नानी टाळता येणाऱ्या आपत्तीचा समावेश अनीतीतहि करावा लागेल. कारण त्याचा उद्भव मनुष्याच्या दुर्गुणातून झालेला असतो. असो. हृया सर्व गोष्टी लक्षात घेतां नैतिक ताबा (Moral restraint), आत्यंतिक हलाखी (Misery) व अनीति (Vice) असें लोकसंख्येवरील निर्बन्धाचें (Checks) वर्गीकरण करावयास हरकत नाही.

वरील सर्व बंधने समाजात कमी जास्त प्रमाणात लोकसख्या मर्यादित करण्याचे कार्य करीत असतातच. त्याना न जुमानताच अन्नसाठ्यावर घातलेली मर्यादा ओलांडून जाण्याची वृत्ति लोकसख्येत दिसून येतेच. त्यामुळे समाजातील खालच्या वर्गातील लोकाना हलाखीतच दिवस कठावे लागतात व त्याची परिस्थिति सुधारण्याची आशाहि नसते. पैशातील कामगारांचें वेतन कमी होत नसल्यामुळे कामगारांची हलाखी लपून राहिली तरी प्रत्यक्षात ती होत असते. कारण मजुरांना लागणाऱ्या वस्तूच्या किमतीत सारखी वाढ होत असते. हृयाचा फायदा भाडवलदारांना व जमीनदाराना मिळतो. कारण मानवी श्रम त्याना मजुरांच्या वाढत्या लोकसंख्येमुळे स्वस्त मिळतात. त्याच्याकडून वाढलेल्या मागणीमुळें व मध्यंतरीच्या काळात आपत्तीवजा बधनानी मजूरसख्या कमी झाल्यामुळे पुढे मजुरीत वाढ होते पण ती तात्पुरतीच.

**मनुष्यानें नैतिक बंधनें आपण होऊन स्वीकारलीं पाहिजेत**

वरील विवेचनावरून ही गोष्ट सिद्ध होते की, लोकसख्या अन्न-साठ्याच्या पलीकडे वाढणें व ती नैतिक सयम, आपत्ति व अनीति या त्रयी-पैकी एक अगर अधिक बंधनामुळे मर्यादित केली जाणें, हा अटळ असा निसर्ग-नियम आहे. मनुष्य आपल्या प्रयत्नाने फार तर वरील त्रयींपैकी कोणत्या बधनाला आपले कार्य करावयाला अधिक वाव द्यावा हे ठरवू शकतो आणि स्वतःचे सुख व श्रेष्ठत्व ह्या गोष्टी लक्षात घेऊनच त्याने ते ठरविले पाहिजे. ह्या दृष्टीने विचार करता लोकसंख्येच्या वाढीकडे लक्ष न देता आपत्ति आपल्यावर ओढवून घेण्यात अर्थ नाही. आपत्ति ह्या दैवी कोप नसून निसर्ग-नियमांच्याविरुद्ध जाण्याच्या मनुष्याच्या वृत्तीतूनच त्या जन्मास येतात ह्या दृष्टीने त्याच्याकडे पाहिले पाहिजे. आपण होऊन आपल्यावर आपत्ति ओढवून घेणें हे जसे त्याज्य तसेच अनैतिक मार्ग मनुष्याने अनुसरल्याने लोकसख्या मर्यादित व्हावी हेहि त्याज्यच. त्या मार्गामुळे मनुष्याच्या नीति-मत्तेला बट्टा लागतो. तेव्हा आपत्ति व अनीति वगळता नैतिक ताबा हाच मार्ग उरतो. हा मार्ग श्रेष्ठ आहे आणि तो मार्ग स्वीकारणें हे मनुष्य-मात्राचे कर्तव्य आहे हा मार्ग स्वीकारणे ह्याचा अर्थ लैंगिक सुखाचा अजिबात त्याग करणें हा नाही. तसें करणे बरोबर होणार नाही. कारण ह्या सुखाला योग्य तो वाव दिल्याने मनुष्याच्या केवळ शारीरिक सुखातच भर पडते असें नसून त्यामुळे मनुष्यात कोमलता, सुहृदयता, दयाबुद्धि इत्यादि गुण निर्माण होतात व त्याला उच्च असे कौटुंबिक सुख प्राप्त करून घेतां येतें, ही गोष्ट दृष्टिआड करता येत नाही. हा मार्ग मनुष्याने स्वीकारावा याचा अर्थ एवढाच की, प्रजोत्पादनक्षम वय झाल्याबरोबर लग्न न करतां स्वतःच्या मुलांबाळांचा योगक्षेम व्यवस्थित करता येईल ही खात्री होईपर्यंत विवाहाशिवाय त्यानें थाबले पाहिजे. मध्यतरीच्या काळांत कडक ब्रह्मचर्य-पालन त्यानें केलें पाहिजे, हें ओघानें आलेंच. नाहीतर अनीति निर्माण होते.

सारांश :—**लैंगिक सुखोपभोगाच्या हांवेवर योग्य कालपर्यंत विजय मिळविणें हाच लोकसंख्या मर्यादित करण्याचा सर्वांत श्रेष्ठ मार्ग आहे. विचारशक्ति असणाऱ्या मनुष्याने हा मार्ग आपण होऊन**

स्वीकारावयास हवा. कारण अशा मनुष्याला एवढें कळले पाहिजे की, गरिबाची स्थिति सुधारण्याचा हा एकच श्रेष्ठ असा मार्ग आहे.

**माल्थसच्या लोकसंख्या-सिद्धान्तावरील अनुकूल प्रतिकूल टीका**

माल्थसच्या लोकसख्या-सिद्धान्तांतील बराचसा भाग त्याच्या पेशाला साजेसा असाच आहे. धर्मगुरु असल्याने लैंगिक सुखोपभोगाच्या नैसर्गिक इच्छेवर नियंत्रण हा लोकसंख्या मर्यादित करण्याच्या मार्गांतील सर्वात श्रेष्ठ मार्ग होय असे त्याने म्हणावें हे साहजिकच होते. माल्थसच्या वेळी-सुद्धा माल्थसच्या सिद्धान्तावर साधकबाधक चर्चा बरीच झाली. माल्थसच्या लिखाणावर प्रतिकूल टीका करणाऱ्यात मनुष्याच्या उपजत श्रेष्ठत्वाबद्दल आणि मनुष्यस्वभावाच्या नैसर्गिक चांगुलपणाबद्दल यत्किंचितहि संदेह नसणारा विलयम गॉडविन (सुप्रसिद्ध आंग्लकवि शेले ह्याचा सासरा) हा ध्येयवादी प्रमुख होता. त्याने १८२० साली प्रसिद्ध केलेल्या लोक-सख्येवरील निबधात माल्थसच्या मताचे खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या निबधात माल्थसच्या सिद्धान्ताचे गॉडविनने पत्त्याचा बगला असें मोठे समर्पक वर्णन केले आहे. माल्थसच्या मतांचा गॉडविननें केलेल्या खडनाचा आशय एवढाच की लोकसख्या भूमितिश्रेणीने वाढते, ह्या माल्थसच्या कल्पनेला सबळ असा काहीच आधार नाही. उलट प्रजोत्पादनाचे बाबतीत परमेश्वरी योजना अशी दिसते की प्राणिसृष्टीतील खालच्या दर्जाच्या प्राण्याकडून प्रजोत्पादन अधिक व्हावें व वरच्या दर्जाच्या प्राण्याकडून प्रजोत्पादन त्या मानाने कमी पण अधिक परिपूर्ण व्हावें. मनुष्य तर काय प्राणिसृष्टींतील राजाच ! तेव्हां मनुष्यांतील प्रजोत्पादनच कमी ठेवून निसर्ग मनुष्याचें श्रेष्ठत्व राखण्यास मदत करीत असला तर त्यात नवल नाही. ह्या परिस्थितीत लोकसंख्या भूमितिश्रेणीनें वाढते हा निसर्गनियम आहे असे म्हणणें म्हणजे त्या शब्दाचा अवमान करण्यासारखें आहे आणि तो नियम समजून त्यावर मनुष्यानें प्रथमच योग्य खबरदारी घेतली नाहीं तर मनुष्या-वर आपत्तीचें वा अनीतीचें अरिष्ट कोसळणें अटळ आहे; असें तर्कट रचणे हा केवळ कल्पनाविलास आहे आणि तोहि अत्यंत हीन दर्जाचा. कारण मनु-ष्याच्या श्रेष्ठत्वाला कमीपणा आणणारी आणि भविष्यकाळाचें अवास्तव निराशावादी चित्र रंगवणारीं अनुमानें त्यांत सामावलेलीं आहेत. माल्थसला

पाठिंबा देणारे लोकहि त्या वेळी होतेच. त्यांना अर्थातच गॉडविनने माल्थसचे मठ्ठ व अंध शिष्य असे संबोधिले आहे. माल्थसच्या पाठिराख्यांत उत्क्रांति (Evolution) तत्त्वाचा जनक डार्विन व वॅलेस हे दोघे सुविख्यात प्राणिशास्त्रज्ञ प्रमुख होते. जीवनकलह सर्वत्र चालू असतो व त्या कलहात जो श्रेष्ठतम असेल तोच टिकून राहतो, ह्या त्याच्या मताला माल्थसचा सिद्धान्त पोषकच आहे. त्या दोघा शास्त्रज्ञांनी माल्थसचे बौद्धिक ऋण जाहीरपणे मान्य केले. त्याशिवाय इंग्लंडचा तत्कालीन प्रधानमंत्री पिट व तेव्हाचा प्रमुख धर्मशास्त्रज्ञ पेली ह्यांनी माल्थसच्या सिद्धान्ताबद्दल आपला झालेला अनुकूल ग्रह जाहीरपणे सांगितला. माल्थसच्या सिद्धान्ताचा संबंध केवळ अर्थशास्त्राशीच नसल्यामुळे माल्थसच्या सिद्धान्ताच्या प्रकाशनाने विशेष खळबळ उडावी हे साहजिक होते.

**माल्थसच्या सिद्धान्ताचें अर्थशास्त्रांतील स्थान**

माल्थसच्या लोकसंख्येसंबंधीच्या सिद्धान्तावरील तत्कालीन प्रतिक्रिया कांहीहि असो, माल्थसच्या सिद्धान्ताच्या अर्थशास्त्रातील स्थानाबद्दल दोन गोष्टी निश्चितपणे सांगतां येतील. पहिली अशी की, माल्थसचा सिद्धान्त सनातनी संप्रदायाकडून जलद पचवला गेला. कारण कामगारांची स्थिति न सुधारण्याला त्या वर्गाचा बेजबाबदारपणाच जबाबदार आहे हे म्हणणे भांडवलशाहीला रुचण्याजोगे होते. दुसरी गोष्ट अशी कीं, माल्थसचा सिद्धान्त आपोआपच स्थानभ्रष्ट झाला. कारण आर्थिक दृष्टया मनुष्याच्या झालेल्या प्रगतीनेच माल्थसच्या सिद्धान्ताचा फोलपणा नजरेस आणला. लोकसंख्या वाढती असूनहि सुबत्ता राहू शकते, व लैंगिक सुखाला बाध न येतां संततिनियमनाच्या साधनांनी लोकसंख्या नियंत्रित करता येते. ह्या गोष्टी जेव्हा सिद्ध व शक्य झाल्या तेव्हा माल्थसच्या सिद्धान्ताचा अपुरेपणा व कच्चेपणा जाणवू लागणे व त्या सिद्धान्ताचे महत्त्व कमी होत जाणें हे साहजिकच होते. माल्थसच्या सिद्धान्ताला आजच्या अर्थशास्त्रांत स्थान नसलें तरी माल्थसचा सिद्धान्त हा एक धोक्याचा कंदील असून लोकसंख्या ही गोष्टसुद्धा नियोजनाच्या कक्षेत आली पाहिजे ह्याची जाणीव करून देण्यास तो सिद्धान्त मदत करतो, असें आजचे अर्थशास्त्रज्ञ कबूल करतात.

**माल्थसची अन्य कामगिरी**

माल्थस त्याच्या लोकसंख्येच्या सिद्धान्तामुळेंच मुख्यत: प्रसिद्धीस आलेला असला तरी वर सांगितल्याप्रमाणें लोकसंख्येचा सिद्धान्त एवढीच माल्थसची अर्थशास्त्रांतील कर्तबगारी असे समजणें हें चूक ठरेल. माल्थसची आणखी एक कामगिरी वाखाणण्याजोगी आहे. ही कामगिरी अशी की, 'व्यक्तिस्वातंत्र्यावर व वैयक्तिक फायद्यावर उभारलेली आर्थिक व्यवस्था कोणत्याहि प्रकारच्या घोटाळ्यापासून मुक्त आहे आणि म्हणूनच ती आपसूक कार्यक्षमतेनें चालते' ह्या स्मिथ-रिकार्डोप्रणीत सनातन वादांतील प्रमुख समजुतीवर त्यानें हल्ला केला व आर्थिक व्यवस्थेंत भांडवलाची वाढ अवास्तव झाल्यास अनर्थ होऊं शकतो, हें दाखवून देण्याचा प्रयत्न केला. माल्थसच्या ह्या कामगिरीचा ह्या ठिकाणी केवळ उल्लेख केला आहे. त्या कामगिरीसंबंधींची विशेष माहिती पुढील प्रकरणाकरितां राखून ठेविली आहे. कारण ती कामगिरी सनातनवादाला विरोधक स्वरूपाची असल्यामुळे सनातनवादाच्या अभिवृद्धीची माहिती देणाऱ्या ह्या प्रकरणांत समाविष्ट करता येत नाहीं. ह्या ठिकाणीं एवढे मात्र सांगावयास हरकत नाहीं की, माल्थसच्या लोकसंख्येच्या सिद्धान्ताचा जेवढा गाजावाजा झाला तेवढा त्याच्या इतर लिखाणाचा झाला नाही. त्या वेळीं जोरांत असलेल्या सनातन-सप्रदायाच्या प्रकृतीला माल्थसचें इतर लिखाण मानवण्यासारखें नव्हतें हेच असें होण्याचें बहुधा कारण असावें.

**जे. बी. से**

लोकसंख्येचा सिद्धान्त प्रतिपादून माल्थस ज्याप्रमाणें सनातनवादाच्या अभिवृद्धीला कारणीभूत झाला त्याचप्रमाणें एखाददुसऱ्या सिद्धान्ताची देणगी अर्थशास्त्राला देऊन सनातनवादाची अभिवृद्धि करणाऱ्या आणखी दोन लेखकांचा उल्लेख केला पाहिजे व त्यांच्या कामगिरीचे थोडक्यांत वर्णन केलें पाहिजे. त्यापैकीं पहिला म्हणजे **से** (१७६७–१८७२) हा फ्रेंच अर्थशास्त्रज्ञ. कालदृष्ट्या से हा रिकार्डो-माल्थसचा समकालीन होता. १८०३ मध्यें अर्थशास्त्रावरील त्याचा प्रमुख ग्रंथ प्रसिद्ध झाला. से हा सामान्यत: स्मिथचा शिष्य समजला जातो. सनातनवादाच्या फ्रान्समधील शाखेचा जनक असेंहि त्याचें वर्णन करण्याची पद्धत आहे सेचे

हें वर्णन योग्यच आहे. कारण स्मिथप्रणीत सनातनवादाचा सुबोध प्रचार करून त्याला फ्रान्समध्ये लोकप्रियता मिळवून देण्याचें महत्कार्य से याने केलें. मात्र त्याची कामगिरी तेवढीच होती, असें समजणें चूक होईल. त्याशिवाय स्वतःची अशी भरहि सेने सनातनवादांत घातली.

**सेचा बाजाराचा सिद्धान्त**

सेची अर्थशास्त्राला सर्वांत महत्त्वाची देणगी म्हणजे त्याचा बाजाराचा सिद्धान्त (Law of Market). हा सिद्धान्त पुढीलप्रमाणें सागता येईल. खुल्या चढाओढीच्या भरभक्कम पायावर उभारलेल्या आर्थिक व्यवस्थेत सर्वसामान्य-पणे मागणीपेक्षा पुरवठा जास्त आणि (General Over production) म्हणून सर्वच वस्तूच्या बाबतींत उत्पादनखर्चापेक्षा किंमत कमी अशी परिस्थिति उद्भवणें अशक्य आहे. आर्थिक व्यवस्थेंत वरीलसारखी परिस्थिति निर्माण होणें पूर्णपणें असंभवनीय आहे. कारण वस्तूंचा एकूण उत्पादनखर्च म्हणजेच निरनिराळ्या घटकांच्या मालकांच्या पैशातील उत्पन्नाची (सामान्य नफा धरून) एकूण बेरीज. घटक मालकांना मिळणारे पैसारूपी सर्व उत्पन्न उत्पादित वस्तूवरच खर्च होत असल्यानें उत्पादनक्रियेंतून उत्पादनखर्चाच्या रूपानें बटवडा होणारी रक्कम व वस्तूच्या किंमतीच्या रूपानें वसूल होणारी ( परत उत्पादनक्रियेत येणारी ) रक्कम ह्याच्यात तफावत असणें शक्यच नाही. एखाद्या वस्तूचा उत्पादनखर्च शंभर असला तर ते १०० रु. उत्पादनाचे घटक पुरवणाऱ्या लोकांत विभागले जातात तेच १०० रु. किंमतीच्या रूपाने उत्पादनांत परत येतात. परत येणारी रक्कम १०० रु. पेक्षा अधिक असणारच नाहीं, हे सहज समजण्याजोगे आहे. ती शंभरपेक्षा कमीहि असणार नाही. कारण केवळ अदलाबदलीचें साधन असलेला पैसा तसाच ठेवून कोणास काय फायदा ? शिवाय खर्च न करतां वांचलेला पैसाहि कर्जाच्या रूपानें दुसऱ्यांकडे जाऊन भांडवली वस्तूवर (त्याच्याकडून) खर्चिला जातो. अशा तऱ्हेने सर्व वस्तूचा एकूण उत्पादन-खर्च किंमतीच्या रूपाने उत्पादनांत परत आल्यास सर्व वस्तूचा विचार करतां एकूण उत्पादनखर्च व किंमतीच्या रूपानें होणारी एकूण जमा ह्या दोन्ही गोष्टी भिन्न असणारच नाहीत. ह्याचाच अर्थ असा की, सर्व वस्तूचा विचार करता जेवढे उत्पादिलें जाईल तेवढे सर्व बाजारात खपेल आणि

मागणीपेक्षां पुरवठा जास्त असे होणार नाहीं. मात्र प्रत्येक वस्तूच्या उत्पादन खर्चाइतकी रक्कम त्या त्या वस्तूवरच खर्च केली जाईल असे नाहीं. त्यामुळें जरूरीपेक्षा उत्पादन जास्त अशी परिस्थिति एखाद्या दुसऱ्या वस्तूच्या बाबतीत उद्भवणे शक्य आहे. पण एका वस्तूवर खर्च न झालेला पैसा दुसऱ्या कोणत्या तरी वस्तूवर खर्च झालाच पाहिजे. तेव्हां एका वस्तूच्या उत्पादनांत पुरवठा जास्त असला तर दुसऱ्या वस्तूकडे मागणी जास्त असते. निरनिराळ्या वस्तूंची मागणी पुरवठ्याची परिस्थिति पाहिली तर आर्थिक व्यवस्थेचा तोल कायम राहतो असेंच दिसून येईल.

**सेची इतर कामगिरी**

सेचा वरील सिद्धान्त आर्थिक व्यवस्था आपसूक एकसूत्रता निर्माण करते ह्या स्मिथच्या जबर आशावादाचे व रिकार्डोच्या तर्कप्रधान विचार-पद्धतीचें अत्युत्कृष्ट उदाहरण आहे. ह्या सिद्धान्ताला सनातनवादांत ताबडतोब स्थान मिळाले ह्यांत नवलाचें कांहींच नाहीं. 'सरकारनें आर्थिक व्यवस्थेत मुळीच ढवळाढवळ न केली तरी सर्व कांहीं ठाकठीक होत असते,' ह्या सनातनवादाच्या प्रमुख तत्त्वाला सेचा सिद्धान्त पोषक होता. त्या सिद्धान्ता-शिवाय आणखीहि एक भर सेनें सनातनवादांत टाकली आहे. ती अशी. सेनें उद्योगपति (Entrepreneur) हा उत्पादनक्रियेचा मध्यबिंदु धरून उत्पादन-व्यवस्थेच्या कारभाराचे वर्णन केलें. उद्योगपतींची कार्यें विस्तृतपणें सेनेच प्रथम सांगितलीं. सेच्या मतें उद्योगपति हा उपभोक्त्यांचा (Consumers) प्रतिनिधि असून उत्पादन कशाचें व किती करावें ह्याचा निर्णय घेण्याच्या रूपानें तो उपभोक्त्यांच्या अपेक्षा व्यक्त करीत असतो. एका अर्थानें तो सर्व आर्थिक व्यवस्थेचाच मध्यबिंदु आहे. कारण त्याच्या उत्पादनविषयक निर्णयामुळें उत्पादनाचे उद्दिष्ट व स्वरूप तर ठरतेंच, पण त्याशिवाय सारा, मजुरी, नफा, व्याज हीं सर्व उत्पन्नें म्हणजेच उत्पादनाची वांटणी ठरली जाते. उत्पादन व त्याची वांटणी ठरण्यास कारणीभूत होणारा उद्योगपति हाच आर्थिक व्यवस्थेंतील प्रधान घटक ह्यांत शंकाच नाहीं. आर्थिक व्यवस्थेच्या कारभाराचें वर्णन करण्याची सेची ही पद्धत जितकी अभिनव तितकीच प्रचलित आर्थिक व्यवस्थेपुरतें बोलावयाचें झाल्यास वास्तवतेचें यथार्थ दर्शन करून देणारी आहे.

सेचा आणखी एक विशेष म्हणजे उत्पादन ही प्रधानतः वस्तुनिर्मिति नसून उपभोग्यतेची (utility) निर्मिति आहे, हा विचार त्यानें माडला. निर्मिति करणाऱ्या सर्वांना उत्पादक श्रमिक म्हणावें असा त्याचा आग्रह होता. आपल्या पुस्तकांत त्यानें डॉक्टरचें उदाहरण घेतलें आहे. रोग्याना औषध देऊन बरा करणाऱ्या डॉक्टरला अनुत्पादक कां म्हणावें असा त्याने प्रश्न केला. डॉक्टरच्या श्रमाच्या बाबतींत जर अदलाबदल होऊं शकते म्हणजे किंमत देऊन डॉक्टरच्या विद्येचा उपयोग ज्याला हवा त्याला करून घेता येतो, तर त्याला अनुत्पादक कशाच्या आधारावर म्हणतां येईल, अशी त्याची विचारणा आहे. उपयोग्यतेची निर्मिति म्हणजे उत्पादन अशी त्यानें व्याख्या केली. ह्यावरूनच स्मिथ-रिकार्डोचें अधानुकरण करणारा तो नव्हता हें स्पष्ट होते. वस्तूपेक्षा वस्तूकरता असलेल्या गरजेला प्राधान्य देणारा जो नवसनातनवादी सप्रदाय पुढे उदयास आला त्याची बीजें अशा तऱ्हेने सेच्या लिखाणांत आढळतात.

**सिनिऑरची व्याजाची उपपत्ति**

सेनंतर सिनिऑर (१८००–१८६४) ह्या अर्थशास्त्राज्ञाचा उल्लेख केला पाहिजे. सेने बाजाराचा सिद्धान्त अर्थशास्त्राला देणगी म्हणून देऊन ज्याप्रमाणे अर्थशास्त्राच्या, विशेषतः सनातनवादी अर्थशास्त्राच्या इतिहासांत स्थान मिळविलें त्याचप्रमाणें व्याजाची उपपत्ति सांगून सिनिऑरने त्या इतिहासांत आपला उल्लेख केला जाईल अशी व्यवस्था केली. सिनिऑरची व्याजाची उपपत्ति त्याच्या १८३६ साली प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांत आढळते. त्या उपपत्तिनुसार व्याज ह्या उत्पन्नाचा उगम भाडवल ह्या घटकाच्या उत्पादनशक्तीत व भांडवलाच्या निर्मितीकरितां कराव्या लागणाऱ्या उपभोगाच्या संयमनांत आढळतो. दुसऱ्याच्या भांडवलाकरितां जे मागणी करतात ते व्याज द्यावयास तयार होतात. कारण भांडवलाच्या उत्पादनशक्तीचा फायदा घेऊन व्याजाच्या दरापेक्षां अधिक किंवा निदान व्याजाच्या दराइतका नफा मिळेल अशी त्यांची अपेक्षा असते. भांडवलाचा पुरवठा करणाऱ्यांना व्याज हवें असतें. कारण उपभोगाच्या वस्तू उत्पादिण्यास लागणारे श्रम भांडवली वस्तू उत्पादण्यास लावले तरच भांडवलाची निर्मिति होऊं शकते. निराळ्या भाषेंत असें म्हणतां येईल की उपभोगाचा मोह आवरला तरच भांडवलाची

निर्मिति होते. प्रत्यक्ष भांडवलाचें उत्पादन कोणाकरवीहि होवो, भांडवलाचा पुरवठा ज्यांच्याकडून होतो त्या भांडवल ह्या घटकाच्या मालकांवर उपभोगाचा मोह आवरण्याची जबाबदारी शेवटीं पडते. तो मोह आवरण्याच्या प्रयत्नामुळे मनावर जें दडपण पडतें त्याची किंमत म्हणून भांडवलाचा पुरवठा करणारे व्याजाची अपेक्षा करतात. सारांश, व्याज ही उपभोगनिग्रहाची (Abstinence) किंमत आहे. भांडवल ह्या उत्पादनघटकाची किंमत म्हणून व्याजाचा स्वतंत्रपणे उत्पादनखर्चांत समावेश झाला पाहिजे

व्याज ह्या उत्पादनखर्चाच्या भागाची एवढी चिकित्सा सिनिऑरपूर्वी केली गेली नव्हती ह्याचेंहि एक विशेष कारण सागतां येईल. ते कारण हे की, भाडवलशाहीच्या सुरुवातीच्या म्हणजे स्मिथच्या काळात उद्योगधंद्याला लागणारे भाडवल एवढे अल्प असे कीं सामान्यत भाडवलाचा पुरवठा करणारे व भांडवलाचा उपयोग करणारे एकच असत. त्यामुळें व्याज व नफा ह्याचा स्वतत्र विचार न होतां नफ्यांतच व्याज समाविष्ट झालें. तात्त्विक दृष्टया हे चूक असले तरी तत्कालिन परिस्थितीशी सुसंगत होते. भाडवलशाहीचा जसजसा विकास झाला तसतशी मोठ्या प्रमाणावर भाडवलाची गरज भासूं लागली. अर्थातच स्वतःच्या भाडवलावर उद्योगधंदे चालविण्याची शक्यता दुराव लागली. म्हणजेच भांडवलाची उसनवारी करण्याची जरुरी भासूं लागली. ह्या परिस्थितीत व्याज कसे ठरते, ते देणेघेणे कितपत योग्य ही चर्चा अपरिहार्यच होती. सिनिऑरच्या वेळेपर्यंत अशी परिस्थिति उद्भवलेली होती.

सिनिऑरनें सांगितलेल्या व्याजाच्या उपपत्तिबद्दल आणखी एक गोष्ट म्हणतां येईल. ती ही कीं, सनातनवादाचें पुढें नवसनातनवादांत जें रूपांतर झालें त्या रूपातराला सिनिऑरने व्याज ह्या उत्पन्नाची जी मीमांसा केली तिनें चांगलीच मदत झाली. नवसनातनवादानें मूल्याचा श्रमसिद्धान्त सपशेल धुडकावून लावला. सिनिऑरची व्याजाची मीमांसाहि श्रमसिद्धान्ताला बाधकच होती ती उपपत्ति मानल्यास मानवी श्रमाबरोबरच भांडवल हा उत्पादनाचा स्वतत्र घटक होतो. भांडवलांत केवळ शारीरिक श्रमाचा अंतर्भाव नसून मानसिक दडपणामुळें होणारा त्रासहि आहे. ह्या त्रासाची दखल स्वतंत्रपणें घेतली जाणें अवश्य आहे हें सिनिऑरच्या उपपत्तीमुळें सिद्ध झालें.

### सिनिऑरपासून संक्रमणाला प्रारंभ

एकदरीत विचार करतां सनातनवाद व नवसनातन ह्यांच्यामधील संक्रमणावस्थेला स्थूलमानानें सिनिऑरपासून सुरुवात झाली असें म्हणतां येईल. त्याचे व्याजाची उपपत्ति एवढेच चिन्ह सिनिऑरमध्यें आढळतें असें नाही. आणखीहि चिन्हे आढळतात. उदाहरणादाखल आणखी एक चिन्ह दर्शविले असतां पुरे होईल. पुढे अर्थशास्त्रात फारच महत्त्व पावलेला घटत्या उपभोग्यतेचा सिद्धान्त ( Law of Diminishing Utility ) बीजरूपाने सिनिऑरमध्ये आढळतो. वस्तूच्या उपभोगापासून मिळणारे सुख वाढत्या उपभोगाबरोबर जोराने कमी होत जाते. आणि एखाद्या वस्तूचा पुरवठा भरपूर असला तर अधिक पुरवठ्याने त्या वस्तूची उपभोग्यता जवळजवळ अजिबात नष्ट होते असे त्यानें स्पष्टपणे लिहिले आहे.

* * * *

### जॉन स्टुअर्ट मिल

स्मिथनें ज्याची संस्थापना केली त्या सनातन संप्रदायांतील प्रमुख अर्थशास्त्रज्ञ शेवटचा म्हणजे जॉन स्टुअर्ट मिल (१८०६–७३) हा होय. स्मिथनें सुरू केलेली व रिकार्डो माल्थसनें अनुसरलेली विचारसरणी मिलने परिणत स्वरूपास पोहोचविली. मिलचा जन्म लंडनमध्यें १८०६मध्य झाला. जॉन मिलचा बाप जेम्स मिल हा एक विद्वान् गृहस्थ म्हणून प्रसिद्ध होता. साहजिकच त्यानें आपल्या मुलाच्या शिक्षणात विशेष लक्ष घातले. मिलला मिळालेलें शिक्षण कशा प्रकारचें होते. ह्याचें त्यानें आपल्या आत्मचरित्रात सुरेख वर्णन केले आहे. त्या वर्णनावरून मुलाच्या शिक्षणाची काळजी असलेल्या व त्या बाबतींत योजना करून ती सक्तपणें अमलांत आणण्यास समर्थ असलेल्या बापाचा मुलाच्या आयुष्यावर किती चांगला परिणाम होतो हे समजून येतें. पूर्वनियोजित शिक्षणाचा जॉन मिल हा अत्युत्कृष्ट नमुना होता. वयाच्या तिसऱ्या वर्षी ग्रीक भाषेच्या अभ्यासास सुरुवात, त्यानंतर लवकरच लॅटिन भाषेचा अभ्यास, वयाचीं दहा वर्षे पुरीं व्हायच्या आत लॅटिन व ग्रीक ह्या भाषांतील वाङ्मयाचें विस्तृत वाचन, त्याच सुमारास भूमिति व बीजगणित ह्या विषयांचा अभ्यास व शैक्षणिक बदल म्हणून भौतिक शास्त्रांवरील पुस्तकांचें वाचन, वयाच्या तेराव्या वर्षी स्मिथ-

ार्डो ह्याच्या अर्थशास्त्रीय विचारसरणीचा तौलनिक अभ्यास व च्या पंधराव्या वर्षी तत्त्वज्ञानाचा अभ्यास हा शैक्षणिक कार्यक्रम जेम्स ने आपल्या मुलाकरतां आंखला होता व बुद्धिमत्तेमध्यें बापसे सवाई ेल्या जॉन मिलनें तो पारहि पाडला ! जॉन मिलच्या शिक्षणावर ्या बापाचा जसा परिणाम झाला तसाच त्याच्या बापाचा परममित्र ेल्या जेरेमी बेंथॅम ह्या विख्यात तत्त्वज्ञाचा व कायदेपंडिताचा झाला. र हा तत्त्वज्ञानातील उपयुक्ततावादी संप्रदायाचा (Utilitirianism) ता होता. कोणत्याहि कृत्याची युक्तायुक्तता त्या कृत्याच्या स्वरूपां- न ठरतां परिणामांवरून ठरते हा त्या संप्रदायाचा प्रमुख विचार होता. संप्रदायाच्या विचारसरणीची छाप मिलच्या लिखाणावर पडल्याचे पदी दिसून येते. जेम्स मिल व बेंथॅम ह्या द्वयाने प्रचलित केलेली मधील ज्ञानार्जनाची वात प्रज्वलित होण्यास स्मिथच्या व्याव- यक व कौटुंबिक जीवनानें मदत केली. १८२२ पासून मिलची 'वर्ष इंडिया हाऊसमध्यें नोकरी करण्यांत गेली. ह्या नोकरीत त्याला ुर वेळ मिळाला व त्या वेळेचा वाचन, मनन व लेखन ह्या त्रयीसाठी ें भरपूर उपयोगहि केला. मिलची पत्नी त्याला स्फूर्तिदायक ठरली व नाच्या कामी त्याला मदतनीसहि झाली. मिलचे लिखाण त्याचे विविध यातील पांडित्य दर्शवणारें असेंच होते. १८४४ मध्यें त्याने तर्कशास्त्रावर ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ त्या क्षेत्रात प्रसिद्ध आहे. त्यानंतर र्थशास्त्रातील कांही अनिर्णित प्रश्न' हा त्याचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. ४८ मध्यें 'अर्थशास्त्राची तत्त्वे' (Principles of Political Eco- ny) हा त्याचा ग्रंथ प्रकाशित झाला. त्याशिवाय निबंधवजा असें ळ लिखाण त्यानें केले. त्या लिखाणापैकीं व्यक्तिस्वातंत्र्य, प्रातिनिधिक ार, उपयुक्ततावाद, स्त्रियांची गुलामगिरी ह्या विषयांवरील त्याचे, ध अतिशय विस्तृत असून त्या त्या क्षेत्रांत फार मानले जातात. त्याचें चरित्र मृत्यूनंतर प्रसिद्ध झालें.

**चें अर्थशास्त्रांतील स्थान**

अर्थशास्त्रांत मिलला मिळालेल्या मान्यतेस त्याचा अर्थशास्त्राची हा ग्रंथ जबाबदार आहे. ह्या ग्रंथावरूनच त्याचें अर्थशास्त्राच्या

इतिहासांतील स्थान ठरवलें जातें. अर्थशास्त्रांतील मिलची कामगिरी सप्रदाय-संस्थापकाची नाहीं. स्मिथ-रिकार्डोनें स्थापलेल्या सनातन सप्रदायांतच मिल बसतो कारण स्मिथ-रिकार्डो ह्यांच्या लिखाणाची तात्त्विक बैठक व मिलची तात्त्विक बैठक ह्यांमध्यें मूलभूत असा फरक नाही. पण मिलला सस्थापकाचें महत्त्व नसलें तरी जुन्याचीच री ओढणारा तो सामान्य लेखक नव्हता. स्मिथ-रिकार्डोचें लिखाण प्रसिद्ध झाल्यानंतर आर्थिक परिस्थितींत बराच फरक पडला होता. ज्या भाडवलशाहीला स्मिथ-रिकार्डोचें लिखाण उपकारक ठरले होते त्या भाडवलशाहींतील दोष भांडवलशाहीच्या विकासाबरोबरच प्रत्ययास येऊं लागले होते. अर्थातच सनातन संप्रदायाला विरोधकहि निर्माण झाले होते. ह्या सर्वांचा परिणाम सनातन संप्रदायाला जाणवू लागला होता. ह्या परिस्थितीत स्मिथ-रिकार्डोच्या अर्थशास्त्रांत बदलत्या परिस्थितिनुसार योग्य ती दुरुस्ती करून त्या अर्थशास्त्रामागील तत्त्वज्ञानाची बैठक जोरदार करणाऱ्या व त्या तत्त्वज्ञानाची भूमिका पुन्हा एकदा स्पष्टपणें मांडणाऱ्या अर्थशास्त्रज्ञाची सनातन संप्रदायाला जरुरी होती. ही कामगिरी मिलने बजावली. हे काम अर्थात् येरा गबाळ्याचें नव्हते हे स्पष्ट आहे. आपली कामगिरी मिलने कशा प्रकारें पार पाडली हे पाहतां असें दिसून येईल कीं, त्यानें परंपरागत सनातनवाद व त्या वादाला होणारा तत्कालीन विरोध ह्याच्यांत समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. आर्थिक विचारांच्याच नव्हे तर कोणत्याहि विचाराच्या संक्रमणावस्थेत असें होतेच. त्या वेळी जुन्या संप्रदायाचें तात्त्विक समर्थन करूं इच्छिणाऱ्या विचारी लेखकाला नवीन विचार अजिबात डावलतां येत नाहीत. नवीन विचारांतील ग्राह्य भाग त्याला घ्यावा लागतो व जुन्या संप्रदायाच्या चौकटीत तो बसवावा लागतो. तसेंच जुन्या विचारांतील अपुरेपणाहि त्याला नाहीसा करावा लागतो. हें काम अर्थातच कठिण आहे आणि हें काम यशस्वी करणारे संप्रदाय संस्थापकाच्या खालोखाल त्या त्या विषयातले मानकरी ठरतात. एका अर्थानें विचाराच्या संक्रमणावस्थेंत जुन्या नव्यांचा सुरेख समन्वय करणारे संप्रदाय संस्थापकापेक्षांहि भाग्यशाली ठरतात. ते अशा अर्थानें की, जुन्या नव्या विचारांच्या लोकांत त्यांना सारखाच मान मिळून त्यांचा समन्वयहि जुना होईपर्यंत ते प्रमाणभूत लेखक मानले जातात. मिलचे

अर्थशास्त्रातील स्थान ह्या प्रकारचें आहे. सनातनी सप्रदाय व त्याला विरोधी विचार ह्याचा त्यानें समन्वय घातला व त्यामुळें त्याच्या ग्रथाला अलोट लोकप्रियता लाभली. मिलचा अर्थशास्त्राची तत्त्वे हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानतर जवळजवळ दोन पिढ्यापर्यंत तो ग्रंथ अर्थशास्त्रातील प्रमाणभूत ग्रथ मानला जात असे व अर्थशास्त्राच्या प्रत्येक अभ्यासकाकडून अभ्यासला जात असे. मिलनें जो समन्वय साधला त्याला मिलला मिळालेले शिक्षण व त्याची मानसिक भूमि अनुकूल अशीच होती. भोवतालच्या परिस्थितीची मिलच्या विचारी मनावर प्रतिक्रिया होणें, त्या प्रतिक्रियेमुळे जुन्या विचारातील अपुरेपणा मिलला जाणवणें, तर्कशुद्धतेला महत्त्व देणाऱ्या मिलकडून नवीन विचारांतील ग्राह्य भाग स्वीकारला जाणे ह्या गोष्टी साहजिकच होत्या. ह्या गोष्टीमुळेच मिलला नव्या जुन्याचा यशस्वी समन्वय करता आला हे लक्षात ठेवले पाहिजे. त्याजबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की, मिलने केलेल्या समन्वयामुळे मिलच्या सनातनवादित्वाला मुळीच बाध येत नाही. कारण अर्थशास्त्रातील सनातन सप्रदायाच्या भूमिकेपासून तो मुळीच ढळला नाही. मिलच्या प्रसंगोचित समन्वयामुळे सनातनवादाची अभिवृद्धीच झाली मिलने समन्वय करणाऱ्याची भूमिका स्वीकारून अर्थशास्त्रातील सनातन सप्रदायाची अभिवृद्धि कशी केली हे समजण्याकरिता त्याच्या अर्थशास्त्रीय विचाराची माहिती करून घेणे जरूर आहे.

### मिलचा अर्थशास्त्रीय विचार

आपला अर्थशास्त्रीय विचार मिलने उपरोक्त अर्थशास्त्राची मूलतत्त्वें ह्या जवळजवळ १००० पृष्ठे असलेल्या ग्रथात समग्रपणे माडला. ह्या ग्रंथाचे पाच भाग असून पहिल्या भागांत उत्पादनाचे, दुसऱ्या भागांत विभाजनाचे, तिसऱ्या भागांत मूल्य ठरण्याच्या क्रियेचे, चवथ्या भागात समाजाच्या प्रगतीचें उत्पादन व विभाजन ह्यांच्यावर जे परिणाम होतात त्याचें व पाचव्या भागांत सरकारच्या कर्तव्याचें व अर्थव्यवस्थेचे विवेचन आढळते. अर्थशास्त्राच्या व्याप्तिसंबंधी मिलची कल्पना काय होती हे निरनिराळ्या भागांत समाविष्ट असलेल्या विषयावरून दिसून येतेंच. आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत मिलने अर्थशास्त्र म्हणजे काय हें स्पष्टहि केले. मिलच्या मतें संपत्ति हा अर्थशास्त्राचा विषय

असून संपत्तीचें स्वरूप, संपत्तीचें उत्पादन, विभाजन ह्यासंबंधींचें सिद्धान्त ह्याचा शोध घेणें हे अर्थशास्त्राचें कार्य आहे. ह्या कार्यामध्येंच मनुष्य-समाजाची सांपत्तिक (अर्थशास्त्रीय अर्थानें) भरभराट व अवनति होण्याची कारणें व त्या कारणांची कार्यपद्धति ह्यांच्या वर्णनाचाहि अंतर्भाव होतो असेंहि त्यानें म्हटले आहे. मिलनें साहजिकच संपत्ति ह्या शब्दप्रयोगाचा त्याला मान्य असलेला अर्थहि प्रस्तावनेंतच दिला आहे. तो म्हणतो की, संपत्ति म्हणजे ज्यांना विनिमय मूल्य (Exchange value) असतें अशा सर्व उपयोगीं व परिणामी हितकर गोष्टी किंवा निराळ्या शब्दांत श्रम किंवा त्याग केल्याशिवाय मिळूं शकणाऱ्या गोष्टी सोडून इतर सर्व उपयोगी व हितकर गोष्टी. संपत्ति म्हणजे काय हे सांगितल्यानंतर प्रस्तावनेत निरनिराळ्या देशांची व निरनिराळ्या कालखंडाच्या वेळची सांपत्तिक स्थिति सारखी कशी नसते म्हणजे संपत्तीत अंतर्भूत होणाऱ्या वस्तू व संपत्तीची मर्यादा ह्यातच फरक कसा असतो व संपत्तीचे विभाजन सारखे कसे नसते ह्याचें थोडक्यांत दिग्दर्शन त्यानें केलें. ह्या दिग्दर्शनाचा हेतु हा की, उत्पादन व विभाजन ह्या गोष्टी कशामुळें ठरतात ह्याचा शोध घेणे किती जरूर आहे हें वाचकाच्या मनावर ठसावें. असो. मिलची संपत्तीची व्याख्या नवीन नाहीं व संपत्ति हा अर्थशास्त्राचा विषय आहे हे म्हणण्यांतहि मिलने स्मिथ-रिकार्डोचाच पाठिंबा केला आहे. उत्पादन व विभाजन ह्याना सारखें महत्त्व देण्यांत मात्र मिलचे वैशिष्ट्य दिसून येते. स्मिथने उत्पादना-वर विशेष भर दिला होता. रिकार्डोनें विभाजन हाच अर्थशास्त्राचा प्रमुख भाग असा आग्रहच धरला होता. मिलनें दोहोंवर सारखा भर देऊन अर्थशास्त्राला विशेष स्पष्टता आणली.

**प्राथमिक उत्पादन घटक**

प्रस्तावनेनंतर प्रथम मिलनें संपत्तीचें उत्पादन ह्या विषयाचें विवेचन केलें. मानवी श्रम व निसर्ग हे दोन उत्पादनाचे घटक मिलनें मानले होते. मानवी श्रमांत त्यानें शारीरिक व मानसिक श्रमांचा व निसर्गात निसर्गानें पुरवलेली वस्तूरूप साधने व नैसर्गिक शक्ति ह्या दोहोंचा अंतर्भाव केला. मानवी श्रमांत केवळ श्रम करण्यानें होणाऱ्या दमणुकीचाच समावेश न करतां कोणतेहि श्रम करण्यामुळें होणारी शारीरिक गैरसोय, मानसिक

त्रास व अन्य न रुचणाऱ्या सर्व भावना ह्यांचाहि समावेश व्हावा असेंहि त्याने स्पष्ट केले. मानवी श्रमाचे उत्पादक व अनुत्पादक श्रम हे वर्गीकरण त्याला मान्य होतें. स्मिथप्रमाणेंच साकार उपभोग्य वस्तू निर्माण करणारे श्रमच उत्पादक; इतर श्रम, मग ते कितीहि उपयुक्त असोत, अनुत्पादक अशी त्याची समजूत होती. निसर्ग व मानवी श्रम ह्या उत्पादनाला आवश्यक असणाऱ्या गोष्टी सारख्याच महत्त्वाच्या आहेत, हें मिलने आग्रहानें प्रतिपादले. एखादे कार्य होण्यास दोन गोष्टीची ( Conditions ) आवश्यकता असताना त्यातील एक गोष्ट महत्त्वाची आहे असे म्हणणें म्हणजे कात्रीच्या दोन पात्यापैकी कापण्याचे कार्य एका पात्याकडून अधिक प्रमाणात होते असे म्हणण्यासारखे आहे असे त्याचे मत होते. निसर्ग व मानवी श्रम ह्याचे महत्त्व सारखेच आहे हा आग्रह धरण्यात निसर्गवाद्यापासून चालत आलेली निसर्ग हेच संपत्तीचे उगमस्थान असते, किंवा उद्योगधंद्यापेक्षा शेतकीमध्ये निसर्गाचा भाग अधिक असतो ह्या समजुती दूर व्हाव्यात असा मिलचा हेतु होता. अर्थशास्त्रात उत्पादन महत्त्वाचे का विभाजन महत्त्वाचे ह्या बाबतीत मिलने जशी समन्वयकाची भूमिका घेतली तशीच भूमिका, पण जरा वेगळ्या पद्धतीनें, उत्पादनांत निसर्गाचें महत्त्व अधिक कां मनुष्याचें अधिक ह्या वादात घेऊन अर्थशास्त्राचा तोल राखला व एखाद्या गोष्टीवरच अकारण भर दिल्यानें होणाऱ्या गैरसमजुतीना टाळा दिला. मिलच्या मतें कांही वस्तूंच्या उत्पादनात निसर्गाचा भाग अधिक असतो ही गैरसमजूत उद्‌भवते ह्याचे कारण काही बाबतीत निसर्गाच्या देणगीला साऱ्याच्या रूपाने किंमत द्यावी लागते व कांही ठिकाणी ती द्यावी लागत नाही हें आहे. ह्यामुळे होणारी गैरसमजूत दूर करण्याकरितां निसर्गाच्या देणगीला द्यावी लागणारी किंमत निसर्गाच्या देणगीचा जो विशिष्ट प्रकार असतो त्या प्रकारच्या देणगीच्या पुरवठ्यावरून ठरते असा खुलासा त्यानें केला. ज्या प्रकारची देणगी मर्यादित असेल ती देणगी मिळविण्याकरतां किंमत द्यावी लागते. उदा० कसदार जमीन. ज्या प्रकारची देणगी विपुल असते त्या देणगी-करितां कांही द्यावें लागत नाहीं. उदा० हवा व सूर्यप्रकाश. एवढाच ह्या खुला-शाचा अर्थ आपल्या देणगीच्या कांही प्रकारांचा निसर्गाकडून विपुल पुरवठा केला जातो. व कांहींचा पुरवठा अतिशय मर्यादित असतो, ही गोष्ट मिलने अत्यंत महत्त्वाची मानली.

**भांडवल**

निसर्ग व मानवी श्रम ह्या प्राथमिक घटकांशिवाय भाडवल हा आणखी एक घटक मिलने सांगितला. पूर्वीच केलेल्या श्रमांनीं उत्पादिलेल्या वस्तूंचा सांठा अशी मिलची भांडवलाची व्याख्या होती. भांडवल म्हणजे पैसा नव्हे. कारण पैशाचे रक्षण देणाऱ्या, कामकऱ्याच्या गरजा भागवणाऱ्या व अशा प्रकारें मानवी श्रमास सहाय्यक होणाऱ्या वस्तूत रूपातर केल्याशिवाय भांडवलाचें कार्य पैसा करू शकत नाही हे त्यानें त्यानें स्पष्ट केले. भांडवलाचें स्थिर व खेळते भाडवल हे वर्गीकरण त्याला मान्य होतें. केवळ स्थिर भांडवलांत वाढ होणें हें तो कामगारांच्या दृष्टीनें अनिष्ट मानीत असे.

**उत्पादनविषयक मिलचे विचार—श्रमविभागणी**

उत्पादनासबंधी मिलने केलेल्या विवेचनाचा साराश सूत्ररूपाने पुढील-प्रमाणें सांगतां येईल. (१) निसर्गाची देणगी व भाडवल ह्या घटकाचे उत्पादनांतील कार्य मानवी श्रमाच्या माध्यमानेच व्यक्त होत असल्यानें मानवी श्रमाची उत्पादन क्षमता (Efficiency of Labour) हा उत्पादनविषयक विचारांतील महत्त्वाचा भाग आहे. मानवी श्रमाची उत्पादनशक्ति ठरवणाऱ्या प्रमुख गोष्टी म्हणजे नैसर्गिक अनुकूलता, श्रम करणाऱ्यांचा कामसुपणा, समाजांतील एकंदर शिक्षण व परंपरागत कुशलता, काम करणारांची नीति-मत्ता, सरकारनें दिलेलें संरक्षण व सरकार आपल्या सत्तेचा दुरुपयोग करणार नाही ह्याची शाश्वती, आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे श्रमविभागणी. श्रमविभागणीचे महत्त्व वाटते त्यापेक्षां फार आहे. श्रमविभागणीच्यामागे एक-मेकांच्या गरजा भागविण्यासाठी मनुष्यामनुष्यांत होणारें सहकार्य दडलेलें असतें. उत्पादनांतील श्रमविभागणीचे फायदे अर्थातच उत्पादनवाढीशी निगडीत झाले आहेत. श्रमविभागणीमुळें उत्पादन वाढतें ह्या स्मिथनें सांगितलेल्या कारणापैकीं कामगाराच्या कुशलतेत वाढ हे कारण ताबडतोब उमगणारे व सर्वत्र आढळणारे असें आहे. एकच काम सारखें करीत राहिल्यामुळें ते चांगले केलें जाईल अशी खात्री नसली तरी तें सुलभ होतें हे निश्चित. श्रमविभागणी-मुळें वेळाची बचत होते हे स्मिथनें दिलेले दुसरें कारण आहे. ह्या गोष्टीला स्मिथनें जरूरीपेक्षां जास्त महत्त्व दिलें असें म्हणावेसें वाटते. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, श्रमविभागणीमुळें वेळाची बचत होतच नाही. पण तो फायदा

किती होतो हे तपासतांना इतरहि कांही गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. उदाहरणार्थ, कामांत बदल झाल्यानेंच मनुष्याला एक प्रकारची विश्रांति मिळते; कारण निरनिराळ्या कामांत निरनिराळ्या अवयवांचा उपयोग होतो आणि काम बदलल्यानें एका अवयवाला विश्रांति मिळून दुसऱ्या अवयवाचें कार्य सुरू होतें. शारीरिक काम चालू असतां मेंदूला व मेंदूचें काम चालू असतां शरिराला विश्रांति असते. त्यामुळें आणि कामाच्या वैचित्र्यामुळे व कामांतील बदलामुळेच जास्त काम होऊं शकतें, ही गोष्ट लक्षांत घ्यावयास हवी. तसेंच एक काम झाल्यावर दुसरे काम चटकन सुरू करण्याची संवय एकदां जडली की त्यामध्ये फारसा वेळ जात नाहीं. हेहि लक्षांत ठेवले पाहिजे की, ज्याच्या कामांत बदल होत असतो तो मनुष्य विशेष उत्साही आणि कार्य-प्रवृत्त असतो. जगांतला हा अनुभव दृष्टीआड करतां येत नाही. अर्थात सारखा बदल करणें केव्हांहि वाईटच. निरन्तर वैचित्र्य तोचतोपणा इतकाच त्रासदायक असते. श्रमविभागणीमुळें श्रमिकांचें लक्ष एकाच कार्यांत गुतून श्रमांत व कालांत बचत करणारे शोध लागण्यास अनुकूल परिस्थिति निर्माण होते हा स्मिथनें श्रमविभागणीचा जो तिसरा फायदा सागितला तो खरा आहे. स्मिथनें न सांगितलेला पण महत्त्वाचा असा श्रमविभागणीचा आणखी एक फायदा आहे. तो असा की निरनिराळ्या कामांत कामगारांची वांटणी अधिक चांगल्या पद्धतीनें होऊं शकते. निरनिराळ्या कामांना वेग-वेगळ्या प्रकारची लायकी लागते. आणि श्रमविभागणी केल्यास ज्याला त्याला त्याच्या लायकीप्रमाणें काम पाहून देतां येतें. श्रमविभागणीमुळे आयुधांचा जास्तीत जास्त उपयोग करतां येतो ही गोष्ट श्रमविभाग-णीच्या फायद्यातच समाविष्ट केली पाहिजे. श्रमविभागणी कितीहि चांगली असली तरी तिचा अवलब करण्याचे बाबतीत मर्यादा आहेच. बाजार लहान असल्यास श्रमविभागणीला मुरड घालावी लागते तसेंच व्यवसायाचें स्वरूप श्रम-विभागणीला वाव देणारे नसले तर श्रमविभागणीच्या तत्त्वाला आपोआपच मुरड बसते. उदाहरणार्थ, शेतकीमध्ये फार प्रमाणांत श्रमविभागणी करतां येत नाहीं.

**मोठ्या प्रमाणावरील उत्पादन**

(२) श्रमविभागणीचे फायदे लक्षांत घेतां मोठ्या प्रमाणावरील उत्पादन बहुतेक ठिकाणी किफायतशीर कां ठरतें हें समजते. मात्र मोठ्या

प्रमाणावरील उत्पादन किफायतशीर ठरतें ह्याचे श्रमविभागणीचे सर्व फायदे मोठ्या प्रमाणांवरील उत्पादनात मिळतात एवढेच कारण नसून त्याची अन्यहि कारणे आहेत. त्यापैकी अधिक किंमतीची पण किमतीच्या मानाने उत्पादनशक्ति पुष्कळ अधिक असलेली यंत्रसामुग्री वापरतां येते व उत्पादनाची व्यवस्था पहाणाऱ्याचा भरपूर फायदा करून घेतो ही कारणें विशेष उल्लेखनीय आहेत श्रमविभागणी प्रमाणेच मोठ्या प्रमाणावरील उत्पादनावर बाजाराच्या विस्तारामुळें मर्यादा घातली जाते. मोठ्या प्रमाणावरील उत्पादनास भांडवलहि मोठ्या प्रमाणांत लागतें. मोठ्या प्रमाणावर भांडवल जमविणें ही गोष्ट संयुक्त भांडवल संस्था (Joint Stock Company) मुळें सुलभ होते. तेव्हां अशा संस्थांचें स्वागत केले पाहिजे.

**उत्पादन वाढीची मीमांसा**

(३) उत्पादनाची मर्यादा स्थिर नसून उत्पादन सारखं वाढते असते, असावे लागतें. उत्पादनाची वाढ कशावर अवलंबून असते, तत्संबंधीचे सिद्धान्त कोणते ह्याचा शोध घेण्यापेक्षा अधिक महत्त्वाचे अर्थशास्त्रात कांहीच नाही. मानवी श्रम, भांडवल व निसर्गाची देणगी हे उत्पादनाचे घटक. तेव्हां त्यांच्यांत होणाऱ्या वाढीवर उत्पादनांतील वाढ अवलंबून असावी हे साहजिकच आहे मानवी श्रमातील वाढ लोकसंख्येवर अवलंबून असते आणि लोकसंख्येच्या बाबतीत, लोकसंख्या अनेक कारणांनी मर्यादित केली जाते हे लक्षांत घेऊनहि. लोकसंख्येच्या वाढीला मर्यादा अशी काहीं नाही असे सहज दाखवितां येईल. म्हणजे मानवी श्रमाच्या बाजूने उत्पादन वाढीच्या मार्गांत कोणताहि अडथळा नाही. भांडवलाचें तसें नाही. बचतीतून भांडवल निर्माण होत असल्यामुळें बचत करण्याची शक्यता व ती करण्याची इच्छा ह्यावर भांडवलात कितपत वाढ होऊ शकते हें अवलंबून असतें. बचत करण्याची शक्यता एकूण उत्पादन व उत्पादकांच्या अत्यंत जरूरीच्या गरजा भागण्याकरितां लागणारा उत्पादनाचा भाग ह्यांच्यांतील फरकावर अवलंबून असते. हा फरक जथें जास्ती असेल तेथें अर्थातच जास्त बचत होऊं शकते. बचत करण्याची इच्छा कशावर अवलंबून असते हें पाहतांना बचत म्हणजे भविष्यकाळातील फायद्याकरितां वर्तमान काळी केलेला त्याग ही गोष्ट

लक्षांत ठवली पाहिजे. भविष्य काळाकरितां तरतूद करण्याची अनिच्छा अदूरदर्शीपणा व भविष्य काळाबद्दल अनास्था ह्या दोहोपैकी एक अगर दोन्ही गोष्टी असतात तेथें उद्भवते. बचत करण्याची शक्यता व इच्छा कोणत्या गोष्टीवर अवलंबून असते हे पाहता असें म्हणतां येतें की, मागासलेल्या देशांत भांडवलाची कमतरता भासावी हे बरोबर असले तरी सुधारलेल्या देशांत भांडवलाची कमतरता भासण्याचे काहीच कारण नाही. तेव्हां अशा देशात भांडवल ह्या घटकाकडूनहि उत्पादन वाढ थोपवली जात नाहीं. रहाता राहिला निसर्गाची देणगी हा घटक. हा घटक मात्र मानवी श्रम व भाडवल ह्या घटकांपेक्षा अगदी भिन्न स्वरूपाचा आहे. ह्या घटकांत वाढ करतांच येत नाही. ह्या घटकाचा पुरवठा मर्यादित आहे आणि त्यांतील उत्पादनक्षम भाग तर अतिशय मर्यादित आहे. जमिनीपासून होणारे उत्पादन वाटेल तितके वाढवतां येत नाही कारण मर्यादित पुरवठा व मर्यादित उत्पादनक्षमता ह्यांमुळें जमिनीच्या बाबतीत त्वरित अनुभवास येणारा घटत्या फळाचा सिद्धान्त हा सिद्धान्त अर्थशास्त्रात मूलभूत महत्त्वाचा आहे. हा सिद्धांत असा की, शेतकीविषयक ज्ञान व शेतकीकौशल्य स्थिर असतां शेतकीमध्यें ज्या प्रमाणांत मानवी श्रम वाढतात त्या प्रमाणांत उत्पादन वाढत नाही. घटत्या फळाचा अनुभव हा उत्पादन वाढीच्या मार्गातील खराखुरा व सर्वांत मोठा अडथळा आहे. उत्पादनात हा अनुभव आला नसता तर उत्पादन व विभाजन ह्या दोहोंवरहि फार परिणाम झाला असता. घटत्या फळाच्या सिद्धान्ताला विरुद्ध असणारी एक घटना नेहमीं घडत असते व ती घटना घटत्या फळाच्या सिद्धान्ताला थोपवू शकते हेंहि लक्षांत ठेविले पाहिजे. ती घटना म्हणजे मानवी प्रगति, मानवी प्रगतिमुळें शेतकीविषयक ज्ञानात, कौशल्यांत वाढ होत असते, आणि इतरहि अनेक प्रकारें मनुष्याला निसर्गावर अधिकाधिक विजय संपादितां येतो. तसे झाल्यास घटत्या फळाचा सिद्धान्त मनुष्याच्या काबूत राहतो. साराश, घटत्या फळाचा सिद्धान्त ही उत्पादनवाढीला सर्वांत प्रतिकूल अशी गोष्ट आहे पण त्या गोष्टीचा अंमलहि थोपवून धरणे मनुष्याला शक्य आहे. तो सिद्धान्त अटळ नाहीं.

**मिलच्या विचारांतील संयम**

मिलकृत उत्पादनतत्त्वांचें उपरोक्त विवेचन पाहिल्यास असे दिसून येते की, मिलनें त्या तत्त्वांत भर अशी कोणतीच घातली नाही. स्मिथ, रिकार्डो, माल्थस ह्यांनीं प्रतिपादलेली तत्वेंच मिलने सांगितली. स्मिथने वर्णिलेले श्रमविभागणीचें उत्पादनांतील महत्त्व, रिकार्डोने सांगितलेला घटत्या फळाचा सिद्धान्त, माल्थसची लोकसंख्या अवास्तव वाढण्याची भीति ह्या गोष्टी स्थूलमानानें मिलला मान्य होत्या असे स्पष्ट दिसते. मिलचें महत्त्व एवढेच की, त्याने स्मिथ, रिकार्डो, माल्थस ह्याची तत्त्वे संकलित केली. तसेच ह्या तत्त्वाच्या प्रतिपादनांत होणारा अतिरेक टाकून त्याने अर्थशास्त्राचा तोल सांभाळला. उत्पादन व विभाजन ह्या अर्थशास्त्राच्या दोन्ही विभागांना-सारखेच महत्त्व आहे; तसेंच जमीन व मानवी श्रम ह्याचा उत्पादनात सारखाच भाग असतो ह्या त्याच्या सुरुवाती–सुरवातीच्या विधानांतच त्याची समतोल प्रवृत्ति दिसून येते. हीच प्रवृत्ति पुढील लिखाणातहि व्यक्त झाली आहे. स्मिथप्रमाणें श्रमविभागणीच्या बाबतींत त्याच्या उत्साहाचा अतिरेक झाला नाही किंवा रिकार्डोप्रमाणेंच त्यानें घटत्या फळाचा सिद्धान्त अटळ मानला नाही; किंवा माल्थसप्रमाणें लोकसंख्येतील संभाव्य वाढीला अवास्तव महत्त्वहि दिले नाही.

**उत्पादन व विभाजन ह्यांतील महत्त्वाचा फरक**

आपल्या ग्रंथाच्या पहिल्या भागात उत्पादनतत्त्वाची चर्चा केल्यानंतर ग्रंथाचा दुसरा भाग मिलने विभाजनतत्त्वाकरिता खर्च केला. ह्या भागाच्या सुरुवातीसच मिलने उत्पादन व विभाजन ह्याच्यातील एक महत्त्वाचा फरक वाचकाच्या नजरेस आणला तो फरक असा की, उत्पादनाचे सिद्धान्त भौतिक शास्त्रातील सिद्धान्ताच्या स्वरूपाचेच असतात. त्या सिद्धान्ताच्या बाबतीत मनुष्याच्या आवडीनिवडीचा प्रश्नच उद्‌भवत नाही. जेथे जेथे उत्पादन होते तेथे तेथे ते अनुभवास येतातच उदाहरणार्थ, घटत्या फळाचा सिद्धान्त; ह्या ह्या सिद्धान्तानुकूल परिस्थिति जेथे असेल तेथे प्रत्ययास येतोच व त्या सिद्धान्ताच्या अमलात बदल करण्यास मनुष्यास फारसा वाव नसतो. विभाजनाच्या सिद्धान्ताविषयीं असें

म्हणतां येत नाही. विभाजन हा सर्वस्वी मनुष्याच्या इच्छेचा प्रश्न आहे. समाजांतील मनुष्यनिर्मित संस्थांकडून विभाजनाचें स्वरूप ठरवले जात असते. थोडक्यांत--विभाजन हे समाजाने त्यासंबंधी जी व्यवस्था केली असेल त्याबरहुकूम होत असते. ह्याचा अर्थ असा नव्हे की, विभाजनाची व्यवस्था मनुष्याच्या लहरीवरच केवळ अवलबून असते त्यालाहि शास्त्रीय खुलासा आहे. तो असा की, मनुष्य जे करतो ते आपल्या स्वभावधर्मानुसारच करतो. पण मनुष्याचा स्वभावधर्म बदलणें शक्य असल्यामुळे विभाजनाची एकदां ठरलेली व्यवस्था उत्पादनाच्या सिद्धान्ताप्रमाणें अनिवार्य नाही. उत्पादन व विभाजन ह्यातील हा भेद सागितल्यावर मिलने लगेच असे म्हटलें की, विभाजनाची विशिष्ट व्यवस्था समाजाने कोणत्या कारणासाठी केली हा प्रश्न अर्थशास्त्राच्या कक्षेत येत नसून विभाजनाबाबतच्या प्रचलित व्यवस्थेचे व सभाव्य अशा सर्व व्यवस्थाचे परिणाम काय होऊं शकतात ते पहाणे एवढेच अर्थशास्त्राचे कार्य आहे. हे कार्य अर्थशास्त्रात बसतें. कारण एखादी व्यवस्था स्वीकारल्यानतर त्याचे परिणाम मात्र अटळ असतात. अशा प्रकारे उत्पादनाच्या विभाजनाच्या, बाबतीतील अर्थशास्त्राची मर्यादा ठरवून नतरच त्या विषयाची सपूर्ण चर्चा केली. मिलने केलेली चर्चा साराशरूपाने खाली दिली आहे.

**उत्पादन साधनांच्या मालकीवर उत्पादनव्यवस्था अवलंबून असते**

विभाजनासबधी निरनिराळ्या कालांत समाजाने केलेली व्यवस्था पाहिली असता असे दिसून येते की. काही अपवाद वगळता खाजगी मिळकत ही प्राथमिक व मूलभूत महत्त्वाची संस्था विभाजनव्यवस्थेचा पाया म्हणून सर्वत्र स्वीकारण्यात आली आहे. खाजगी मिळकतीचे तत्त्व प्रथम जेव्हा मान्य करण्यात आलें तेव्हां अर्थातच विषमता नसली पाहिजे. उत्पादनाची साधनें सर्वांत सारखी वांटूनच खाजगी मिळकत ह्या संस्थेची प्रस्थापना झाली असली पाहिजे. त्यानंतर मात्र ज्याला त्याला आपल्या वाट्याला जें कांही आलें त्याचा स्वहितासाठीं वाटेल तसा उपयोग करण्याचे पूर्ण स्वातंत्र्य देण्यांत आले. ज्या समाजांत खाजगी मिळकतीच्या तत्त्वाला मान्यता देण्यांत आली नाहीं त्या समाजांत उत्पादनाचीं सर्व साधनें समाजाच्या मालकीखालींच ठेवण्यांत आलीं आणि उत्पादनाच्या विभाजनालाहि सामाजिक

स्वरूप प्राप्त करून देण्यांत आलें. संपूर्ण समतेच्या तत्त्वानुसार अगर समाजांतील घटकांच्या गरजानुसार किंवा समाजाला न्याय्य वाटत असलेल्या अन्य काही तत्त्वांनुसार विभाजन अशा समाजात केलें जात असे. ह्या दुसऱ्या प्रकारच्या समाजाचें मोठ्या प्रमाणावर अनुकरण व्हावे असा कांहीं ठिकाणी प्रचार होत आहे आणि सध्याच्या काळांत—म्हणजे ज्या काळांत समाजातील नाहीरे वर्गाला आपले म्हणणे मांडायची संधि पूर्वीपेक्षा जास्त प्रमाणावर मिळत आहे त्या कालात—असे विचार पुढें यावे व त्यांचा फैलाव व्हावा हें साहजिकच आहे.

**समाजवादी आर्थिक व्यवस्था अव्यवहार्य नाहीं**

खाजगी मिळकतीच्या तत्त्वावर हल्ला करणाराचे दोन वर्ग पाडता येतील. त्यांतील पहिल्या वर्गातील लोकाना उपभोग्य वस्तूच्या विभाजनांत सपूर्ण समता हवी असते. दुसऱ्या वर्गातील लोकाचा विषमतेबद्दल आक्षेप नसतो. पण ती विषमता प्रचलित आर्थिक व्यवस्थेतील विषमतेप्रमाणे दैववशात् न ठरता कोणत्यातरी न्यायाच्या तत्त्वावर आधारलेली असावी असे वाटत असतें. समतेच्या तत्त्वावर उभारलेली व जमीन आणि अन्य उत्पादनाची साधने समाजाच्या मालकीची जिच्यात आहेत अशी आर्थिक व्यवस्था अव्यवहार्य आहे असे मानण्याचे मुळीच कारण नाही. एखाद्या खेड्यातील लोकांनी समाईक मालकीचें तत्त्व स्वीकारून सहकार्याने आणि आधुनिक पद्धतीने शेतकी करण्याचे ठरवले; तर जरूर ते श्रम करण्याकरितां लागतील तेवढे कामगार पुढे येतील. न आल्यास प्रत्येकाला काम करावयास लावता येईल, आणि सर्वांना आरामात रहाता येईल इतके उत्पादन होऊ शकेल ह्यासबधी कोणीहि जाणता मनुष्य संशय घेणार नाही. समतेवर आधारलेल्या व्यवस्थेंत कामगाराकडून कामात चुकारपणा होण्याचा सभव आहे; ही गोष्ट खरी असली तरी तिला फार महत्त्व देण्याचे कारण नाही. कारण प्रचलित आर्थिक व्यवस्थेत सुद्धा अगदी मोजकेच लोक स्वतःच्या फायद्याकरिता राबत असतात. बहुसंख्य लोक ठराविक वेतनाकरितांच काम करतात आणि अशा लोकांच्यावर जबाबदारीचीं कामेंहि सोपवली जातात. तेव्हा पगारी कामगाराकडून कामाच्या बाबतींत जास्तींत जास्त उत्साह दाखवला जात नाही, हा आक्षेप प्रचलित आर्थिक व्यवस्थेबद्दल जितक्या

प्रमाणांत घेतां येईल तितक्याच प्रमाणात समतेवर आधारलेल्या आर्थिक व्यवस्थेबद्दल फार तर घेता येईल.

**समताधिष्ठित समाजवाद समाजहिताला अधिक पोषक**

समतेवर आधारलेल्या आर्थिक व्यवस्थेविरुद्ध वरील आक्षेप अधिक पोकळ ठरला जाण्याचा फार संभव आहे कारण मनुष्यातील सामाजिक वृत्ति (Public spirit) वाटते त्यापेक्षा पुष्कळ अधिक आहे आणि ही वृत्ति फोफावायला समतेवर अधिष्ठित असलेल्या समाजरचनेपेक्षा अधिक अनुकूल अशी दुसरी कोणतीहि परिस्थिति नाही. समाजहिताकरितां जास्तीत जास्त काय करावें ह्यासंबंधी चढाओढीनें कोशीस केली जाण्याचा ह्या समाजरचनेंतच फार संभव असतो. तेव्हां अशा समाजरचनेत कामगाराचा कामसूपणा कमी होईलच असें निश्चयाने सागतां येत नाही. समताधिष्ठित समाजात उदरनिर्वाहाची शाश्वति असल्यामुळे लोकसंख्या जास्त प्रमाणांत वाढून समाजावर उपासमारीचें सकट ओढवेल असाहि एक आक्षेप त्या समाजावर घेतला जातो ह्या आक्षेपातहि विशेष तथ्य नाही. कारण अशा समाजांत स्वार्थी हेतूने व्यक्तीने दाखविलेल्या अदूरदर्शीपणावर समाजाचा विशेष कटाक्ष असतो व तो वरील धोका टाळण्यास समर्थ असतो. ह्या उपरहि कोणी समाजहिताविरुद्ध वागला तर त्याला शिक्षा द्यावयास समाज तयार असतोच. साराश, समाजवादी व्यवस्थेत आपल्या कर्तव्यात कोणी कसूर करील असे वाटत नाही. मात्र कोणत्याहि कामाविषयी अधिक आस्था बाळगून त्यात प्रगति करण्याचा कोणी प्रयत्न करील की काय, ह्या विषयी जबरदस्त शंका वाटते. 'जाऊ द्या; आपल्याला काय करावयाचे आहे' अशी वृत्ति निर्माण होण्याचा अशा समाजात फार सभव असतो. ही वृत्ति आर्थिक प्रगतीला बाधक ठरते. अशा समाजांत योजना फार पण प्रत्यक्ष कार्य कमी होईल अशी साधार भीति वाटते.

**समाजवादांत श्रमाचे योग्य मूल्यमापन कठिण**

समताधिष्ठित अर्थव्यवस्थेतील अधिक महत्त्वाची अडचण म्हणजे मानवी श्रमाचे बरोबर मूल्यमापन करून कामाची व्यक्तिव्यक्तीत वाटणी करण्यासंबधीची. अमुक इतके विणकऱ्याचे काम अमुक इतक्या शेतकऱ्यांच्या

कामाच्या लायकीचें आहे असे कोण ठरविणार ? शिवाय एकाच प्रकारचें काम करण्याचे श्रमहि सारखेच असतात असें म्हणणें कठिण आहे. जे काम दिसावयास सारखें दिसते त्याचा ताण सर्वांवर सारखाच पडत नाही. सारख्या कामांत सुद्धां कामाचा बोजा काम करणाऱ्याच्या वेगाप्रमाणें, शारीरिक स्थितीप्रमाणें कमीजास्त असू शकतो. निरनिराळया दर्जाच्या कामात फरक करण्याची अडचण व त्यामुळे निर्माण होणारी कोणतें काम कोणी करावे हें ठरविण्याची अडचण इतकी मोठी आहे कीं, कांहीं समतावाद्यांनीं प्रत्येकानें प्रत्येक काम थोडथोडें करावें असें सुचवलें आहे. तसें झाल्यास श्रमविभागणीचें तत्त्व बाजूस सारावें लागून त्या तत्त्वाच्या स्वीकारामुळें वाढणाऱ्या कामकऱ्याच्या उत्पादनशक्तीचा फायदा समाजाला मुळीच घेता येणार नाहीं. वरील अडचण खरी असली तरी ती अनिवार्य नाहीं. उपरोक्त प्रश्न सोडवणें मानवी न्यायबुद्धीच्या व बुद्धिमत्तेच्या पलीकडचें नाहीं. शिवाय समतावादी आर्थिक व्यवस्था एकदां प्रस्थापित झाली की, उपरोक्त व तत्सम अडचणी आपोआपच निवारल्या जाण्याचाहि संभव आहे. समतावादी आर्थिक व्यवस्थेंत व्यावहारिक दृष्टया अडचणी असल्या तरी त्या फार महत्त्व देण्याजोग्या नाहीत; हें लक्षात घेतां खाजगी मिळकतीवर उभारलेल्या आर्थिक व्यवस्थेंत अधिकाधिक श्रम करणाऱ्यांना जीवनोपयोगी वस्तू मिळविणें अधिकाअधिक जड जातें; हें खरें असेल तर, तिच्यातील संभाव्य अशा सर्व फायद्यासह समाजवादी आर्थिक व्यवस्था व अन्यायानें आणि कष्टानें भरलेली प्रचलित आर्थिक व्यवस्था ह्या दोहोंतील काय निवडावे हा प्रश्न अगदीं सोपा आहे.

**मजुरी**

विभाजनव्यवस्थेच्या स्वरूपाबद्दल सर्वसाधारण विचार प्रदर्शित केल्यानंतर प्रचलित आर्थिक व्यवस्थेंतील विभाजनाचें--म्हणजे मजुरी, नफा व सारा हे विभाग कसे ठरतात ह्यासंबंधीचें विस्तृत--विवेचन मिलनें केलें. मजुरीविषयक त्याचे विचार सारांशरूपानें पुढीलप्रमाणें सांगतां येतील. प्रचलित आर्थिक व्यवस्थेंत मजुरी चढाओढीच्या तत्त्वानुसारच मुख्यतः ठरते. म्हणजेच ती मागणी पुरवठयाच्या संघर्षानें ठरते. मजुरांचा पुरवठा म्हणजे मजुरीकरितां काम करावयास तयार असणाऱ्यांची संख्या.

मजुरांकरितां मागणी किती असते हे मजुरीच्या रूपानें देण्याकरितां पुढें आलेल्या देशांतील निधीमुळें ठरते. मजुरांचा पुरवठा कमी झाला किंवा हा निधि वाढला तरच मजुरी वाढते. मजुराचा पुरवठा वाढला किंवा निधि कमी झाला तरच मजुरी कमी होते. मजुरांचा पुरवठा व मजुरीनिधि ( Wage fund ) ह्यांच्यांत काहीहि फरक न पडतां एखाददुसऱ्या धंद्यांतील मजुरी कमीजास्त होणें किंवा काही काळपर्यंत सर्व ठिकाणची मजुरी कमीजास्त होणें अगदी शक्य आहे; पण त्यामुळें वरील तत्त्वाला बाध येत नाहीं. मजुरीनिधि जो कांही असेल तो तात्पुरता न वापरतां बाजूस ठेवला जातो किंवा एखाद्या धंद्यांतून भांडवल काढून घेऊन दुसऱ्या धंद्यात घातलें जातें, म्हणून वर उल्लेखिलेला प्रकार होतो. पण मजुरींत कायम स्वरूपाचा बदल व्हावयास वर दिलेल्या अर्थानें मागणी-पुरवठ्यात बदल झाला पाहिजे. नाहीतर कायम स्वरूपाचा बदल मजुरींत होऊं शकतच नाहीं. ह्या दृष्टीनें विचार करतां मजुरी वाढवून घेण्याचा कामगारांच्या हातांतील मार्ग म्हणजे लोकसंख्येच्या वाढीवर नियंत्रण. मजुरीच्या बाबतीतील मजुरीची नेहमी एका किमान पातळी-वर रहाण्याकडे प्रवृत्ति असते हा रिकार्डोप्रणीत सिद्धान्त फारसा बरोबर नाही. रिकार्डोच्या इतर सिद्धान्ताप्रमाणेंच तो तात्त्विक दृष्ट्या अगदीं बरोबर आहे. पण त्या सिद्धान्ताचा व्यवहारांत उपयोग करतांना हें लक्षात ठेवावयास हवें की, किमान मजुरी म्हणजे काय ह्यासंबंधीच्या कल्पनाहि नेहमीं बदलत्या अशा असतात. असा अनुभव नेहमी येतो की, वाढत्या धान्याच्या किमतीमुळें मजुरी न वाढतां मजुराचे रहाणीमान कमी होते व कमी झालेलें रहाणीमान किमान वेतनासबधीच्या अपेक्षाच कमी करते. उलटपक्षी शेतकीसुधारणामुळें धान्य स्वस्त झाल्यास ताबडतोब मजुरी कमी होत नाही व धान्य स्वस्त झाल्यास मजुराचे परिमाण रहाणीमान वाढ-ण्यांत होतें. वाढलेल्या रहाणीमानाची कामगाराना सवय झाली की, किमान वेतनाची अपेक्षाहि कायमची वाढू शकते. मात्र पूर्वोक्त अनुभवापेक्षा उपरोक्त अनुभव कमी प्रमाणांत येतो. कारण रहाणीमान वाढण्याऐवजी लोकसख्या वाढून मजुरीचें मान कमी होण्याचाहि त्या परिस्थितीत सभव असतो. तरी-सुद्धां उपरोक्त अनुभव येण्याची तात्त्विक शक्यता दृष्टीआड करतां

येत नाहीं. असो. मिलचें एकदर विवेचन पाहता मजुरीनिधिसिद्धान्त त्याला संमत होता असें म्हटलें पाहिजे.

**नफा**

नफा म्हणजे एकूण उत्पादनखर्च व एकूण मिळकत ह्यांच्यांतील फरक. उत्पादनखर्चांतील बराच मोठा भाग मजुरी हा असतो आणि उरलेला भाग कच्चा माल, आयुधें, इमारती ह्यांवरील खर्च असतो. हा खर्चसुद्धां शेवटी मजुरीच्या स्वरूपाचाच असतो. कारण ह्या वस्तूंचे जे उद्योगपति असतील तेसुद्धां मजुरी देऊनच उत्पादन करून घेत असतात. अथ त् ह्या वस्तूंच्या किंमतीतहि नफ्याचा भाग असतोच; पण त्याशिवाय फक्त मजुरी असते. तात्पर्य, उत्पादनखर्चाचे मजुरी व नफा असे दोनच भाग पडतात. ह्याचा अर्थ असा की, उद्योगपतींचा एकूण नफा एकूण उत्पादन व त्यांतील मजुरीच्या रूपानें जाणारा भाग ह्या दोन गोष्टींमुळें ठरतो. एकूण नफा लक्षात न घेतां नफ्याचा दर पाहिला तर असे म्हणतां येईल की, तो मजुरीच्या दरावरच अवलंबून असतो. एकूण उत्पादन वाढून मजुरीच्या उत्पादनांतील प्रमाण तेच राहिलें तर नफ्याचा दर वाढत नाहीं. कारण एकूण नफा दुप्पट झाला तरी तो भांडवल दुप्पट झाल्यामुळें दुप्पट झालेला असतो. मजुरीचें एकूण उत्पादनांतील प्रमाण कमी झाले म्हणजे मात्र नफ्याचा दर वाढतो व मजुरीचें प्रमाण कमी झाल्यास नफ्याचें प्रमाण वाढते. ह्या अर्थाचा सिद्धान्त ह्यापूर्वी रिकार्डोनें माडला आहेच. तो सिद्धान्त बरोबर आहे.

**सारा**

सारा म्हणजे जमिनीच्या मालकांना जमीन उत्पादनासाठी उपलब्ध करून देण्याबद्दल मिळणारा उत्पादनाचा भाग. जमिनीचे मालक हा एकच वर्ग असा आहे की, त्या वर्गांतील लोकांना स्वतः न उत्पादिलेल्या गोष्टीच्या केवळ मालकीबद्दल उत्पादनाच्या विभाजनात हक्क सांगता येतो. सारा हें उत्पन्न नैसर्गिक स्वरूपाच्या मक्तेदारीमुळे (Natural Monopoly) जमीनदाराना मिळतें हे उघड आहे. जमिनीच्या बाबतीत मक्तेदारी अशा अर्थाने असते की जमिनोचा पुरवठा मर्यादित असतो. जमिनीच्या मालकाना जमिनीला मागणी जेव्हा पुरवठ्यापेक्षां जास्त असेल तेव्हा जमिनीचा उपयोग करून देण्याबद्दल किमत मागण्याची संधि मिळते. अर्थात् जी जमीन उत्पादनक्षम

आहे अशा जमिनीच्या मालकांनाच ही संधि मिळते हें उघड आहे उत्पादनक्षम नसलेल्या जमिनीच्या बाबतीत सारा हे उत्पन्न उद्‌भवण्याचा प्रश्नच येत नाही. उत्पादनात गुतलेल्या जमिनीपैकी सुद्धां सर्वात कमी प्रतीच्या जमिनीच्या मालकाला साऱ्याच्या रूपाने काही मिळत नाही; कारण त्या जमिनीपासून होणारें उत्पन्न (किंवा त्या उत्पन्नाची किंमत) मजुरी व सामान्य दराने नफा भागविण्यास पुरेसें इतकेच असते. मात्र ती जमीन ज्याअर्थी उपयोगात आणली जाते त्याअर्थी तिच्यापेक्षा अधिक दर्जाच्या जमिनीपासून होणारे उत्पादन समाजाला पुरेसें नसतें असें म्हणण्यास हरकत नाही. उत्पादनात गुतलेल्या सर्वांत कमी प्रतीच्या जमिनीपासून सामान्य दराने नफा मिळतो, हे खरे असेल तर तिच्यापेक्षा अधिक प्रतीच्या जमिनीपासून मिळणाऱ्या नफ्याचा दर अधिक असावा हे सहज समजण्याजोगे आहे. वापरांतील सर्वात कमी प्रतीच्या जमिनीपासून मिळणारा नफा व त्यापेक्षा अधिक दर्जाच्या जमिनीपासून मिळणारा नफा ह्यांच्यातील फरक म्हणजेच सारा. हा फरक जमिनीच्या दर्जामुळें उद्‌भवला असा दावा करून जमीनदार त्याच्यावर आपला हक्क सागतात. जमिनीवरील त्याच्या मालकीमुळे तो हक्क मान्य करावा लागतो उपलब्ध असलेली सर्व जमीन जेव्हां वापरांत आणली जाते तेव्हा सर्वात निकृष्ट जमिनीच्या मालकालाहि सारा मिळतो; कारण तेव्हा उत्पादन वाढवण्याचा आधीच उपयोगांत असलेल्या जमिनीवर जास्त श्रम व भांडवल खर्च करावयाचा हा एकच मार्ग शिल्लक असतो. ही परिस्थिति घटत्या फळाच्या सिद्धान्ताला फारच अनुकूल असते व त्या सिद्धान्ताचा प्रत्यय येऊ लागला की, शेवटच्या उत्पादनाचें प्रमाण जसेजसें वाढवीत जावे तसतसा उत्पादनखर्च वाढत जातो. उत्पादनाच्या शेवटच्या भागाचा उत्पादनखर्च अत्युच्च असतो. ह्या उत्पादनखर्चावर सामान्य दरानें नफा मिळावा इतकी किंमत ठरते. ह्या किंमतीमुळें उत्पादनाच्या पूर्वीच्या भागावर सामान्य दरांपेक्षा अधिक नफा सुटतो. त्यामुळें एकदर उत्पादनात सामान्य दरापेक्षां जो जास्त नफा होतो त्यावर जमीनदारांना आपला हक्क सागता येतो व तो प्रस्थापितहि करतां येतो. साराश, ज्या देशातील सर्व जमीन उपयोगात आलेली असते त्या देशांत साराविरहित जमीन नसते. साऱ्याचा सिद्धान्त हा अर्थशास्त्रांतील प्रमुख सिद्धान्त आहे.

### आर्थिक प्रगति केव्हां तरी थांबणारच

आपल्या ग्रथाच्या दुसऱ्या भागात मिलने सागितलेलीं विभाजनाची तत्त्वें वरीलप्रमाणे होतीं. त्या तत्त्वाचे महत्त्वमापन करण्यापूर्वी मिलच्या ग्रथाच्या चवथ्या भागातील विवेचनहि लक्षात घेतले पाहिजे. ह्या विभागातील विवेचन आर्थिक प्रगतीचे उत्पादन व विभाजन ह्याच्यावर जो परिणाम होतो त्याविषयी आहे. आर्थिक प्रगतीचा परिणाम निसर्गावर अधिकाधिक प्रमाणात ताबा मिळण्यात, जीवनाला अधिक सुरक्षितता लाभण्यात व मनुष्या-मनुष्यांत अधिक सहकार्य होण्यात होतो असे त्याने प्रतिपादले. आर्थिक प्रगतीमुळे सर्व वस्तू स्वस्त होतात; पण फायद्याचे मान कमी होतें. ह्या विवेचनांत मिलने असेहि प्रतिपादिले की, उत्पादनातील प्रगति थाबून अचल (Stationary) स्थिति प्राप्त होणें ही घटना केवळ अपरिहार्यच नव्हे तर नजीकहि आहे. मिलच्या मते किमान फायदा हे अचल आर्थिक स्थितीचे चिन्ह होते. ही गोष्ट वाईट व निरुत्साह उत्पन्न करणारी आहे असे वाटणे साह-जिक असले तरी तिलाहि चागली बाजू आहेच. ती अशी की, अचल आर्थिक स्थितीमध्ये लोकसख्या मर्यादित केली जाण्याचा सभव अधिक असतो. भाडवल व उत्पादन ह्याच्या दृष्टीने प्रगतीपथावर असलेल्या समाजात लोकसख्येतील वाढीला अनुकूल अशी परिस्थिति असते व त्याचा परिणाम श्रीमत अधिक श्रीमत होण्यात, गरीब अधिक गरीब होण्यात व श्रीमत होण्याची सधि सर्वांना सारखी न मिळण्यात होतो. अशा समाजात उत्पादन व भाडवलसचयहि वाढत असतात हे खरे, पण केवळ उत्पादनवाढीकरता उत्पादनवाढ व भाडवलसचयाकरिता भाडवलसचय ह्यात अभिनदनीय असे काहीच नाही. ह्याच्या उलट सपत्तीची समान वांटणी जिच्यात आहे अशी समाजरचना प्रचलित समाजरचनेपेक्षा पुष्कळ बरी अशी समाजरचना अचल आर्थिक स्थितीशी जास्त प्रमाणात निगडित आहे. शिवाय उत्पादन, भांडवल व लोकसख्या ह्याच्या बाबतीत अचल असलेला समाज कोणत्याहि प्रकारच्या प्रगतीपासून अलिप्त असतो असे नाही. अशा समाजात मानसिक, सास्कृतिक, नैतिक व सामाजिक प्रगति जगण्याच्या कलेत सुधारणा ह्याना भरपूर वाव असतो. सपत्तीची हांव, अधिक वाव नसल्यामुळे का होईना, नष्ट

ऊन सास्कृतिक विकासाकडे मानवाचे लक्ष गेले तर तें वाईट असे मान-
ास मिल तयार नव्हता

### ामगारांचें भवितव्य

वरील प्रतिपादनानतर चवथ्या भागाचा उत्तरार्ध मिलनें कामगार-
ांच्या भवितव्याबद्दल अंदाज करण्यांत खर्च केला. कामगारांच्या
वितव्याबद्दल त्याचा अंदाज असा होता कीं, कामगारवर्ग वरच्या वर्गाने
पल्या हिताकरितां चालविलेलें सरकार फार काळपर्यंत सहन करणार
हीं; इतकेंच नव्हे तर मजुरीकरितां दुसऱ्याची नोकरी करावयाची ही
पतिसुद्धां त्या वर्गाला कायमची पसंत पडण्यासारखी नाहीं. ह्या बाबतींत
जूरवर्गांत शिक्षणानें व एकजुटीनें निर्माण झालेली स्वत्वाची भावना व
लकाचे व त्यांचे हितसंबंध एकच नाहीत ह्याची त्यांना झालेली जाणीव
ाचा उल्लेख करून मिलनें मालकांना असा इशारा दिला की, मालक व
कर असे दोन वर्ग समाजांत कायमचे राखता येणें अशक्य आहे. तेव्हां
ा योगें कामगारांनाहि आपल्या कामाबद्दल आत्मीयता वाटेल अशी
द्योगिकपुनर्घटना करणें केवळ मजूरवर्गाच्याच नव्हे तर मालकवर्गा-
ाहि हिताचेंच आहे. अशा तऱ्हेच्या पुनर्घटनेसाठी मिलनें मालक-मजुरांची
गीदारी व कामगाराच्या समायिक मालकीच्या व कामगारांनीं निवडून
लेल्या व त्याना जबाबदार असणाऱ्या लोकांनी चालविलेल्या उद्योगधद्यांची
थापना असे दोन उपाय सुचविले. दुसऱ्या उपायावर त्याने विशेष जोर
ला व त्या उपायानेच म्हणजे सहकारी तत्त्वावर उत्पादनाची प्रस्थापना
रण्यानेच कामगारांना कायमचे बरे दिवस येऊं शकतील असें मतहि व्यक्त
े. त्याच्याहि पुढें जाऊन एके ठिकाणी मिलने मिलकालीन समाज-
द्यांच्या औद्योगिक पुनर्घटनाविषयक स्वप्नाना मान्यता देऊन ती स्वप्ने
यसृष्टीत उतरविण्यास आपल्या वेळचा काळ योग्य आहे अशी ग्वाही
ली. त्याकरितां सर्व न्याय्य व परिणामकारक मार्गांनी अशा पुनर्घट-
ा मदत केली पाहिजे व उत्तेजन दिले पाहिजे असे त्याने सुचविले.

### ढाओढीच्या तत्त्वावरील समाजवादी टीका चूक

समाजवाद्यांची औद्योगिक पुनर्घटनेची कल्पना मिलला रुचत असली
ी त्याची चढाओढीच्या तत्त्वांवरील टीका मात्र मिलला रुचत नसे. सर्व

आर्थिक अनर्थांचा दोष चढाओढीच्या माथी लादण्यांत समाजवाद्यांची चूक होत असून असें करण्यांत चढाओढ व मक्तेदारी कोठें असते, कोठें नसते हे समाजवादी नीट पारखून पहात नाहींत, असा त्यांच्यावर मिलनें आरोप केला. ह्या आरोपाचा अर्थ एवढाच की, मिलच्या मतें आर्थिक व्यवस्थेंतील वाईट गोष्टी चढाओढीचा परिणाम नसून चढाओढीच्या अभावाचें प्रतीक होत्या. ह्याशिवाय चढाओढीच्या समर्थनार्थ मजुरामजुरातील चढाओढ वगळतां इतर सर्व प्रकारची चढाओढ मजुरांच्या हिताकरितांच असते, असा निर्वाळा त्यानें दिला. उदाहरणार्थ, वस्तूंच्या उत्पादकांतील चढाओढ मजुरांना लागणाऱ्या उपयोगाच्या वस्तूची किंमत कमी करते. सुधारणा करण्याकरितां प्रोत्साहन म्हणून, आळशीपणापासून, बौद्धिक मंदतेपासून, अचळपणापासून संरक्षण म्हणून चढाओढीची जगांत अत्यंत जरुरी आहे, असें प्रतिपादून चढाओढीमुळें कांहीं काळपर्यंत कामगारवर्गाच्या कांहीं भागाला त्रास झाला म्हणजे कांहीं कामगारांना तात्पुरत्या बेकारीला तोंड द्यावें लागेल तरी चढाओढीला मनुष्याच्या अंतिम हिताच्या दृष्टीने उत्तेजन मिळालेच पाहिजे व चढाओढीला प्रतिबंधक अशी कोणतीहि गोष्ट करणें धोक्याचें ठरेल, असा इषारा मिलने दिला.

**मिलच्या विभाजनचिकित्सेचें महत्त्व**

मिलचें विभाजनतत्त्वाचें विवेचन व चवथ्या भागातील त्याने केलेले विवेचन, त्याने केलेल्या उत्पादनतत्त्वाच्या विवेचनापेक्षां निःसंशय अधिक महत्त्वाचे आहे. प्रत्यक्ष विभाजनाच्या तत्त्वांत त्यानें कोणतीच भर टाकली नाही. नाही म्हणावयाला मजुरीच्या बाबतीतील त्याचे विवेचन विभाजनतत्त्वाच्या बाबतीत अर्थशास्त्राचे पाऊल पुढें नेणार होते. रिकार्डोच्या विवेचनामुळें मजुरी ही मजुरांच्या अन्नवस्त्राच्या किमान गरजा भागवण्याइतपतच नेहमी असते, अशी समजूत झाली होती. हा मजुरीचा अत्यत निराशावादी सिद्धान्त बाजूस सारून मिलने मजुरीनिधि-सिद्धान्त म्हणून पुढे अर्थशास्त्रांत प्रसिद्ध झालेला सिद्धान्त उचलून धरला. ह्या सिद्धान्ताप्रमाणे मजूरसंख्या मर्यादित राहिली तर--आणि ती रहाणे शक्य आहे असे मिलला वाटत होते--मजुरीत वाढ होऊं शकते, कामगाराचें रहाणीमान वाढू शकते व वाढलेलें रहाणीमान किमान पातळीहि बदलू शकतें, हा सिद्धान्त

पूर्णपणे निराशावादी नाही मिलने प्रतिपादिलेला सिद्धान्तहि अर्थशास्त्रात फार काळ टिकला नाही मजुरी-निधि ह्या शब्दप्रयोगाला निश्चित अर्थ नाही. एकदर मजुरीचे मान पाहाण्यापेक्षां वैयक्तिक उत्पादक मजुरी किती द्यावी हे कशावर ठरवतात हे पाहाणें अधिक श्रेयस्कर. किमान रहाणीमान स्थिर नसतें म्हणून जर त्याज्य तर मजुरीनिधि ही कल्पनाहि त्याज्यच. कारण आगाऊ ठरवलेला, स्थिरमर्यादेचा असा कोणताहि निधि नसतो, इत्यादि मुद्यावर हा सिद्धान्त मागें पडला. मात्र ह्या सिद्धान्तानें अर्थशास्त्राचे क्षेत्र बराच काळ व्यापून ठेवले होते, ही गोष्ट मात्र खरी आहे. मजुरीच्या बाबतीत मिलने रिकार्डोपुढे पाऊल टाकले असले तरी नफा व सारा ह्या बाबतीत त्याने जवळ जवळ रिकार्डोचाच अनुवाद केला नफ्यातील कांहीं भाग व्याजाच्या रूपाने भाडवलाचा पुरवठा करणाऱ्याना पोचता करावा लागतो ह्याची मिलला जाणीव होती व्याजाबद्दलची सिनिऑरची उपपत्ति त्याला मान्य होती.

### मिलनें साधलेल्या समन्वयाचें यशापयश

प्रत्यक्ष विभाजनतत्त्वांत मिलने भर टाकली नसली तरी उत्पादन-सिद्धान्त व विभाजनसिद्धान्त ह्यांत एक महत्त्वाचा भेद दाखविण्यांत मात्र मिलने मोठी कामगिरी केली. उत्पादन-सिद्धान्ताप्रमाणें विभाजन-सिद्धान्तहि सर्वत्र आढळतात व अतएव ते अटळ असे आहेत, ह्या समजुतीला गाडून टाकून विभाजनाच्या दृष्टीने आर्थिक बदल होणे शक्य आहे, असें त्यानें दाखवून दिले. असे करण्याने त्याने अर्थशास्त्राच्या व आर्थिक व्यवस्थेच्या प्रगतीचा मार्ग सुकर केला ह्यात काहीच शका नाही. ह्या दृष्टीनें विचार करता समतेवर प्रस्थापित झालेली आर्थिक व्यवस्था व्यवहार्य आहे अशी त्याने दिलेली कबुली व उत्पादनवाढीकरिता उत्पादनवाढ व भांडव-सचयाकरिता भाडवलसचय ह्या गोष्टी अनिष्ट आहेत, असा त्याने दिलेला इशारा महत्त्वाचा आहे. समाजवादी आर्थिक व्यवस्थेच्या व्यवहार्यतेबद्दल त्याने दिलेल्या कबुलीमुळे व सहकारी तत्त्वावर अधिष्ठित असलेल्या उद्योग-धद्याबद्दल त्यानें काढलेल्या चांगल्या उद्गारामुळें त्या विचारसरणीला जोम आल्यास नवल नाही. मात्र आर्थिक समतेचा मिलने केलेला पुरस्कार त्याला सनातन सप्रदायिकाच्या पंक्तीतून बाजूला काढण्यास पुरेसा नाहीं. त्याचा

समतेचा पुरस्कार त्याचा उदारमतवादीपणा दर्शविते. तसेच भांडवलशाहीच्या विकासात प्रतीत होणाऱ्या विभाजनातील विषमतेमुळे भांडवलशाहीला व त्याचबरोबर भांडवलशाहीतील विभाजन नैसर्गिक आहे, असे म्हणणाऱ्या अर्थशास्त्राला होऊ लागलेला विरोध सनातन सप्रदायातील लोकाना जाणवू लागल्याचेहि पुरस्कार हे चिन्ह होते. ह्या विरोधाला तोड देण्याचा 'विभाजन–सिद्धान्त अटळ स्वरूपाचा नसतो व विभाजनातील दोष हा सनातनवाद्यांनी पुरस्कारिलेल्या आर्थिक व्यवस्थेचा दोष नसून सनातनवाद्यांच्या तत्त्वापासून म्हणजेच चढाओढीपासून आर्थिक व्यवस्था च्युत झाल्याचा तो दोष होता' असे म्हणणें हा एक मार्ग होता. तोच मार्ग मिलने स्वीकारला. समाजवादी आर्थिक व्यवस्था व्यवहार्यहि आहे व इष्टहि आहे, पण त्या आर्थिक व्यवस्थेपासून असणाऱ्या अपेक्षा खऱ्याखुऱ्या चढाओढीला प्रस्थापित होण्यास संधि दिल्यानेहि फलित करून घेता येतील, असा मिलच्या लिखाणाचा आशय सागता येईल. चढाओढीच्या तत्त्वाचे त्याने त्याच्या अर्थशास्त्रावरील ग्रंथात केलेले सावेश समर्थन व व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा त्याने अन्यत्र केलेला पुरस्कार ह्याने त्याच्या सनातनवादित्वाबद्दल शका उरत नाही. तडजोडवृत्ति धारण करून त्याने केलेले सनातनसंप्रदायाच्या मूलतत्त्वाचें समर्थन त्या वेळेपुरते तरी यशस्वी झाले. त्याबद्दलचे श्रेय मिलच्या सद्भावनेला जसे द्यावे लागेल तसेच मिलच्या वेळेपर्यंत सनातनवादी अर्थशास्त्राला शास्त्रशुद्ध असा तीव्र विरोध निर्माण झाला नव्हता ह्यालाहि द्यावे लागेल. मिलनतर मात्र 'चढाओढीला संधि द्या' ह्या म्हणण्यात अर्थ नाही. कारण चढाओढीचा अभाव हेच मनुष्यस्वभावाशी अधिक सुसगत आहे, मजुराची दुस्थिति हा चढाओढीचा किंवा चढाओढीच्या अभावाचा प्रश्न नसून हितसंबध परस्परविरोधी असलेले वर्ग समाजात असण्याचा तो परिणाम आहे, असे म्हणणारे लेखक पुढे आले व त्यावेळी मिलकृत तडजोड अयशस्वी ठरली. ते कांही असो, काही काळपर्यंत तरी मिलचे विवेचन प्रमाणभूत मानले गेले हे कबूल केले पाहिजे.

**मूल्यचिकित्सा**

आपल्या ग्रंथाच्या तिसऱ्या भागात मिलने मूल्य कसे ठरले ह्या प्रश्नाची चर्चा केली. मिलच्या मूल्यतत्त्वांच्या विवेचनाचा थोडक्यात

आशय पुढीलप्रमाणे सांगता येईल. वस्तूला मूल्य प्राप्त व्हावयाचें असल्यास कोणतीतरी गरज भागवण्याची शक्ति वस्तूत असावयास हवी व वस्तु मिळविण्यांत त्रास व्हावयास हवा. वस्तूच्या गरज भागविण्याच्या शक्तीकडून तिचे कमाल मूल्य ठरविले जातें. कारण कोणताहि ग्राहक गरज भागविण्याच्या दृष्टीने वस्तूची जी योग्यता असते त्यापेक्षा जास्त द्यावयास तयार होत नाही. कमाल मर्यादेच्या आत वस्तु मिळवण्याच्या त्रासाने तिचें मूल्य ठरवले जाते. वस्तु मिळवण्याच्या त्रासाचे स्वरूप मात्र निरनिराळ्या वस्तूच्या बाबतीत निरनिराळे असते काही वस्तूचा पुरवठा मर्यादित असतो. एवढेच नव्हे तर त्यांत वाढ करणे शक्यच नसते इतर वस्तूचा पुरवठा वाढणे शक्य असते. दुसऱ्या विभागांतील बऱ्याच वस्तू अशा असतात की, त्याचा पुरवठा वाढवावयाचा असला तर अधिक मानवी श्रम खर्च करावे लागतात. इतरहि खर्च अधिक करावा लागतो. बहुसंख्य वस्तू ह्या विभागांत मोडतात. अशा वस्तूची बाजारातील किंमत मागणी-पुरवठ्यामुळें ठरते व उपलब्ध पुरवठा खपावा इतकी ठरते. बाजारातील किंमत ज्या किंमतीभोंवती घोटाळत असते त्या किंमतीला नैसर्गिक किंमत म्हणता येईल ह्या किंमतीचे मजुरी, व्याज व सामान्य दरानें नफा हे स्वतंत्र घटक आहेत. ह्यांपैकी मजुरी, कामगाराना श्रम करण्याबद्दल द्यावी लागते. व्याज, भाडवलाचा पुरवठा करणाऱ्याना उपभोगनिग्रह करण्याबद्दल द्यावें लागते व नफा उद्योगपतीना उत्पादनांतील धोके स्वीकारण्याबद्दल द्यावा लागतो. मजुरी, व्याज व नफा ह्याच्या पैशातील बेरजेला पैशातील उत्पादन खर्च (Money cost of production) म्हणतां येईल. पैशांतील उत्पादनखर्चामागें उत्पादनाचा खराखुरा खर्च (Real cost of production) असतो. उत्पादन साध्य होण्यासाठी शारीरिक व मानसिक असा जो त्रास उत्पादनघटकाच्या मालकाना सोसावा लागतो त्याला खराखुरा खर्च म्हणतां येईल. कामगाराना होणारा त्रास मुख्यत: शारीरिक व भांडवलदाराना आणि उद्योगपतीना होणारा त्रास मुख्यत: मानसिक असतो.

मिलचें मूल्यतत्त्वाचें विवेचन त्या तत्त्वांच्या बाबतीतील अर्थशास्त्राची प्रगति दर्शविणारे आहे. बाजारी किंमतीचें विस्तत व पद्धतशीर विवेचन

त्यानेच प्रथम केलें. मिलच्या विवेचनानें सनातनवादी अर्थशास्त्रातून श्रम-सिद्धान्त कायमचा डावलला गेला आणि उत्पादनखर्चसिद्धान्ताकडे होत असलेलें संक्रमण पुरें झाले. उत्पादनखर्च व खराखुरा उत्पादनखर्च ह्याच्यां-तील परस्परसंबधाची सुस्पष्ट कल्पना मिलला होती असे दिसत नाही. तरीसुद्धां मूल्याच्या वर दिलेल्या विवेचनाबद्दल मिलला इतका आत्मविश्वास होता की, मूल्यविषयक प्रश्नावर शेवटचा शब्द लिहिला गेला, असे त्याने उद्गार काढले. अर्थशास्त्राच्या पुढील प्रगतीने हे उद्गार खोटे ठरविले.

## सरकारचीं कर्तव्यें

मिलनें आपल्या ग्रथाच्या शेवटच्या भागांत सरकारची आर्थिक व्यवस्था, आणि सरकारची कर्तव्यें ह्या विषयाचा परामर्ष घेतला. सरकारच्या कर्तव्यांसबंधीच्या विवेचनांत मिलची नव्याजुन्या विचारांची तडजोडीच्या भावनेने सांगड घालण्याची वृत्ति स्पष्टपणे दिसते. प्रजेला अतर्गत व बाह्य आक्रमण आणि फसवणूक ह्यापासून सरक्षण देणे एवढेच सरकारचे कार्य, हा आत्यतिक स्वरूपाचा जुना विचार आणि सरकारचा प्रपच उचितानुचिताचा विचार न करतां वाटेल तसा वाढवण्यास हरकत नाही, हा तितकाच आत्यतिक उतावळ्या सुधारणावाद्याचा विचार ह्यामध्ये मिलने सुचविलेला विचार सुवर्णमध्याच्या स्वरूपाचा आहे नाणीं पाडणे, वजनमापे ठरवून ती अंमलात आणणे, बदरे बाधणे इत्यादि कर्तव्याचा उल्लेख करून जें जे सर्वाच्या सोयीसाठी आवश्यक आहे तें तें सरकारने करावे. मात्र कोणतीहि गोष्ट करण्यापूर्वी ती सर्वाच्या दृष्टीने आवश्यक व सरकारनेच केली पाहिजे अशी आहे अशी पक्की खात्री करून मगच ती सरकारने आपल्या कर्तव्यांत समाविष्ट करावी असें मिलने सुचविलें. मिलची सूचना तडजोडीच्या स्वरूपाची आहे. कारण सनातनवाद्याना व सुधारणा-वाद्यांना त्या सूचनेचा आपापल्या दृष्टीने इष्ट असा अर्थ करण्यास सारखाच वाव आहे.

## मिलचें खरे स्वरूप

मिलचें खरे स्वरूप मिलच्या ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणात व्यक्त झाले आहे. ह्या प्रकरणाचें नांव 'सरकारच्या कार्यक्षेत्राच्या मर्यादा' असें

आहे ह्या प्रकरणात त्याने असें स्पष्टपणें म्हटलें आहे कीं, व्यक्तिजीवनाचा व्यवहार शक्य तितक्या कमी प्रमाणांत नियंत्रित करावयाचा हे सरकारच्या धोरणाचें सामान्यत: सूत्रवाक्य असावें आणि ह्या सूत्रवाक्यापासून ढळणारी वागणूक सरकारला करावयाची असल्यास तितकेच जोरदार कारण पाहिजे. तसे कारण नसेल तर सरकारचें व्यक्तिजीवनावरील नियंत्रण ही निश्चित वाईट गोष्ट आहे. सरकारच्या व्यक्तिजीवनांत ढवळाढवळ करण्याच्या धोरणाविरुद्ध सामान्यत घेतल्या जाणाऱ्या सर्व आक्षेपांचा उल्लेख करून — उदाहरणार्थ '—सत्तेचा दुरुपयोग होण्याची शक्यता अधिक असते, सरकारवर कामाचा बोजा अधिक पडून कोणतेंच काम व्यवस्थित होत नाही, आपल्याला काय हवे हे लोकानाच अधिक समजते इत्यादि आक्षेप—वकिली थाटात मिलने असे लिहिले आहे की, सरकारकृत ढवळाढवळीचे समर्थन करण्याची जबाबदारी 'सरकारचे कार्यक्षेत्र वाढवावे' असे म्हणणाऱ्याच्याकडे असून ते वाढू नये असे म्हणणाऱ्याना आपली बाजू सिद्ध करण्याचे कारण नाही.

मिलच्या खऱ्या स्वरूपाची अधिक प्रतीति—समाजवादाविषयी मिलने मृत्यूपूर्वी योजलेल्या व त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या सावत्र मुलीने प्रसिद्ध केलेल्या—मिलच्या लिखाणात होते. त्या लिखाणांत समाजावादी अर्थव्यवस्था कार्यक्षम ठरणार नाही अशी भीति मिलनें व्यक्त केली असून खाजगी मिळकत व चढाओढ ह्या संस्था सर्वस्वी नष्ट होणे अशक्य आहे. तेव्हा त्या भानगडीत न पडता फारतर त्यात जरूर त्या सुधारणा कराव्यात असें सुचविले आहे. असो.

**सरकारच्या अर्थव्यवस्थेबाबत मिलचे विचार**

मिलच्या सरकारच्या अर्थव्यवस्थेविषयीच्या कल्पनात उल्लेखनीय असे विशेष काही नाही. कारण स्मिथच्या कल्पनाना पाठिंबा देऊन त्यासंबधी स्पष्टीकरण करण्यापलीकडे मिलने काही केले नाही. स्मिथने सांगितलेल्या करयोजनेच्या चारी कसोट्या मिलला मान्य होत्या. करावावतच्या विवेचनाला आरंभ मिलने स्मिथच्या ग्रंथातील अवतरणे देऊनच केला आहे. समतेच्या कसोटीचा 'करामुळे कराव्या लागणाऱ्या त्यागाच्या बाबतीत समता' असा मिलनें अर्थ केला असून खर्चाकरितां उपलब्ध असणाऱ्या उत्पन्नाचें ठराविक प्रमाण करांच्या रूपानें वसूल केल्यानें समता प्रस्थापित

होईल असें त्यानें सुचविले. पुरोगामी करयोजनेच्या नावाखाली श्रीमंतांकडून अधिक कर उकळणें मिलला सर्वसाधारणपणे पसत नव्हते. तसे करणें म्हणजे अधिक कष्ट करून अधिक पैसा मिळवणारांना शिक्षा देणें होय. असे त्याला वाटत होते. मात्र ज्याना कष्टाशिवाय उपन्न मिळालें आहे त्याच्याकडून अधिक पैसा घेण्यास त्याची हरकत नव्हती.

**पैशासंबंधींचे विचार**

सरकारच्या अर्थव्यवस्थेसंबंधीच्या विचारांत मिलने स्मिथला जसा पाठिबा दिला तसा पैशासंबंधीच्या विचारात त्यानें रिकार्डोला पाठिंबा दिला. हे विचार पुस्तकाच्या ज्या भागांत त्यानें मूल्यसिद्धान्ताचे विवेचन केलें त्याच भागात व्यक्त केले. असें करण्यांत त्याचा हेतु हा होता की, पैशाचे मूल्य ठरण्याची क्रिया आणि इतर वस्तूचे मूल्य ठरण्याचो क्रिया ह्यामध्ये अजिबात भिन्नता नसते हे स्पष्ट व्हावे. रिकार्डोप्रमाणेच पैशाच्या मूल्याचा द्रव्यनिधि-सिद्धान्त त्याला मान्य होता. ह्या सिद्धान्ताप्रमाणें पैशाचे मूल्य बदलण्यांत पुरवठ्याची बाजूच फक्त परिणामकारक असते. पुरवठा वाढला की तो ज्या प्रमाणात वाढतो त्याच प्रमाणात किमती वाढून पैशाचे मूल्य तितकेच कमी होते. पुरवठा कमी झाला की त्याच प्रमाणात पैशाचे मूल्य वाढते. पुरवठा कमीजास्त झाला की त्याचप्रमाणात पैशाचे मूल्य जास्तकमी व्हावे हे इतर वस्तूंशी तुलना करता, पैशाचे वैशिष्टच म्हणता येईल. पैशाचा पुरवठा पहाताना केवळ नाण्याची सख्या न पहाता प्रत्येक नाणे वर्षाकाठी सरासरी किती वेळा वापरले जाते हेहि पहावे लागत. पैशाचे कोणत्याहि वेळचे मूल्य द्रव्यनिधि सिद्धान्तानुसार ठरले तरी इतर वस्तूप्रमाणे पैशालाहि नैसर्गिक मूल्य असते. पैसा ज्या धातूचा केलेला असतो तिचा उत्पादनखर्च हे तें मूल्य. ह्या मूल्याच्या आवतीभोवती पैशाचे कोणत्याहि वेळचे मूल्य घोटाळत असते. पेढीनिर्मित पैशाचा पैशाच्या मूल्यावर परिणाम होतो; पण कोणत्याहि प्रकारच्या पैशाचे सोन्यांत रूपातर करतां येत असेल तर फारसा धोका संभवत नाहीं.

**पैशाच्या निर्मितीवर नियंत्रण हवें**

ज्याचे सोन्यांत रूपांतर करता येत नाही असा कागदी पैसा मात्र धोकेबाज असतो. असा पैसा निर्माण करण्याची सत्ता कोणालाहि देणे भयानक

आहे. असा पैसा निर्माण करण्याचा मोह जोरदार असतो. अशा पैशाच्या निर्मितीवर कोणतेहि नियंत्रण नसेल तर पैशाचें मूल्य किती खालीं जाईल म्हणजेच वस्तूंच्या किंमत किती वाढतील ह्याची कल्पनाच करवत नाहीं. कागदी पैशाचा वापर राष्ट्राला लाभदायक असतो पण त्याचा भरपूर फायदा घ्यावयाचा असेल तर त्या पैशाच्या निर्मितीवर योग्य बंधन घातलेंच पाहिजे. वापरांतील पैसा कागदी असला तरी मौल्यवान् धातूचें मूल्य त्याला प्राप्त होईल अशा बेतानें त्याचा पुरवठा नियंत्रित करणें (थोडक्यांत—सुवर्ण परिमाण स्वीकारणें) एवढाच त्यावर उपाय आहे. पैशांत वाढ करून उद्योगधंद्याला चालना देतां येते ही समजूत वेडगळ आहे.

## आंतरराष्ट्रीय आर्थिक व्यवहार

वरील व्यवहारांच्या बाबतीत मिलने खुल्या व्यापाराचा पुरस्कार करावा हें त्याच्या एकंदर विचारसरणीशी सुसंगतच होतें. जगांतील उत्पादन-शक्तींचा भरपूर फायदा घेण्याचा, त्यांच्यांत सुधारणा घडवून आणण्याचा, जगांत कायम स्वरूपाची शांतता राखण्याचा प्रमुख उपाय असें त्याने आंतर-राष्ट्रीय व्यापाराचें गुणगान केलेंच; पण ते करतांकरतां स्मिथच्या पावलावर पाऊल ठेवून आंतरराष्ट्रीय व्यापाराला नियंत्रित करणाऱ्या व्यापारवादावर कडाडून टीका केली. 'पैसा हीच संपत्ति' ह्या व्यापारावादाच्या प्रमुख तत्त्वाची 'घृणास्पद तत्त्व' अशी त्याने संभावना केली. आंतरराष्ट्रीय व्यापार अनियंत्रित असतां सर्व देशातील पैशाची खरेदीशक्ति समान पातळीवर रहावी अशा बेतानें पैशापैशांतील रूपांतराचा दर ठरतो; सर्व देशांत सुवर्णपरिमाण असतां त्या बेतानेंच मौल्यवान् धातूंचे वांटप होऊन सोन्याचें मूल्य सर्वत्र सारखें होतें ही रिकार्डोची मीमांसा मिलला सपूर्णपणें मान्य होती.

## मिलच्या यशापयशाची विशेष चिकित्सा

मिलचा आर्थिक विचार व त्यामागील तत्त्वज्ञान ह्यांची रूपरेषा वर दिल्याप्रमाणें आहे. वरील सर्व विवेचनावरून दोन गोष्टी स्पष्ट होतात. पहिली अशी की, मिलने अर्थशास्त्रांत मौलिक अशी भर कोणतीच टाकली नाही. स्मिथ, रिकार्डो, से, सिनीऑर, माल्थस ह्या मिलपूर्वींच्या लेखकांनी प्रणीत केलेल्या सिद्धान्तावर मिलचे सर्व विवेचन उभारलेलें होतें. मिलचे लिखाण

म्हणजे वरील लेखकांच्या विचारांचें स्पष्टीकरणच होतें असें म्हटले तरी चालेल. दुसरी गोष्ट अशी कीं मिलनें अर्थशास्त्रांत मौलिक भर कोणतीच टाकली नसली तरीसुद्धां मिलचें अर्थशास्त्रांतील स्थान अगदी स्वतंत्र आहे असें म्हणावें लागते. मिलला स्वतंत्र स्थान प्राप्त झालें ह्याचें कारण आर्थिक विचार व आर्थिक परिस्थिति ह्याच्या प्रवाहाच्या तत्कालीन विशिष्ट स्वरूपामुळे व विशिष्ट कालांत जन्मल्यामुळें मिलवर पडणारी ऐतिहासिक जबाबदारी मिलनें व्यवस्थित पार पाडली हें आहे. विचारानें सनातनी असलेल्या मिलला सनातनवादाला होणारा तत्कालीन विरोध लक्षात घेऊन व त्याला योग्य तो मान देऊन सनातनवादाचें व्यवस्थित विशदीकरण करण्याचे कार्य करावे लागलें; म्हणजेच पर्यायाने त्याला समालोचकाची व समन्वयकाची अशी दुहेरी भूमिका वठवावी लागली. मिलने आपले कार्य वर वर पहातां तरी उत्तम रीतीनें पार पाडलें; ह्याची साक्ष मिलच्या ग्रथाला मिळालेली मान्यताच देते. पूर्वींच एके ठिकाणी सांगितल्याप्रमाणे मिलचा अर्थशास्त्रांतील सर्व विषयाचा विस्तृत व कुशल ऊहापोह करणारा ग्रंथ बरींच वर्षे प्रमाणभूत मानला जात असे. मिलच्या मूलभूत अर्थशास्त्रीय सिद्धान्तांचें विशदीकरण व मिलनें केलेला अर्थशास्त्रांतील जुन्या-नव्याचा समन्वय अर्थशास्त्रावरील शेवटचा शब्द अशी समजूत आर्थिक विचाराच्या क्षेत्रात बराच काळपर्यंत टिकाव धरून राहिली. मिलला प्राप्त झालेलें यश मिलला मोठेपणा मिळवून देण्यास समर्थ ठरले असलें तरी ही गोष्ट स्पष्ट केली पाहिजे की मिलचें यश मूलग्राही नव्हतें. मिलच्या समन्वयांतील अपुरेपणा, त्यांतील ढोबळपणा, लौकरच जाणवू लागला व कालांतरानें मिलचें महत्त्व आपोआप कमी झालें. सनातनवादाला होणाऱ्या विरोधाचा पाया जोपर्यंत कच्चा होता तोंपर्यंतच मिलचा दबदबा टिकला. शास्त्रशुद्ध, तर्कशुद्ध पायावर उभा असलेला मार्क्सवाद सनातनवादाला विरोधक म्हणून पुढे आल्यानंतर त्या तीव्र व प्रखर विरोधापुढें जुन्या स्वरूपांतील सनातनवाद तग धरून राहणें शक्यच नव्हते. सनातनवाद ढासळू लागल्याची चिन्हे मिलच्या लिखाणातच आढळतात. तो तसा ढासळू लागला नसता तर समाजवादाचा तात्त्विक कां होईना विचार करून त्याच्या व्यवहार्यतेची कबुली मिलला द्यावी लागली नसती. आणि अस्सल सनातनवाद वितळू लागल्यानंतर मिलचें महत्त्व कमी

व्हावें हें क्रमप्राप्तच होते. मिलनंतर थोड्याच दिवसांत मार्क्सवादाचा उद्‌भव झाल्याने जुन्या मालिकेतील मिल हा शेवटचा लेखक असें जें म्हणण्यांत येतें ते बरोबरच आहे स्मिथ, रिकार्डो, माल्थस ह्यांनीं सुरू केलेली विचाराची मालिका मिलने परिणत स्वरूपास पोहोचविली व अर्थशास्त्रातील सर्व विभागाचा यथाशक्ति परामर्ष घेऊन सनातनवादी अर्थशास्त्राला एक प्रकारचें पूर्णत्व प्राप्त करून दिले. सनातनवादाच्या अभिवृद्धीने मिलच्या लिखाणात उच्चबिंदु गांठला आणि म्हणूनच मिलच्या लिखाणाचा विस्तृत साराश वर दिला आहे हेतु हा की, परिणत स्वरूपातील सनातनवादाचे सम्यक् ज्ञान व्हावे. मिलने प्रतिपादिलेले अर्थशास्त्रीय सिद्धान्त हे सनातनवादाला मान्य असणारे अर्थशास्त्रीय सिद्धान्त व मिलचे तत्वज्ञान हे सनातनवादाचे प्रातिनिधिक तत्त्वज्ञान असे म्हणण्यास कोणतीच हरकत नाही.

**सनातनवाद्यांचा बाह्यरंग भिन्न; पण अंतरंग सारखेच**

मागील प्रकरणात व चालू प्रकरणात येथपावेतो स्मिथकडून सनातनवादाची बीजे कशी रोवली गेली व रिकार्डो, माल्थस, मिल, से प्रभृति अर्थशास्त्रज्ञाकडून त्यांना खतपाणी करण्यांत येऊन सनातनवादी अर्थशास्त्राची जोपासना व वाढ कशी करण्यांत आली ह्याची माहिती देण्यांत आली आहे त्या माहितीला पूर्णविराम देण्यापूर्वी सनातनवादाचे एकदर स्वरूप, सनातनवाद व तत्कालीन परिस्थिति ह्यांचा परस्परसंबंध ह्याबद्दल थोडे-बहुत लिहिणें जरूर आहे सनातनवादी अर्थशास्त्रज्ञांनी प्रतिपादिलेले अर्थशास्त्रीय सिद्धान्त व तत्त्वे पाहिली व सनातनवादी अर्थशास्त्रज्ञाची मनोभूमिका पाहिली तर असे म्हणण्यास कोणतीहि हरकत नाही की सनातनवादी अर्थशास्त्रज्ञाच्या बाह्यरगांत भरपूर फरक आहे. ' पिंडे पिंडे मतिर्भिन्ना ' ह्या न्यायानें तसे असणें स्वाभाविकच आहे. स्मिथ हा कमालीचा आशावादी आहे; तर माल्थस पराकोटीचा निराशावादी आहे. प्रचलित आर्थिक व्यवस्थेचे सामर्थ्य व कर्तबगारी ह्यांच्याबद्दलचा उत्साह स्मिथच्या लिखाणात अधिक; तर त्या आर्थिक व्यवस्थेच्या दोषांची कबुली मिलच्या लिखाणात अधिक. मानवी व्यवहारांत सुरळीतपणा अदृश्य हाताच्या प्रभावामुळें आपोआप येतो, असा स्मिथचा विश्वास; तर मानवी व्यवहार स्वभावतः सुरळीत नसतात; पण स्वतःच्या बुद्धि-

सामर्थ्याच्या जोरावर मनुष्य त्यात सुरळीतपणा आणू शकेल ह्यावर मिल-माल्थसचा विश्वास. तर्कशुद्ध कठोरता हा रिकार्डोच्या लिखाणाचा विशेष; तर वर्ण्यविषयासबधी जिव्हाळ्याचा ओलावा हा स्मिथ-माल्थस-मिल ह्याचा विशेष; असे कितीतरी फरक सनातनवाद्याच्या लिखाणाच्या स्वरूपाविषयीं दाखविता येतील. केवळ अर्थशास्त्रविषयक कल्पना घेतल्या तर त्यातहि हे फरक दिसून येतात. स्मिथचा उत्पादनावर भर, तर रिकार्डोचा विभाजनावर, तर मिलमध्ये दोहोचा समन्वय करण्याची वृत्ति ! मानवी श्रम हा मूल्याचा पाया की उत्पादनखर्च हा मूल्याचा पाया ह्याविषयी स्मिथमध्ये वैचारिक गोधळ, मानवी श्रम हेंच मल्याचे माप असा रिकार्डोचा अट्टाहास; मिलमध्ये मानवी श्रमाचा केवळ एक घटक म्हणून उल्लेख; वाढत्या लोकसख्येचे स्वागत करावयास स्मिथ तयार; तर वाढती लोकसख्या मनुष्याच्या हिताला विघातक असा माल्थसचा विचार. असो.

### सनातनवाद्यांच्या अंतरंगांतील सारखेपणा

सनातनवादी लेखकांचा बाह्यरंग वर दर्शविल्याप्रमाणें भिन्न असेल तर असा प्रश्न उपस्थित होणे शक्य आहे की त्या सर्वांचा एकाच सप्रदायांत अंतर्भाव कां करावा ? ह्या प्रश्नाचे उत्तर असें की, सनातनवादी सप्रदायातील वर निर्देशिलेल्या लेखकांचा बाह्यरंग भिन्न असला तरी त्यांचे अतरग एकच आहे तसेच त्यांच्या बाह्यरंगांतील फरकहि बराचसा परिस्थितिजन्यच आहेत. त्या लेखकांची मनोमन एकी होती, ही गोष्ट त्याना एका सप्रदायात अतर्भूत करण्यास पुरेशी आहे. त्याची बाह्यस्वरूपातील भिन्नता त्यांचा भिन्न दृष्टिकोन प्रकट करणारी नसून परिस्थिति बदलल्याचा त्याच्यावर झालेला परिणाम फक्त दर्शविते. त्याच्या बाह्यस्वरूपातील भिन्नतेमुळे त्यांच्यातील समानधर्माला कोणताच बाध येत नाही. म्हणूनच त्याचें भिन्न बाह्यस्वरूप त्यांच्या सप्रदायाला बाध आणीत नाहीं.

वरील विधानें सिद्ध होण्यासाठी सनातनवादी लेखकाचें अतरग सारखें कसे होतें व त्यांचा बाह्यरग केवळ परिस्थितीमुळेंच कसा बदलत गेला हें स्पष्ट होणे अगत्याचें आहे. सनातनवादी सप्रदायातील अर्थशास्त्राचे अतरग अशा अर्थाने सारखे होते की, त्या सप्रदायातील सर्व अर्थशास्त्रज्ञाचे आर्थिक तत्त्वज्ञान एकच होतें.

**सनातनवादी अर्थशास्त्र व्यक्तिनिष्ठ व अनियंत्रणवादी**

सनातनवादातील सर्व अर्थशास्त्रज्ञांचें अर्थशास्त्र व्यक्तिनिष्ठ असून प्रत्येक व्यक्तीला आपलें हिताहित योग्य प्रकारे समजतें असा त्याचा दावा होता. व्यक्तीला आपलें हित साधता यावे म्हणून समाजानें खाजगी मिळकतीचें तत्त्व व निर्बन्धविरहित स्पर्धेचे तत्त्व अशी दोन तत्त्वे शिरोधार्य मानावीत असा त्यांचा आग्रह होता. त्यांत समाजाला विघातक असें कांहीच नाही. कारण व्यक्तिहित एकमेकांत समाविष्ट आहे असा त्यांचा युक्तिवाद होता. सनातनवाद्याचें व्यक्तीला प्राधान्य देणारे व निर्बंधविरहित स्पर्धेचा पुरस्कार करणारें तत्त्वज्ञान आर्थिक क्षेत्रांत आर्थिक व्यक्तिवाद (Economic Indivisualism) ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. हें तत्त्वज्ञान स्मिथमध्ये प्रकर्षानें आढळतें. त्यानंतरच्या लेखकात त्याचा जोर कमी झालेला दिसला तरी त्यांचाहि त्या तत्त्वज्ञानावर पूर्ण विश्वास होता असें मानण्यास सबळ जागा आहे. मिलच्या विवरणात समाजवादाची व्यवहार्यता प्रथम कबूल करण्यांत आली तरी शेवटी मिल सनातनवादी वळणावरच गेला. सनातनवादी लेखकांचा केवळ सनातनवादाच्या तत्त्वज्ञानावर विश्वास होता असे नव्हे; तर त्या तत्त्वज्ञानाला धोरणात्मक स्वरूप मिळावे अशीहि त्याची इच्छा होती. सरकारनें आपले कार्यक्षेत्र शक्य तितकें मर्यादित करावे, आर्थिक व्यवस्थेत अजिबात ढवळाढवळ न करण्याचे म्हणजेच अनियत्रणवादी धोरण (Laisse faire policy) स्वीकारावे, हें धोरण परराष्ट्रीय व्यापारालाहि लागू करून खुल्या व्यापाराला उत्तेजन द्यावे, सुवर्णपरिमाण ह्या चलनव्यवस्थेचा स्वीकार करून पैसा ह्या सस्थेचा मनुष्याकडून दुरुपयोग होऊ न द्यावा; खाजगी मिळकत (Private Property) ह्या सस्थेची प्रतिष्ठा बिघडूं देऊ नये, योग्य अशा स्पर्धेच्या मार्गातील सर्व अडथळे दूर करावेत, इत्यादि सर्व सूचनाबद्दल त्याच्यांत एकवाक्यता होती. एका विशिष्ट तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन व ते तत्त्वज्ञान अमलात यावे म्हणून केलेल्या सूचना ह्याच्या बाबतीत सनातनवादी लेखकात जी एक प्रकारची एकवाक्यता आढळते तिच्यामुळेच त्या लेखकाचा सप्रदाय एकच होता असें मानले जातें. त्या लेखकांची तात्त्विक बैठक काळजीपूर्वक तपासली व आर्थिक व्यवस्थेसंबंधी शासनसंस्थेनें काय करावे ह्याबद्दलच्या त्यांच्या सूचना पाहिल्या तर त्यांचे अतरंग एकच होते. ह्यासबंधी संदेहसुद्धां मनात निर्माण होत नाही.

**बाह्यरंगांतील फरक परिस्थितिजन्य**

सनातनवाद्याच्या बाह्यरगांत असलेला फरक परिस्थतिजन्यच होता. औद्योगिक क्रांतीला नुकतीच कोठें सुरुवात झाली आहे, नवनवीन शोध सारखे लागत आहेत, त्या शोधांमुळे एका बाजूला उत्पादन वाढत आहे तर दुसऱ्या बाजूला बाजारक्षेत्र वाढत आहे, त्यामुळे उद्योगपतीच्या व व्यापाऱ्यांच्या उत्साहाचा अतिरेक होऊन काय करूं, काय न करूं असे त्याना झालें आहे, अशा वातावरणांत लिहिणारा स्मिथ आशावादी नसेल तरच नवल ! रिकार्डो-मालथसच्या काळांत वरील परिस्थिति पूर्णांशानें शिल्लक राहिली नव्हती. त्याच्या वेळी सुद्धां औद्योगिक प्रगतीला पायबद बसला नव्हता हें खरे; पण प्रगतीसुद्धा फार झपाट्याने होऊ लागली तर ती तशीच चालू राहील काय ह्यासंबधी शका उत्पन्न होते. ह्याच शकेची बीजें रिकार्डो–मालथसमध्यें उद्भवली होतीं. व त्यामुळे स्मिथचा आशावाद त्यांच्यांत उरला नव्हता असे दिसते. मिलच्या वेळी तर काय औद्योगिक क्रांतीचे ढोबळ दोषच प्रामुख्याने नजरेस येत होते. ह्या घटनेनें मिलचें बाह्यरग भिन्न झाले.

**सनातनवादी अर्थशास्त्र भांडवलशाहीचें अर्थशास्त्र**

अर्थशास्त्रातील सनातनवाद ह्या विषयाला पूर्णविराम देता देतां सनातनवादासंबधी नेहमी करण्यात येणाऱ्या एका विधानाचा उल्लेख केला पाहिजे. सनातनवादी नावाने ओळखले जाणारे अर्थशास्त्र हे भाडवलशाहीचें अर्थशास्त्र आहे, हें ते विधान होय हे विधान सपूर्णतया खरे आहे. हे विधान खरे असण्याचीं तीन कारणे सांगतां येतील. पहिले कारण भांडवलशाही ह्या नावाने ओळखिल्या जाणाऱ्या आर्थिक व्यवस्थेचे वर्णन सनातनवादी अर्थ-शास्त्रात आढळतें. उत्पादनाच्या घटकावर व उपभोगाच्या वस्तूवर खाजगी मालकी, स्वतःचे आर्थिक हित साधण्याची खटपट करण्यास व्यक्तीला दिलेला पूर्ण वाव व उद्योगपतीचे सूत्रधारित्व ही भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेची तीन प्रमुख वैशिष्टचे आहेत ह्या वैशिष्टचानी युक्त असलेल्या आर्थिक व्यवस्थेचा कारभार कसा चालतो म्हणजेच त्या व्यवस्थेंत उत्पादन व विभाजन ह्याचें स्वरूप कसें ठरते ह्याचे शास्त्रीय दृष्टचा वर्णनात्मक विवेचन म्हणजेच अर्थशास्त्रातील सनातनवाद. दुसरे कारण असे की सना-तनवादाची तात्त्विक भूमिका व सनातनवादाचे अर्थशास्त्र भाडवलशाहीला

पोषकच ठरले. भाडवलशाहीचा उत्कर्ष होण्यासाठी रूढी, शासनसंस्था इत्यादींनी नियन्त्रित झालेली आर्थिक व्यवस्था कोलमडून पडणे जरूर होतें, आर्थिक व्यवस्थेतील जमीनदारवर्गाचे वर्चस्व नष्ट होणे जरूर होते, पैसा हे केवळ साधन आहे ही कल्पना रूढ होणे जरूर होतें, भाडवलाचा व मानवी श्रमाचा भरपूर पुरवठा शक्य तेवढ्या कमी किमतीत उपलब्ध होणे जरूर होते. भाडवलशाहीच्या ह्या गरजा सनातनवादी अर्थशास्त्राने बौद्धिक पाठपुरावा करून भागवल्या. स्पर्धेनेच व्यक्तीचे व समाजाचे कल्याण होते. हे तत्त्व पुढे माडून स्पर्धेला आर्थिक स्वातन्त्र्याचा पुरस्कार करणारी आर्थिक व्यवस्था प्रस्थापित होणे सनातनवादाने सुलभ केले. उत्पादना-करितां कोणत्याहि प्रकाराचा त्याग न करता किंवा कष्ट न घेतां निसर्गाच्या देणगीवरील मालकी हक्काच्या जोरावरच फक्त विभाजनांत हक्क सागणारा जमीनदारांचा वर्ग हा समाजांतील एकटाच ऐतखाऊ वर्ग आहे, असे सूचित करणारे सिद्धान्त पुढें माडून जमीनदारवर्गाचे आसन बरें-चसें डळमळीत होण्यास मदत केली. पैसा हीच संपत्ति ह्या कल्पनेला मूठमाती देऊन पैशावर आधारलेले आर्थिक व्यवहार सुगम करण्यास मदत केली, बचतीतून भाडवल कसे निर्माण होते, भांडवलाच्या पुरवठ्या-वर उत्पादनवाढ, मजुरी, एकूण रोजगारी ह्या गोष्टी कशा अवलंबून असतात, उपभोगाचा मोह आवरून बचत करणे हा मोठ्यात मोठा सद्‌गुण कसा आहे, भाडवलाची अमर्यादित वाढ होण्यातहि धोका कसा नाही, प्रमाणाबाहेर उत्पादन हे अशक्य कोटीतील कसे आहे, इत्यादि गोष्टीवर प्रकाश पाडून भाडवलाचा पुरवठा वाढविण्याचे म्हणजे बचत करण्याचें महत्त्व सिद्ध केले व मजुरी किमान मर्यादेवरच नेहमी राहणार असे दर्शवून कमी मजुरीबद्दल उद्योगपतींना दोष देता येणार नाही अशी पळवाट निर्माण करून ठेवली. सनातनवादाची तात्त्विक बैठक व अर्थशास्त्रीय सिद्धान्त भांडवलशाहीच्या दृष्टीनें उपकारकच ठरले, ह्यात शंकाच नाही तिसरे कारण असे की, भाडवलशाहीतील दोषांपेक्षा गुणावरच सनातनवाद्यांनी अधिक भर दिला. खाजगी मिळकतीवर व आर्थिक स्वातन्त्र्यावर अधिष्ठित झालेल्या आर्थिक व्यवस्थेच्या गुणाचें अतिरंजीत वर्णन स्मिथपासूनच म्हणजे सनातन संप्रदायाच्या सुरुवातीपासूनच दिसून येतें मिलमध्यें दोषांचा उल्लेख आला; पण शेवटीं मिलनेंसुद्धा खाजगी मिळकतीच्या

तत्त्वावर अधिष्ठित झालेली आर्थिक व्यवस्थाच उत्तम असाच निर्वाळा दिला. हे सर्व पाहता भाडवलशाही ह्या नावाने परिचित असलेली आर्थिक व्यवस्था नैसर्गिक, सर्वगुणयुक्त व अनिवार्य अशी होती असे सर्व साधारणपणे सनातनवाद्याना वाटत होतें असे म्हणणे चूक ठरणार नाही.

**सनातनवाद इंग्लंडांतील भांडवलशाहीचे अर्थशास्त्र**

अर्थशास्त्रांतील सनातनवाद हे केवळ भाडवलशाहीचे अर्थशास्त्र नव्हतें तर ते उघडउघड इग्लंडातील औद्योगिक क्रांतीला जबाबदार असणाऱ्या भांडवलदारवर्गाचें अर्थशास्त्र होते इग्लडातील भाडवलदाराना वरील गोष्टीशिवाय आणखी एका गोष्टीकरता बौद्धिक पाठिबा हवा होता. ती गोष्ट म्हणजे खुला व्यापार. इंग्लंडातील भाडवलशाहीचा उत्कर्ष मुख्यत्वेंकरून परराष्ट्रीय व्यापारावर अवलबून होता. परराष्ट्रातून स्वस्त दरानें कच्चा माल मिळण्याची व परराष्ट्रातील बाजार आपल्या मालाकरिता काबीज करण्याची सवलत इंग्लंडांत नव्यानेच उदयास येणाऱ्या भाडवलदाराना हवी होती. ही सवलत त्याना खुल्या व्यापाराशिवाय मिळणे अशक्य होते. आर्थिक स्वातत्र्याचा तत्त्व म्हणून पुरस्कार करून व प्रादेशिक श्रमविभागणीने सर्व प्रदेशांची आर्थिक उन्नति कशी होते हे दाखवून सनातनवादाने इग्लडातील भाडवलशाहीची विशिष्ट गरजहि भागवली.

सनातनवाद हे मुख्यत्वेकरून इग्लडमधील वाढत्या भांडवलशाहीचे अर्थशास्त्र होते असें वर सूचित करण्यात आले आहे. असे सूचित करण्यामध्ये सनातनवादी अर्थशास्त्रज्ञ हे भाडवलशाहीचे हस्तक होते असे ध्वनित करण्याचा यत्किचितहि हेतु नाही. तसे ध्वनित करणे हे त्याना अन्यायकारक होईल. सनातनवादी अर्थशास्त्रज्ञाची आर्थिक घटनाकडे पाहण्याची दृष्टि शास्त्रीयच होती ह्यात बिलकूल शका नाही. त्याच्याकडून भाडवलशाहीचे वर्णन करणारें व भाडवलशाहीचे गुणगान करणारे अर्थशास्त्र प्रतिपादिले गेले हा परिस्थितीचाच परिणाम होय. सनातनवादी अर्थशास्त्रानीच आपले लिखाण भाडवलशाहीच्या वाढीच्या व त्यानतर उत्कर्षाच्या कालात केले हे लक्षात ठेवण्याजोगे आहे. ह्या कालात केलेल्या लिखाणात भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेचें वर्णन व्हावे, तिच्या गुणाचाच पाढा वाचला जावा व ज्या पायावर ती उभी होती तोच पाया भरभक्कम आहे असे प्रतिपादिलें जावें हें साहजिकच होतें.

*

# ५ : : : : सनातनवादविरोधी आर्थिक विचार

**सनाततनवादविरोध ही सनातनवादाची प्रतिक्रिया**

सनातनी अर्थशास्त्र इग्लंडमधील औद्योगिक क्रांतीला जबाबदार असणाऱ्या उद्योगपतीना अनुकूल असणाऱ्या आर्थिक व्यवस्थेचें वर्णन व समर्थन होतें हे मागील प्रकरणाच्या शेवटीं दाखवून देण्यांत आलें आहे. सनातनी अर्थशास्त्राचे हें स्वरूप पहातां सनातनवादाला झालेल्या विरोधाचीं उगमस्थानें कोणतीं असावींत व त्या विरोधाचें स्वरूप कोणतें असावें हें सहज लक्षांत येण्याजोगें आहे. सनातन अर्थशास्त्रानें पुरस्कारिलेलीं आर्थिक तत्त्वें ज्यांना मान्य नव्हती, पोषक नव्हती, त्यांच्याकडूनच हा विरोध झाला. एका अर्थानें सनातनवाद–विरोधी आर्थिक विचार ही सनातवादाचीच प्रतिक्रिया होती. सनातनवादाने पुरस्कारिलेली आर्थिक व्यवस्था प्रस्थापित होण्याच्या कालांत ज्याचे हितसंबंध दुखावले गेले ते मग साहजिकच सनातनवादाचे विरोधक झाले. ह्या वर्गाच्या आकाक्षाबद्दल कोणत्या ना कोणत्या कारणामुळें सहानुभूति बाळगणारे व आपल्या सहानुभूतीचा इमला शास्त्रशुद्ध पायावर उभा करण्याची कुवत असणारे अर्थशास्त्राभ्यासी सनातनवादविरोधी आर्थिक विचाराचे नेते व प्रणेते बनले. सनातनवाद-विरोधी आर्थिक विचार ही सनातनी आर्थिक विचाराचीच प्रतिक्रिया असल्यामुळें सनातनवादाच्या जन्मानतर त्या विचाराचा उद्भव व्हावा व सनातनवादाच्या चलत्या काळांतहि सनातनवादाबरोबर तो विचारहि अस्तित्वात असावा हे साहजिकच होते. कालान्तराने सनातनवादाचें आसन अस्थिर करण्यातहि तो विचार यशस्वी झाला

**सनातनवादविरोधी आर्थिक संप्रदाय**

सनातनवादविरोधी आर्थिक विचार सनातनवादविरोधी ह्या नात्यानें एकत्र करितां आला तरी त्या विचाराचा विशेष विचार करतेवेळीं त्या विचारातील वेगवेगळचा सप्रदायाचें स्वतंत्रपणेच विवेचन केलें पाहिजे. भांडवलशाहीच्या प्रस्थापनेमुळें व उत्कर्षामुळे निरनिराळचा वर्गाचें हितसबंध दुखावले गेले होते. त्यामुळे भांडवलशाहीला बौद्धिक पाठिंबा देणाऱ्या

अर्थशास्त्राला विरोध करणारेहि भिन्नभिन्न वर्गाचे चहाते होते. अर्थातच सनातनवादविरोधी आर्थिक विचारात भिन्नभिन्न प्रवाह होते. प्रवाहरूपाने प्रथम आढळणाऱ्या आर्थिक विचाराचें कालान्तरानें भिन्नभिन्न संप्रदायात रूपान्तर झालें सामान्यपणें सनातनवादविरोधी आर्थिक विचाराची चार ठळक संप्रदायांत विभागणी करता येते. हे संप्रदाय म्हणजे भाडवलशाहीपूर्व आर्थिक व्यवस्था पुन: प्रस्थापित व्हावी असा आग्रह धरणारा रम्यस्वप्नवाद (Romanticism), भांडवलशाही आर्थिक व्यवस्था सामान्यत: मान्य असणारा पण व्यक्तीपेक्षां राष्ट्राला अधिक महत्त्व देणारा आर्थिक राष्ट्रवाद (Economic Nationalism), भाडवलशाही मजूरवर्गाच्या लुबाडणुकीवर उभी आहे व आर्थिक विषमतेची जननी आहे असे प्रतिपादन कामगारवर्गाच्या आकाक्षाबद्दल सहानभूति बाळगणारा समाजवाद (Socısliam) व अर्थशास्त्रीय सिद्धान्ताचा शोध घेण्याची व ते मांडण्याची सनातनवादी पद्धत ऐतिहासिक अनुभवाला अजिबात डावलणारी व म्हणून अशास्त्रीय आहे असें प्रतिपादणारा इतिहासवाद (Hıstorical sehool) हे चारहि संप्रदाय सनातनवादी अर्थशास्त्रातून निर्माण झाले. विशेषत त्या अर्थशास्त्राकडून जिचे वर्णन व समर्थन केले जात असे त्या भाडवलशाहीमुळें ज्याचे आर्थिक हितसंबंध दुखावले होते त्याच्या असतोषातूनच निर्माण झाले. भाडवलशाहीच्या प्रस्थापनेमुळे जुन्या आर्थिक व्यवस्थेंत ज्याचें प्राबल्य होते तो सरजामदाराचा वर्ग प्रथमच दुखावला गेला. त्यामुळे निर्माण झालेल्या असंतोषातून जुन्याबद्दल आत्मीयतेची भावना बाळणाऱ्याचा आर्थिक विचार उदयास आला. तो आर्थिक विचार म्हणजेच स्वप्नवादी आर्थिक विचार. औद्योगिक क्राति इंग्लडात झाल्यामुळे इग्लंडमधील भाडवलदारवर्ग फारच प्रबल होऊन इतर देशातील भाडवलदाराचे आर्थिक हितसंबध दुखावले व त्यातून निर्माण झालेल्या आर्थिक विचारानेच आर्थिक राष्ट्रवादाचे स्वरूप धारण केले भाडवलशाहीचा जसजसा उत्कर्ष झाला तसतसे भांडवलशाहीमुळेच पडणारे 'आहेरे नाहीरे' हे वर्ग अधिकाधिक स्पष्ट झाले. 'नाहीरे' वर्गाच्या असतोषातूनच समाजवाद उद्भवला. सनातनवादी अर्थशास्त्राचे सिद्धान्त जागतिक व अटळ ह्या भावनेनें देशकालपरिस्थिति न पहाता ते गृहीत धरून सर्वत्र आर्थिक धोरण जेव्हां

आखण्यांत येऊं लागले तेव्हा त्या असंतोषातून इतिहासवाद निघाला. ह्या सनातनवादविरोधी आर्थिक संप्रदायांची विस्ताराने माहिती क्रमशः खालीं दिली आहे.

**स्वप्नवादाचा उगम**

स्वप्नवादी आर्थिक विचाराची जन्मभूमि जर्मनी हा देश होती. १९ व्या शतकाच्या सुरुवातीला जर्मनीची आर्थिक परिस्थिति विशिष्ट प्रकारची होती तो देश आर्थिक दृष्टया फ्रान्स, इग्लंड ह्या देशांच्या मानानें मागासलेला होता. सरजामशाहीपद्धतीची शेतकी व प्राथमिक अवस्थेंतील घरगुती उद्योगधंदे एवढेच जर्मनीचे आर्थिक वभव होते. राजकीय दृष्टया एकमेकाशी भाडण्यात सदैव मग्न असणाऱ्या अनेक संस्थानात तो देश विभागला होता. परस्पराशी लढणें, परस्परांच्या व्यापारांवर अनेक प्रकारें निर्बध घालून व्यापाराच्या वृद्धीत अनेक प्रकारे हरकत उत्पन्न करणें, हे खेळ त्या संस्थानाचे राजे केवळ आपापसातील चुरशीकरता खेळत असत. त्याचा त्रास स्वकीयाना जेवढा होई तेवढा परकीयाना होत नसे. त्यामुळे परकीयांचा व्यापार सस्थानातून राजरोसपणे चालू शकत असे. अशा परिस्थितीत जर्मनीची आर्थिक उन्नति होऊ शकली नाही म्हणजेच जर्मनीचे भाडवलशाहीच्या रोखाने सक्रमण जलद होऊ शकले नाही ह्यात नवल नाही.

जर्मनीचा मागासलेपणा तेथील तत्कालीन विचारवताना साहजिकच बोचत होता आणि ते आपापल्यापरीने जर्मनीने कोणता मार्ग स्वीकारावा हे सुचवीत होते. भाडवलशाहीच्या मार्गाने गेल्यामुळे इग्लडची झालेली आर्थिक प्रगति नजरेसमोर असल्यामुळे त्यातील बरेचजण इंग्लंडचे अनुकरण जर्मनीने करावे ह्या मताचे असले तर ते स्वाभाविकच म्हणता येईल. इग्लडच्या आर्थिकोन्नतीला जबाबदार असणाऱ्या स्मिथ-रिकार्डोप्रणीत अर्थशास्त्राने हे लोक अर्थातच भारून गेले होते ह्या लोकाचा गट प्रबळ असला तरी जर्मनीच्या तत्कालीन वैचारिक आदोलनात सुरुवाती—सुरुवातीस कां होईना, पण उलट बाजूहि कमी जोरदार नव्हती. उलट बाजूच्या लोकाचे म्हणणे असें होतें की जर्मनीनें इंग्लंडचा मार्ग स्वीकारूं नये. ह्या बाजूच्या लोकांकडून जी आर्थिक विचारसरणी पुढे मांडण्यांत आली तीच रम्यस्वप्न-

वादी विचारसरणी म्हणून प्रसिद्ध झाली. त्या विचारसरणीला रम्यस्वप्न-वादी हे नाव का मिळालें व त्या विचारसणीचें अर्थशास्त्रांत स्थान काय, ह्याचा विचार ती विचारसरणी काय होती व त्याचे प्रमुख प्रवक्ते कोण, हे समजून घेतल्यानतर करणें योग्य होईल.

**जंट्झ मूल्लर**

फ्रेडरिक जटझ् (१७६४–१८३४) व अॅडॅम मूल्लर (१७७९–१८२९) हे दोघे रम्यस्वप्नवादाचे प्रमुख नेते म्हणून सागता येतील. ह्यापैकी जट्झ हा राजकारणी गृहस्थ असून मूल्लर हा साहित्यिक टीकाकार व अध्यापक होता. तोहि राजकारणापासून अलिप्त नव्हता आणि आपली लेखणी व वाणी स्वतःला पसत असलेल्या राजकारणाकरितां झिजविण्याची त्याची केव्हाहि तयारी असे. राजकारणाचा त्याला प्रत्यक्ष अनुभव नव्हता इतकेच.

**स्वप्नवादाची आर्थिक विचारसरणी**

जंट्झ् व मूल्लर ह्याच्या आर्थिक विचारावरून रम्यस्वप्नवादी अर्थ-शास्त्र ही काय चीज होती ह्याची कल्पना येऊं शकेल. १८०९ व १८१६ ह्या साली प्रसिद्ध झालेल्या दोन ग्रंथांत मूल्लरने आपले आर्थिक विचार पुढे माडले ह्या ग्रंथातून मूल्लरनें स्मिथला गुरुस्थानी मानणाऱ्या जर्मन लेखकावर जोरदार हल्ला चढविला. स्मिथला त्याने फारसा दोष दिला नाही. स्मिथने आपल्या देशातील अनुभवावरून बसविलेले ठोक-ताळे जागतिक अनुभवाचे व महत्त्वाचे आहेत असे भासविण्याची चूक केली, एवढाच त्याचा स्मिथविरुद्ध आक्षेप होता. स्मिथच्या जर्मन अनुयायावर त्याचा फार रोख होता. स्वदेशपरिस्थिति न पाहता त्यानी इग्लंडचे अधानु-करण करण्यास जर्मनीला प्रवृत्त करावे व स्मिथएवढी स्वतःची लायकी नसता स्मिथप्रमाणे उपदेशकाचा आव आणावा ह्याचे मूल्लरला अतोनात वैषम्य वाटत असे. त्याचा भ्रमनिरास करून जर्मनीला योग्य मार्ग दाखवून देण्या-करितां मूल्लरनें सनातनवादाच्या मुळावरच घाव घातला व सनातनवादी-अर्थशास्त्राला उधळून लावण्याचा प्रयत्न केला.

**शासनसंस्थेबद्दलची मूल्लरची कल्पना**

मूल्लरचा आर्थिक विचार समजून घेण्यासाठीं त्याची शासन सस्थेबद्दलची कल्पना समजून घेणे आवश्यक आहे. मूल्लरच्या मते शासनसंस्था ही मानवी

शरिराप्रमाणें असून निरनिराळ्या व्यक्ती हे तिचे अवयव आहेत. ही कल्पना मान्य केली कीं समाज हा व्यक्तीपेक्षां श्रेष्ठ व समाजाच्या व्यतिरिक्त व्यक्तीचा विचारहि अशक्य ह्या कल्पना ओघानेंच येतात. समाज हा केवळ व्यक्तीपेक्षां श्रेष्ठ आहे असें नव्हे, तर व्यक्ति तात्कालिक असून समाज चिरंतन आहे. म्हणजेच समाजाचा एक अणु घटक ह्या नात्याने व्यक्ति ही समाजाच्या इतिहासानें बद्ध व भविष्याला जबाबदार अशी आहे. थोडक्यांत—-चिरंतन समाजाचा एक अवयव म्हणून आपल्या वांट्याचें कार्य करणें, एवढेंच व्यक्तीचें जीवनकार्य आहे. समाजापेक्षां श्रेष्ठ अशी एकच गोष्ट मूल्लरनें मानली होती. ती म्हणजे अंतिम निर्माता व अंतिम न्यायाधीश असा परमेश्वर. परमेश्वराबद्दलच्या कृतज्ञता व आदर ह्या भावनांना म्हणजेच धर्माला मानवी जीवनांत महत्त्वाचें स्थान असलें पाहिजे असें तो प्रतिपादीत असे.

**संपत्तीचा खरा अर्थ**

मूल्लरची आर्थिक विचारसरणी त्याच्या वरील मतांना अनुरूप अशीच होती मूल्लरच्या मतें संपत्ति म्हणजे स्मिथनें सांगितलेल्या केवळ साकार वस्तू नसून साकार, निराकार अशा सर्व वस्तू, व्यक्ती व त्यांचे संबंध ह्या सर्वांचा संपत्ति ह्या कल्पनेंत समावेश होतो. संपत्ति ही एकाच वेळी खाजगी व राष्ट्रीय मालकीची गोष्ट असते. संपत्तीचें संपत्तित्व व्यक्तीला संपत्तीचा जो उपयोग होतो त्यापेक्षां राष्ट्राला जो उपयोग होतो त्यावर अवलबून असतें. उपयोग मोजतां येत नसल्यामुळें संपत्ति वजनांत अगर संख्येत सागता येत नाहीं. मात्र उपयोग आहे कीं नाही याची कल्पना करतां येते. अनुभव घेतां येतो.

**आर्थिक व्यवस्थेचें ध्येय**

संपत्तीच्या वरील कल्पनांशीं सुसंगत अशीच मूल्लरची आर्थिक व्यवस्थे संबंधीची कल्पना होती. मूल्लरच्या मतें राष्ट्रोपयोगी अशा व्यक्ति व आदर्श वस्तूंची शक्य तितकी वाढ व राष्ट्ररूपी कुटुंबाची आर्थिक व सामाजिक एकता निर्माण करणें हें आर्थिक व्यवस्थेचें ध्येय आहे. हें ध्येय साधण्याकरितां लागणाऱ्या उत्पादनघटकांची विभागणी निसर्ग, मनुष्यश्रम, इतिहास ह्या तीन वर्गांत केली पाहिजे. सनातनवादी अर्थशास्त्रज्ञांनीं मानलेले जमीन व मानवी श्रम हें घटक नि मूल्लरनें मानलेले निसर्ग व मनुष्य हे

घटक ह्यांत नांवाचाच फरक दिसतो. इतिहास ह्या घटकांत मूल्लरनें लौकिक दृष्ट्या ज्याला भांडवल म्हणतात त्याबरोबरच अलौकिक भांडवलाचाहि समावेश केला. तसें न करण्याबद्दल त्यानें सनातनवाद्यांना दोषहि दिला. त्या भांडवलांत जुन्या काळापासून चालत आलेली विद्या, अनुभवामुळें मिळत असलेलें ज्ञान इत्यादि गोष्टीचा त्यानें अतर्भाव केला होता.

**आर्थिक व्यवस्थेचें ध्येय साधण्याची जबाबदारी शासनसंस्थेवर आहे.**

आर्थिक व्यवस्थेकडून वरील ध्येयें साध्य व्हावयाची असतील तर शासनसंस्थेकडून आर्थिक व्यवस्थेंत ढवळाढवळ न करण्याचें धोरण स्वीकारलें जाता कामा नये हे उघड आहे. वरील ध्येयाच्या सिध्यर्थ शासनसंस्थेनें अनुरूप असें आर्थिक धोरण स्वीकारावे व ते अमलात आणण्यास प्रजाजनाना भाग पाडावें, असें मूल्लरचें म्हणणें होतें. मूल्लरची शासनसस्था ही खरीखुरी दंडधारी शासनसंस्था होती. आर्थिक देशभक्ति प्रजाजनांमध्यें निर्माण करणें हे धोरण वरील ध्येय साधण्यासाठी शासनसंस्थेनें स्वीकारावें असें त्याने सुचविलें. स्वदेशातील वस्तूबद्दल प्रीति निर्माण करण्याचा प्रयत्न करणें व खुल्या व्यापाराला बंदी करणें ह्या गोष्टी मूल्लरने सुचविलेल्या धोरणाचा भाग होत्या. स्वदेशांतील वस्तूवरील प्रेमानें राष्ट्राभिमान वाटतो व खुल्या व्यापाराला बदी केल्यानें प्रजाजनांची निष्ठा अन्यत्र धांवण्याचा संभव दुरावतो असें मूल्लरचें मत होतें. खुल्या व्यापाराला बदी केल्यानें राष्ट्राराष्ट्रांत शत्रुत्वाची भावना निर्माण होत असली तरी मूल्लरला त्याचे सोयरसुतक नव्हतें; कारण केवळ शत्रुत्वाची भावनाच काय, पण राष्ट्राराष्ट्रात मधून मधून युद्धेंहि व्हावीत अशा मताचा मल्लर होता. युद्धे झाल्यानेच राष्ट्रीय ऐक्याची कल्पना व्यक्तीच्या मनावर ठसते असें त्याला वाटत होतें. युयुत्सु वृत्ति सदा जिवंत ठेवणें हे सरकारचे धोरण असावे असेंहि त्यानें प्रतिपादिले.

**कागदी पैशाचा पुरस्कार**

युयुत्सु आर्थिक व्यवस्थेला पैशाचा अमर्यादित पुरवठा लागतो, ही गोष्ट सध्यां सर्वांना प्रतीत झाली आहे. मूल्लरलाहि याची जाणीव असावी; कारण धातुजन्य पैशापेक्षां सरेकारी कागदी पैशाचा त्यानें पुरस्कार केला.

धातुजन्य पैशाचें स्वरूप आंतरराष्ट्रीय असतें व तो राष्ट्रीयत्वाच्या भावनेला पोषक होऊं शकत नाही. ह्याच्या उलट सरकारनें काढलेला कागदी पैसा स्वत्वाची भावना निर्माण करतो, राष्ट्रीय एकी, सामर्थ्य व पत ह्यांचे तो प्रतीक असतो, असें कागदी पैशाचें त्याने समर्थन केले.

**सरंजामशाहीचा पुरस्कार**

आर्थिक राष्ट्रभक्ति निर्माण करणे हे जसे शासनसस्थेच्या आर्थिक धोरणाचे ध्येय सागितले आहे तसेच आणखी एक ध्येय मूल्लरच्या लिखाणात गर्भित आहे. ते ध्येय म्हणजे जमीनदार, धर्मगुरु व कामकरी हे त्रिवर्ग ज्याचा भाग आहेत ती समाजव्यवस्था कायम ठेवणें. मूल्लरच्या मते हे तीन वर्ग अनुक्रमें निसर्ग, अलौकिक भांडवल व मनुष्य ह्या घटकांचा पुरवठा होण्यास आवश्यक होते. मूल्लरला पसंत असलेली समाजरचना लक्षात घेतां तो सरंजामशाही आर्थिक व्यवस्थेचा भोक्ता होता, हे ताबडतोब लक्षात येते. ह्या आर्थिक व्यवस्थेत उत्पादनाच्या घटकांचा पुरवठा करणारे वरील त्रिवर्ग एकोप्याने रहातात; तसेच सनातनवादी अर्थशास्त्राने पुरस्कारिलेला फाजील अहभाव व भौतिक प्रेम व्यक्तीच्या ठायी निर्माण होत नाही; कारण त्या आर्थिक व्यवस्थेत व्यक्तिसुखापेक्षा व्यक्तिकर्तव्यावरच भर दिला जात असे, असे त्याला वाटत असे. सरजामशाहीतील खाजगी मिळकतीची कल्पना त्याच्या मते आदर्श होती. सरजामशाहीत जमीन, श्रम, उपभोग्य वस्तु ह्याचा विनियोग त्याच्या मालकांनी कसा करावा हे त्यांचे त्यांनी न ठरविता समाजाने पाडलेल्या रूढीनें ठरविले पाहिजे ही कल्पना प्रमुख होती. ह्या कल्पनेप्रमाणें व्यक्तीचा खाजगी मालकीचा हक्क व्यक्तीवरील राष्ट्राच्या मालकीने मर्यादित केला जातो. ह्या कल्पनेमध्ये व्यक्तिभावना व राष्ट्रभावना ह्याचा सुरेख संगम आहे, असे मूल्लर समजत असे.

साराश, सर्वदृष्टया आदर्श असलेली सरजामशाही आर्थिक व्यवस्था जर्मनीनें स्वीकारावी असे मूल्लरचें मत होते. जर्मनींत त्यावेळी चाललेल्या वैचारिक आदोलनांत मूल्लरने कोणती भूमिका स्वीकारली हे ह्यावरून स्पष्ट होतें. उपरोक्त फ्रेडरिक जंट्झची विचारसरणीहि मूल्लरप्रमाणेच होती. त्यामुळे ती विस्तारानें देण्याचें कारण नाही. त्याच्याहि लिखाणात सरंजामशाही ही एक आदर्श आर्थिक व्यवस्था आहे आणि शासनसस्था तत्त्वांत

व प्रत्यक्ष आचरणांत अतिशक्तिमान असली पाहिजे, असे विचार आढळतात. मूल्लरप्रमाणेच त्याचाहि कागदी पैशाला पाठिंबा होता. शासनसंस्थेची शक्ति एवढी की वाटेल त्या वस्तूला ती पैसा बनवू शकते ह्याचें उत्कृष्ट प्रतीक कागदी पैशांत आढळत असल्यामुळें तो पैसा स्वीकारणीय असे त्याचें मत होतें.

### रम्यस्वप्नवादाचें खरें स्वरूप

जंट्झच्या व विशेषत: मूल्लरच्या लिखाणाने रम्यस्वप्नवाद म्हणजे काय हे स्पष्ट होतें. रम्यस्वप्नवाद म्हणजे दुसरेतिसरे कांही नसून राष्ट्र-भक्तीच्या मोहक आवरणाखाली दडून सरंजामशाहीचें पुनरुज्जीवन कर-ण्याचा तो एक प्रयत्न होता. ह्या प्रयत्नाला रम्यस्वप्न असें नांव मिळालें. कारण तो प्रयत्न करणाऱ्यानी सरजामशाहीची रंगविलेलीं चित्रे स्वप्न-सृष्टीला शोभण्याइतकी रम्य होती. सत्यसृष्टीत सरंजामशाही इतकी रम्य नव्हती, हे एक कटुसत्य आहे जाऊं लागलेली सरंजामशाही पुन. यावी व पूर्वीइतक्या जोमाने प्रस्थापित व्हावी ही कल्पनाहि स्वप्नातच जमा होण्या-जोगी होती, कारण ती कल्पना सत्यसृष्टीत उतरण्याचा सुतराम् सभव नव्हता. कालाचा प्रवाह अशा तऱ्हेने वाहत आहे की एकदां नाहीशी झालेली गोष्ट त्याच स्वरूपात पुन्हा येत नाही. इतिहासाची पुनरावृत्ति होते, हा सिद्धान्त खोलवर विचार करणाऱ्यांना कधीच पटणारा नाही. अर्थात् काही लोकाच्या स्वप्नसृष्टीत जमा होणे यापरते सरंजामशाहीला भवितव्य नव्हते. हे सर्व लक्षात घेतां जट्झ व मूल्लर ह्याच्या आर्थिक विचारसरणीला लावलेले रम्य-स्वप्नवादी हे विशेषण योग्यच वाटते.

### स्वप्नवादाचे इंग्लिश प्रवक्ते

१९ व्या शतकाच्या प्रारंभी जर्मनी हा देश भाडवलशाहीच्या उबर-ठ्याच्या आतबाहेर उभा असल्याने रम्यस्वप्नवादासारख्या आर्थिक विचाराला तेथें उघड उघड विशेष असा थारा मिळाला. इग्लडमध्ये तसे होणें शक्य नव्हतें. त्यामुळे त्या देशांत सरंजामशाहीचे समर्थन करणाऱ्यानी भाडवलशाहीचे दोष दाखवून सरंजामशाही ह्या आर्थिक व्यवस्थेचें समर्थन

करण्याचा आव आणला. ह्याचें उत्तम उदाहरण म्हणजे भांडवलशाहीमध्यें प्रमाणाबाहेर उत्पादन कधींहि होत नाहीं ह्या सेनें सांगितलेल्या सिद्धान्तावर माल्थसनें केलेली टीका. माल्थसच्या टीकेचा आशय असा कीं, मजुरी, व्याज ह्या रूपानें उद्योगपतीकडून वाटण्यांत येणारी एकूण रक्कम, किमतीच्या रूपानें योग्य नफा मिळण्यासाठी जेवढी रक्कम वसूल व्हावी अशी उद्योगपतीची अपेक्षा असते, त्या रकमेपेक्षा कमी असते. ह्याचाच अर्थ असा की, उत्पादनास हातभार लावणाऱ्यांपैकी उद्योगपतीशिवाय इतराचे उत्पन्न वस्तूची योग्य किंमत देण्यास समर्थ नसते. त्यानी ती किंमत दिल्याशिवाय उद्योगपतीना त्यांचें उत्पन्न मिळूं शकत नाही, ह्या अडचणीतून उत्पादनाची सुटका होते. ह्याचे एकच कारण आहे. तें म्हणजे समाजातील उत्पादनकार्यात भाग न घेणारा पण उपभोगांत भाग घेणारा वर्ग. अनुत्पादक उपभोक्त्यांचा (Unproductive Consumers) वर्ग समाजात असतो म्हणूनच उत्पादनकार्य अबाधित चालू शकते. ज्या वेळेस भाडवलाची वाढ होत असते त्या वेळेस तर अनुत्पादक उपभोक्त्याची फारच गरज भासते कारण त्याच्याशिवाय इतरांकडून होणाऱ्या उपभोगाचें प्रमाण कमी कमी होत असते. उत्पादन मात्र वाढत असते. साराश—माल्थसच्या मतें अफाट उत्पादनशक्ति असलेल्या कोणत्याहि देशांत वाढत्या उत्पादनाला परिणामकारक मागणी सदैव राहण्याच्या दृष्टीने अनुत्पादक अनुभोक्त्यांचा वर्ग असणें अत्यंत जरूर होतें. अनुत्पादक उपभोक्त्यामध्ये कोणाचा समावेश होतो हेहि माल्थसने नमूद केलें आहे. त्यामध्यें मुख्य स्थान जमीनदारानाच आहे त्याशिवाय सैनिक, मुत्सद्दी, वकील इत्यादि स्मिथनें अनुत्पादक मानलेले लोकहि आहेत.

### माल्थसचें प्रतिगामित्व

माल्थसच्या टीकेंत जमीनदार ह्या वर्गाचे समर्थन करण्याचा प्रयत्न स्पष्ट दिसतो. भाडवलशाहीपूर्व आर्थिक व्यवस्था पुनः आणण्याच्या जर्मन प्रयत्नाचीच ही इंग्लिश आवृत्ति होती. ह्या प्रयत्नानें इंग्लडमध्यें जें स्वरूप धारण केलें तें स्वरूप त्या प्रयत्नास देण्यास माल्थस हा अत्यंत लायक गृहस्थ होता. शरीरानें भाडवलशाहीच्या तेव्हां नव्या असलेल्या जगांत तो वावरत असला व भाडवलशाहीची योग्यता जाणण्याची बौद्धिक

कुवत त्याला असली तरी तो मनानें जुना होता. त्यामुळेंच भांडवलशाहीला उघड विरोध न करता पण भांडवलशाहीची एकसारखी वाढ होण्यांत असलेल्या अडचणी निदर्शनास आणून तो प्रमुख अशा जुन्या गोष्टीचें समर्थन करूं शकला. सरजामशाही तशीच्या तशी पुनः प्रस्थापित करण्याच्या जर्मनींतील प्रयत्नाप्रमाणेंच जमीनदाराना पूर्ववत् मानाचे स्थान प्राप्त करून देण्याचा माल्थसचा प्रयत्नहि एखाद्या रम्य स्वप्नांतच जमा होण्याजोगा होता. म्हणूनच माल्थसच्या प्रयत्नाना रम्यस्वप्नवादाचे इंग्लिश स्वरूप असे म्हटले आहे. मात्र माल्थसला अधिक शास्त्रीय दृष्टि असल्यामुळे सेच्या सिद्धान्तासबंधी माल्थसच्या लिखाणाचा हेतु काहीहि असला तरी त्यामुळे भांडवलशाही आर्थिक व्यवस्था आपसूक व्यवस्थितरीत्या चालते हे वाटतें तेवढे खरे नाही, ह्या गोष्टीकडे लक्ष वेधले गेले हे कबूल केलें पाहिजे भांडवलाची वाढ प्रमाणाबाहेर झाली की ती भांडवलशाहीच्या अंगाशीं येते ही गोष्ट माल्थसच्या टीकेने निदर्शनास आणली गेली. व्यापारचक्र ह्या भांडवलशाहीस जडलेल्या रोगासबंधीच्या निदानाची बीजे माल्थसच्या वरील टीकेत आढळतात. ती टीका करून सनातनी माल्थसने सनातनवादी अर्थशास्त्राला मोठा धक्काच दिला ह्यात शका नाही. पण त्या वेळी भांडवलशाही इतकी जोरांत होती व भांडवलशाहीच्या राज्यांत सर्व काही ठाकठीक आहे असे प्रतिपादिणारा आर्थिक विचार इतका प्रबल होता की, माल्थसच्या वरील लिखाणाला फारशी प्रसिद्धिहि मिळाली नाही. सेच्या बाजाराच्या सिद्धान्ताचा विध्वस हा आजच्या अर्थशास्त्राचा प्रमुख भाग असल्यानें माल्थसच्या सनातनवादावरील टीकेकडे आजचे अर्थशास्त्रज्ञ सहानुभूतीनें पहातात. माल्थसचा अत्यत निराशावादी असा लोकसंख्येचा सिद्धान्त पचविणाऱ्या सनातनवादाला लोकसंख्येतील वाढीप्रमाणेच भांडवलांतील वाढही भयानक असते, ह्या माल्थसच्या सिद्धान्ताचे वावडे वाटले ही गोष्ट जातां जाता नमूद करण्याजोगी आहे. त्यावरून सनातनवादी अर्थशास्त्राची सहानुभूति कोणत्या बाजूकडे झुकती होती ह्यावर स्पष्ट प्रकाश पडतो. ते असो. माल्थसने सनातनवादी अर्थशास्त्राच्या काही भागावर टीका केली, ह्यावरून तो पुरोगामी अर्थशास्त्रज्ञ मात्र ठरत नाही. जात्या तो प्रतिगामीच---प्रतिगामी हा शब्द येथे मागें जाऊ इच्छिणारा ह्या अर्थानेच

वापरला आहे——होता. तत्कालीन परिस्थितीत त्याच्या प्रतिगामित्वाला फारसा वाव नसल्यानें भाडवलशाहीत सरंजामदारांना मानाचे स्थान मिळवून देणे एवढीच त्याने इच्छा बाळगली असावी. अर्थातच तें त्याचे एक रम्य स्वप्न होते.

**स्वप्नवादाचें मूल्यमापन**

रम्यस्वप्नवाद हा सनातनवादाने आशीर्वाद दिलेल्या भांडवलशाहीची एक प्रतिक्रिया होती हे उघड आहे. ह्या प्रतिक्रियेचा उद्देश प्रतिगामी होता हेंहि स्पष्टच आहे. तो उद्देश बाळगणाऱ्यांनी आपल्या प्रतिगामित्वाला जी बैठक दिली ती शास्त्रीय दृष्टया कमकुवत होती. किंबहुना त्यात शास्त्र असे कांहीं नव्हतेच असे म्हटले तरी चालेल. हें विधान विशेषत: जर्मनींतील रम्यस्वप्नवादाला अनुलक्षून आहे. कोणत्याहि प्रकारचे विश्लेषण न करता, कोणत्याहि प्रकारचा कार्यकारणभाव न दाखवता जुने तें सोने म्हणण्यांत शास्त्रीय दृष्टीचा प्रत्यय येत नसतो. कागदी पैशानें राष्ट्राची एकी वाढते, युयुत्सु वृत्ति जिवत ठेवल्याने राष्ट्र श्रेष्ठ होते इत्यादि तत्त्वात शास्त्रीयत्वाचा सपूर्ण अभाव आहे. शास्त्रदृष्टि, शास्त्रपद्धति यापासून पूर्णतया अलिप्त असलेल्या रम्यस्वप्नवादासारख्या विचारालासुद्धा अर्थशास्त्राच्या इतिहासांत स्थान द्यावें लागतें कारण विशिष्ट आर्थिक व्यवस्थेचे व हितसबधाचें येनकेन प्रकारेण समर्थन करणें हा त्या विचाराचा हेतु असतो त्या आर्थिक व्यवस्थाचे शास्त्रीय समर्थन करणें अशक्य असेल किवा उघड उघड समर्थन करणे धोक्याचें वाटत असेल तेव्हाच त्यावर कसले तरी मोहक आवरण घालण्याचा प्रयत्न केला जातो. दुर्दैवाची गोष्ट अशी की, तसें आवरण घातले की चूक व अशास्त्रीय म्हणजेच बुद्धीच्या कोणत्याहि कसोटीला न उतरणाऱ्या कल्पनाचाहि लोकावर पगडा बसू शकतो रम्यस्वप्नवादासारख्या विचारप्रणाली कोणत्याहि कालांत आढळतात त्या विचारसरणीचा उद्‌भव होण्यास आर्थिक कारण काय, त्या विचारसरणीचे आर्थिक उद्दिष्ट काय व त्या विचारसरणी स्वीकारल्यास होणारे आर्थिक परिणाम कोणते ह्यांवर प्रकाश पाडण्यासाठीच केवळ अर्थशास्त्राला लोकांवरील पगडयाच्या दृष्टीने त्या विचारसरणी विशेष प्रभावी असतील तर त्यांची दखल घ्यावी लागते ह्या दृष्टीनें रम्यस्वप्नवादाची

थोडक्यात माहिती सागावयाची असली तर असें म्हणतां येईल की सनातनवाद व भाडवलशाही ह्याविरुद्ध झालेली ती प्रतिक्रिया असून त्या प्रतिक्रियेचें उद्दिष्ट सरंजामशाहीचे पुनरुज्जीवन करणे हा होता. काही काळपर्यंत रम्य-स्वप्नवादाने जर्मनीत लोकमत आकर्षित करून घेतले होते, पण एकदरीत आपल्या जन्मभूमींतहि रम्यस्वप्नवाद अल्पजीवीच ठरला ! इतरत्र तर तो अगदी लवकर---काही ठिकाणी जन्मापूर्वीच---थडावला.

**लिस्टप्रणीत आर्थिक राष्ट्रवाद**

वर एके ठिकाणी सांगितलेच आहे कीं, जर्मनीतील बरेच विचारवत जर्मनीने भाडवलशाही आर्थिक व्यवस्थेचाच मार्ग आक्रमण करावा ह्या मताचे होते. त्या विचारवंताना एक गोष्ट स्पष्टपणें दिसत होती. ती ही की आधीच प्रबल झालेल्या इग्लंडमधील भाडवलशाहीपुढें चढाओढीत जर्मनी-तील भांडवलशाहीचा टिकाव लागणें शक्य नाही. जर्मनीतील कर्त्या लोकांनाहि ही जाणीव होऊ लागली असावी. त्यांना औद्योगिक वाढ होण्यास अनुकूल अशा सर्व सवलती हव्या होत्या. त्यांपैकीच इग्लडच्या चढाओढीपासून सरक्षण ही एक होती. थोडक्यांत म्हणजे तत्कालीन जर्मनीला खुल्या व्यापाराचे तत्त्व वगळता सनातनी अर्थशास्त्राचीं इतर सर्व तत्त्वे---विशेषत: त्या तत्त्वा-मागील तत्त्वज्ञान---पसत होती. सनातनी अर्थशास्त्र तर मान्य करावयाचे पण त्यांतील खुल्या व्यापाराचे तत्त्व तर डावलावयाचें ! ही बाह्यत विसगत दिसणारी गोष्ट साधावयाची कशी हा त्याना पडलेला एक मोठा पेचच होता ह्या पेंचातून जर्मनीची मुक्तता फ्रेडरिक लीस्ट ( १७८९–१८४६ ) ह्या नामवत अर्थशास्त्रज्ञाने केली त्याने जो आर्थिक विचार पुढे मांडला तो विचार सामान्यत. सनातनवादी अर्थशास्त्राला अनुकूल, पण त्याचबरोबर स्मिथप्रणीत खुल्या व्यापाराच्या तत्त्वाला प्रतिकूल होता. लीस्टचा आर्थिक विचार अर्थशास्त्रात आर्थिक राष्ट्रवाद म्हणून प्रसिद्ध झाला आहे. लीस्टचा आर्थिक राष्ट्रवाद व रम्यस्वप्नवाद्याची राष्ट्रवादाशी तोडापुरती साम्य असलेली विचारसरणी ह्यामध्ये मूलभूत फरक आहे. रम्यस्वप्नवादामध्यें विशिष्ट आर्थिक हितसंबध टिकवण्यास राष्ट्र ह्या कल्पनेचा उपयोग करून घेतला आहे; म्हणजे त्यातील वरवर दिसणारा राष्ट्रवाद हें केवळ एक सोंग आहे. लीस्टचा राष्ट्रवाद हा खराखुरा राष्ट्र-

वाद आहे. कारण कोणत्याहि राष्ट्राला राष्ट्र म्हणून आपली आर्थिक उन्नति करून घेण्याचा हक्क आहे. ही भूमिका लीस्टच्या विचारामागे आहे. म्हणजे राष्ट्र या कल्पनेचा त्यांत केवळ उपयोग करून घेतला नसून त्या कल्पनेला प्राधान्य दिले आहे. ह्या दृष्टीनें विचार करता लीस्टने प्रतिपादिलेला आर्थिक विचार हा शुद्ध राष्ट्रवादी आर्थिक विचार होता असें म्हणावें लागते. विचार शुद्ध होता; म्हणजे तो बरोबरच होता असें मात्र नाही. आर्थिक राष्ट्रवाद इष्ट की अनिष्ट हा प्रश्न अगदी वेगळा आहे. असो. आर्थिक राष्ट्रवादाला पुढें पुढें फारच महत्त्व प्राप्त झालें. आर्थिक राष्ट्रवादाचा पाया लीस्टनेंच घातला असें म्हणण्यास हरकत नाही. अर्थशास्त्रांतील एका विशिष्ट विचारप्रणालीचा संस्थापक ह्या नात्यानें लीस्टचें अर्थशास्त्रातील स्थान महत्त्वाचे आहे, ह्यांत शंका नाही. लीस्टचें स्थान लक्षांत घेतां लीस्टबद्दल व त्याच्या आर्थिक विचाराबद्दल अधिक माहिती मिळवणे अर्थशास्त्राच्या अभ्यासकास अगत्याचें आहे.

**लीस्टचा जीवनवृत्तान्त**

लीस्टचा जन्म १७८९ मध्यें झाला. त्याने १८१८ मध्यें सरकारी नोकरींत प्रवेश केला. पण थोड्याच दिवसांत त्याने एका विश्वविद्यालयांत अर्थशास्त्राच्या अध्यापकाची जागा स्वीकारली. उदारमतवादी असल्याने जर्मनीतील नोकरशाहीवर व सत्तेच्या राजकारणावर त्याने कडक टीका केली. ही टीका मुख्यत: अंतर्गत व्यापारावर अनावश्यक निर्बंध व जाचक कर बसविण्याच्या तत्कालीन धोरणावर होती. ही टीका करण्यास त्याच्या सनातनी अर्थशास्त्राच्या सखोल अभ्यासाने त्याला प्रवृत्त केले होते हे विशेष ध्यानांत ठेवण्याजोगे आहे त्याची टीका तत्कालीन सरकारला न रुचल्या-मुळे त्याला स्वदेश सोडावा लागला. १८२४ मध्यें तो परत आला. लगेच त्याला अटक करण्यांत आली. पुन: देशाबाहेर जाण्याचे वचन दिल्याने त्याची मुक्तता झाली. तो अमेरिकेत जाऊन स्थायिक झाला. अमेरिकेतून तो १८३२ मध्ये परत आला. त्यानंतरचें उर्वरित आयुष्य म्हणजे १८४६ पर्यंतचे दिवस त्याने आपल्या देशातच वाङमयीन कार्यांत घालवले. ह्या काळांतच त्याचा अर्थशास्त्रावरील प्रमुख ग्रंथ ' राष्ट्रीय अर्थशास्त्र ' (National System of Political Economy) हा प्रसिद्ध झाला. त्याची प्रथमावृत्ति १८४१

मध्यें बाहेर आली. ह्या ग्रंथातच लीस्टने आपला आर्थिक विचार समग्र व मुद्देसूद मांडला.

**लीस्टच्या आर्थिक विचारांतील प्रमुख कल्पना :..औद्योगिक संरक्षण**

लीस्टच्या ' राष्ट्रीय अर्थशास्त्र ' या ग्रथाचा थोडक्यांत साराश पुढीलप्रमाणे सागता येईल. निसर्गवाद्याचा नेता क्विस्ने ह्याला जागतिक खुल्या व्यापाराची कल्पना प्रथम सुचली. इतर बाबतीत निसर्गवाद्याच्या चुका दाखवणाऱ्या स्मिथने खुल्या व्यापाराची कल्पना मात्र घेतली एवढेच नव्हे तर त्या धोरणाचा अवलब सर्व देशानी करावा असे सुचविलें. असे सुचविताना जगातील सर्व देशात सहकार्याची भावना आहे व जगात त्यामुळे कायम स्वरूपाची शांतता नादू शकेल, असे त्याने जवळ जवळ गृहीतच धरले. तसे खरोखरच जर असेल—आणि तशी परिस्थिति असणे हे इष्ट आहे, ह्याबद्दल वादच नाही—तर जागतिक खुल्या व्यापाराच्या तत्त्वाला विरोध करण्याचें कांहीच कारण नाही. पण खऱ्या जगात तशी परिस्थिति नाही. तशी परिस्थिति आहे, असे मानून आर्थिक सहकार्याचा उपदेश करणें अस्थानी आहे. हा उपदेश करण्यात सनातनी अर्थशास्त्राने कार्यकारणाची गल्लत केली. आधी राजकीय एकी; मग आर्थिक सहकार्य ! असा अनुक्रम आहे, हें इतिहासावरून दिसते. आर्थिक सहकार्य राजकीय एकीच्या आधी असा प्रकार कोठेच आढळत नाही खुल्या व्यापाराच्या योगाने आर्थिक सहकार्य सर्व देशावर लादले गेले तर राष्ट्राराष्ट्रांत ऐक्य निर्माण होण्याऐवजी काही राष्ट्राना उद्योग, व्यापार, ह्यात प्रबल असणाऱ्या राष्ट्रांची गुलामगिरी पत्करावी लागते. असे होण्याची कारणे जोरदार आहेत, इतकेच नव्हे तर ती वादातीत आहेत. प्रबल राष्ट्रे व कमजोर राष्ट्रे ह्याच्यात अनिर्बंध व्यवहार सुरू झाले तर कमजोर राष्ट्राचे अस्तित्वच संपुष्टात येण्याचा धोका असतो. हा धोका टाळावयाचा असल्यास खुला व्यापार सर्वांना फायदेशीर होईल, अशी परिस्थिति निर्माण झाली पाहिजे. अशी परिस्थिति जेव्हा सर्व राष्ट्रे एकाच औद्योगिक पातळीवर येतील तेव्हाच निर्माण होईल. त्याकरिता स्वदेशातील उद्योगधंद्याना संरक्षण ( Protection ) हा एकमेव मार्ग आहे. निरनिराळ्या राष्ट्रांची सद्य परिस्थिति लक्षात घेऊन त्या सर्वांना परस्परसंबध फायद्याचे होतील असा दर्जा प्राप्त कसा करून देता येईल ह्याचे शास्त्र म्हणजच अर्थशास्त्र.

**सनातन संप्रदायाच्या तीन चुका**

वरील गोष्टीकडे स्मिथने सस्थापन केलेल्या सप्रदायाकडून लक्ष देण्यांत आलें नाहीं. ह्याचे कारण म्हणून त्या संप्रदायानें केलेल्या तीन चुकांकडे बोट दाखविता येईल. पहिली चूक अशी कीं, शेखमहंमदी जागतिक दृष्टीच्या नादीं लागून त्यांनी राष्ट्र या कल्पनेकडे व राष्ट्राच्या आर्थिक हितसंबधाकडे दुर्लक्ष केलें दुसरी चूक अशी कीं निर्जीव अशा भौतिकवादानें पछाडल्यामुळे त्यानी वस्तूच्या विनिमय-मूल्याकडेच केवळ लक्ष पुरवलें व त्या नादात आजचे व उद्यांचे नैतिक व राजकीय हितसंबंध व राष्ट्राची उत्पादक शक्ति यांकडे दुर्लक्ष केलें. तिसरी चूक अशी कीं फुटीर, विसंवादी व अव्यवस्थाजनक अशा व्यक्तिवादाला उत्तेजन देण्याच्या भरांत वैयक्तिक उद्योगाला त्यांनीं महत्त्व दिलें व राष्ट्रीय उद्योगधंदे ह्या कल्पनेंकडे दुर्लक्ष केलें पहिल्या चुकीमुळें एकाच वेळीं निरनिराळी राष्ट्रें आर्थिक विकासाच्या निरनिराळ्या टप्प्यांवर असतात, ही गोष्ट त्या संप्रदायाच्या लक्षांत आली नाही. कोणत्याहि देशाला जंगली, पशुपालक, शेतकी, व शेतकी–उद्योग–व्यापार–मिश्रित इत्यादि अवस्थातून क्रमाक्रमानें जावें लागतें. ह्या अवस्थाच्या बाबतीत राष्ट्रा राष्ट्रांच्या आर्थिक परिस्थितींत फरक असतो व सर्व राष्ट्राना जगण्याचा व वाढण्यांचा सारखाच हक्क असल्याने सर्वांना एकच आर्थिक धोरण मानवत नाही. उदाहरणार्थ, शेतकीप्रधान व उद्योगप्रधान अशा देशाचा आर्थिक संबंध त्यांना सारखाच फायदेशीर होत नाही. शेतकीप्रधान व उद्योगप्रधान देशामध्ये जोपर्यंत खुले आर्थिक व्यवहार चालू आहेत तोपर्यंत शेतकीप्रधान म्हणजे उद्योगदृष्टचा मागासलेल्या देशात उद्योगाची वाढ होऊ शकतच नाही त्यामुळें वाहतुकीची साधनें इत्यादि महत्त्वाच्या गोष्टीतहि त्याची वाढ होत नाही. त्यामुळें अर्थातच राजकीय व आर्थिक दृष्टचा त्याना दुसऱ्या देशावर संपूर्णपणें अवलंबून रहावें लागते. अशी स्थिति असतानाच जर का युद्ध झाले तर जादा शेतकी वस्तूना ग्राहक नाहीत आणि नेहमीच्या उपयोगी वस्तूची आयात नाही ! अशी दुहेरी गैरसोय शेतकीप्रधान देशाना सोसावी लागते. दुसऱ्या चुकीमुळें व्यक्ति व सर्व मनुष्यसमाज ह्यामध्ये एक भाषा, एक वाङमय, एक इतिहास, एक संस्कृति, एक संस्था, ह्यांनीं युक्त असें राष्ट्र

असतें आणि भौतिक वस्तूपेक्षां महत्त्वाची अशी ही मूल्ये टिकविण्याकरिताहि निरनिराळ्या राष्ट्रांना आपली शक्ति व त्या शक्तीची साधनें वाढविण्याची जरुरी भासते, ही गोष्ट स्मिथच्या भौतिकवादी सप्रदायाच्या नजरेतून सुटली. भौतिकवादानें या संप्रदायाची दृष्टि दूषित कशी झाली होती, याचे एक उदाहरण म्हणजे माल्थसचा लोकसंख्येचा सिद्धान्त. ह्या सिद्धान्तांत माल्थसने केवळ उदरनिर्वाहाचीं साधनें व लोकसंख्या ह्यांचा सबंध विचारात घेतला. वाढती लोकसख्या हेच निसर्गानें निर्माण केलेलें मानवी शरीराला व मनाला कार्यप्रवृत्त करणारे, मनुष्यांतील उच्च भावनाना आवाहन करणारे प्रोत्साहन आहे व ह्या प्रोत्साहनामुळेच मनुष्याची प्रगति झाली आहे, ही गोष्ट त्यानें लक्षात सुद्धा घेतली नाही. स्मिथसप्रदायाच्या भौतिक दृष्टीचे आणखी एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे स्मिथनेंच केलेला उत्पादक व अनुत्पादक श्रम ह्यांतील भेद. शिक्षक, संगीतज्ज्ञ, कायदेपडित, मुत्सद्दी ह्याना स्मिथ अनुत्पादक ठरवितो. ह्याचा अर्थ उत्पादकशक्तीपेक्षा तो वस्तूच्या उत्पादनालाच अधिक महत्त्व देतो हाच आहे. राष्ट्राची भावी उत्पादनशक्ति वाढवणाऱ्याना अनुत्पादक ठरविले जावे व उपभोग्य वस्तू उत्पादन करणारे तेवढेच उत्पादक ठरले जावे, हा भौतिकवादाने दृष्टिदूषित झाल्याचाच पुरावा आहे. तिसऱ्या चुकीमुळें राष्ट्रातील उद्योगधदे राष्ट्रीय विकासाच्या दृष्टीने वाढविण्याची गरजच स्मिथसप्रदायाला आकलन करता आली नाही. ज्यात व्यक्तीचें हित साधते तेवढेच उद्योगधदे राष्ट्रात वाढले जाणे इष्ट अशी गैरसमजूत त्या सप्रदायानें करून घेतली.

**अर्थशास्त्र शुद्ध करण्याचा एकमेव मार्ग**

वरील चुकांचें निराकरण करून अर्थशास्त्र शुद्ध करण्याचा एकच मार्ग आहे. तो म्हणजे राष्ट्र ह्या कल्पनेला अर्थशास्त्रात योग्य तें स्थान देऊन राष्ट्राला आपला सर्व दृष्टीनें विकास करावयाचा व त्या दृष्टीनें जरूर तर लौकिक फायद्याचा तात्पुरता त्याग करावयाचा हक्क आहे, ह्या विचाराला संमति द्यावयाची. त्याकरिता उद्योगधंद्याना संरक्षण ह्या आर्थिक धोरणालाहि अर्थशास्त्राने कांही विशिष्ट प्रसंगी योग्य धोरण अशी मान्यता देणे जरूर आहे. कच्च्या मालाच्या व्यापारावरील निर्बंध ते घालणाऱ्या देशाना विघातक होतात; पण स्वदेशाला औद्योगिक शिक्षण देण्याच्या हेतूने

उद्योगधंद्यांना विशेषत· त्यांच्या बाल्यावस्थेत दिलेलें सरक्षण देशाच्या दृष्टीनें फायदेशीर व म्हणून न्याय्यच असतें. संरक्षण हा राजकारणी लोकांचा खेळ आहे, ही स्मिथसंप्रदायाची कल्पना मुळांतच चुकीची आहे. इतिहास असेच दर्शवितो की, सुबत्ता, स्वातत्र्य, सामर्थ्य ह्याकरितां चाललेल्या नैसर्गिक अशा आतरराष्ट्रीय झगडचात व युद्धासारख्या आपत्तीतच संरक्षणाच्या धोरणाचा उगम आढळतो. सरक्षण धोरण म्हणून स्वीकारण्याची ही कारणे योग्यच आहेत.

**लीस्टप्रणीत आर्थिक राष्ट्रवादाचें मूल्यमापन**

वर दिलेल्या साराशावरून लीस्टने सांगितलेल्या आर्थिक राष्ट्रवादाचे · स्वरूप कसे होते तें समजून येईल. लीस्टच्या आर्थिक राष्ट्रवादांत दोन गोष्टी महत्त्वाच्या आहेत. राष्ट्र ह्या कल्पनेला लीस्टनें दिलेले प्राधान्य व संरक्षण ह्या आर्थिक धोरणाला दिलेली तात्त्विक बैठक. राष्ट्र ह्या कल्पनेला प्राधान्य देऊन एका दगडाने लीस्टने सनातनवादातील व्यक्तिवाद व भौतिकवाद हे दोन पक्षी मारले. राष्ट्र ह्या कल्पनेला प्राधान्य दिले की व्यक्ति त्या मानाने उपेक्षणीय बनते. सनातनवादात व्यक्तीला दिलेल्या प्राधान्यावर हा हल्ला होता. तसेच 'राष्ट्र ह्या कल्पनेला सास्कृतिक, राजकीय, ऐतिहासिक, इत्यादि गोष्टीचा आधार असल्यामुळे केवळ साकार वस्तूच्या उत्पादनाशी अर्थशास्त्राचा सबध आहे' ह्या स्मिथच्या तत्त्वावरहि तो हल्ला होता. संरक्षण हे काही प्रसंगी न्याय्य आहे, असा पुकारा करून लीस्टने खुल्या व्यापाराच्या तत्त्वाला मुरड घालावी लागते, असें प्रतिपादिले. राष्ट्रहित ही कसोटी सरक्षणाच्या धोरणाला लावली म्हणजेच संरक्षण योग्य की अयोग्य हे ठरविता येते, असा त्याच्या एकंदर लिखाणाचा आशय होता. लीस्टने सरक्षणाला दिलेल्या पाठिंब्याबाबत हे लक्षात ठेविलें पाहिजे की, लीस्ट मर्यादित प्रमाणातच संरक्षणवादी होता. राष्ट्रहिताकरितां स्वीकारलेल्या सरक्षणाच्या धोरणालाच त्याची अनुमति होती. राष्ट्रहित ह्याचा त्याचा अर्थहि मर्यादितच होता. बाल्यावस्थेतील उद्योगधद्याना संरक्षण हा त्याने प्रतिपादिलेल्या सरक्षणाच्या धोरणाचा महामंत्र होता. म्हणजे परदेशातील आधीच वाढलेल्या धद्याशी स्वदेशातील धद्यांना केवळ त्यांच्या बाल्यावस्थेमुळे टक्कर देणें कठिण होत असलें तर

परदेशांतील धद्याची बरोबरी व्हावी म्हणून कांहीं काळपर्यंत संरक्षणाचें धोरण स्वीकारण्यास त्यांची संमति होती. अशा प्रकारचे कोणतेहि कारण नसता संरक्षणाकरिता संरक्षण हे धोरण स्वीकारण्यास किंवा योग्य कारणा-शिवाय स्वीकारलेले संरक्षणाचें धोरण कायम चालू ठेवण्यास त्याची संमति नव्हती. कच्च्या मालावरील व्यापारनिर्बंधास तर त्याचा सरास विरोध होता. देशांतील लोकांना संरक्षित वस्तूकरितां संरक्षणपूर्व किंमतीपेक्षा अधिक किंमत द्यावी लागते, ह्याची त्याला जाणीव होती; पण त्याला तो देशांतील उद्योगधंद्याच्या वाढीकरितां केलेला त्याग म्हणत असे.

**लीस्टचा राष्ट्रवाद अंतर्यामी सनातनवादीच**

लीस्टचा आर्थिक राष्ट्रवाद वरवर पाहतां सनातनवादाच्या अगदी विरुद्ध दिसतो. पण वस्तुतः तसे नव्हते. कारण लीस्टच्या मुखानें जर्मनीतील भाडवलशाहीचे पुरस्कर्तेच बोलत होते. स्मिथचा सनातनवाद इंग्लडमधील औद्योगिक क्रातीला जबाबदार असणाऱ्या वर्गाच्या जसा पथ्यावर पडला तसाच लीस्टचा आर्थिक राष्ट्रवाद जर्मनीत भांडवलशाही क्राति घडवून आणू इच्छिणाऱ्यांच्या पथ्यावर पडला सनातनवाद्यानी पुरस्कारिलेल्या आर्थिक कार्यक्रमांपैकी जागतिक खुल्या व्यापाराशिवाय त्याचा कशासहि विरोध नव्हता. खुल्या व्यापाराचें तत्त्व आपल्या फायद्यासाठी खोडून काढ-ण्यास त्याना राष्ट्रवादाची कास धरणे जरूरच होते. व्यक्तिवाद व भौतिकवाद ह्यावर हल्ला करून सनातनवादाच्या मुळावरच हल्ला करण्याचा देखावा करणारा लीस्ट सनातनवाद्यांनी पुरस्कारिलेल्या आर्थिक धोरणापैकी जागतिक खुल्या व्यापाराच्या धोरणावरच फक्त हल्ला करतो, हे लक्षात ठेवण्याजोगे आहे जर्मनीची आर्थिक उन्नति व्हावी ह्याच हेतूने लीस्ट प्रेरित झाला होता. म्हणूनच त्याच्या विचाराला राष्ट्रवाद म्हणावयाचें. (तसे पाहिले तर सनातनवादी लेखकाच्या मनांतहि इंग्लडची आर्थिक उन्नति कशी होईल हाच विचार होता.) हा विचार कागदावर उतरवताना राष्ट्र ह्या कल्पनेचा विशेष उदो उदो करण्याची त्यांना गरज भासली नाही. कारण त्याशिवायच त्याचे काम साधत होते. ती गोष्ट जर्मनी भाडवलशाही मार्गाने गेला तरच होईल अशी त्याची खात्री पटली होती. म्हणूनच त्याचे लिखाण जर्मनीत भांडवलशाहीची वाढ होण्यास पोषक ठरलें. लीस्टचा हेतु

काहीहि असो; केवळ परिणाम लक्षांत घेतला तर लीस्टचा आर्थिक राष्ट्रवाद थोडयाफार फेरफारासह सनातनवादाची जर्मनोपयोगी आवृत्ति होती, असे म्हणावेसें वाटते. सनातनवादी अर्थशास्त्रानें दिलेल्या तात्त्विक पाठिंब्याचा भरपूर फायदा घेऊन इग्लडमधील भांडवलदारवर्गाने इग्लंडचे आर्थिक वर्चस्व जगांत प्रस्थापित करण्याचा जो घाट घातला होता त्याचीच लीस्टचा आर्थिक राष्ट्रवाद ही वरवर विरोधक पण अंतर्यामी बहुतांशी समानधर्मी अशी प्रतिक्रिया होती, असें म्हणणे चूक ठरणार नाही.

**लीस्टचा आर्थिक राष्ट्रवाद भारतीय अर्थशास्त्राचें स्फूर्तिस्थान**

आर्थिक राष्ट्रवादाचा निरोप घेऊन समाजवादाकडे वळण्यापूर्वी विषयान्तराचा दोष पत्करूनहि आपल्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा एका गोष्टीचा उल्लेख करावासा वाटतो. ती ही की आज ज्याला हिंदी वा भारतीय अर्थशास्त्र (Indian Economics) म्हणून संबोधण्यांत येतें त्याचा उद्भव लीस्टच्या आर्थिक राष्ट्रवादांतून झाला आहे. सामान्यत: न्यायमूर्ति माधवराव रानडे ह्यांना आधुनिक स्वरूपातील भारतीय अर्थ-शास्त्राचे जनक मानण्यात येते. न्यायमूर्तींच्या विचारावर लीस्टच्या आर्थिक राष्ट्रवादाचा पगडा बसला होता, हें स्पष्टपणे आढळते. हे विचार रानडयाच्या भारतीय अर्थशास्त्रावरील निबंधसंग्रहात (Essays on Indian Economics १८९८) एकत्रित करण्यात आले आहेत. जर्मनीचे अर्थशास्त्र भिन्न असले पाहिजे व तें राष्ट्रीय स्वरूपाचे असले पाहिजे ह्या लीस्टच्या भूमिकेसदृशच हिंदी अर्थशास्त्र भिन्न असलें पाहिजे व हिंदुस्थानची परिस्थिति व गरजा लक्षात घेऊनच त्याची बैठक घडवण्यात आली पाहिजे, ही न्यायमूर्तींची भूमिका होती. भारतीय अर्थशास्त्राने लीस्टपासून स्फूर्ति घ्यावी ह्यात आश्चर्य वाटण्याजोगें काही नाही. कारण सनातनवादी अर्थशास्त्राचा आधार घेऊन बलिष्ठ झालेल्या इग्लडचा उपसर्ग जर्मनीला जेवढा झाला त्यापेक्षा किती तरी अधिकपट हिंदुस्थानला झाला. स्वतःचे आर्थिक धोरण ठरविण्याइतकें स्वातंत्र्य तरी जर्मनीला होते; पण हिंदुस्थानला तें स्वातंत्र्यहि नव्हतें! स्वातंत्र्यहीन व मागासलेल्या हिंदुस्थानावर जेत्यांचें खुल्या बाजाराचे तत्त्व लादलें जाण्याचा हिंदुस्थानवर एकच परिणाम होऊं शकत होता व तोच झाला. तो परिणाम म्हणजे परदेशी चढाओढीच्या दडपणाखाली स्वदेशी

उद्योगधंद्याचें मरण व तदनुषंगाने उद्‌भवलेले दारिद्र्य. त्या दारिद्र्यातच ह्या नाही त्या रूपानें खंडणी द्यावी लागल्यामुळें हिंदुस्थानचें पुरेपूर आर्थिकशोषण (Economic Drain) होत होतें. ह्या परिस्थितीत ज्या अर्थशास्त्राच्या आधारावर ते होत होतें त्या अर्थशास्त्राविरुद्ध वैचारिक बंड उभारणें एवढेच भारतीयांच्या हातांत होतें. त्या वैचारिक बडानेच भारतीय अर्थशास्त्र हे नाव धारण केले. सामान्यतः भारतीय आर्थिक विचार सनातनवादविरोधीच आहे. ह्या प्रकरणांत सांगितलेल्या चारी संप्रदायांच्या आर्थिक विचारांना भारतांत कमीजास्त प्रमाणांत पाठिंबा मिळाला आहे. त्यांपैकी आर्थिक राष्ट्रवादानें भारतीय अर्थशास्त्राला रानडयांच्या द्वारां जन्म देण्याचें श्रेय मिळविलें; ह्याचेंहि एक विशेष कारण आहे. ते असे कीं ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंडाचा झेंडा प्रथम ज्या वर्गाने उभारला व हिंदी अर्थशास्त्राच्या जन्माच्या वेळी हिदुस्थानात जो वर्ग बोलविता धनी होता त्या वर्गाला मान्य असलेल्या अर्थशास्त्राला प्रथम वाचा फुटावी हे साहजिकच होते. तो वर्ग म्हणजे हिदुस्थानला भाडवलशाहीच्या मार्गाने नेऊं पाहणाऱ्यांचा. ह्या वर्गाचें भांडण भाडवलशाहीविरुद्ध नसून केवळ परकी भाडवलदाराबरोबर व त्याच्यातर्फे परकी मरकारकडून देशी भाडवलदारांची जी गळचेपी होत होती त्या विरुद्ध होते. ह्या वर्गाला लीस्टचा राष्ट्रवाद जशाचा तसा मान्य होण्याजोगा होता. कळत वा नकळत हिंदी अर्थशास्त्राचे जनक न्यायमूर्ति रानडे पर्यायाने हिंदी अर्थशास्त्र ह्या वर्गाचे वकील बनले. न्यायमूर्तींना प्रत्येक देशाचे अर्थशास्त्र भिन्न असावें ही लीस्टची कल्पना मानवली; एवढेंच नसून आदर्श आर्थिक व्यवस्था व्यक्तिवादी व स्पर्धाप्रधान असावी, ही लीस्टमध्यें अंतर्भूत असलेली कल्पनाहि मानवली, ह्या मागील रहस्य हें होतें. भारताने आर्थिक विचाराच्या बाबतीत लीस्टचा राष्ट्रवाद पचनी पाडला; एवढेच नव्हे तर त्यात भरहि घातली. शैशवावस्थेंतील धंद्याना सरक्षण द्यावे एवढेच लिस्टने म्हटले होतें. त्याच्यापुढें जाऊन एका हिंदी अर्थशास्त्रज्ञाने--प्रा. आडारकर ह्यानी, शैशवावस्थेंतील देशांना संरक्षणाची जरुरी असते असें प्रतिपादिले त्या प्रतिपादनाचा अर्थ असा की, बाहेरील जगात भाडवलशाही परिणतस्वरूपास पोचली असतां जेव्हा एखादा देश नव्यानेंच भाडवलशाहीच्या मार्गानें प्रवास करूं लागतो तेव्हां त्या देशांतील कोणत्या धंद्याला उत्तेजन हवे, सरक्षण

हवें हा प्रश्नच उद्भवत नाही. कारण त्या देशांतील प्रत्येक उद्योगधंद्याला संरक्षणाची जरुरी असते व तें दिलें पाहिजे.

### समाजवादी आर्थिक विचार

लीस्टचा आर्थिक राष्ट्रवाद वरवर सनातनवादाला विरोधक पण अंतर्यामी समानधर्मी होता असें वर लिहिलें आहे. सनातनवादाला सपूर्णतया विरोधक असा आर्थिक विचारहि सनातनवादाच्या उत्कर्षाच्या अमदानींतच उदयास आला. हा आर्थिक विचार म्हणजे समाजवादी आर्थिक विचार. समाजवादी आर्थिक विचार दोन अवस्थातून गेला आहे. पहिली अवस्था ध्येयवादाची. ह्या अवस्थेतील आर्थिक विचाराला ध्येयवादी समाजवाद ( Idealistic Socialism ) असे म्हणता येईल. ध्येयवादी समाजवाद म्हणजे समाजवाद ह्या पदवीला पात्र असलेला पण पुरेसा शास्त्रीय नसलेला आर्थिक विचार. दुसरी अवस्था समाजवादाला शास्त्रीय स्वरूप प्राप्त झालें तेव्हाची. ह्या अवस्थेतील समाजवादाला शास्त्रीय समाजवाद (Scientific Socialism) असे म्हणता येईल. ह्या प्रकरणात ध्येयवादी समाजवादाशींच फक्त कर्तव्य आहे.

### ध्येयवादी समाजवादाचा उगम

आर्थिक राष्ट्रवादाप्रमाणेच समाजवादहि भांडवलशाहीच्या वाढीचीच प्रतिक्रिया होती, हे प्रथमच सागितलें पाहिजे. औद्योगिक क्रान्तीचा पहिला बहर जोंपर्यत ओसरला नव्हता तोंपर्यंत श्रमविभागणी, अजस्र यंत्राच्या साहाय्यानें उत्पादन, मोठ्या प्रमाणावरील उत्पादन, उत्पादनाची गिरणीपद्धत (Factory System) ह्यामुळें होणाऱ्या अफाट उत्पादनवाढीमुळें लोकाचे डोळे इतके दिपून गेले होते की, औद्योगिक क्रातीमुळें प्रस्थापित होऊं पहाणारी भाडवलशाही ही अनेक भयकर अशा दोषाची जननी असू शकेल, ही कल्पनाच कोणाला शिवणे शक्य नव्हते आणि शिवली तरी भाडवलशाहीला दोष दुरुस्त करण्याची पुरेशी सधि दिल्याशिवाय भाडवलशाहीच्या दोषाचा परिस्फोट करणे अनुचित वाटलें असावें. औद्योगिक क्रान्तीचा पहिला बहर ओसरल्यानंतर मात्र ही परिस्थिति उरली नाही. त्या वेळेस बऱ्याच विचारवताना अशी जाणीव होऊं लागली की, औद्योगिक

क्रान्तीच्या प्रवाहाने आणून सोडलेल्या भांडवलशाही नामक आर्थिक व्यवस्थेंत अंगभूत व असह्य असे अनेक दोष आहेत. ते दोष काढून टाकण्यास भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेच्या व त्या व्यवस्थेला आशीर्वाद देऊन उपकृत करणाऱ्या सनातन आर्थिक विचारांच्या मुळावरच घाव घातल्याशिवाय दुसरा उपायच नाहीं. विचारवंताच्या ह्या जाणिवेंतून समाजवादी आर्थिक विचाराचा उद्भव झाला.

**भांडवलशाहीचा प्रमुख दोष**

विचारवंताना विचारप्रवृत्त करणारा भाडवलशाहीचा प्रमुख दोष हा कीं, भांडवलशाहीमध्ये उत्पादनाला प्रत्यक्ष जबाबदार असणाऱ्या वर्गाचीच म्हणजे कामगारवर्गाची स्थिति अत्यंत अनुकंपनीय असते. भाडवलशाही ही श्रीमंतांना अधिक श्रीमत करीत जाणारी व गरिबाना अधिक गरीब करीत जाणारी व अर्थातच डोळ्यात भरणारी आर्थिक विषमता निर्माण करणारी अशी आर्थिक व्यवस्था आहे. ह्या आर्थिक व्यवस्थेत उत्पादनाची सूत्रे उत्पादनाची मानवी श्रमाव्यतिरिक्त अन्य साधने ज्याच्या ताब्यांत असतात अशा मूठभर लोकाच्या हातांत असतात. ह्या मूठभर लोकावर श्रम करण्याची ताकद एवढेच ज्यांचे उदरनिर्वाहाचें साधन अशा बहुसख्य श्रमजीवी लोकाना अवलबून रहावें लागतें. उत्पादनाची सूत्रे ज्या मूठभर लोकाच्या हातांत असतात त्याच्याकडेच अर्थात् उत्पादनाचा मोठा वांटा जातो आणि जे काही थोडे उरेल तें उत्पादनास प्रत्यक्ष जबाबदार असणाऱ्या पण भाडवलावरील मालकीच्या अभावीं कमकुवत असणाऱ्या बहुसंख्य लोकांच्या वाटयास येते. भाडवलशाहीत असे व्हावें हें अगदी अपरिहार्य आहे. कारण त्या आर्थिक व्यवस्थेची उभारणीच वैयक्तिक फायद्याच्या तत्त्वावर झाली आहे. स्वत चा जास्तींत जास्त फायदा पहाणारे उत्पादनाचे मूठभर सूत्रधार श्रमजीवी वर्गाच्या असहाय्यतेचा फायदा घेणारच. भाडवलशाही ही उत्पादनाला प्रत्यक्ष जबाबदार असणाऱ्या बहुसंख्य लोकाना आर्थिक दृष्ट्या अनुकपनीयता प्राप्त करून देणारी आर्थिक व्यवस्था आहे. उत्पादनाची गिरणीपद्धति ही भांडवलशाहीचें प्रतीक आहे. ही पद्धति सुरू होण्यापूर्वी कामगाराची स्थिति चागली होती, असे येथे सुचविण्याचा मुळीच हेतु नाही. त्या वेळी उत्पादनच कमी असल्याने एकंदर राहाणीमान कमीच होते; पण उत्पादनाची साधने थोड्याच लोकांच्या हातांत गेलेली नसल्यामुळें औद्योगिक क्षेत्रात तरी आर्थिक समता

अधिक होती. दुसरे असें की त्या काळी कामगार स्वतःच्या घरी स्वतःच्या कुटुबातील लोकाच्या साहाय्याने उत्पादन करीत असल्यामुळे त्याला स्वतंत्रताहि बरीच होती. औद्योगिक क्रान्तीनतर कामगाराला आर्थिक दृष्टचा लाभ तर झाला नाहीच; पण त्याची स्वतंत्रता नाहीशी होऊन त्याला मानहानीचे दुःखहि भोगावे लागले. त्याशिवाय खेड्यातील घरगुती जीवनाचा मोकळेपणा त्याच्या आयुष्यात नष्ट होऊन शहरी जीवनाच्या बहुविध गैरसोयी, गिरणीतील कडक शिस्त, तेथील अस्वच्छ व रोगट वातावरण ह्या गोष्टीना त्याला तोंड द्यावें लागेल हें निराळेच. शहरी जीवनांतील व गिरणीतील गैरसोयीसुद्धा अपरिहार्य नसूनहि स्वार्थच पहाण्याच्या भाडवलदारांच्या प्रवृत्तीतूनच उद्‌भवतात हेहि येथें नमूद केलें पाहिजे. खर्च कमी व्हावा म्हणून गिरणीतील वातावरण सुधारावयाचे नाहीं व भरपूर भाडें मिळविण्यासाठी खुराड्यासारख्या चाळी बांधून त्यांचीहि नीट व्यवस्था ठेवावयाची नाही ह्या गोष्टी त्या गैरसोयीच्या मागे आहेत थोडक्यांत--भाडवलशाहीच्या अमदानीत आर्थिक दुःस्थिति, प्रत्यक्ष गुलामगिरी नसली तरी गुलामगिरीची भावना, शहरातील व गिरणीतील कष्टप्रद जीवन ह्यामुळे कामगारांची परिस्थिति शोचनीय झाली. इतके असूनहि जीवनांत कोणतीहि शाश्वति उरली नाही. कामगारवर्गाची अनुकंपनीय स्थिति, भाडवलशाहीत मजूर वस्तीचे शहरातील बकाल, अस्वच्छ व कोंदट असे विभाग, हवा व स्वच्छता ह्याच्या अभावानेच उठून दिसणाऱ्या गिरण्या, कामगारांतील बेकारी, कामगारांच्या जीवनांतील किमान गरजा भागविण्याचीहि अशाश्वति, स्त्रिया व अत्यत लहान मुले ह्याच्यावर केवळ पोटासाठी अत्यंत गलिच्छ वातावरणात अत्यत कमी वेतनावर वाटेल ते काम करण्याचा प्रसंग व ह्याचा मालकवर्गाने घेतलेला भरपूर फायदा इत्यादि रूपानें व्यक्त झाली. भांडवलशाहीचा जसजसा विकास होऊं लागला तसतशी कामगारांची परिस्थिति अधिकच खालावू लागली. कारण भांडवलशाहीच्या विकासाच्या ओघात आर्थिक सत्तेचे केन्द्रीकरण व त्या मानानें कामगारवर्गाची असहाय्यता ह्यातहि वाढ झाली.

**समाजवादी आर्थिक विचार निःसंशय पुरोगामी**

भांडवलशाहीतील वरच्याप्रमाणें असलेली कामगारांची परिस्थिति समाजवादी आर्थिक विचाराची पार्श्वभूमि आहे. समाजवादी आर्थिक विचार

निःसंशय पुरोगामी आहे. पुरोगामी ह्या अर्थाने की मागें पाऊल टाकून भांडवलशाहीने केलेल्या उत्पादन पद्धतीतील क्रान्तीला विरोध करून भांडवलशाहीपूर्व आर्थिक व्यवस्था पुनरपि प्रस्थापित करणें हा त्या विचाराचा उद्देश नव्हता; तर पुढें पाऊल टाकून भांडवलशाहीने केलेली उत्पादनातील क्रान्ति पचनी पाडून विभाजनांतील विषमता नाहीशी करणारी आर्थिक व्यवस्था प्रस्थापित करणे हा त्या विचाराचा उद्देश होता. हा उद्देश सफल होण्यासाठी समाजवादाला खाजगी फायद्यासाठीं उत्पादन ह्या भांडवलशाहीच्या मूलतत्त्वावरच घाव घालणे, तसेच आर्थिक दृष्टया सरकारनें निष्क्रिय असावे, ह्या विचारसरणीवर हल्ला करणे भागच होते. अर्थात् खाजगी फायद्यासाठी केल्या जाणाऱ्या उत्पादनाला पाठिंबा देणाऱ्या व सरकारनें आर्थिक व्यवस्थेत कोणत्याहि प्रकारची ढवळाढवळ करूं नये असें प्रतिपादन करणाऱ्या सनातनी अर्थशास्त्राच्या विरोधकाची भूमिका समाजवादी आर्थिक विचाराने घ्यावी हे क्रमप्राप्तच होते. सनातनवादी अर्थशास्त्राप्रमाणें समाजवादी आर्थिक विचारालाहि एकदमच परिणत स्वरूप प्राप्त झालें नाही. तसेंच सनातनवादी अर्थशास्त्राप्रमाणे समाजवादी अर्थशास्त्रालाहि घाट येण्यास अनेक विचारवंत कारणीभूत झाले. त्यांच्या विचाराची दिशा एकच असली तरी व्यक्ति तितक्या प्रकृति ह्या नात्यानें थोडयाफार प्रमाणांत मतवैचित्र्य आढळते. ही गोष्ट विशेषतः समाजवादी विचार अपरिपक्व होता तेव्हां दिसून आली. समाजवादी विचाराला परिणत स्वरूप देण्याचे, त्या विचाराला पक्वता आणण्याचें, त्या विचाराला शास्त्रशुद्ध करण्याचें कार्य कार्ल मार्क्सने केले. प्रस्तुत प्रकरणात फक्त मार्क्सपूर्व समाजवादी विचारच सांगितला आहे. मार्क्सपूर्व समाजवादी विचार समजून घेण्याकरितां समाजवादी संप्रदायाचा पाया घालणाऱ्या व त्या संप्रदायाच्या विचाराच्या वाढीला हातभार लावणाऱ्या विचारवंताचे व त्यांच्या आर्थिक विचाराचें ज्ञान करून घेणें आवश्यक आहे.

**समाजवादाचा पाया घालणारे मानकरी**

समाजवादी विचारसरणीचा पाया घालण्याच्या मानाचे वाटेकरी अनेक आहेत त्यांमध्यें सेंट सैमन, चार्लस् फौरीअर, सिस्मंडी, रॉबर्ट ओवेन,

प्रौधन, रॉडबर्टस्, थॉम्सन, हॉजस्कीन, ब्रे व ग्रे हे महत्त्वाचे आहेत. त्या प्रत्येकाच्या विचाराचा थोडक्यांत परामर्ष घेतला तर मार्क्सपूर्व समाजवादाचे स्वरूप कसें होते व समाजवादाचा हळूहळू कसा विकास होत गेला हे समजून येईल.

**सेंट सैमन**

सेंट सैमन ( १७६०–१८२५ ) ह्या फरेंच गृहस्थाने अमेरिकेच्या स्वातन्त्र्ययुद्धांत सैनिकी जीवनाचा अनुभव घेतला होता. त्यानंतर फरेंच राज्यक्रान्तीच्या वेळी तुरुंगवासहि त्याने अनुभवला. त्यानंतरच्या काळात त्याच्याकडून बरेच लिखाण झाले. ह्यातील बरेचसें लिखाण विस्कळित स्वरूपाचे असेच आहे. त्याच्या लिखाणावरून त्याला पहिला समाजवादी असे नाव प्राप्त झाले असले तरी त्याच्या लिखाणात कट्टर समाजवाद्याला समाजवाद औषधापुरताच सापडेल. असें असूनहि सेंट सैमनला समाजवाद्यात गणलें जाते; ह्याचें श्रेय त्याच्या अनुयायांनाच द्यावे लागते. त्याच्या अनुयायानी ज्यांतून समाजवादी अनुमाने काढतां येतील असा भाग त्याच्या विस्कळीत, पुष्कळ वेळा असबद्ध अशा लिखाणातून उचलला व त्यांत आपली भर घालून समाजवादाला पोषक असा एक संप्रदायच निर्माण केला. सेंट सैमन संप्रदाय असें त्या संप्रदायाला नांव देतां येईल. सेंट सैमन संप्रदायातहि अस्सल समाजवादी असा भाग थोडाच आहे. सेंट सैमन काय किंवा त्याच्या संप्रदायांतील लोक काय ह्यांना उत्पन्नांतील समता बिलकूल मान्य नव्हती. अर्थात् व्यक्ती-व्यक्तीच्या उत्पन्नांतील फरकांमुळे निर्माण होणारी उच्चनीचता त्यांना मान्य होती, हें ओघानें आलेंच; पण आर्थिक उच्चनीचतेमुळें समाजाच्या सर्व घटकांना समान संधि मिळत नाही. ही गोष्ट मात्र त्यांना पसंत नव्हती. समाजांत एकदा आर्थिक विषमता निर्माण झाली की आपली आर्थिक उन्नति करून घेण्याची सर्वांना सारखी संधि नसते. श्रीमंताच्या मुलांना वाटल्यास स्वस्थ बसून खाता येतें किंवा आपल्या वडिलोपार्जित श्रीमंतीचा योग्य उपयोग करून अधिक श्रीमंत होता येतें. ह्याच्या उलट गरिबाच्या मुलाना जन्मभर राबावेंच लागतें. एवढेंच नव्हे तर आपली स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करणेंहि त्याना शक्य नसतें. ही स्थिति नाहींशी करावयाची

असेल तर उत्पन्नातील विषमता कायम राहिली तरीसुद्धा सर्वांना समान संधि मिळेल ह्या अनुरोधानें समाजाचा प्रपंच केला जावा, असे सेंट सैमन संप्रदायाचे मत होतें. समान संधीची कल्पना सेट सैमनच्या अनुयायांना सेंट सैमनकडूनच मिळाली. कारण त्याच्या लिखाणात त्या कल्पनेचा उल्लेख आढळतो.

**सर्वांना समान संधि प्राप्त होण्यासाठीं सैमननें सुचविलेला उपाय**

जगांत सर्वाना सारखी संधि मिळत नाही. ह्याचे कारण सेंट सैमन संप्रदायाच्या मतें व्यक्तीने संपादित केलेली मिळकत त्याच्या मुलाबाळां-कडेच जाते हें आहे. समाजातील सपत्ति पिढ्यान्पिढ्या विशिष्ट कुटुबातच राहू लागली तर संपत्तीमुळे प्राप्त होणारी सधि विशिष्ट लोकाना मिळते. असें जोंपर्यंत होते तोपर्यंत प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यात जन्म ह्या व्यक्तीच्या हाती नसलेल्या घटनेला अवास्तव महत्त्व प्राप्त होतें ही परिस्थिति पालटून सर्वांना समानसधीचा लाभ व्हावा, ह्याकरिता मेट सैमन संप्रदायाने सुचविलेला उपाय अगदी साधा आहे. तो उपाय असा की, व्यक्तीच्या मृत्यूनतर त्याची मिळकत त्याच्या मुलाबाळाकडे न जाता शासनसस्थेकडे जावी. हा क्रान्तिकारक उपाय सुचविताना सेट सैमन सप्रदायाने सेट सैमनच्या सर्वाना सारखी संधि असावी व त्याकरिता समाजात विशिष्ट गटालाच लाभणारे विशेष हक्क नाहीसे केले जावेत ह्या दोन वचनाचा आधार घेतला होता. येथें हें स्पष्ट केलें पाहिजे की सेट सैमनच्या खाजगी मिळकतीसबंधीच्या लिखाणांत प्रत्येक व्यक्तीला आपल्या मिळकतीचा समाजहिताकरितां विनियोग करावयास लावला पाहिजे; ह्यापलीकडे काही नाही. श्रीमत उद्योगपतीना बहुसख्य जनतेच्या दारिद्र्याची जाणीव करून दिल्यास त्याच्या करवी हलाखीत रहाणाऱ्या कामगाराची स्थिति सुधारता येईल व अशा रीतीनें वर्गसघर्षाचें मूळच उपटून काढतां येईल अशी सैमनची समजूत होती. खाजगी मिळकतीचा विनियोग समाजहिताकरिता व्हावा व समानसंधीच्या दृष्टीने कोणासहि विशेष हक्क असू नयेत, या सेट सैमनच्या मताचा वरील क्रान्तिकारक अर्थ लावण्यात त्याच्या अनुयायांनी मोठीच उडी मारली ह्यात शंका नाही. त्यामुळेंच सेंट सैमनला समाजवादाच्या संस्थापकात स्थान प्राप्त झाले.

उत्पादनाच्या सर्व साधनावर शासनसंस्थेची मालकी असावी; व्यक्तीची असू नये, हें समाजवादाचें एक प्रमुख तत्त्व आहे. ह्या तत्त्वाचा सेट सैमन संप्रदायाने प्रत्यक्ष उल्लेख केलेला नसला तरी सर्वांना समानसंधि मिळावी म्हणून सेट सैमन सप्रदायाने सुचविलेला उपाय अंमलांत आणला तर कांही काळानतर शासनसस्थेकडे मानवी श्रमांव्यतिरिक्त उत्पादनाच्या अन्य साधनाची मालकी आपोआपच येईल, हें सहज समजण्यासारखें आहे. तसे झाल्यास उत्पादनाची सूत्रे आपल्या हाती घेतल्याशिवाय शासनसस्थेला गत्यतर नाही. अशा तऱ्हेने सेट सैमन सप्रदायाच्या विचारसरणीतून समाजवादी म्हणता येतील असे निष्कर्ष काढता येतात. मात्र असा निष्कर्ष काढताना मनुष्या-मनुष्यात निसर्गनिर्मित विषमता असते व सर्वांना सारखी सधि असली तरी समाजातील व्यक्तीना उच्चनीच पातळीवर ठेवणारे भेद समाजात असणें अपरिहार्य व इष्ट आहे हें त्या संप्रदायाचे मतहि लक्षात घेतले पाहिजे.

**चार्लस फॉरिअर**

चार्लस् फॉरिअर (१७७२–१८३७). ह्या फ्रेंच समाजवाद्याचा बाप एक छोटासा पण सामान्यपणें सुव्यवस्थित व सुखवस्तु असलेला एक दुकानदार होता. शालेय शिक्षणानंतर चार्लस्ने बेल्जिअम, हॉलड, जर्मनी ह्या देशांत प्रवास केला बापाच्या मृत्यूनंतर बापाची दुकानदारी त्याच्याकडे आली. १७९३च्या एका दगलीत त्याच्या गावावर बॉम्बचा हल्ला होऊन त्यात त्याचें अपरिमित नुकसान झाले. नाइलाजानें दोन वर्षें त्याला सैन्यांत नौकरी करावी लागली. त्यानंतरहि प्रवासी, प्रचारक, कारकून अशा हलक्यासलक्या नोकऱ्याच त्याला पत्कराव्या लागल्या. त्याला पुनः कधीच चांगले दिवस दिसले नाहीत आणि हलाखीच्या परिस्थितीतच वयाच्या ६५ व्या वर्षी तो मरण पावला. आयुष्याचा बराचसा भाग हलाखीत व निराश मनस्थितीत काढावा लागल्यामुळेच कीं काय समाजरचनेंतील दोष व ते काढून टाकण्याचे उपाय ह्यांवर त्यानें बराच विचार केला. त्या विचाराचें फळ म्हणजेच त्याचें विविध विषयावरील विस्तृत लिखाण. प्रचलित समाज राक्षसी आहे. त्या समाजांत तत्काळ सुधारणा होण्याकरितां सामाजिक संस्थांतील मद प्रगतीवर विसंबून न राहतां बुद्धीच्या कठोर कसोटीला

उतरणाऱ्या नव्या समाजरचनेची तांतडीने प्रस्थापना केली पाहिजे, ही त्याच्या लिखाणातील मध्यवर्ती कल्पना होती. त्याचें बहुतेक सर्व लिखाण फॉरिअरचें समग्र लिखाण ह्या नांवाखाली सहा मोठ्या ग्रंथात एकत्रित करण्यांत आले आहे.

**व्यक्तिवादी आर्थिक व्यवस्थेचे फॉरिअरनें दाखविलेले दोष**

फॉरिअरच्या विचाराचे दोन भाग पाडतां येतील. पहिल्या भागात समाजाच्या दोषावर प्रकाश टाकणाऱ्या त्याच्या विचारांचा समावेश होतो. दुसऱ्या भागांत समाजदोष निवारण्यासाठी त्याने केलेल्या सूचनाचा समावेश होतो. समाजात त्याला आढळणारा मुख्य दोष म्हणजे आत्यंतिक व्यक्ति-वादामुळें समाजांत सतत होत असलेला नैतिक मूल्यांचा ऱ्हास. व्यक्तिवादी समाजांत दुसऱ्याना फसविणाऱ्या, अतिशय ढोंगी असणाऱ्या, अत्यत कावेबाज अशा लोकांनाच यश मिळते. असेच लोक उच्च पदाला जातात. ह्याच्या उलट सद्‌गुण व सत्य ह्याची कांस धरणाऱ्यांना हटकून अपयश मिळतें असें त्याला वाटत होतें. अशा समाजांत मनुष्या-मनुष्यांतील संबध खोटेपणा, फसवणूक, ढोंगीपणा, कारस्थानीपणा ह्या व ह्यासारख्या गोष्टींनीं युक्त असल्यास त्यांत नवल तें काय अशी त्याची विचारणा होती. समाजांत आढळणारा दुसरा दोष म्हणजे समाजातील ऐतखाऊ लोकाचा भरणा. फॉरिअरच्या मते शहरांतील बहुतेक स्त्रिया, खेड्यातील काहीं स्त्रिया, सैनिक, सरकारी नोकर, भिकारी व भटके ही सारी मंडळी ऐतखाऊ ह्या सदरात घालावी लागते.

व्यक्तिवादी समाजांतच वरील गोष्टी कां दिसाव्यात ह्या प्रश्नाला फॉरिअरचें उत्तर असें होते की त्या समाजाच्या उभारणीत प्रत्येकजण दुसऱ्याचा शत्रु असतो. कारण प्रत्येकाला आपले हित साधण्याकरिता दुसऱ्याचे अहित चिंतावेंच लागते, ह्या तत्त्वावरच झाली आहे. ह्या संबंधात फॉरिअरनें दिलेली उदाहरणें मोठी मनोरंजक आहेत. तो म्हणतो की वैद्य हा दुसऱ्यानीं आजारी पडावे अशी इच्छा करीत असतो. तर वकिलाला सर्व कुटुंबात न्यायालयप्रविष्ट होण्याजोगी भाडणे व्हावीत असें वाटत असतें. न्यायाधीशांना गुन्ह्याची संख्या जितकी वाढल तितकी हवीच असते. कारण त्यायोगेंच त्यांची जरुरी समाजाला भासते. बांधकाम करणारे लोक शहराची

राखरागोळी व्हावी असे इच्छीत असतात; तर चाभार, शिपी कमी प्रतीचे जोडे कपडे लोकानी वापरावे; म्हणजे त्याना वारवार आपल्याकडे यावें लागेल, असे मानीत असतात. थोडक्यात--प्रत्येकजण इतराचा सहेतुक शत्रु असतो. व्यक्तीवादी समाजाच्या दोषाचे माहेरघर फॉरिअरच्या मतें व्यापार व कुटुबसस्था हे होते. ह्या दोन ठिकाणीं फसवणूक व ढोंगीपणा ह्यांचा आश्रय केल्यावाचून चालतच नाही असे तो म्हणत असे.

**आदर्श समाजरचनेविषयींचे फॉरिअरचे विचार**

आदर्श समाजरचना कशी असावी ह्या संबंधी फॉरिअरने रेखाटलेल्या कल्पनाचित्रावरून असे दिसते की उपभोग व उत्पादन ह्या आर्थिक क्रिया सहकारी तत्त्वावर अधिष्ठित असाव्यात, ह्या मताचा तो गृहस्थ होता. एका लेखात त्याने असे प्रतिपादिले की ३०० स्त्रियानी, ३०० लहान घरांत, ३०० चुली मांडून ३०० भाड्यात ३०० माणसाचे वेगवेगळे ३०० स्वैपाक करावेत हा मूर्खपणाचा उपद्व्याप आहे. त्यापेक्षा ३०० कुटुबांनी एकत्र येऊन एकत्र स्वैपाकाची व्यवस्था का करू नये, अशी त्याने विचारणा केली. उत्पादनाच्या बाबतीत प्रत्येक कामाकरिता ते काम करणाऱ्याचा स्वतत्र गट असावा, ज्यांना ते काम आवडेल अशाचाच त्या गटात समावेश व्हावा. प्रत्येक गटाच्या घटकात चढाओढीची व दुसऱ्याचे अनुकरण करण्याची इच्छा असावी; पण चढाओढीत शत्रुत्वाची भावना असू नये, कामगाराना नफ्याचा ठराविक भाग मिळावा व कामाचे तास अगदी कमी असावेत असे तो म्हणत असे. ह्या त्याच्या मतात सहकारी उत्पादनावर त्याने दिलेला भर विशेष उल्लेखनीय होता. सहकारी उत्पादनात प्रत्येकजण सारख्या दर्जाचा असल्यामुळे उच्चनीचतेची भावना निर्माण होत नाही; म्हणजेच वर्गभेद नाही. वर्गभेद नाही म्हणजे अर्थातच वर्गसघर्ष नाही सहकारी उपभोग व सहकारी उत्पादन ह्याच्या मर्यादेत खाजगी मिळकत व आर्थिक विषमता ह्याना त्याची हरकत नव्हती. निरनिराळ्या कामाचा समाजाला होत असलेला उपयोग कमीजास्त असल्याने निरनिराळी कामे करणाऱ्याना समाजाकडून दिले जाणारे वेतनहि कमीजास्तच असते. ह्यात त्याला आक्षेपार्ह असे काहीच वाटत नव्हते. खाजगीपणा त्याला सर्वस्वी अमान्य नव्हता. सहकारी तत्त्वावर स्वैपाक ह्यासंबंधी त्याची कल्पना एखाद्या आधुनिक वसतिगृहा-

सारखीच होती. अनेक लोकानी एकाच इमारतीत एकत्र रहावे, ही त्याची कल्पना होती हे खरे; पण ज्याला आवडेल व ज्याला ऐपत असेल त्याने जेवण स्वतःच्या खोलीत घेण्यास व अशा लोकांना स्वतंत्र खोल्या असण्यास त्याची हरकत नव्हती. खाजगी मिळकत व विषमता ह्याशिवाय त्याच्या आदर्श जगात भाडवलदारानाहि स्थान होते. सहकारी स्वरूपावरील उत्पादन सुरू करण्यास भाडवलदारानी पुढे यावे. असें त्याचे त्याना आवाहन होते. उत्पादनात होणाऱ्या फायद्यापैकी $\frac{1}{3}$ फायदा भाडवलदारांनी घ्यावा व बाकीचा कामगारात व कल्पक लोकात वांटावा अशीहि त्याची सूचना होती. सहकारी स्वरूपावर चाललेलें एखादे वसतिगृह स्वतःच काढावे असें त्याला वाटत होते व ते काढण्याकरितां एखादा धनिक भाडवल देईल अशी कल्पना मरेपर्यंत त्याने बाळगली होती.

**फॉरिअरच्या विचारांत समाजवाद नांवापुरताच**

फॉरिअरच्या वरील कल्पनात आजच्या समाजवादाशी साम्य असलेला भाग थोडाच आढळतो. समाजवादाचे जनकत्व त्याच्यावर लादले गेले आहे की काय अशीहि शका येते. पण फॉरिअरच्या बाजूने ह्या बाबतीत एवढें म्हणावयास हरकत नाही की, त्याने कल्पिलेल्या आदर्श समाजांत, उत्पादनात व उपभोगात चढाओढीपेक्षा सहकार्यावर भर दिला होता व वर्गसघर्षरहित अशी समाजरचना म्हणजे आदर्श, अशी त्याची भावना होती. समाजवाद अस्तित्वात आला की वर्गसघर्ष रहाणार नाही आणि उत्पादनात खरेखुरे परस्पर सहकार्य आढळेल असे आजचेहि समाजवादी सागत असतात. तेव्हा त्या दोन बाबतीत तरी फॉरिअरचें जनकत्व समाजवादाने मान्य करण्यास हरकत नाही. त्या दोन कल्पनाच्या बाबतीतहि त्याच्या विचारात विशेष स्पष्टता आढळते असे नाही. तरीपण तशा स्वरूपाच्या कल्पना त्यानेच प्रथम पुढें माडल्या हे कबूल केले पाहिजे, खरेखुरे सहकार्य नसल्यामुळेंच भाडवलदार व मजूर ह्यांच्यात झगडे होतात, हे त्याला प्रतीत झाले होते असे म्हणण्यास हरकत नाही. त्याच्यात खरेखुरे सहकार्य कसें निर्माण होईल, ह्याची आपल्या परीने त्यानें योजना सुचवली. सहकारी उत्पादनाच्या त्याच्या प्रचारानें सहकारी चळवळीचे त्याने मोठे कार्य केलें आहे हेहि मान्य करावयास हवे.

**रॉबर्ट ओवेन**

रॉबर्ट ओवेन (१७७१-१८५८). ह्या ध्येयवादी ब्रिटिश समाजवाद्याचा जन्म न्यूटाऊन ह्या गावी १७७१ मध्ये झाला. त्याचा बाप लोहार होता. वयाच्या ९ व्या वर्षीच त्याने शेजारच्या दुकानात मदतनीस म्हणून औद्योगिक क्षेत्रात प्रवेश केला. औद्योगिक क्षेत्रांत त्याची फारच झपाट्यानें प्रगति झाली आणि वयाची तीस वर्षे पुरी होण्याच्या आंत तो एक प्रमुख उद्योगपति म्हणून गणला जाऊं लागला. पैसा, पैशाने प्राप्त होणारें सामाजिक महत्त्व व सत्ता ह्या गोष्टी त्याच्या दाराशी चालत आल्या, असे म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति यत्किंचितहि नाही. पण त्यानें त्याचें समाधान झाले नाही ! स्वतः उद्योगपति असल्यामुळें त्याला तत्कालीन औद्योगिक व्यवस्थेचे तंत्र पूर्णपणें अवगत होते. जात्याच सहानुभूतिप्रधान असल्यानें त्याला तत्कालीन उद्योगव्यवस्थेंतील कामगारांवर होणारा अन्याय ताबडतोब उमगला तो अन्याय नाहींसा करून आदर्श उद्योगपति होण्याची त्याने महत्त्वाकांक्षा धरली. त्या दृष्टीनें त्यानें स्वतःच्या मालकीच्या कापडगिरण्यांत प्रयत्नहि केले. तसेंच इतर उद्योपगतीना 'कामगारवर्गाला योग्य वागणूक देणें त्याचें कर्तव्य आहे,' असे सागून त्यांनी ते कर्तव्य करावे अशी विनती केली. ती करतांना कामगारांना न्याय्य वागणूक देण्यांत त्याचाहि फायदाच आहे, असें दाखविण्यासहि तो चुकला नाहीं. त्याचे उत्तर–आयुष्य स्वतः प्रयोग करण्यांत व दुसऱ्याची विनवणी करण्यातच गले त्या प्रयत्नात तो अयशस्वी ठरला; एवढेंच नव्हे तर तो निष्काचनहि झाला. अपयश, नी दारिद्र्य ह्यांबरोबर हेटाळणीहि त्याच्या पदरात भरपूर प्रमाणांत पडली ! पण अपयश, दारिद्र्य, हेटाळणी ह्यानी खचून जाण्यास तो कच्च्या दिलाचा नव्हता. अंगीकृत कार्याविषयी जबर आत्मविश्वास, स्वमताविषयी अत्यत आस्था, जग सुखी व्हावें अशी तळमळ, कामगारवर्गाविषयी पराकाष्ठेचा जिव्हाळा ह्याच्या जोरावर अपयश, दारिद्र्य व हेटाळणी ह्या त्रयीला न जुमानता त्यानें आपली मतें स्पष्टपणें पुढें माडण्याचें व त्याना व्यावहारिक स्वरूप देण्याचें कार्य अविरतपणें चालू ठेवले. ह्या कार्यात त्याला आपोआपच कामगार चळवळीचे धुरीणत्व लाभले. त्याच्या नेतृत्वाखाली काम करून त्याच्या कल्पनाना मूर्त स्वरूप देण्यास तयार असलेल्या कामगारांची

एक मोठी संघटना तयार झाली. त्याचे लिखाण हा त्याच्या कार्यातलाच एक भाग होता. नवसमाजदर्शन (A new view of society) हे १८१३ मध्यें प्रसिद्ध झालेले त्याचें पुस्तक बरीच मान्यता पावलेले असे आहे. ह्याशिवाय त्याचें इतरहि फुटकळ लिखाण बरेच होते. त्याच्या लिखाणांत पुनरोक्ति वारंवार आढळत असल्यामुळें त्याचें थोडे लिखाण वाचलें तरी त्याची मतें कळून येतात पुनरोक्ति हा त्याचा दोष आहे, पण हा दोष एकाच कल्पनेने प्रेरित झालेल्या सर्वच लोकाच्या लिखाणांत आढळून येतो. सारांश—ओवेनचें आयुष्य आपले ध्येय ठरवून त्याकरिता सतत झगडणाऱ्या ध्येयवादी गृहस्थाचें आयुष्य कसें असतें ह्याचा एक उत्कृष्ट नमुना होता.

**भांडवलशाहीवरील ओवेनची विध्वंसक टीका**

फॉरिअरप्रमाणें ओवेनच्या विचाराचे दोन भाग पाडून पहिल्या भागांत त्यानें दाखविलेल्या भांडवलशाहीच्या दोषांचा व दुसऱ्या भागांत त्यानें केलेल्या विधायक सूचनाचा समावेश करता येईल. ओवेन हा स्वतः उद्योगपति असल्यामुळें भांडवलशाहीचे अंतरंग विशेष जाणत होता. त्यामुळें भांडवलशाहीवर त्यानें केलेला हल्ला मूलग्राही स्वरूपाचा आहे भांडवलशाही अर्थव्यवस्थेमध्ये मालक–मजूर–सबधात मनुष्यत्वाचा भाग कोठेंच नसतो आणि मालक कामगारांना फायदा मिळविण्याची साधने ह्यापलीकडे काहीच किंमत देत नाही, असा भाडवलशाहीविरुद्ध त्याचा मुख्य आक्षेप होता. ह्या आक्षेपाच्या समर्थनार्थ तो लहान मुले व स्त्रिया ह्याना वाटेल त्या ठिकाणी कामाला लावण्याची पद्धत, बेकारी ह्या भाडवलशाही अर्थव्यवस्थेंत अगभूत असणाऱ्या दोषांकडे वारवार बोट दाखवीत असे. तत्कालीन आर्थिक व्यवस्थेचे दोषदर्शन करतेवेळी ओवेनची लेखणी विशेषच धारदार होत असे. एका ठिकाणी प्रचलित समाजव्यवस्थेसबधी लिहिताना तिचे अत्यत समाजहितविरोधी, बुद्धीला न पटणारी आणि अशिष्ट व्यवस्था असें त्याने वर्णन केलें. त्या समाजव्यवस्थेंतील व्यक्तीनें स्वतःपुरते पाहाणे ह्या वृत्तीमुळेच सर्व प्रकारच्या गुन्ह्याची, हलाखीची, वर्ग–जाति–पक्षभेदांची आणि मनुष्यातील उग्र स्वरूपाच्या भावनाची निर्मिति झाली, असें त्याने स्पष्टपणे म्हटलें. तत्कालीन आर्थिक व्यवस्थेतील गिरण्याचें वर्णन करतांना त्या गिरण्यांना पैशाची निर्मिति करणाऱ्या पण त्याच-

बरोबर मनुष्याच्या आरोग्याचा व सुखाचा नाश करणाऱ्या हे विशेषण त्याने बहाल केले. तसेच खाजगी मिळकत ह्या सस्थेबद्दल लिहिताना त्या सस्थेला असख्य गुन्ह्याची व आत्यतिक अन्यायाची जननी ही पदवी त्याने दिली. खाजगी मिळकत ह्या सस्थेमुळेच एक मनुष्य दुसऱ्याचा शत्रु होतो आणि साहजिकच प्रत्येकाला दुसऱ्याचा सशय वाटू लागतो, असें त्याचे मत होतें. भाडवलशाही व तिला जन्म देणारी औद्योगिक क्रान्ति ह्याचे दुष्परिणाम ओवेनच्याच शब्दात थोडक्यांत सागावयाचे असतील तर असे म्हणता येईल की भाडवलशाहीमुळे आर्थिक सत्ता थोडचा लोकाच्या हाती जाते व त्याच्या जोरावर इतरानी उत्पादिलेली सपत्ति ते गिळकृत करू शकतात साराश--भाडवलशाहीमध्ये बहुसख्य लोक उरलेल्या थोडचा लोकांचे अक्षरश गुलाम होतात. व्यक्तीने स्वत.च्या फायद्यालाच प्राधान्य देणे ह्या वृत्तीमुळे व काही थोडचा लोकाच्या हातात आर्थिक व्यवस्थेची सूत्रे गेल्यामुळेच भाडवलशाही कामगाराच्या म्हणजे समाजातील संख्येने मोठचा व अत्यत उपयोगी अशा वर्गाच्या दु.खाला व असंतोषाला कारणीभूत होते, हा ओवेनने आपल्या लिखाणात अप्रत्यक्षपणे दर्शविलेला कार्यकारणभाव अतिशय मूलग्राही आहे हे स्पष्टच आहे.

**ओवेनकृत भांडवलदारांची मनधरणी**

ओवेनने केलेल्या सूचनाकडे पाहिल्यास असें दिसते की, कामगाराना योग्य वागणूक देणे किती जरुरीचे आहे हे भाडवलदारांना व उद्योगपतीना पटवून दिल्यास भाडवलशाहीत कामगारावर होणारा अन्याय दूर करणे शक्य होईल, असा काही काळपर्यंत तरी त्याचा विश्वास होता. म्हणूनच आपल्या लिखाणात उद्योगपतीनी कामगाराना अल्प वेतन देण्याचे, लहान मुलांना कामावर घेण्याचे व कामगाराच्या सुखसोयीकडे अजिबात दुर्लक्ष करण्याचे धोरण सोडावे, अशी वारवार त्याने त्याची मनधरणी केलेली आढळते. आपण केलेल्या विनतीला योग्य मान मिळावा, ह्या हेतूने त्याने असेंहि दाखविण्याचा प्रयत्न केला की, कामगाराच्याकडे अधिक लक्ष देण्याचे उद्योगपतीच्याच शेवटी हिताचे आहे. गिरण्यातील मुकादमांना उद्देशून केलेल्या एका भाषणात त्याने असे उद्गार काढिले की, व्यवस्थित, स्वच्छ, सदा दुरुस्त, अशा स्थितीत असलेली यत्रें अव्यवस्थित, अस्वच्छ,

मधूनमधून दुरुस्त असलेल्या यंत्रापेक्षां कितीतरी अधिक काम करतात. ह्या निर्जीव गोष्टीबद्दल येणारा अनुभव खरा असेल तर यत्राकडे जेवढे लक्ष देण्यात येते तितकेच लक्ष सजीव कामगाराकडे दिल्यास व त्याना सुस्थितीत ठेवल्यास त्याच्याकडून किती काम होईल त्याची कल्पनाच करवत नाही. दुसऱ्या एका प्रसगी त्याने असे उद्‌गार काढले की, स्वतःच्या आर्थिक फायद्याच्या दृष्टीने विचार करतां सुद्धा मालकानी कोवळ्या वयाच्या मुलाना दहा दहा तास, आणि तेसुद्धा आरोग्याला विघातक अशा वातावरणात, काम करावयास लावणे, तसेंच मानवी जीवनाला प्रतिकूल असे वातावरण असलेल्या ठिकाणी स्त्रियांना काम करावयास लावणे, ह्या गोष्टी करू नयेत. असे केल्यानें त्याच्या उत्पादनक्षमतेवर अनिष्ट परिणाम होतो, असा त्याचा म्हणण्याचा आशय होता कामगाराना कमी मजुरी देणेंसुद्धा उद्योगपतीच्या दृष्टीनें कसे अनिष्ट आहे ह्याविषयीसुद्धां त्याने एके ठिकाणी अशाच स्वरूपाचें विवेचन केलें आहे. तो म्हणतो की, कमी मजुरीनें कामगाराची उत्पादनक्षमता तर कमी होतेच; पण आणखी नुकसान असें होतें की, उद्योगपतीनी उत्पादन केलेल्या मालाचे ग्राहक कमी होतात. बहुसख्य ग्राहक कामगार असतात आणि कामगाराची उत्पादित वस्तूना आश्रय देण्याची शक्ति मजुरीवर अवलबून असते, हे त्याचे मुद्दे होते. आणखीहि एक पाऊल पुढे जाऊन त्याने असे म्हटले आहे की कामगाराना केवळ योग्य मजुरी हवी, एवढेच नसून त्याना शिक्षण व उमत ह्या गोष्टीहि हव्यात कारण त्या गोष्टी मिळाल्या तरच कामगाराना कोणत्या वस्तू खरेदी करणें युक्त व कोणत्या नाही ह्याचा स्वतः निवाडा करणे शक्य होते.

### कामगारांना सबुरीचा सल्ला

उद्योगपतीना विनवणी करून आपला कार्यभाग साधेल असे ओवेनला जोपर्यंत वाटत होते तोपर्यंत कामगारानासुद्धा तो सबुरीचा सल्ला देत असे. त्याना उद्देशून केलेल्या एका भाषणात उद्योगपतीना दोष देणें योग्य नाहीं. कारण ते परिस्थितीमुळे कामगारहितविरोधी झालेले असतात, असें त्याने म्हटले आणि त्यापैकी काहीना त्याची चूक कळून आली असून ते कामगाराची स्थिति सुधारण्यास उत्सुक झाले आहेत असा निर्वाळाहि दिला.

**नवसमाजनिर्मितीसाठीं विधायक सूचना**

वैयक्तिकरीत्या उद्योगपतींची विनवणी करून कामगारवर्गाची उन्नति करणे अशक्य आहे; ही गोष्ट जसजशी ओवेनच्या लक्षांत येऊं लागली तसतसें नव्या धर्तीवर समाजरचना करण्याचे विचार त्याच्या मनात घोळू लागले. सपूर्णपणें समाजाची पुनर्घटना कशी करावयाची ह्यासबंधीं त्याने केलेल्या सूचनांना त्याच्या विधायक कामगिरीत महत्त्वाचें स्थान होतें. 'समाजाचे नवे दर्शन' ह्या अनेक निबंध एकत्रित केलेल्या त्याच्या ग्रंथांत ह्या सूचनाचा अंतर्भाव प्रामुख्याने झाला होता.

समाजाच्या पुनर्घटनेसाठी ओवेननें केलेली प्रमुख सूचना म्हणजे सहकार्याच्या भावनेवर व तत्त्वावर अधिष्ठित झालेल्या आदर्श खेडयाची जगभर प्रस्थापना. अशा खेडयाचें स्वरूप काय असावे ह्याबद्दल त्याच्या कल्पना काय होत्या हे त्याने त्यासबंधी तयार केलेल्या विस्तृत योजनेवरून समजून येईल. त्याच्या योजनेंत पुढील सूचना समाविष्ट होत्या

(१) खेडी फार लहान अगर फार मोठी असू नयेत. खेडयांचा विस्तार कमीत कमी मानवी श्रम खर्च करून खरोखरी उपयुक्त वस्तूचें जास्तीत जास्त प्रमाणात उत्पादन केलें जाईल ह्या बेताने ठरविण्यांत यावा. ह्या दृष्टीनें विचार करतां कोणतेंहि खेडे ३०० पेक्षा कमी लोकसख्येचें अगर २००० पेक्षा जास्त लोकसख्येचे असू नये. सर्वसाधारणपणे ८०० ते १२०० ही लोकसंख्येची मर्यादा वाजवी आहे असे म्हणता येईल.

(२) खेडी शेतकीप्रधान असावीत. औद्योगिक वस्तूंच्या उत्पादनाची शेतकीलाच जोड दिलेली असावी. शेतकी वस्तूचें उत्पादन करणारे व औद्योगिक वस्तूचे उत्पादन करणारे असे कामगाराचे विभाग पाडले जाऊ नयेत अशी दक्षता घ्यावी; अशी विभागणी हा प्रचलित समाजाचा सर्वांत प्रमुख दाष आहे त्यामुळे औद्योगिक कामगार आपल्या अन्नापासून अलग केला जातो; म्हणजेच तो आपल्या अन्नाकरिता परावलबी होतो अशा पद्धतीवर समाजरचना केल्याने समाजाला अधिक लोकाच्या गरजा भागवितां येतात. ही कल्पना सपशेल चुकीची आहे. ह्याच्या उलट उद्योगाची जोड असलेल्या शेतकीनें मात्र अनेकांच्या गरजा चांगल्या रीतीनें भागवितां येतात.

(३) समाईक श्रम, समाईक खर्च, समाईक मिळकत व सर्वांना सारखे हक्क हे ह्या खेड्यांचे मुख्य तत्त्व असावे.

(४) उत्पादन सहकारी तत्त्वानुसार व्हावे.

(५) केवळ उत्पादनातच नव्हे तर उपभोगाच्या बाबतीतहि सहकार्याचे तत्त्व शक्य तितक्या प्रमाणात अमलात आणले जावे. उदाहरणार्थ, जेवणाची व्यवस्था एकत्र करण्यास कोणतीच हरकत नाही. खेड्यांतील सर्व कुटुंबाचा स्वैपाक एके ठिकाणीच व्हावा व जणू काय सर्व मंडळी एकाच कुटुंबातील आहेत असें समजून त्यांचे जेवणहि एकत्रच व्हावे ह्या पद्धतीने जेवणाची व्यवस्था केली गेल्यास जळणादि बाबतीत भरपूर बचत होईल आणि अन्नाचा दर्जा कमी होणार नाही. एकत्र जेवणाची लोकांना संवय लागली की त्याची खुमारी लोकांना कळून येईल आणि वैयक्तिकरीत्या आपलें जेवण व्हावे असे कोणालाच वाटणार नाही.

(६) ह्या खेड्यात वय व अनुभव ह्यावर आधारलेल्या व सर्वस्वी योग्य व नैसर्गिक असलेल्या विषमतेशिवाय अन्य कोणतीहि विषमता आढळू नये. अन्य कोणत्याहि प्रकारची विषमता आदर्श खेड्यातील प्रगल्भ बुद्धीच्या लोकाना पटणार नाही.

(७) ह्या खेड्यांतून पैशाची जागा मानवी श्रमाचें बरोबर मापन करणाऱ्या पत्रिकांकडून घेतली जावी. त्या कामगारांस वेतनादाखल मिळाव्या. त्या पत्रिकाच्या आधारावर कामकऱ्याला त्याच्या श्रमाचे योग्य मूल्य होईल इतका उत्पादनांतील वांटा मिळावा.

(८) सहकारी तत्त्वावरील उपयोग व उत्पादन यशस्वी होण्यासाठी व अन्य कारणासाठी योग्य शिक्षणाची ह्या खेड्यातून व्यवस्था व्हावी. तें अत्यत जरूर आहे. योग्य पद्धतीने शिक्षण दिल्यास सर्व दृष्टया आदर्श नागरिक निर्माण करणें मुळीच अशक्य नाही. ही गोष्ट पटण्यास एकच गोष्ट लक्षात आली पाहिजे. ती ही की, मनुष्यमात्राचे व्यक्तिमत्व जन्माच्या वेळी ठरत नसून शिक्षणानें व भोंवतालच्या परिस्थितीनें तें घडविलें जाते.

**समाजवादाचें ओवेनदर्शित प्रात्यक्षिक**

आदर्श खेडें कसें असावें ह्या संबंधीची ओवेनची वरील विस्तृत योजना ओवेनच्या समाजवादाचे स्वरूप चागल्या प्रकारें व्यक्त करते. ते अधिक स्पष्ट करण्यापूर्वी ओवेनचा समाजवाद केवळ विचारांतच नव्हता; तर तो त्याच्या कृतीतहि उतरला होता, हे सांगणें जरूरीचें आहे. आपल्या समाजवादी विचाराना मूर्त स्वरूप देण्याचे ओवेनने दोन उल्लेखनीय प्रयत्न केले. पहिला प्रयत्न उद्योगपतीनी कामगाराची स्थिति सुधारण्याचे वैयक्तिकरीत्यासुद्धा मनावर घेतल्यास प्रचलित आर्थिक व्यवस्थेतील अन्याय दूर केला जाईल, असे जेव्हा त्याला वाटत होते तेव्हा त्यानें केला. १८०० मध्ये डेल नावाच्या गृहस्थाकडून (हा पुढे त्याचा सासरा झाला), न्यू लानार्क ह्या ठिकाणी त्याचा चालू धंदा ओवेननें खरेदी केला. डेलने चालविलेले कारखाने किंवा गिरण्या, तत्सम कारखाने—गिरण्याना मुळीच अपवाद नव्हते. औद्योगिक क्रान्तीचे सर्व दोष न्यू लानार्क गांवी दिसत होते. डेलच्या कामगारवर्गात अत्यंत लहान वयाची मुले होती. स्त्रियाना कोठें काम द्यावयाचें ह्यावर कसलेहि नियंत्रण नव्हतें. कामगाराना अत्यत कमी वेतन देण्यात येत होतें. कामगारवस्ती अस्वच्छतेचें माहेरघर होती. दारूबाजी अत्यंत बोकाळली होती. शिक्षित कामगार अपवादानेच आढळत होता. ओवेनने आदर्श मालक होण्याचें ठरवून हे सर्व दोष नाहीसे करण्याचा पद्धतशीर प्रयत्न केला. त्याचा प्रयत्न यशस्वीहि झाला! असें सांगतात की, थोडयांच दिवसांत दुर्गंध व दुर्गुण ह्याचे माहेरघर असलेले गांव स्वच्छता, टापटीप, आदर्श सामाजिक जीवन, कामगाराची एकंदर सुस्थिति ह्याकरितां वाखाणले जाऊं लागले. इतकेच नव्हे तर इतर गांवांतील लोक ते गांव आदर्श गाव कसें असावें ह्याचा नमुना पाहाण्याकरितां म्हणून त्या गावीं मुद्दाम येऊं लागले.

**ओवेनचा दुसरा प्रयोग**

ओवेनचा दुसरा प्रयोग १८२५ साली केला गेला. त्या वर्षी त्यानें २००० एकर जमीन खरेदी केली व त्या ठिकाणीं त्याच्या उपरोक्त कल्पनांनुसार एक आदर्श खेडें बसवण्याचा त्यानें प्रयत्न केला. त्या खेडयांतील

वसाहतीला 'न्यू हार्मनी' (नवी एकतानता) असें अन्वर्थकच नाव त्याने दिले होतें. हा प्रयोग यशस्वी होण्यासाठी त्याने जवळजवळ ९०० उत्साही लोक जमवले होते. ओवेनचा हा प्रयोग यशस्वी झाला नाहीं. आपापसातील भांडणामुळे त्याच्या आदर्श वसाहतीचा एक-दोन वर्षातच बोजवारा उडाला आणि आदर्श खेड्याचें प्रात्यक्षिक करण्याची कल्पना तेथेंच विरमली.

**समाजवादाच्या इतिहासांत ओवेनचें स्थान**

ओवेनच्या जीवनाविषयी सपूर्ण माहिती वर दिली आहे. ती लक्षात घेता समाजवादी आर्थिक विचाराच्या इतिहासात ओवेनचे स्थान मोठे आहे ही गोष्ट स्पष्टपणे लक्षात येते. ओवेन उद्योगपति म्हणून ऐश्वर्याच्या शिखरावर चढला होता. अशा व्यक्तीची सर्वसाधारण मन प्रवृत्ति लक्षात घेता ओवेनने मिळालेलें ऐश्वर्य टिकविण्याचे व वाढविण्याचे धोरण सोडून समाजवादाची कांस धरावी हे कौतुकास्पदच समजले पाहिजे. इतर समाजवादी व ओवेन ह्यांमध्ये हा मोठा फरक आहे की, इतर समाजवाद्याना प्रचलित आर्थिक व्यवस्थेसंबधी असंतुष्ट होण्यास त्याच्या वैयक्तिक जीवनाला ग्रासून टाकणारी अशी काही कारणें होती ओवेनचे तसे काही नव्हते. प्रचलित आर्थिक व्यवस्था त्याच्या वैयक्तिक उत्कर्षाला उपकारकच ठरली होती. असे असताहि केवळ तत्त्वासाठी स्वतःला दारिद्र्याप्रत नेणारा ध्येयवादी मार्ग त्यानें स्वीकारावा हे विशेष होतें समाजवादाच्या इतिहासांत ओवेनला प्राप्त झालेले स्थान त्याचा समाजवाद केवळ कौतुकास्पद होता म्हणून प्राप्त झाले असे मात्र नव्हे त्याला मिळालेले स्थान मुख्यतः त्याचा समाजवाद प्रगतिपर होता ह्याचें द्योतक आहे. ओवेनचा समाजवाद प्रगतिपर होता. कारण समाजवादास खासगी मिळकत व कोणत्याहि प्रकारची विषमता ह्याचे सपूर्णपणे वावडे आहे, ह्याची स्पष्ट जाणीव त्याला झाली होती. तसेच समाजवाद यशस्वी होण्यास नागरिकात एक विशेष प्रकारची गुणवत्ता लागते हेहि त्याला प्रतीत झाले होते. ते त्याने आपल्या विचारात शिक्षणावर दिलेला भर पाहातां समजून येतें. व्यक्तीची गुणवत्ता व नीतिमत्ता ह्या गोष्टी जन्मजात नसून त्याची घडण परिस्थितीनें व शिक्षणाने होते, हे तत्त्व ओवेनच्या सर्व विचारांचा पाया आहे. प्रचलित आर्थिक व्यवस्थेंत स्वार्थबुद्धिच बोकाळली असली तर त्याचा दोष ओवेनच्या मतें शिक्षणाकडे व स्वार्थाला उत्तेजन

देणाऱ्या परिस्थितीकडे आहे. आपल्या गरजा भागविण्याची जबाबदारी व्यक्तीवरच टाकण्यांत आली, इतरापेक्षां श्रीमंत असण्यातच मोठेपणा आहे अशी जाणीव व्यक्तीला पदोपदी करून देण्यात येऊं लागली तर व्यक्तीला स्वार्थी बनण्याशिवाय गत्यंतरच नाही. ही परिस्थिति सुधारण्याचें सामर्थ्य फक्त शिक्षणातच आहे असें ओवेनला वाटत होते.

समाजवाद म्हणजे काय ह्याची बरीचशी स्पष्ट कल्पना ओवेनला असली तरी समाजवाद कसा प्रस्थापित व्हावयाचा ह्यासबधी तो भ्रमांतच होता असे दिसतें. समाजवादी वसाहती खेडोखेडीं स्थापन करण्यास, समाजवादाला योग्य असे नागरिक निर्माण करण्यास व योग्य शिक्षण देण्यास भांडवलदारांनी पुढें यावें, असें आवाहन तो करीत असे. ह्यावरून भाडवलदाराकडूनच शेवटीं समाजवाद प्रस्थापित केला जाईल अशी भाबडी समजूत फॉरिअरप्रमाणे त्याचीहि होती असे वाटते. समाजवादाच्या प्रत्यक्ष प्रगतीच्या दृष्टीने ओवेन मजूरसघटना व सहकारी चळवळ ह्यांचे स्फूर्तिस्थान ठरला, हे लक्षांत ठेवले पाहिजे. त्याच्याच नेतृत्वाखाली मजुराची मोठी सघटना प्रथम निर्माण झाली.

## प्रौधन

ओवेननंतर प्रौधन (१८०९–१८६८) ह्याचा समाजवादी परपरेंतील एक पाईक म्हणून उल्लेख केला पाहिजे. प्रौधनचें मुख्य वैशिष्टच हें की, दारिद्रय अनुभवलेला, श्रमजीवी वर्गांत मोडणारा असा तो होता. तो फ्रेंच असून एका साध्या गुराख्याचा मुलगा होता. जवळजवळ आयुष्याच्या सुरुवातीपासूनच त्यानें दारिद्र्याचा कडवटपणा चाखला होता. त्या कडवटपणाच्या स्मृति त्याच्या बाबतीत शेवटपर्यंत ताज्या राहिल्या, असा त्याच्या कठोर लिखाणावरून कोणाचा ग्रह झाल्यास नवल नाही. जवळजवळ सर्व जन्म त्यानें लेखनांत घालविला. हयात असतां प्रसिद्ध झालेलें त्याचें लिखाण तर भरपूर होतेच; पण त्याच्या आयुष्यांत अप्रकाशित राहिलेलें व त्याच्या मृत्यूनंतर प्रकाशित झालेले असें लिखाणहि भरपूर होतें. गुराख्याचा मुलगा एक पट्टीचा लेखक कसा झाला हें कोडेंच आहे. हें कोडें त्याचा पराकाष्ठेचा भावनावश स्वभाव व मुद्रकाचें काम मिळाल्यामुळें त्याला मिळालेली

वाचनाची संधि ह्या गोष्टी लक्षात घेतल्या तर उलगडते. आधींच वाचनाची आवड असलेल्या प्रौधनला ही संधि म्हणजे एक वरच वाटावा ह्यात नवल नाही. त्यांतहि प्रौधनचे सुदैव असे की त्याला एक शिष्य-वृत्ति मिळाली आणि आपल्या वाचनाला सुव्यवस्थित स्वरूप तो देऊं शकला. वाचन व मनन ह्यांचीच परिणति स्वाभाविकपणेंच लेखनांत झाली. जन्मभर तो लिहीतच राहिला व लिहिता लिहितांच मेला, असें त्याचे वर्णन करणे मुळीच चूक होणार नाही. प्रत्यक्ष राजकारणातहि त्यानें भाग घेतला व त्यामुळें तुरुंगवास, देशान्तर ( प्रचलित राज्यतन्त्राच्या तो विरुद्ध होता हे सागावयाला नकोच ) ह्या गोष्टीहि त्याच्या वाटयास आल्या. मात्र त्यामुळें त्याच्या लेखनात खड तर पडला नाहीच. पण विविध अनुभव मिळाल्याने त्याच्या लेखनाला धार मात्र आली.

प्रौधनचे लिखाण जितके विपुल तितकेच तें भोंगळ होते. भोगळ अशा अर्थाने की त्यामध्यें सुसगतपणा, व्यवस्थितपणा, प्रतिपाद्य विषयासबधीच लिहण्याची कला ह्या गोष्टी जवळजवळ अजिबात नव्हत्याच. उलटपक्षी जहाल भाषा, भरमसाट विधाने ह्या गोष्टी त्याच्या विधानांत भरपूर होत्या. दुसरें असें कीं विनाशक टीका करण्याच्या एकाच वृत्तीनें त्याचे लिखाण विशेष पछाडल्यासारखें दिसते. तो कुणावर कशी टीका करील ह्याचा नेमच नव्हता मुळी. दुसऱ्या कुणीहि काहीहि म्हटलें तरी ते त्याला पटावयाचेच नाही, असें जणू ठरलेलेच होते. ह्या त्याच्या वृत्तीमुळेंच कीं काय तो शेवटपर्यंत मित्रविहीन आणि शिष्यविहीन असाच राहिला. त्याचा असा सप्रदाय स्थापन होऊं शकला नाही. शिवाय त्याच्या लिखाणाचा गभीरपणें विचार करावा अशी लोकांत वृत्ति निर्माण झाली नाही.

**खाजगी मालकीच्या तत्त्वावर प्रौधनची जहाल टीका**

वरील सर्व गोष्टी लक्षांत घेऊनहि असें म्हणावेसें वाटते कीं प्रौधनच्या लिखाणास समाजवादाच्या इतिहासात महत्त्वाचें स्थान आहे. त्याची जहाल भाषा व त्याची असंगत––कांहींशी असबद्धहि––मांडणी ह्या गोष्टी बाजूला करून त्याचे विचार समजून घेण्याचा प्रामाणिकपणे प्रयत्न केल्यास वरील विधानाचें मर्म ध्यानांत येईल. त्याचा समाजवाद त्यानें खाजगी

मिळकत ह्या संस्थेवर चढवलेल्या प्रखर हल्ल्यांत विशेषत्वाने प्रकट झाला. तो केवळ समाजवादी होता, एवढेंच नव्हे; तर तो अराज्यवादी ( Anarchist ) होता. अराज्यवादाचा पुरस्कार करणारा तो पहिलाच समाजवादी होता, असें म्हटले तरी चालेल. कांहींच्या मते अराज्यवाद ही समाजवादाच्या पुढली पायरी आहे. म्हणून ह्या गोष्टीचा येथें मुद्दाम उल्लेख केला आहे.

**खाजगी मिळकत म्हणजे चोरीचा माल**

प्रौधनच्या समाजवादाची ओळख करून घेण्याकरितां त्याच्या खाजगी मिळकत ह्या संस्थेविषयीच्या मतांची छाननी केली पाहिजे. खाजगी मिळकतीसंबधींची त्याचीं मतें ' खाजगी मिळकत म्हणजे काय ? ( What is Property ? ) ह्या प्रश्नचिन्हयुक्त नांवाखाली सन १८४० मध्यें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत प्रकट झाली. त्या प्रश्नाला खाजगी मिळकत म्हणजे चोरी असें उत्तर ह्या बहाद्दरानें दिलें आणि वर खाजगी मिळकतीकडे पाहाण्याचा हा दृष्टिकोन क्रांतिकारक आहे अशी शेखी मिरवली. ह्या उत्तरातील जहालपणा व त्यासंबंधींच्या खुलाशांतील दर्पोक्ति प्रौधनच्या लेखनपद्धतीला साजेशीच होती. खाजगी मिळकत म्हणजे चोरी हे उत्तर दिल्यानतर ग्रथात त्या उत्तराचो अधिक चिकित्सा त्याने केली. प्रौधननें केलेली चिकित्सा त्याच्याच शब्दात सांगावयाची असल्यास असें म्हणता येईल की आर्थिक विषमता ही गरिबी, गुन्हेगारी, बडे आणि युद्धे ह्याची जननी व खाजगी मिळकत ह्या संस्थेची पुत्री आहे. साराश, युद्धगुन्हेगारी इत्यादि अनिष्ट गोष्टीना खाजगी मिळकत ही सस्था अप्रत्यक्षपणें जन्म देते. अशा ह्या संस्थेचा उगम तरी कशात आहे ? प्रौधनच्या मते ह्या सस्थेचा उगम लबाडी, हावरटपणा, दुसऱ्यांना लुबाडण्याची वृत्ति ह्यामध्ये आहे. खाजगी मिळकत ह्या संस्थेच्या प्रस्थापनेपूर्वींच्या समाजांतील सबळ लोकामध्यें दुर्बळांना लुबाडण्याची वृत्ति जेव्हां निर्माण झाली तेव्हांच खाजगी मिळकत ही संस्था निर्माण झाली असें प्रौधनचें म्हणणे होतें प्रचलित आर्थिक व्यवस्थेंतील कारखानदारांचे, व्यापाऱ्यांचे, पेढीवाल्याचें नफे फसवणुकीतच निर्माण होतात असें प्रौधनचे मत होतें. दुसऱ्याला फसविण्याची कला, चातुर्य व बुद्धिमत्ता ह्या नांवाला पात्र होते. ह्याबद्दल त्याने आश्चर्यहि व्यक्त केलें. सारांश, लबाडी व फसवणूक ह्यांमध्ये खाजगी मिळकत ह्या

संस्थेचा उगम असल्यानें प्रौधनच्या मते ती चोरी ह्या वर्णनाला प्राप्त झाली. प्रौधनने केलेली चिकित्सा लक्षपूर्वक पाहिल्यास असें दिसतें कीं, खाजगी मिळकत ह्या सस्थेमुळे आयुष्यांत प्रत्येकाला सारखा वाव मिळत नाही, ही गोष्ट प्रौधनला विशेष डांचत होती. मूळच्या परिस्थितींतील समतेला आपल्या ग्रंथांत त्यानें न्याय्य म्हटलें असून अशा प्रकारच्या न्यायावर अधिष्ठित समाजरचना खाजगी मिळकत ह्या संस्थे-मुळें अशक्य होते, हा त्याचा त्या सस्थेवरील मुख्य आक्षेप होता. व्यक्ति-मात्राची मूळची परिस्थिति व आयुष्यांत आपल्या कुवतीनुसार कर्तबगारी दाखवण्यास मिळणारा वाव ह्यामध्यें समता असावी व त्याकरिता खाजगी मिळकत ही संस्था नको, हा प्रौधनच्या विवेचनाचा निष्कर्ष सागता येईल हा निष्कर्ष लक्षात घेतां समाजवादाला प्रौधननें कसा हातभार लावला ह्यावर प्रकाश पडतो.

समाजवादाचा अप्रत्यक्षपणें पुरस्कार करणारा प्रौधन आत्यतिक समतावादाचा (Communism) विरोधी होता हेंहि सागितले पाहिजे. व्यक्ती-व्यक्तीला मिळणाऱ्या सधीतील समता म्हणजे सुखसोयींतील समता नव्हे, असें त्यानें एका ठिकाणी मुद्दाम स्पष्ट केले. आप-ल्याला मिळालेल्या सधीचा उपयोग करून घेणे ज्याच्यात्याच्यावर अवलबून आहे, आणि मिळालेल्या संधीचा प्रत्येकानें चांगला उपयोग करून न घेतल्यास विषमता निर्माण होणें अपरिहार्य आहे असें त्याला वाटत होते.

### प्रौधनचा अराज्यवाद पुरस्कार

खाजगी मिळकत ह्या सस्थेवरील आपली मते ज्या ग्रंथात त्यानें माडली त्याच ग्रथात प्रौधननें अराज्यवादाचा पुरस्कार केला. शास्त्रीय समाज-वादात कोणत्याहि तऱ्हेच्या सत्तेला स्थान नाही. कारण सत्तेचा वापर म्हणजे आपल्या बुद्धीनुसार वागण्याच्या मनुष्याच्या स्वातत्र्यावर नियत्रणच. मनुष्याची वर्तणूक दुसऱ्याच्या इच्छेनें नियंत्रित न होतां त्याच्या बुद्धीनेच नियंत्रित झाली पाहिजे असें त्याचें मत होतें. तसें झाल्यास समाजात बेदिली माजेल, ही भीति फोल असून तसें झाल्यासच समाजात व्यवस्था

प्रस्थापित होईल असें मत त्याने व्यक्त केलें. आत्यंतिक समतावादाची कांस धरून शासनसंस्थेवर अंमल चालविणाऱ्या सरकारवर त्यानें विशेष कडक टीका केली व असें सरकार सर्वत्र एक सांचा निर्माण करून मनुष्याच्या स्वतंत्र, बुद्धिवादी, अशा व्यक्तिमत्वावर घाला घालतें, असा इषारा दिला. प्रौधनच्या समाजवादाचा व अराज्यवादाचा सारांश एका वाक्यांत द्यावयाचा असल्यास असें म्हणतां येईल कीं, समानसंधीत न्याय व अराज्यवादांत व्यवस्था आढळते. न्याय ही नैतिक कल्पना प्रौधनच्या समाजवादाचा पाया होती.

### सिस्मंडी

सिस्मंडी (१७७३–१८४२) ह्या समाजवाद्यांशी बऱ्याच प्रमाणांत सहमत असलेल्या फ्रेंच लेखकाचें झालेले मतान्तर पहाण्याजोगें आहे. त्याचा अर्थशास्त्रावरील पहिला ग्रंथ १८०३ मध्यें प्रसिद्ध झाला. त्याचा अर्थशास्त्रावरील दुसरा ग्रंथ १८१९ मध्यें प्रसिद्ध झाला. मध्यतरीच्या सोळा वर्षांच्या काळात त्याने पुष्कळच ऐतिहासिक संशोधन केले व त्यानिमित्त देशोदेशी प्रवासहि भरपूर प्रमाणात केला. संशोधन व प्रवास ह्यांमध्ये प्राप्त झालेल्या अनुभवाचा त्याच्यावर इतका परिणाम झाला की, १८०३ मधील ग्रंथांत त्याची व्यक्त झालेली मते व १८१९ मधील ग्रंथांत व्यक्त झालेली त्याचीं मते ह्यामध्ये महदतर होते. पहिल्या ग्रंथात अॅडम स्मिथच्या मतांचा पाठपुरावा करण्यापलिकडे त्याने कांहीं केलें नव्हतें. स्मिथच्या व्यक्तिहितांतच समाजहित समाविष्ट आहे हा आर्थिक व्यवस्थेंत एकतानता आहे, असें अभिप्रेत धरणारा विश्वास; स्मिथनें केलेला खुल्या व्यापाराचा पुरस्कार; स्मिथनें व्यक्त केलेलें सरकारनें आर्थिक बाबतीत अजिबात ढवळाढवळ करूं नये हें मत; स्मिथच्या मूल्यासंबंधी, भांडवलासंबंधी व इतर अर्थशास्त्रीय सिद्धान्त ह्या बाबतीत केवळ मम म्हणण्याचें कार्य सिस्मंडीनें ह्या ग्रंथांत केलें. प्रचलित आर्थिक व्यवस्थेंत कामगारवर्गाची स्थिति नेहमींच वाईट रहावी ह्याबद्दल कांहींशी असंतुष्टता ह्या ग्रंथात त्यानें व्यक्त केली होती, ही गोष्ट खरी; पण एकंदरींत हा ग्रंथ वाचून सिस्मंडी हा गृहस्थ सनातनवादाचा उपासक असावा हेंच जास्त प्रमाणांत मनावर ठसते.

१८१९ मधील ग्रंथांत व्यक्त झालेलें सिस्मंडीचें स्वरूप अगदीं भिन्न होतें. ह्या ग्रंथांत आर्थिक व्यवस्थेंतील एकतानतेवरील पूर्वी असलेला त्याचा विश्वास अजिबात नष्ट झालेला स्पष्टपणें दिसला. भांडवलशाही अर्थव्यवस्था हें आपसूकपणें व्यवस्थित चालणारे यंत्र आहे; ह्या स्मिथपासून चालत आलेल्या विश्वासाचा त्यानें ह्याच ग्रंथांत खरपूस समाचार घेतला. भाडवलशाहीत सपत्ति-निर्मितीच्या साधनांची वाढ झालेली असूनहि सामान्य जनतेचे जीवन सुखकर करण्यास त्याचा कांहीं उपयोग होत नाही, ह्याबद्दल त्यानें आत्यंतिक विषाद प्रदर्शित केला ह्या ग्रथात त्याने केलेले अर्थशास्त्राचें विवेचन निःसशय मूलग्राही, शास्त्रीय स्वरूपाचे व सनातनवादापेक्षा समाजवादाला अधिक जवळचें असल्यामुळे ते अधिक बारकाईने तपासून पहाणें जरूर आहे.

**सनातनवादावरील सिस्मंडीचा हल्ला**

सिस्मंडीने आपल्या सनातनवादावरील हल्ल्याला सुरुवात अर्थशास्त्राच्या स्वरूपाबद्दल व त्याच्या पद्धतीबद्दल सनातनवादांत अभिप्रेत असलेल्या कल्पनांवर टीका करूनच केली. अर्थशास्त्र हें केवळ सत्यशोधक शास्त्र नसून तें नैतिक स्वरूपाचेहि शास्त्र आहे असे त्याचे मत होते. कारण संपत्ति हा अर्थशास्त्राचा विषय नसून ‘ मनुष्य ’ हा अर्थशास्त्राचा विषय आहे. मनुष्य हा जर अर्थ-शास्त्राचा विषय असेल तर केवळ भौतिक अर्थानें संपत्तीची वाढ कशी होते, त्यासबंधी कार्यकारणभाव काय, ह्याचा विचार एवढेंच ध्येय अर्थशास्त्रानें आपल्यापुढें ठेवता कामा नये. ह्या बाबतीत सिस्मंडीनें असा प्रश्न उपस्थित केला कीं, उपयुक्त व नेत्रतोषक वस्तूंचे अफाट उत्पादन करून नेत्रदीपन करणे, मनुष्याच्या निसर्गा-वरील ताब्याचें प्रदर्शन करून मनाला भूल पाडणे आणि लाखों लोकांचें जीवन जिच्यामुळें सुखकर झालें असतें इतकी संपत्ति हस्तगत करण्याचा अधिकार मूठभर लोकांना प्राप्त करून देणें एवढेंच मानवी समाजाचें ध्येय आहे काय ?’ तसें असेल तर मनुष्य त्या ध्येयाप्रत केव्हांच जाऊन पोंचला आहे तसें असेल तर केवळ उत्पादनावर आपलें लक्ष अर्थशास्त्रानें केन्द्रित करावें हें योग्य होईल. तसें नसेल तर मात्र मानवी समाजाचें ध्येय मानवाची केवळ भौतिक उन्नति न करतां त्याचा नैतिक व बौद्धिक दर्जा वाढवावयाचा हेंहि असेल व प्रगतीचा फायदा सर्वांनाच मिळावा अशी समाजाची इच्छा

असेल तर त्या ध्येयापासून मानवी समाज अजून बराच लांब आहे, असें म्हणणें भाग आहे. अशा परिस्थितीत अर्थशास्त्राची व्याप्ति केवळ संपत्ती-पुरती मर्यादित न करता संपत्तीचा मानवी सुखाशी संबंध हा प्रश्नहि अर्थशास्त्रातच अंतर्भूत झाला पाहिजे. ह्या दृष्टीने विचार करतां अर्थ-शास्त्रात उत्पादनाच्या प्रश्नापेक्षां उत्पादनाची वाटणी ह्या प्रश्नालाच महत्त्व दिले पाहिजे कारण उत्पादनाच्या वांटणीचा अभ्यास केल्यानेच ज्या योगे मानवाची सर्वांगीण प्रगति होते अशी साधनें सर्वांनाच उपलब्ध होतात किंवा नाही हे कळून येते. हे कळून घेण्याकरिता सिस्मंडीच्या मतें अर्थशास्त्राने ऐतिहासिक पद्धतीचाच अवलंब केला पाहिजे 'मानवाची सर्वांगीण उन्नति कशी व किती प्रमाणात होत आहे? ती होत नसल्यास त्या मार्गांतील अडचणी कोणत्या? हे केवळ आरामखुर्चीत बसून अनुमानपद्धति वापरल्याने समजणार नाही. त्याकरिता प्रत्यक्ष संशोधनच झाले पाहिजे. रिकार्डोप्रणीत सनातनवादात गृहीततत्त्वापासून काढलेल्या अनुमानातूनच अर्थशास्त्रीय सिद्धान्ताची निर्मिति होते असा समज असल्याने हा एक प्रकारे सनातनवादावर हल्ला होता.

अर्थशास्त्राचें उद्दिष्ट, त्या शास्त्राचें स्वरूप, व्याप्ति व त्या शास्त्राची पद्धत ह्यावरील सिस्मंडीचा हल्ला हे केवळ त्याच्या सनातनवादावरील हल्ल्याचे सूतोवाच होतें. प्रत्यक्ष सनातनवादावर त्याने केलेली प्रतिकूल टीका त्याहूनहि प्रखर होती. ती टीका अधिक महत्त्वाचीहि आहे. कारण त्या टीकेमुळेंच सिस्मंडीला अर्थशास्त्राच्या इतिहासांत कायम स्थान मिळाले

**सनातनवादाचें मुख्य प्रमेय सपशेल चुकीचें**

सनातनवादावर त्यानें केलेल्या प्रतिकूल टीकेचा आशय असा की प्रत्येकाने स्वहित साधण्याचाच फक्त प्रयत्न करावा, ह्या तत्त्वावर उभ्या असलेल्या आर्थिक व्यवस्थेमध्ये सर्वांचेच हित साधतें. कारण त्या आर्थिक व्यवस्थेमध्ये सर्वांच्या हिताचा गोड समन्वय आपोआप होतो, हे सनातन वादाचे महान् प्रमेय सपशेल चुकीचे आहे. सनातनवादाने पुरस्कारिलेल्या भांडवलशाही उत्पादनपद्धतीमुळें मनुष्यानें उत्पादनामध्ये अचाट प्रगति केली आहे, नैसर्गिक शक्तीचें स्वामित्व मिळविले आहे, उपभोग्य

वस्तूचें उत्पादन दरवर्षी फार मोठ्या प्रमाणात वाढत आहे व प्रत्येक शहर अन् प्रत्येक राष्ट्र संपत्तीच्या पुरांत शब्दशः वाहून जात आहे. हें अगदी खरें. उत्पादनकलेंत व सपत्तीचा संचय करण्याच्या कलेंत आतांपर्यंत केव्हाहि इतकी प्रगति झाली नव्हती, असे निःसकोचपणें म्हणण्यास हरकत नाही. पण त्यामुळें प्रत्येक व्यक्तीचें आयुष्य अधिक सुरक्षित झाले आहे काय, भविष्यकालाबद्दलची चिंता कमी झाली आहे काय, व्यक्ति-स्वातंत्र्यात, उसंतीत भर पडली आहे काय, समाजातील सर्वांत खालच्या पायरीवर आढळणाऱ्या लोकांची सख्या कमी झाली आहे काय, श्रीमंत व गरीब ह्यांच्या स्थितीतले अंतर कमी झालें आहे काय, असे प्रश्न सिस्मंडीने विचारले. ह्या सर्व प्रश्नाचें त्यानें अर्थातच नकारार्थी उत्तर दिले व त्या परिस्थितीबद्दल प्रत्येकाने स्वहितच साधावें ह्या सनातनवादाच्या उप-देशाला दोष दिला. त्या उपदेशाची एका ठिकाणी त्याने चागलीच थट्टा केली. त्याच्या मते प्रत्येकाने आपलें हितच प्रथम पहावे असें म्हणणे म्हणजे कोणीहि दुसऱ्याच्या आरोग्याबद्दल व आयुष्याबद्दल पर्वा करूं नये, दुसऱ्याना मरण आले तरी चालेल; पण आपण जिवंत राहिलें पाहिजे, अशी इच्छा धरावी असें म्हणण्यासारखे आहे. आपले हित साधणें ह्याचा आपल्या प्रतिस्पर्ध्यांना बाजूस सारणे व शक्य असल्यास त्यांचा समूळ नाशच करणे असा व्यवहारांत अर्थ होतो. स्वहिताला प्राधान्य देण्याच्या वृत्तीला उत्तेजन मिळाल्यामुळे दुसऱ्याचा काटा काढणें, त्याचा नाश करण्यास प्रवृत्त होणें हाच जीवनमार्ग होऊन बसतो, असेंहि सिस्मडीनें सुचविले.

**भांडवलशाहींतील अनर्थाची मीमांसा**

स्वार्थाच्या पायावर उभारलेली आर्थिक व्यवस्था कोणकोणत्या अनर्थास कारणीभूत होते, ह्याचें केवळ वर्णन करूनच सिस्मंडी थांबला नाही; तर असे का व्हावे ह्याची उद्बोधक मीमांसाहि त्याने केली. त्याची मीमांसा अशी की, भांडवलशाहीची जसजशी वाढ होत जाते तसतसे समाजातील श्रीमंत गरीब हे भेद अधिकाधिक स्पष्ट होत जातात आणि ज्याचे हितसंबंध परस्परांशी अगदीं भिन्न आहेत अशा मालक व कामगार ह्या दोन वर्गांतच समाजाची विभागणी होत जाते. त्यासबंधात विशेष लक्षात ठेवावयाची

गोष्ट ही कीं, भांडवलशाहीच्या वाढीच्या ओघांत मालकांचा म्हणजे श्रीमंतांचा वर्ग अधिकाधिक लहान होत जातो व कामगारांचा म्हणजे गरिबांचा वर्ग अधिकाधिक फुगत जातो. भाडवलशाहीची वाढ होत असतां लहान लहान उद्योगपतींना बडयाबडया धेंडांबरोबरच्या चढाओढीत टिकाव धरतां येत नाही व साहजिकच त्याचें स्वातंत्र्य नष्ट होऊन त्यांना कामगारवर्गाच्या पंक्तीत सक्तीनें वा खुशीने येऊन बसावें लागतें. आणखी एक विशेष लक्षांत ठेवावयाची गोष्ट ही कीं, भाडवलशाहीच्या वाढीबरोबरच कामगार व खाजगी मिळकत ह्यांची अधिकाधिक फारकत होत जाते व कामगारांना सर्वस्वीं मजुरीवर म्हणजे पर्यायाने श्रीमंतवर्गावर अवलंबून रहावे लागतें. अशा परिस्थितीत चढाओढ हा एकतर्फीच व्यवहार असला व त्याचा परिणाम श्रीमंतांची वाढती श्रीमती व गरिबाचें वाढतें दारिद्र्य ह्यात होत असला तर त्यांत नवल काय? समाजाची विभागणी परस्परविरोधी वर्गांत झाली आहे व त्यामुळे समाजांत दारिद्र्याची व भिकारडेपणाची निपज झाली आहे हे ढळढळीत सत्य डोळ्यासमोर असतां स्वहितांतच परहित आहे, हें कितीहि अट्टाहासाने सागितले गेलें तरी त्यावर विश्वास बसणेंच शक्य नाही. सत्य हे हट्टी व बडखोर असतें. ते लपवू म्हटलें तरी लपवितां येत नाही. उलट तें लपविण्याचा प्रयत्न केला तर अधिक जोमानें पुढे येते व त्याला विरोधी अशा सर्व कल्पना उधळून लावतें. भाडवलशाहीत उघड उघड दिसणाऱ्या गोष्टीचा अर्थ एवढाच की, प्रत्येकाच्या स्वार्थ साधण्याच्या वृत्तीला उत्तेजन देऊन समाजाने समाजहित साधण्यापेक्षा व्यक्तीमध्यें आपले व इतर सर्वांचे अहित साधण्याच्या वृत्तीची जोपासना मात्र भाडवलशाहीनें केली आहे.

**भांडवलशाहीनिर्मित अनर्थ परिणामीं भांडवलशाहीलाच त्रासदायक**

भांडवलशाहीचे वरील परिणाम भांडवलशाहीलाहि त्रासदायक कसे ठरतात ह्याचेंहि सिस्मंडीनें विवेचन केलें. भाडवलशाहीवर मधून मधून ओढवणाऱ्या अतिउत्पादनाच्या (Over production) संकटाची बीजें वर वर्णन केलेल्या अनर्थांतच कशी आहेत हे सिस्मंडीनें सप्रमाण दाखविलें. त्यानें पुढील तीन कारणांना ह्या संकटाबद्दल जबाबदार धरलें

(१) चढाओढीवर आधारलेल्या उत्पादनपद्धतीत उत्पादकाला बाजारांतील परिस्थितीची--विशेषत: किती उत्पादकाचे उत्पादन बाजारांत खपू शकेल किंवा इतर उत्पादक काय करीत आहेत--ह्याची फारच थोडी कल्पना असते. म्हणजेच त्याचे बेत व बाजारची मागणी ह्याचा योग्य समन्वय होत नाही.

(२) गरजेपेक्षां भाडवलामुळेच उत्पादन ठरतें. गरज संपली तरी आगाऊच गुतवलेले भाडवल आहे, म्हणून उत्पादन चालू असे प्रकार घडतात.

(३) मालाला मागणी करणारा मुख्य वर्ग म्हणजे कामगारवर्ग तो वर्ग तर अधिकाधिक गरीब होत जातो. उत्पादन मात्र वाढत असते. ह्या कारणानें कामगारवर्गाची मागणी कमी कमी होऊन उत्पादन व उपभोग--म्हणजे मालाची निर्मिति व उठाव--ह्याच्यातील अतर वाढत जाते.

### रोगनिदान अचूक पण औषध चूक

सनातनवादावरील सिस्मडीची टीका खचित मूलग्राही होती समाजाची परस्परविरोधी वर्गात विभागणी झाल्याने सर्व अनर्थ होतो. हे त्याचे निदान व ह्या निदानाचा त्याने केलेला विस्तार अर्थशास्त्राच्या इतिहासात उल्लेखनीय आहे. भाडवलशाहीची त्याने केलेली चीरफाड पुढे मार्क्सलाहि उपयोगी पडली व सिस्मडोचे हे ऋण मार्क्सने जाहीररीत्या कबूलहि केले. असें असताहि त्याने सुचविलेली उपाययोजना मात्र प्रतिगामी होती. खाजगी मिळकत ह्या सस्थेचे उच्चाटण हा समाजवादी मार्ग त्याने सुचविला नाही. त्या ऐवजी कामगार व मिळकत ह्याची फारकत ज्यांत होत नाही अशी लहान प्रमाणावर उत्पादन ह्या तत्त्वावर आधारलेली आर्थिक व्यवस्था त्याने सुचविली. अशा तऱ्हेची आर्थिक व्यवस्था पुन: निर्माण करणें म्हणजे इतिहासाला--विकासाला--मागे खेंचण्यासारखेच आहे. भाडवलशाहीवर त्याने केलेल्या अत्यंत चिकित्सक व समाजवादानुकूल टीकेमुळे त्याला समाजवादाच्या इतिहासांत स्थान देण्यात आले तरी त्याला अस्सल समाजवादी केव्हाहि म्हणतां येणार नाहीं. त्याची उपाययोजना प्रतिगामी स्वरूपाचीच होती आणि त्याला प्रतिगामी म्हणण्याचा प्रघात नसला तर त्याचे कारण त्याचा हेतु प्रतिगामी नव्हता एवढेंच असावें.

### रॉडबर्टस्

सिस्मंडीप्रमाणेंच रॉडबर्टस् (१८०५–७५) ह्या जर्मन गृहस्थानेहि दारिद्रय व अति उत्पादनाचा अनर्थ ह्या भांडवलशाहीच्या दोन प्रमुख दोषाचा विशेष विचार केला. त्या दोन्ही दोषाचा उगम एकाच गोष्टीत आहे असे मत त्यानें व्यक्त केले. ती गोष्ट म्हणजे उत्पादनाचें अन्याय्य विभाजन. ते दोष निवारण करण्यासाठी प्रचलित आर्थिक व्यवस्था व समाजवाद्यांच्या मागण्या ह्याचा समन्वय घडवून आणावा असे त्याने सुचविलें. शासनसंस्थेकडून मजुरी धरून सर्व किमती नियंत्रित केल्या जाव्या व योग्य कराचा अवलंब करून आर्थिक विषमता कमी करावी अशा त्याच्या सूचना होत्या. त्या योगे जरूर तो समन्वय साधेल अशी त्याची समजूत होती

### मार्क्सवाद सूचित करणारा समाजवाद

ह्यानंतरचे चौघे समाजवादी लेखक, थॉमसन, हॉडजस्किन, ग्रे, बे, ह्यांचा विचार एकत्र केल्यास चूक होणार नाही कारण ते बहुतांशी समानधर्मी होते. ते चौघेहि इंग्लिश असून मार्क्सचें आगमन सूचित करण्याचा मान त्यांना दिला जातो. त्या सर्वांचे वैशिष्टय हे की, मूल्याचा श्रमसिद्धान्त मान्य करून त्यांतूनच भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेत कामगाराची लुबाडणूक कशी होते हें दाखविण्याचा त्या सर्वांनी प्रयत्न केला. भांडवलशाहीत वस्तूचे मूल्य पूर्णपणें कामगारांच्या हातीं न जातां त्यातीलच कांही भाग अन्यायानें भांडवलदारांकडून गिळंकृत केला जातो असे ह्या सर्वांनीं दाखविले. जे वास्तविक पाहातां कामगारांना मिळावयाचे ते भांडवलदारांकडून मधल्यामध्यें लाटलें जातें. ह्यालाच उद्देशून कामगाराची लुबाडणूक असा शब्द ह्या लोकांनीं वापरला. पुढें मार्क्सने हाच मार्ग अनुसरला हे सुप्रसिद्धच आहे.

त्या चौघाचें समानधर्मीयत्व आणखी एका बाबतीत प्रतीत झाले. त्या सर्वांनी जास्तीत जास्त लोकांचें जास्तीत जास्त हित हे तत्त्व उचलून धरले आहे. ह्या तत्त्वाच्या कसोटीला प्रचलित आर्थिक व्यवस्था अजिबात उतरत नाही. प्रचलित आर्थिक व्यवस्था जास्तीत जास्त लोकांचे जास्तीत

जास्त हित साधणारी ठरावी असे वाटत असल्यास प्रचलित आर्थिक व्यवस्थेचें स्वरूप पार बदलून तिला समाजवादी स्वरूप देण्याशिवाय गत्यतर नाही असें वरील चौघांचेंहि मत होतें.

आर्थिक व्यवस्थेला समाजवादी स्वरूप द्यावयाचें म्हणजे काय, ह्याबद्दल मात्र वरील लेखकांत एकवाक्यता आढळत नाही. थॉमसनच्या ग्रंथावरून असें दिसतें की ज्यानें जे उपादन केले असेल ते त्याचेंच आहे; ही गोष्ट खरी असली तरी ते सर्व त्यालाच मिळावे हें थॉमसनला पसत नव्हतें. असें केल्याने वृद्ध लोक, स्त्रिया, पगु लोक ह्यावर उपासमारीचा प्रसग येईल, अशी भीति त्याला वाटत होती तेव्हा विभाजनामध्यें खुशीची समता असावी; म्हणजे सर्वांकडून खुशीने समतेचें तत्त्व स्वीकारले जावे असें तो म्हणत असे खुशीने स्वीकारलेली समता म्हणजेच समाजवाद असे त्याचें मत असावे. ज्याने जे उत्पादिले त्यावर त्याचीच मालकी असली पाहिजे, ही भावना व समतेच्या तत्त्वावरील विश्वास ह्याची सागड घालताना थॉमसनची ताराबळ उडालेली त्याच्या लिखाणांत स्पष्टपणे प्रतीत होते. ग्रेच्या मते वस्तूचे बरोबर मूल्य, तिच्या उत्पादनाला लागणारे मानवी श्रम पाहून ठरविणारी एखादी राष्ट्रीय सस्था निघाली व त्या संस्थेने प्रत्येक वस्तूचे उत्पादन करणाऱ्या कामगाराना वस्तूच्या मूल्याइतकेंच मूल्य असलेल्या वस्तू खरेदी करण्याची शक्ति असलेली पत्रिका दिली की सर्व कांही ठाकठीक होणार होते. अशा सस्थेच्या स्थापनेने कामगारांची लुबाडणूक थाबेल अशी त्याची भावना होती. ब्रेला खाजगी उत्पादन नष्ट व्हावे असें वाटत होतें आणि वैयक्तिकरीत्या उत्पादन करणाराची जागा वैयक्तिक फायदा हा हेतु नसलेल्या सस्थानी घ्यावी एवढीच त्याची नम्र सूचना होती. भावी समाज कसा असावा, ह्याबद्दल हॉडस्किनच्या विशेष अशा कांही कल्पना नव्हत्या. कामगारवर्गाचे सामर्थ्य संघटनादि उपायांनी आपोआप वाढेल व तें वाढलें की जिच्यामध्यें कोणासहि विशेष हक्क नाहीत आणि जिच्यामध्ये ज्याने जे उत्पादिले असेल ते त्यालाच मिळतें अशी समाजरचना निर्माण होईल, एवढेच त्याला म्हणावयाचें होते. अशा समाजरचनेत परस्परविरोधी वर्ग नसल्यानें सरकारचीहि गरज पडणार नाही असेहि त्याचे मत होतें.

**ध्येयवादी समाजांतील अपुरेपणा**

सनातनवादावर कामगारवर्गाच्या दृष्टिकोनातून जी टीका झाली ती आतापर्यंत सागितली. ती टीका करणारे लोक व त्यांचे विचार पहातां असें दिसते की, भाडवलशाहीच्या दरबारात सर्व कांही ठाकठीक नाही; ह्याची स्पष्ट जाणीव त्याना झाली होती. मात्र खटकते कोठें, ह्याचें त्याना अचूक निदान झालें नव्हते. त्या कारणाने प्रामाणिक असूनहि, अंतःकरणांत अत्यत तळमळ असूनहि आर्थिक व्यवस्थेतील दोष कसे दूर करता येतील, ह्या सबंधाच्या——म्हणजेच भाडवलशाही आर्थिक व्यवस्थेची जागा घेणाऱ्या आर्थिक व्यवस्थेचे स्वरूप कसे असावे ह्याबद्दलच्या——त्याच्या कल्पना बहुतांशी अव्यवहार्य अशा होत्या. त्यामुळेच केवळ ध्येयवादी असें त्या सर्वाचे वर्णन केले जाते. समाजवाद हे त्याचे ध्येय होतें; पण समाजवाद म्हणजे काय ह्याची स्पष्ट कल्पना किंवा समाजवाद प्रत्यक्षात कसा उतरेल ह्यासबधी स्पष्ट कल्पना त्याना नव्हती. असे असले तरी भाडवलशाहीचे दुष्परिणाम परिणामकारकरीत्या दाखवून भाडवलशाहीला सनातनवादी अर्थशास्त्रामुळे मिळालेला बौद्धिक पाठिबा डळमळीत करण्याचे श्रेय ह्या समाजवाद्यानाच दिले पाहिजे ह्यात तिळमात्र शंका नाही.

**इतिहासवाद**

सनातनवादविरोधी चौथा सप्रदाय म्हणजे इतिहास संप्रदाय (Historical School of thought). ह्या संप्रदायाचा सनातनवादाशी झगडा अगदी मर्यादित होता. सनातनवादविरोधी विचाराची माहिती देणाऱ्या प्रकरणातच ह्या सप्रदायाचा उल्लेख करण्याचे कारण असे की, अर्थशास्त्राने आपले कार्यकारणभावदर्शक सिद्धान्त शोधून काढतांना कोणती पद्धति स्वीकारावी, ह्याबद्दल ह्या संप्रदायाची ठाम अशी विशिष्ट मते होतीं आणि त्या मतांना सनातनवादी अर्थशास्त्रांत अजिबात स्थान नाही अशी त्याची समजूत असल्याने तेवढ्यापुरता सनातनवादी अर्थशास्त्राशी ह्या सप्रदायाचा तीव्र विरोध होता. १८४० नंतर सुमारे ४० वर्षे ह्या संप्रदायानें जर्मन आर्थिक विचारावर चागलाच पगडा बसविला होता व त्याचेच पडसाद पुढें इतर देशातहि उमटले होते. रॉशर (१८१७–९४), हिल्डब्रँड (१८१२–७८) नैस (१८२१–९८) हे

ह्या सप्रदायाचे अध्वर्यु होते. पैकीं रॉशरला ह्या सप्रदायाचा नेता मानतां येईल. तो एवढयाच अर्थानें नेता होता की त्याचा ग्रथ प्रथम म्हणजे १८४३ मध्यें प्रसिद्ध झाला. शिवाय प्रथम लिहिणाराच्या मतांत साहजिकच जो संदिग्धता असते ती त्याच्या मतांत असल्याने इतिहास सप्रदायातील सर्व उपगटाची 'रॉशरचीं मतें आपल्याला अनुकूल आहेत' अशी समजूत झाली.

### इतिहासवादी संप्रदायांतील उपगट

ह्या संप्रदायांतील अर्थशास्त्रज्ञांचे मुख्य प्रतिपादन हे की, अर्थशास्त्रामध्ये इतिहासाच्या अभ्यासाला फार मोठे स्थान देण्यात आले पाहिजे. सनातनवादी संप्रदायाच्या अभिमान्यांचा एक मोठा दावा होता की, सनातन अर्थशास्त्राने कोणत्याहि देशांत व कोणत्याहि वेळी अनुभवास येतील, असे नैसर्गिक सिद्धान्त प्रतिपादण्यांत स्पृहणीय असें यश मिळविले आहे हा दावा इतिहास सप्रदायांतील लोकाना अजिबात मान्य नाही. त्या दाव्याविरुद्ध प्रतिदावा करणाऱ्या इतिहास सप्रदायांत तीन गट होते. पहिला गट आत्यंतिक इतिहासवाद्याचा. त्याचे म्हणणे असे होते की, लहरीपणाबद्दल प्रसिद्ध असलेल्या मनुष्याचे जीवन कोणत्याहि सिद्धान्ताने बद्ध असणे शक्य नाही. म्हणून कार्यकारणभाव दर्शविणारे सिद्धान्त मांडण्याच्या भानगडीत पडण्याचे कारण नाही. वेगवेगळया वेळी व वेगवेगळया देशात मनुष्याचे आर्थिक जीवन कसें असते ह्याचें वर्णन करणें एवढेच अर्थशास्त्राचे कार्य थोडक्यात म्हणजे अर्थशास्त्राची व्याप्ति आर्थिक इतिहासापुरतीच मर्यादित असली पाहिजे. नैस् हा ह्या मताचा पुरस्कर्ता होता १८५३ मधील आपल्या ग्रथात त्यानें असा दावा पुढे मांडला की ऐतिहासिक अभ्यास हेच अर्थशास्त्राचे वास्तविक स्वरूप आहे. अशा अभ्यासातहि भौतिक शास्त्राप्रमाणे अर्थशास्त्रातहि सिद्धान्त प्रस्थापित करतां येतील, असा गैरसमज कोणी करून घेऊ नये कारण ते शक्य नाही. आर्थिक इतिहासाचें कथन एवढेच अर्थशास्त्राचे कार्य, असें समजल्यास अर्थशास्त्राच्या अभ्यासात इतिहासाला विशेष स्थान मिळावे हें सरळच आहे. कारण त्या कल्पनेप्रमाणें विशिष्ट दृष्टीने इतिहासाचा अभ्यास म्हणजे अर्थशास्त्र. मनुष्याच्या आर्थिक जीवनांत कार्यकारणभाव दर्शक सिद्धान्त नसतातच, असें मानणाऱ्या इतिहासवाद्यांपेक्षा कमी आत्यंतिक असलेले

दुसऱ्या गटांतील इतिहासवादी असे सिद्धान्त असू शकतात हे मान्य करीत; पण स्थल-काल-निरपेक्ष असे सिद्धान्त अर्थशास्त्रांत असणें शक्य नाही; कारण मानवी आर्थिक जीवन परिस्थितीने बद्ध झाले आहे आणि परिस्थिति तर सर्वत्र सारखी नसते असें त्यांचे म्हणणें होतें. तेव्हा निरनिराळ्या कालाला व निरनिराळ्या देशांना लागू पडणारे सिद्धान्त वेगवेगळे असतात. ते शोधून काढावयाचे असतील तर त्याकरितां परिस्थितिदर्शक असे सत्यसशोधन आगाऊ बरेच झालेलें असले पाहिजे, असा त्याचा युक्तिवाद होता. अशा सशोधनाला सनातनवादी अर्थशास्त्रात स्थान नाही. कारण स्थलकालनिरपेक्ष सिद्धान्त असू शकतात अशी सनातनवादाची समजूत आहे. ह्याबद्दल ह्या गटांतील लोकाना खेद वाटे. हिल्डब्रँडची मतें सर्वसाधारपणे ह्याच स्वरूपाची होती व १८४८ मधील त्याच्या ग्रंथात ती प्रगट झाली. तिसऱ्या गटातील इतिहासवादी स्थलकालनिरपेक्ष म्हणजे सर्वत्र आढळणारे असे काही सिद्धान्त प्रस्थापित करणे अर्थशास्त्राला शक्य आहे, असेहि मान्य करीत; पण त्या सिद्धान्ताचे शोधन इतिहासाच्या म्हणजे प्रत्यक्ष परिस्थितीच्या अभ्यासानेच करता येईल असे प्रतिपादीत. सत्यात्मक पुराव्याची मुळीच जरुरी नसलेली अशी काही गृहीततत्त्वें जमेस धरून त्याच्या जोरावर केलेल्या अनुमानाना सिद्धान्त म्हणावयाचें व जमेस धरलेल्या गृहीततत्त्वाना पुराव्याची जरुरी नाही म्हणून ती अनुमानवजा सिद्धान्तानाहि नाही, असें प्रतिपादावयाचे; ही रिकार्डोने व त्याच्या अनुयायानी स्वीकारलेली पद्धति त्याना पसत नव्हती. कार्यकारणभावदर्शक कोणताहि सिद्धान्त माडण्यापूर्वी सत्यसंशोधन झाले पाहिजे व सिद्धान्त माडल्यानतरहि त्यातील अपुरेपणा अजमावण्याकरिता, कोणत्याहि परिस्थितीत तो लागू होतो किवा नाही हे पाहण्याकरिता पुरावा पुढे आणून त्याला बळकटी आणण्याकरिता सत्य-सशोधनाचे कार्य सतत चालू राहिले पाहिजे. त्याकरितां इतिहासाच्या अभ्यासाला अर्थशास्त्रात मानाचें स्थान पाहिजे, असे ह्या गटाचे विचार होते. स्क्मॉलर् हा सुप्रसिद्ध जर्मन इतिहासवादी ह्या गटांतील विचाराशी सहमत होता. वरील तिन्ही गटातील लोक निरनिराळ्या कारणांकरितां कां होईना, पण ऐतिहासिक व वास्तविक पद्धतीनेच अर्थशास्त्राची प्रगति होऊं शकेल असें म्हणत. म्हणूनच त्या तिन्ही गटांतील लोकांची इतिहास सप्रदायात गणना केली जाते.

**इतिहासवादी विचाराचें उदाहरण**

इतिहासवाद्यानी सनातनवादाला केलेला विरोध समजण्याकरितां एखाद्या इतिहासवाद्याचें उदाहरण घेऊन त्यानें सनातनवादाविरुद्ध उपस्थित केलेले मुद्दे पाहिले म्हणजे पुरे. इंग्राम ह्या इंग्लिश इतिहासवाद्यानें इ. स. १८७८ मध्ये केलेल्या एका भाषणांत इतिहासवाद्याची बाजू चागल्या प्रकारें पुढे माडली. भाषणाच्या सुरुवातीलाच मनुष्याच्या आर्थिक जीवनाचा शास्त्रमान्य पद्धतीनें अभ्यास करणे शक्य आहे, असे कबूल करून सनातनवादाविरुद्ध त्यानें चार आक्षेप पुढें माडले, ते असे :— (१) मनुष्याचें आर्थिक जीवन हें मनुष्याच्या एकंदर सामाजिक जीवनाचा भाग नसून ते त्यापेक्षा कांहीतरी वेगळे आहे असे भासविण्याची वृत्ति सनातनवादांत दिसून येते. ह्या वृत्तीमुळे अर्थशास्त्रीय सिद्धान्त प्रतिपादिताना राजकीय, नैतिक, धार्मिक इत्यादि गोष्टीचा मनुष्याच्या वागणुकीवर काय परिणाम होतो ह्याची योग्य ती दखल घेतली जात नाही. अर्थातच अर्थशास्त्राच्या सिद्धान्तात एक प्रकारचा अपुरेपणा आपोआप शिरतो. हा अपुरेपणा अर्थशास्त्राचे सिद्धान्त माडतांना मनुष्यावर परिणाम करणाऱ्या सर्व गोष्टीचा परिणाम लक्षात घेतल्यास टळण्याजोगा आहे. उदाहरणार्थ, कामगारासंबधीच्या अर्थशास्त्रात आढळणाऱ्या विवेचनांतील अपुरेपणा कामगार हा उत्पादनाचा घटक आहे, ह्याबरोबरच तो नागरिक आहे, समाजाचा सभासद आहे, कुटुबप्रमुख आहे इत्यादि गोष्टी लक्षात ठेवल्या तर टळेल. (२) काही गृहीततत्त्वांपासून काढलेल्या अनुमानापासून पाया ठीक असला तर विशेष धोका नसतो. पण पायाच कच्चा असला तर अनवस्था प्रसग ओढवतो. सनातनवादाचें तसेंच झाले आहे कारण मनुष्याला भौतिकदृष्टचा ज्याला सपत्ति म्हणतात त्या शिवाय दुसऱ्या कशाचीहि पर्वा नसते, आणि भौतिक संपत्तीची हाव त्याच्या वागणुकीच्या मुळाशी असलेली एकच भावना आहे, ह्या कच्च्या पायावर त्या अर्थशास्त्राची उभारणी झाली आहे. (३) वरील परिस्थिति ओढवण्याचे कारण सनातनवादी अर्थशास्त्रात गृहीततत्त्वापासून अनुमानें काढणें ह्या पद्धतीला अवास्तव महत्त्व दिले गेले. कोणत्याहि सामाजिक शास्त्राने सशोधनाला प्रामुख्य देणाऱ्या म्हणजेच इतिहासाच्या अभ्यासावर अधिष्ठित

असलेल्या पद्धतीलाच प्राधान्य दिले पाहिजे. कोणतेहि सामाजिक सत्य त्याचा मागील इतिहास समजून घेतल्याशिवाय पूर्णपणें उमजणारच नाही. (४) इतिहास पद्धतीचा अवलब न करताना माडलेल्या सिद्धान्ताना स्थल-कालनिरपेक्ष स्वरूप देणें अत्यत चुकीचे आहे. तसे स्वरूप चुकीने दिले गेल्यास प्रत्यक्ष व्यवहारात अर्थशास्त्रीय सिद्धान्त अनेकवार निरुपयोगी ठरलेले आढळतात.

**अर्थशास्त्राचे नैतिक टीकाकर**

सनातनवादी अर्थशास्त्रावर अनेक प्रकारची जी टीका झाली ती पूर्णपणे सागावयाची असल्यास नैतिक दृष्ट्या झालेल्या टीकेचाही उल्लेख केला पाहिजे. १८६२ मध्यें प्रसिद्ध झालेल्या रस्किन या सुप्रसिद्ध आग्ल लेखकाच्या ग्रथात (Unto the Last) ही टीका प्रामुख्याने आढळते. मराठीत आचार्य जावडेकरानी ह्या ग्रथाचा 'अर्थशास्त्र की, अनर्थशास्त्र' ह्या नावाखाली सदर व विद्वत्तापूर्ण अनुवाद केला आहे. भौतिक वैभव हे समाजाचे खरे वैभव नव्हे. भौतिक वैभव हेच समाजाचे खरे वैभव मानून ते वैभव लाभणें शक्य व्हावे ह्या हेतूने मनुष्याच्या अर्थप्रेरणेला मोकाट सोडून मनुष्यामनुष्यात स्पर्धेची भावना निर्माण करणे इष्ट असे प्रतिपादणारे अर्थशास्त्र वस्तुत: अनर्थशास्त्र आहे. कारण स्वार्थ व स्पर्धा ह्या भावनापेक्षा सेवा व सहकार्य ह्या भावनाचीच मानवहिताला अधिक गरज आहे असा रस्किनचा मुख्य सिद्धान्त होता. ह्या भावनाचे महत्त्व अर्थशास्त्राकडून ओळखले जात नाही. कारण मनुष्य स्वार्थीच असतो ह्या चुकीच्या गृहीतकृत्यावरच अर्थशास्त्राची उभारणी झाली आहे. तसेच वासना व गरजा ह्याच्यातील फरक प्रचलित अर्थशास्त्राकडून उपेक्षिला गेला असल्यामुळे ते नीतिशास्त्रविन्मुख झाले आहे, असा रस्किनचा त्या अर्थशास्त्रावर आरोप होता. मनुष्याच्या स्वार्थी भावनेला उत्तेजन दिलें पाहिजे असे सनातनवाद्याचे मत असल्यामुळे अनियंत्रणवादी आर्थिक धोरणाचा ते पुरस्कार करीत. रस्किनचा अर्थातच ह्याला विरोध होता. कारण सेवा व सहकार्य ह्याचे अधिष्ठान आर्थिक व्यवस्थेला मिळण्यास नियंत्रणाची जरूरी आहे असे त्याला वाटत असे. तसेंच आर्थिक व्यवहारात न्याय-अन्यायाचा विवेक करण्याचीहि जरुरी त्याला वाटत असे. तसा विवेक पंडितमान्य अर्थशास्त्राकडून केला जात नाही. कारण त्या अर्थ-

शास्त्राने नीतीशास्त्राशी आपली अकारण फारकत करून घेतली आहे असा त्याचा आरोप होता केवळ वास्तवतादर्शनावर संतुष्ट न रहातां ध्येयदर्शनहि करावे असे त्याचे अर्थशास्त्राला आवाहन होते. जीवन हीच खरी संपत्ति आणि जीवनाची सर्वांगीण उन्नति करण्यास पोषक ठरणाऱ्या वस्तूंचें उत्पादन हे ज्याचे ध्येय तेच खरें अर्थशास्त्र असें तो म्हणे. जीवनाची सर्वांगीण उन्नति ह्या त्याच्या कल्पनेंत शील, प्रेम, त्याग इत्यादि उदात्त भावनाना प्रमुख स्थान होते

**मिलपर्यंत सनातनवादाचा पाया कमकुवत झाला नाहीं.**

ह्या प्रकरणात वर्णिलेला सनातनवादविरोधी आर्थिक विचार बहुताशीं मिल्पूर्वीच झालेला होता. मिलचे लिखाण त्यानतरचे होते. मिलचे लिखाण पाहिले असता असे म्हणण्यास हरकत नाही की, ह्या प्रकरणात सागितलेल्या विरोधापासून सनातनवाद फारसा कमकुवत झाला नाही रम्यस्वप्नवादी आर्थिक विचाराचा विरोध फारसा तीव्र नव्हता. कारण जुनी आर्थिक व्यवस्था पुनः प्रस्थापित करणे हेच त्या सप्रदायाचे ध्येय होते. त्या प्रयत्नाला फारसा पाठिंबा मिळणे शक्य नव्हते. लीस्टचा राष्ट्रवाद सनातनवादाला फारसा त्रासदायक झाला नाही. कारण तो सहजासहजी सनातनवादातच समाविष्ट करता आला. बाल्यावस्थेतील धद्याना उत्तेजन दिले तरी चालेल असे खुल्या व्यापाराचे कट्टर पुरस्कर्तेच पुढे म्हणू लागले. अशा तऱ्हेने लीस्टचा राष्ट्रवाद सनातनवादाचा भाग होऊन बसला. इतिहासवाद्याच्या विरोधाने सनातनवादावर फारसा अनिष्ट परिणाम झाला नाही. कारण दोन पद्धतीतील भाडण शास्त्राला दोन्ही पद्धतीची जरूर असते असे त्या त्या पद्धतीच्या लोकांनी पुढे कबूल केल्याने आपोआपच सुटले. इतिहासवादी स्वयसिद्ध गृहीतकृत्यापासून तर्कशास्त्रशुद्ध सिद्धान्ताची रचना करणे ही पद्धति प्रत्यक्ष संशोधनापासून सिद्धान्त बसविणें ह्या पद्धतीइतकीच महत्त्वाची आहे, असें म्हणू लागले आणि कट्टर सनातनवादी अर्थशास्त्रानें ऐतिहासिक व वास्तविक संशोधनावर भर दिला पाहिजे असें प्रतिपादू लागले. अशा तऱ्हेने पद्धतीबद्दलच्या वादाचा सामोपचारातच शेवट झाला. अर्थशास्त्राने ऐतिहासिक व वर्तमानकालीन वास्तवतेपासून पराङ्मुख होऊं नये व आपले सिद्धान्त प्रतिपादिताना इतर शास्त्राच्या सिद्धान्ताची दखल घ्यावी व त्या शास्त्राचें सहकार्य मिळ-

वावे; एवढे अर्थशास्त्राकडून कबूल करून घेण्याची कामगिरी इतिहासवादानें केली, हे कबूल करून ते श्रेय त्याला दिलें पाहिजे. नीतिशास्त्रदृष्टया अर्थशास्त्रावर झालेली टीका फारशी परिणामकारक झाली नाही ती टीका बहुतांशी गैरसमजावरच आधारलेली होती. स्वार्थभावना ही एकच भावना मनुष्यात असते किंवा त्या भावनेलाच उत्तेजन देऊन मनुष्यातील परमार्थभावनेला दडपून टाकावें; तसेच अर्थशास्त्रात-न्याय-अन्याय विवेकाचा विचारहि होऊ नये असे कोणत्याहि जाणत्या अर्थशास्त्राज्ञानें म्हटले नव्हतें. सनातन संप्रदायातील व्यक्तीवादी अर्थशास्त्रज्ञ न्याय-अन्यायाच्या विचारापासून अलिप्त होते असे मुळीच नाही. व्यक्तिवादानेच सर्वाना न्याय' मिळेल एवढेच त्याना म्हणावयाचे होते. मानवी मूल्याचा विचार अर्थशास्त्रात अंतर्भूत होऊ नये, असें म्हणण्यात त्याना एवढेच सुचवावयाचे होते की, अर्थशास्त्र व नीतिशास्त्र ह्यात गल्लत होऊ देऊ नये. त्या दोन्ही शास्त्रांची क्षेत्रे भिन्न मानून प्रथम त्यांचा तात्त्विक अभ्यास स्वतंत्रपणे व्हावा--तो करताना सुद्धा जरूर असेल तेथे एकमेकानी एकमेकाची मदत घ्यावी--आणि व्यवहारात उपयोग करताना मात्र ती शास्त्रें परस्पराना पूरक ठरावीत, एवढेच अर्थशास्त्रज्ञाना म्हणावयाचे असते. त्याची ही भूमिका मान्य झाल्यास अर्थशास्त्र व नीतीशास्त्र ह्याच्यांतील भांडण कायमचे मिटण्यास हरकत नाही.

**ध्येयवादी समाजवाद्यांचा विरोध बोचक पण कमजोर**

राहता राहिला समाजवादी मंडळीचा विरोध. हा विरोध खरोखरच तीव्र स्वरूपाचा व सनातनवादाला बोचक होता; पण मिलपूर्वीचा समाजवाद अधिक ध्येयवादी व कमी शास्त्रीय असल्यामुळे मिलला समाजवादी अर्थव्यवस्था अव्यवहार्य नाही, एवढी कबुली देऊन वेळ मारून नेता आली.सारांश--रिकार्डो-मिल ह्याच्या दरम्यानच्या काळातील विरोधामुळे सनातनवादाचें उच्चासन लक्षात येईल असे डळमळीत झाले नाही. मिलच्यानंतर थोड्याच दिवसात सनातनवादी आर्थिक विचाराची बैठक डळमळीत करणारा एक विरोधक पुढे आला. तो विरोधक म्हणजे कार्लमार्क्स होय. त्याने व त्याच्या संप्रदायाने सनातनवादी आर्थिक विचाराची अर्थशास्त्रावरील पकड अत्यंत खिळखिळी करून सोडली. मार्क्सच्या विरोधाचे महत्त्व लक्षांत घेऊन त्याचा विचार स्वतंत्रपणेच पुढील प्रकरणात केला आहे.

------

*

# ६ : : : : : मार्क्स व मार्क्सवाद

सनातनवादविरोधी आर्थिक विचारांचा नेता व क्रांतिकारक अशा नवीनच आर्थिक विचाराचा निर्माता, तसेंच उक्ति व कृति ह्या दोहोंची सांगड घालणाऱ्या व जगांतील प्रस्थापित अशा सर्व गोष्टींना धक्का देण्याऱ्या संप्रदायाचा जनक, ह्या सर्व नात्यांनी मार्क्सचें स्थान केवळ अर्थशास्त्राच्याच नव्हे तर जगाच्या इतिहासांत अढळ होऊन राहिलें आहे. प्रस्तुत प्रकरणांत त्याच्या अर्थशास्त्रीय विचाराशी व अर्थशास्त्राच्या इतिहासात असलेल्या त्याच्या स्थानाशीच प्रमुखतः कर्तव्य आहे केवळ अर्थशास्त्राच्या दृष्टीने विचार करतां प्रस्थापित आर्थिक विचाराच्या विरोधकाचा यशस्वी पुढारी व मार्क्सवाद म्हणून पुढे प्रसिद्ध झालेल्या आर्थिक विचाराचा जनक असे मार्क्सचे यथार्थ वर्णन करता येईल. हे वर्णन यथार्थ कसे आहे हे समजण्याकरिता त्याच्या आर्थिक विचाराची माहिती करून घेणे अवश्य आहे. तत्पूर्वी त्याच्या चरित्राची माहिती करून घेणे चूक होणार नाही.

**चरित्रविषयक माहिती**

मार्क्सचा जन्म १८१८ मध्ये झाला. त्याचा बाप वकिलीचा धदा करीत असे. मार्क्सचे उच्च शिक्षण बॉन व बर्लिन विश्वविद्यालयात झाले. विश्वविद्यालयामध्ये प्रवेश करण्यापूर्वी आपल्या बापाचा धदा पुढे चालवावा, एवढीच त्याची महत्त्वाकाक्षा होती. शिक्षणासाठी बर्लिन येथे असताना त्याच्या महत्त्वाकाक्षेच्या दिशेत व त्याच्या विचारसरणीत बदल व्हावयास सुरुवात झाली. बर्लिनमध्येच प्रथम हेगेल ह्या सुविख्यात तत्त्वज्ञाच्या तत्त्वज्ञानाशी त्याचा परिचय झाला. केवळ परिचयच नव्हे तर त्या तत्त्व-ज्ञानाने त्याला सर्वस्वी भारून टाकले. तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक होऊन उरलेले जीवन व्यतीत करावे अशी इच्छाहि त्याच्या मनांत डोकावली; पण ती फार वेळ टिकली नाही. कारण लवकरच त्याचे मन तत्कालीन सामाजिक व राजकीय क्रातिकारक चळवळीकडे आकृष्ट झालें. त्याच सुमारास त्याचा विवाह झाला. विवाहानंतर आपल्या पत्नीबरोबर तो पॅरिसला गेला. फ्रान्सच्या ह्या राजधानीतलें त्यावेळचें वातावरण त्याच्या क्रातिकारक मनोवृत्तीचा विकास करील असेंच होतें. पॅरिसमध्येच प्रथम

त्याची पुढें जन्मभर त्याचा जीवश्चकंठश्च मित्र व सहकारी होऊन राहिलेल्या फ्रेडरिक एंगल्स् ह्याची भेट प्रथम झाली. १८४५ मध्यें त्याला फरान्समधून हद्दपार करण्यांत आले. पॅरिसहून तो ब्रुसेल्सला गेला. तेथूनच एंगल्सच्या सहकार्यानें त्यानें काढलेला साम्यवादी जाहीरनामा ( Communist Manifesto ) १८४८ मध्यें बाहेर पडला. इंग्लडमध्यें परिषद भरवू इच्छिणाऱ्या निरनिराळ्या देशातील क्रान्तिकारकांच्या एका गटानें क्रान्ति-तत्त्वें नमूद असलेल्या जाहीरनाम्याची मार्क्सकडे जी मागणी केली त्यातून ह्या जाहीरनाम्याचा जन्म झाला.

**मार्क्स व एंगल्स ह्यांचें अतुल सहकार्य**

१८४९ मध्यें मार्क्स लंडनला गेला. तेव्हापासून ते थेट त्याच्या मृत्यूपर्यंतचे म्हणजे १८८३ पर्यंतचें त्याचे आयुष्य लंडनमध्यें एक हद्दपारित क्रान्तिकारक म्हणून रहाण्यांतच गेले. लंडनमधील आपला बहुतेक वेळ त्याने आर्थिक व ऐतिहासिक सशोधन करण्यांत व क्रातिकारक चळवळीना मार्ग-दर्शन करण्यात घालविला. चरितार्थाचें निश्चित साधन उपलब्ध नसल्याने आत्यतिक गरिबीच त्याच्या वाट्याला आली, हे सागणें नकोच त्याच्या गरिबीत विवाहापूर्वी श्रीमतीचा स्वाद घेतलेल्या त्याच्या पत्नीसहि समभागी व्हावे लागले. चरितार्थाचे निश्चित साधन उपलब्ध नसतांहि गरिबीतच कां होईना, पण त्याला आपला ससार चालविता आला, ह्याचे मुख्य कारण म्हणजे एंगलसनें त्याला केलेली मदत. एंगल्सच्या मदतीशिवाय त्याला जगणेंच अशक्य झाले असते. एगल्सने मार्क्सचें जीवन व आपले जीवन एकच मानले. मार्क्स व एंगल्सची मैत्री अनुपम होती त्या मैत्रीबद्दल लिहिताना एका इग्लिश लेखकाने असे लिहिले आहे की, एखाद्या स्त्रीने एखाद्या पुरुषाकरितां केलेल्या किंवा एखाद्या पुरुषाने एखाद्या स्त्रीकरिता केलेल्या सर्वस्वाच्या त्यागाची उदाहरणे सापडणें कठिण नाही; पण आपल्या मित्राचा व तो करीत असलेल्या कार्याचा मोठेपणा जाणून त्या मित्राला चरितार्थासारख्या बिनमहत्त्वाच्या गोष्टीची जबाबदारी पडू नये म्हणून आपले आयुष्य खर्च करणारा एंगल्ससारखा एखादाच. एगल्स हा मार्क्सचा केवळ निष्ठावान् मित्र होता; एवढेच नाहीं तर तो त्याचा सहकारीहि होता. मार्क्सच्या प्रत्येक लिखाणात त्याला एगल्सचे बौद्धिक

सहकार्य लाभलें. मार्क्संकरितां केलेल्या त्यागाबद्दल व त्याला दिलेल्या बौद्धिक सहकार्याबद्दल निराश होण्याची पाळी एंगल्सवर आली नाही. कारण मार्क्सविषयीच्या त्याच्या अपेक्षा मार्क्सनें पुरेपूर पूर्ण केल्या. त्या कशा ह्याची साक्ष त्याचें लिखाण व त्या लिखाणाला मिळालेली जगन्मान्यताच देते. मार्क्सच्या लिखाणांतील अत्यंत प्रसिद्ध लिखाण म्हणजे भांडवल (Capital) हा त्याचा ग्रंथ. हा ग्रंथ तीन भागांत विभागला गेला आहे. ह्या ग्रंथाचा पहिला भाग १८६७ मध्यें व उरलेले दोन भाग मार्क्सच्या मृत्यूनंतर प्रकाशित झाले. जगांतील सर्व देशांतील क्रान्तिकारकांचा व त्याच्या चळवळीचा आधारस्तंभ असे ह्या ग्रथाचे थोडक्यात वर्णन करतां येईल. ह्या ग्रंथानें मार्क्सला केवळ अर्थशास्त्राच्या इतिहासांतच नव्हे तर मानवाच्या बौद्धिक विकासाच्या इतिहासांत मानाचे स्थान प्राप्त करून दिलें. त्याहीपेक्षां पुढे जाऊन असे म्हणता येईल की ह्या ग्रंथानें मार्क्सला अमर केलें.

**अर्थशास्त्राकडे पाहाण्याची मार्क्सची दृष्टि**

मार्क्सच्या चरित्रासबधी व त्याच्या लिखाणासबंधी एवढी माहिती मिळविल्यानतर त्याच्या अर्थशास्त्रीय विचाराकडे वळण्यास हरकत नाही. तो विचार समजण्यासाठी प्रथम अर्थशास्त्राकडे पाहण्याची मार्क्सची दृष्टि काय होती हे समजून घेतले पाहिजे. ह्या ठिकाणी हे सागण्यास हरकत नाही कीं, स्वयंसिद्ध गृहीततत्त्वावरून अनुमाने काढण्याची जी पद्धत रिकार्डोने अर्थ-शास्त्राचे सिद्धान्त माडण्याकरिता स्वीकारली त्याच पद्धतीचा मार्क्स भोक्ता व पुरस्कर्ता होता. अर्थशास्त्राचे सिद्धान्त माडण्याकरिता मार्क्सनें स्वीकारलेली पद्धतिच केवळ लक्षात घ्यावयाची असेल तर मार्क्सला सनातनवादीच सम-जावे लागेल. पण तसे समजता येत नाही. ह्याचें कारण अगदी उघड आहे. पद्धतीमधील साम्य हे अगदी वरवरचें साम्य असते. कोणती पद्धति वापरली आहे ह्यापेक्षा ती कशाकरिता वापरली आहे ह्याला अर्थातच अधिक महत्त्व असते. गृहीततत्त्वावरून अनुमाने काढण्याची पद्धत सनातनवादाने व मार्क्सनें अगदी भिन्न—अगदी परस्परविरोधी—हेतूनें वापरली. पद्धतीच्या बाबतीत सनातनवाद व मार्क्सवाद ह्यामध्ये साम्य असलें तरी अर्थशास्त्राचा उद्देश व व्याप्तीसबधीच्या सनातनवादात अंतर्भूत असलेल्या कल्पना व मार्क्सवादांत अतर्भूत असलेल्या कल्पना सर्वस्वी भिन्न आहेत.

प्रचलित समाजव्यवस्थेत संपत्तीचें उत्पादन व विभाजन ज्या तत्त्वांनुसार होते ती तत्त्वें शोधून काढणें एवढाच सनातनप्रणीत अर्थशास्त्राचा उद्देश होता. हा उद्देश स्वीकारताना प्रचलित समाजव्यवस्था अविनाशी आहे असे सनातनवादाने गृहीतच धरले होते. एदढेंच नव्हे तर प्रचलित समाजव्यवस्थेच्या अविनाशित्वाबद्दल सनातनवादीयाच्या मनात यत्किंचितहि संदेह नव्हता. त्याहीपुढे जाऊन असे म्हणता येईल की प्रचलित समाजव्यवस्थेंतील अविनाशित्वाबरोबरच तिच्या इष्टतेबद्दल सनातनवादीयाना शका नव्हती. साराश—प्रचलित समाजव्यवस्था अविनाशी आहे हे गृहीत धरून तिच्यांतील सपत्तीच्या उत्पादनाची व विभाजनाची तत्त्वे सागणे व प्रचलित समाजव्यवस्था इष्ट वाटत असल्यामुळे वेळप्रसगी त्या तत्त्वाचा पाठपुरावा करणे एवढेच सनातनवादी अर्थशास्त्राचे ध्येय होते.

**अर्थशास्त्र म्हणजे सामाजिक परिवर्तनाचा शास्त्रीय अभ्यास**

मार्क्सवादी अर्थशास्त्राचे उद्दिष्ट अगदी निराळें होते. ह्यासबधात प्रथम सागितले पाहिजे कीं, समाजव्यवस्था व विशेषतः समाजव्यवस्थेंत इतिहासाच्या ओघात होणारे बदल ह्यासंबधी मार्क्सला विशेष आस्था वाटत होती व त्या गोष्टीचा अभ्यास त्याला महत्त्वाचा वाटत होता. अर्थशास्त्राकडे त्याचें मन आकृष्ट झालें तें अर्थशास्त्रात अंतर्भूत होणाऱ्या गोष्टींबद्दल आत्मीयता वाटत होती म्हणून नव्हे; तर सामाजिक परिवर्तन कशावर अवलंबून असते, ह्या प्रश्नाचें उत्तर आर्थिक क्षेत्रातच सांपडेल अशी त्याची भावना होती म्हणून. ह्या त्याच्या भावनेचा परिणाम मार्क्सवादी अर्थशास्त्रावर झालेला आढळतो. मार्क्सवादी अर्थशास्त्रानुसार संपत्तीचें उत्पादन व विभाजन ह्यांचा अभ्यास एवढाच अर्थशास्त्राचा उद्देश नसून सामाजिक परिवर्तन ज्या तत्त्वानुसार होतें तीं तत्त्वें शोधून काढणें हे अर्थशास्त्राचें ध्येय ठरतें. अर्थशास्त्राने हें ध्येय स्वीकारल्यास अर्थशास्त्राची व्याप्ति पुष्कळ पटीनें वाढते ह्यांत शंका नाहीं. त्यायोगें अर्थशास्त्र प्रचलित आर्थिक व्यवस्थेंतील संपत्तीचें उत्पादन व विभाजन ह्यांपुरतें मर्यादित न रहातां एका आर्थिक व्यवस्थेंतून दुसरी आर्थिक व्यवस्था कशी उद्भवते व आर्थिक क्षेत्रांतील बदल अन्य क्षेत्रांत परिवर्तन कसें घडवून आणतात ह्याचें स्पष्टीकरण करणारें शास्त्र बनतें. अर्थशास्त्रांत केवळ

प्रचलित आर्थिक व्यवस्थेचाच अभ्यास अंतर्भूत नसून प्रचलित आर्थिक व्यवस्थे-पूर्वी येऊन गेलेल्या आर्थिक व्यवस्था व प्रचलित आर्थिक व्यवस्थेंतून उद्भवणाऱ्या भावी आर्थिक व्यवस्थेचाहि अभ्यास अर्थशास्त्राला करावा लागतो. भूतकालीन अर्थव्यवस्था, प्रचलित आर्थिक व्यवस्था व आगामी आर्थिक व्यवस्था, ह्या एकमेकाशी कोणत्या प्रकारे सबधित आहेत ही मार्क्स-वादी अर्थशास्त्राची प्रमुख समस्या आहे हें सागणें नकोच.

**मार्क्सच्या आर्थिक विचाराचे तीन प्रमुख भाग**

मार्क्सवादी अर्थशास्त्राच्या उद्दिष्टासबधी वर दिलेले विवेचन लक्षात घेता मार्क्सच्या आर्थिक विचाराचा अभ्यास करताना त्याचे तीन भाग पाडावयास हवेत. पहिल्या भागात प्रचलित आर्थिक व्यवस्थेसबधी मार्क्सचें निरूपण येते. दुसऱ्या विभागात निरनिराळ्या प्रकारच्या आर्थिक व्यवस्था इतिहासाच्या ओघात एका विशिष्ट क्रमानें कां येतात ह्यासबधाने मार्क्सनें प्रतिपादिलेला सिद्धान्त येतो. तिसऱ्या विभागात आर्थिक व्यवस्थेच्या स्वरूपावर इतर गोष्टी कशा ठरतात ह्यासबंधीचें मार्क्सचें विवेचन येते. ह्या क्रमानेंच खाली मार्क्सचा आर्थिक विचार सागितला आहे.

**प्रचलित अर्थव्यवस्थेच्या विचारांत मूल्य-विचाराला मध्यवर्ती स्थान**

प्रचलित आर्थिक व्यवस्थेसंबंधीचे मार्क्सचें निरूपण विस्ताररूपानें सांगण्यापूर्वी मार्क्सने प्रतिपादिलेला मूल्य-सिद्धान्त समजून घेतला पाहिजे. कारण सनातनवादी अर्थशास्त्रज्ञाप्रमाणें मार्क्सनेंहि आपल्या अर्थशास्त्रांत मूल्य-सिद्धान्ताला मध्यवर्ती स्थान दिले होतें. मूल्य-सिद्धान्ताचा प्रश्न स्वतःच्या उपयोगाकरितां एखाद्या वस्तूचे उत्पादन न करता केवळ विनिमयाचें साधन म्हणून--म्हणजे त्या वस्तूचा मोबदला इतर वस्तू मिळाव्यात म्हणून--उत्पादन करण्याची प्रथा सुरू झाली कीं ताबडतोब उपस्थित होतो. स्मिथनें असे मत व्यक्त केलें होतें कीं, ही प्रथा व श्रम-विभागणी ह्यांचा अभेद्य सबंध आहे. श्रमविभागणी अस्तित्वांत आली कीं विनिमयाकरता उत्पादन अपरिहार्य ठरतें. मार्क्स हे मत मानावयास तयार नव्हता. श्रमविभागणी असूनहि सामुदायिकरीत्या केवळ उपभोगाकरतां उत्पादन करणारी अर्थव्यवस्था असूं शकेल असें त्याचें मत होतें. त्याच्याच शब्दांत हें मत सांगावयाचें असेल तर असें म्हणतां येईल कीं, विनिमयाकरतां

उत्पादन होण्यास श्रमविभागणीची जरूर असते. हे जरी खरे असलें तरी त्याचा अर्थ असा नव्हे की, जेथे जेथें श्रमविभागणी असते तेथें तेथें उत्पादन विनिमयाकरिताच असते. स्मिथ व मार्क्स ह्याची ही मतभिन्नता नमूद करण्याजोगी आहे. त्यावरून मार्क्सचे विचार प्रथमपासूनच विरुद्ध दिशेला कसे जात होते तें स्पष्ट होतें. ते असो. प्रचलित आर्थिक व्यवस्थेपुरता श्रम-विभागणी व विनिमयाकरिता उत्पादन ह्यांचा सबंध मार्क्सला मान्य होता आणि म्हणूनच त्या आर्थिक व्यवस्थेचा विचार करताना मूल्य-विचाराला त्याने मध्यवर्ति स्थान दिलें. मूल्यसिद्धान्ताला मध्यवर्ती स्थान देण्यातच नव्हे; तर प्रत्यक्ष सिद्धान्ताच्या स्वरूपातहि मार्क्सने सनातनवादाचे अनुकरण केले होते. गोष्ट आश्चर्याची आहे! पण तितकीच खरी आहे की, सनातनवादाच्या ह्या कट्टया विरोधकाने प्रति-पादिलेला मूल्यविषयक सिद्धान्त दुसरा-तिसरा कोणताहि नसून रिकार्डो ह्या कट्टया सनातनवाद्याने प्रतिपादिलेला श्रम-सिद्धान्तच होता. रिकार्डो-प्रणीत श्रमसिद्धान्त मार्क्सने जशाचा तसा उचलला असे म्हणण्यात थोडीशी अतिशयोक्ति झाली तरी फारशी चूक होणार नाही.

**मार्क्सचा मूल्यसिद्धान्त**

मूल्याच्या श्रमसिद्धान्ताप्रमाणें वस्तूचे मूल्य ती वस्तू उत्पादित करण्यास लागणाऱ्या वेळावरून ठरते. वस्तूचे मूल्य म्हणजे त्या वस्तूचा इतर वस्तूशी असलेला सबंध. एखाद्या वस्तूच्या मोबदल्यात दुसऱ्या वस्तूचे अगर वस्तूचे जे प्रमाण मिळतें त्या प्रमाणाला त्या वस्तूचे मूल्य म्हणता येईल. **अ** ह्या वस्तूच्या एका परिमाणाच्या मोबदल्यात **ब** ह्या वस्तूची दोन परिमाणें मिळू शकत असली तर दोन **ब** हे एक **अ** चे मूल्य झाले. किवा उलट बाजूनें विचार करतां एक **अ** हे दोन **ब** चें मूल्य झाले. वस्तूचे मूल्य म्हणजे वस्तूंचा परस्परसबध, निरनिराळ्या वस्तू उत्पादित करण्यास ज्या प्रमाणात मानवी श्रम खर्च होतात त्या प्रमाणावरून ठरतो असें मार्क्सचें म्हणणे होतें. मानवी श्रमाचे विनिमय मूल्यामागें दडणारे मूल्य असें त्याने वर्णन केले. हे मानवी श्रम मोजावयाचे कसे? ह्याला मार्क्सचे उत्तर असें कीं, ते तासांच्या भाषेत मोजावयाचे. मानवी श्रमाचें मोजमाप करा-वयाचें उत्तम साधन म्हणजे श्रमाचे तास ह्याबद्दल फारसा वाद होण्याचें

कारण नाहीं. तास हें मोजमाप ठरलें तर असें म्हणतां येईल की, कोणत्याहि दोन वस्तूंपैकी ज्या वस्तूवर अधिक तास खर्च करावे लागतील ती वस्तु दुसऱ्या वस्तूपेक्षां अधिक मूल्यवान्. किती प्रमाणात अधिक मूल्यवान् तर ज्या प्रमाणांत अधिक वेळ लागत असेल त्या प्रमाणांत अधिक मूल्यवान्. **अ** ह्या वस्तूवर **ब** च्या पेक्षा दुप्पट तास खर्च करावे लागत असतील तर **अ** चें मूल्य दोन **ब** किंवा **ब** चे मूल्य $\frac{1}{2}$ **अ** इतकें होईल. सर्वच वस्तूंचा परस्पर सबंध ठरला जाण्यास हाच नियम लागू पडतो. एवढे लक्षात आल्यास मार्क्सच्या श्रमसिद्धान्ताचें स्वरूप समजण्यास अडचण पडणार नाही.

**श्रमसिद्धान्तावरील संभाव्य आक्षेप व त्यांचें निराकरण**

मार्क्सनें प्रतिपादिलेल्या सिद्धान्तावर तीन प्रकारचे आक्षेप घेतां येतील, हें मार्क्सच्या लक्षात आलें होते; म्हणून त्याने त्या आक्षेपाचे मूल्य सिद्धान्ताच्या विवेचनाच्या ओघातच निराकरण केले. पहिला आक्षेप असा कीं, लागणाऱ्या वेळावरून वस्तूचे मूल्य ठरवावयाचे असेल तर आळशीपणे अगर मंदगतीने जी वस्तु निर्माण केली जाईल ती अधिक मूल्यवान, अशी विचित्र परिस्थिति निर्माण होण्याचा सभव आहे. ह्या अडचणीला मार्क्सचे उत्तर असे की, कोणत्याहि वस्तूच्या उत्पादनाला किती वेळ लागतो ह्याचा विचार करताना त्या वस्तूवर खर्च करण्यांत आलेले श्रम सामाजिक दृष्टचा आवश्यक (Socially Necessary Labour) आहेत की नाही हे पहावयास हवे. सामाजिक दृष्टचा आवश्यक श्रम ह्या शब्दप्रयोगाचा अर्थ ज्या काळांत श्रम करण्यात आले आहेत त्या काळांतील समाजपरिस्थिति पाहतां वाजवी असणारे श्रम असा मार्क्सने केला. कोणत्याहि परिस्थितीत जितके श्रम करणें योग्य होईल तितकेच श्रम सामाजिक दृष्टचा आवश्यक असें म्हणतां येईल. उत्पादित वस्तूची कोणाला आवश्यकता असेल तरच त्या वस्तूवर होणारे श्रम सामाजिक दृष्टचा योग्य असाहि अर्थ मार्क्सच्या शब्दप्रयोगातून काढला जातो. हा अर्थ मार्क्सने कदापि मान्य केला नसता, हे स्पष्ट केले पाहिजे. हा अर्थ मान्य करणें म्हणजे श्रमकालापेक्षा वस्तूच्या गरजेलाच प्राधान्य देणे; म्हणजेच पर्यायानें मार्क्सवादी मूल्यसिद्धान्ताचा पायाच उखडणे होय. एखाद्या वस्तूच्या उत्पादनाला किती श्रम केले असतां ते योग्य ठरेल ह्या प्रश्नाला मार्क्सनें असें उत्तर दिलें की, सामान्यत: ज्याची हुशारी अगर

कुवत सरासरी मजुराच्या हुशारीपेक्षां अगर कुवतीपेक्षां कमीहि नाही अगर जास्तहि नाही अशा मजुराला एखादी वस्तु उत्पादन करण्याला जेवढा वेळ लागतो तेवढा वेळ त्या वस्तूच्या उत्पादनावर खर्च करणें योग्य आहे असे समजतां येईल. त्यापेक्षा अधिक वेळ लागला तर तो सामाजिक दृष्ट्या अनावश्यक ठरेल. आवश्यक श्रम ठरविताना तत्कालीन उत्पादनपद्धतीहि लक्षात घेतली पाहिजे. त्या पद्धतीत जसजशी सुधारणा होते तसतसे आवश्यक श्रम कमी होत जातात.

**दर्जांतील फरक कसा मापावयाचा ?**

श्रमसिद्धान्तावरील दुसरा आणि महत्त्वाचा आक्षेप असा की, निर-निराळ्या प्रकारच्या श्रमाचा दर्जा एकच नसतो. तेव्हां सारेच श्रम एकाच मापाने कसे मोजता येतील ? ह्या आक्षेपाला मार्क्सचें असे उत्तर की, श्रमाच्या दर्जांतील फरक तासाच्या भाषेत व्यक्त करता येणें अशक्य आहे, असें समजण्याचे कारण नाहीं. विशेष दर्जाच्या श्रमाची योग्यता साध्या श्रमांच्यापेक्षा जितक्या प्रमाणांत अधिक असेल त्या प्रमाणानुसार साधे श्रम व विशेष श्रम ह्याचे तासात रूपान्तर केलें की काम झाले. एखाद्या मजुराची किंवा एखाद्या कामाला लागणाऱ्या श्रमाची योग्यता साध्या मजुरापेक्षां किंवा दुसऱ्या एखाद्या कामाला लागणाऱ्या श्रमापेक्षां दुप्पट असेल तर सामान्य मजुराचा किंवा सामान्य श्रमाचा जेथें एक तास मोजला जातो तेथें विशेष मजुराचें किंवा विशेष प्रकारच्या श्रमाचे प्रत्यक्ष एक तास काम झालें असूनहि दोन तास मोजावयाचें. ह्या पद्धतीनें श्रमांच्या दर्जादर्जांतील फरक तासांच्या भाषेंत व्यक्त करण्यांत येत असल्यामुळें त्या फरकामुळें श्रमसिद्धान्ताला बाधा येण्याचें कारण नाहीं. शिवाय सामाजिक दृष्ट्या आवश्यक श्रमाची कल्पना येथेंहि उपयोगी पडण्याजोगी आहे. ज्यांत कुशल-तेची अपेक्षा असते अशी कामेंहि किती वेळांत करतां येतील ह्यांचे ठोक-ताळे त्या त्या वेळची परिस्थिति लक्षांत घेऊन ठरविणें अवघड असलें तरी अशक्य नाही

**भांडवलाची दखल कशी घ्यावयाची ?**

श्रमसिद्धान्तावरील तिसरा संभवनीय आक्षेप असा कीं, मानवी श्रमाबरोबरच भांडवलरूपी वस्तूंचाहि उत्पादनांत भाग असतो, ह्या गोष्टीचा

श्रमसिद्धान्ताशी मेळ कसा घालावयाचा? एखाद्या वस्तूच्या उत्पादनाला जी यत्रसामुग्री लागते, जो कच्चा माल लागतो, जी इमारत लागते आणि ज्या अनेक गोष्टी लागतात, त्याना श्रमसिद्धान्तात स्थान कसें द्यावयाचें ? ह्या अडचणीचे निराकरण करणेहि मार्क्सला जड गेले नाही. कारण त्याच्या मते वर उल्लेखिलेल्या गोष्टी म्हणजे दुसरे-तिसरे काही नसून पूर्वीच केल्या गेलेल्या मानवी श्रमाचे प्रतीक होत. त्या वस्तू उत्पादन करण्यास जितके तास खर्च पडले असतील तितके तास ती वस्तु उत्पादन करण्यास लागणाऱ्या तासात मिळविले की भाडवलरूपी वस्तूचा उत्पादनात असणारा भाग योग्य प्रकारे व्यक्त होतो. एखाद्या वस्तूकरिता लागणारा कच्चा माल करण्यास तीन तास लागत असले व त्या कच्च्या मालापासून पक्का माल करण्यास तीन तास लागत असले तर पक्क्या मालाचे मूल्य ६ तासानें व्यक्त केले जाईल. म्हणजे ६ तासात इतर वस्तूचे जितके प्रमाण उत्पादित होईल तितके त्या वस्तूच्या मोबदल्यात मिळेल.

**वस्तूच्या उपभोग्यतेचा विचार अर्थशास्त्रबाह्य**

मार्क्सने मूल्याचा विचार करताना श्रमाचाच फक्त विचार केला. ह्याचा अर्थ असा नाही की, वस्तूची उपयुक्तता नामक काही चीज असते, ह्याची मार्क्सला जाणीवच नव्हती. मूल्याचा विस्ताराने विचार करण्यापूर्वी सुरुवातीलाच त्याने असे विधान केले की, प्रत्येक वस्तूला दोन मूल्यें असतात. एक उपयुक्तता मूल्य (Use Value) आणि दुसरें विनिमय मूल्य (Exchange Value). मात्र उपयुक्तता मूल्याचा--हल्लीच्या भाषेंत वस्तूच्या उपभोग्यतेचा--विशेष विचार करण्यास त्यानें स्पष्ट नकार दिला; कारण त्याच्या मतें उपभोग्यता अर्थशास्त्राच्या कक्षेबाहेर पडते. वस्तूची उपभोग्यता केवळ व्यक्ति व वस्तु ह्यांचा सबंध दर्शविते. अशा संबंधाशी अर्थशास्त्राला अजिबात कर्तव्य नाही; कारण त्या शास्त्राची व्याप्ति सामाजिक संबंधापुरती म्हणजे व्यक्तीव्यक्तीतील संबंधापुरती मर्यादित आहे. वस्तूचें विनिमय-मूल्य ही मात्र सामाजिक बाब आहे आणि म्हणूनच त्याचा विचार अर्थशास्त्रांत केला जातो.

**प्रचलित आर्थिक व्यवस्थेचें विश्लेषण**

मार्क्सनें प्रतिपादिलेल्या मूल्याच्या श्रमसिद्धान्ताचें स्वरूप पाहिल्यानंतर आतां त्यानें केलेल्या प्रचलित आर्थिक व्यवस्थेच्या विश्लेषणाकडे वळावयास

हरकत नाही. मार्क्सच्या मते प्रचलित आर्थिक व्यवस्थेची म्हणजे भाडवलशाहीची दोन वैशिष्टये आहेत पैकीं पहिलें हे कीं, त्या आर्थिक व्यवस्थेंत उत्पादनाच्या भाडवलरूपी साधनांवरील ताबा समाजांतील एका वर्गाच्या हातांत असतो; तर प्रत्यक्ष उत्पादनाचें म्हणजे उत्पादनास आवश्यक ते श्रम करण्याचें काम दुसरा वर्ग करीत असतो. जो वर्ग श्रम करीत असतो त्या वर्गातील लोकाजवळ उत्पादनास जरूर ती अन्य साधने नसल्यामुळे त्याना आपली श्रम करण्याची शक्ति ( Labour Power ) केवळ किमान निर्वाह ( Subsistence ) मिळविण्याकरिता उत्पादनाच्या भांडवलरूपी साधनांवर ज्याचा मालकीहक्क आहे अशा लोकाना विकावा लागतो व ते लोकहि मानवी श्रम विकत घेण्यास तयार असतात. थोडक्यांत म्हणजे भाडवलशाहीत मानवी श्रमांनाहि पर्यायाने कामगाराना बाजारात जिची खरेदी-विक्री होते अशा वस्तूचे स्वरूप प्राप्त होतें. भांडवलशाहीची ही पहिली खूण म्हणता येईल. भाडवलशाहीची दुसरी खूण किंवा दुसरे वैशिष्टय म्हणजे भाडवलवाल्याच्या वैयक्तिक फायद्याकरिता उत्पादन. भाडवलशाही जेव्हां नसते तेव्हा उत्पादनाचा आद्य हेतु केलेल्या उत्पादनाचा उपभोग हा असतो. भाडवलशाहीमध्ये मात्र उत्पादनाला चालना देण्याची जबाबदारी ज्या वर्गावर असते त्या वर्गांतील व्यक्तीचा हेतु उत्पादनाचा उपभोग हा नसून उत्पादनाकरिता होणारा खर्च व उत्पादनापासून होणारा वसूल ह्याच्यातला फरक शक्य तितका वाढवून स्वतःला पैशात मिळणारा फायदा वाढविणें हाच असतो. निराळचा शब्दांत असे म्हणता येईल की, भाडवलशाहीत द्रव्यलाभ हा उत्पादनाचा आद्य हेतु असतो. आपल्याला मिळणारा पैसा भाडवलदारांनी स्वतःच्या उपभोगाकरितां खर्च केला असता तर हा आरोप त्याच्यावर करता आला नसता. पण भाडवलदारांची वृत्ति भाडवलशाहीमध्ये अशी दिसून येते की, पैसा मिळाल्यावर त्याचा उपभोग न घेता--म्हणजे उपभोगाच्या वस्तू खरेदी करण्याकरिता त्याचा उपयोग न करता—परत शक्य तेवढया लवकर त्याचें रूपान्तर भाडवलात करावयाचे व त्याप्रकारे अधिक फायदा मिळविण्यासाठी झटावयाचें. भाडवलशाहीमध्यें पैशाचें कार्यच बदललें

आहे की काय असें वाटू लागतें. ज्या समाजात श्रमविभागणी आहे पण भाडवलशाही नाही, अशा समाजांत उत्पादकाला आपण उत्पादिलेल्या वस्तूंचे पैशात रूपान्तर करावें लागतें. कारण त्याना त्या पैशाचा उपयोग करून दुसऱ्यांनी उत्पादिलेल्या वस्तू स्वतःच्या उपभोगासाठी मिळवावयाच्या असतात. वस्तू--पैसा--पुनः वस्तू असें त्या समाजातील उत्पादनाचे व अदलाबदलीचे स्वरूप असते. भाडवलशाहीत मात्र परिस्थिति ह्याच्या उलट असते पैशाचे रूपातर भांडवलात ह्या हेतूने केलें जाते की, परत त्याचे रूपान्तर पैशात--इतकेच नव्हे तर अधिक पैशात--व्हावें. पैसा-वस्तू-अधिक पैसा असे भाडवलशाहीतील उत्पादनाचे व अदलाबदलीचे स्वरूप असते. निराळ्या शब्दात असें म्हणता येईल की, भाडवलशाहीत अदलाबदलीचे साधन ह्या पैशाच्या प्रमुख कार्याचे महत्त्व कमी होऊन अधिक पैसा निर्माण करण्याचे साधन हे पैशाचे प्रमुख कार्य होऊन बसने. स्वतःचा फायदा व त्यायोगें मिळणारा भाडवलावरील ताबा वाढविणें ही भाडवलदाराची वृत्ति वाढावी, अशीच भाडवलशाहीची समाजरचना असते. त्या समाजात ज्याच्याजवळ भाडवल अधिक त्यालाच अधिक मान मिळतो. समाजात स्थान मिळवायची ज्याला इच्छा असते अशा भाडवलदाराला भाडवल वाढवावयाच्या व त्यायोगें अधिकाधिक श्रीमत होण्याच्या स्पर्धेत भाग घ्यावाच लागतो. त्यामुळे भाडवलदाराच्या बाबतीत तरी उपभोग वाढविण्याची प्रवृत्ति व भाडवल वाढविण्याची प्रवृत्ति ह्या दोन प्रवृत्तीतील मानसिक द्वद्वात दुसऱ्या प्रवृत्तीचाच बहुनेक वेळा जय झालेला आढळतो.

## मूल्यांतील वाढाव्याचा सिद्धान्त

मूल्याचा श्रमसिद्धान्त व श्रमशक्तीला बाजारातील वस्तूचे स्वरूप ह्या दोन गोष्टीची सागड घालून मार्क्सने आपला मूल्यांतील वाढाव्याचा सुप्रसिद्ध सिद्धान्त (Theory of Surplus Value) सागितला. हा सिद्धान्त असा:--भाडवलवाला जेव्हा मानवी श्रम विकत घेतो तेव्हा तो त्याबद्दल श्रम करणाऱ्या मजुराला योग्य तो मोबदला देतो. कितो मोबदला योग्य हे श्रमसिद्धान्तानुसार ठरते. मजुरीचा योग्य मोबदला म्हणजे मजुराच्या जीवनाला आवश्यक असणाऱ्या वस्तूची श्रमसिद्धान्तानुसार होणारी किमत. मजुराला व त्याच्या

कुटुंबाला अन्नवस्त्रादि गोष्टीची जी किमान जरूरी भासत असेल तिच्या उत्पादनार्थ जितके तास श्रम करावे लागत असतील तितक्या तासाची मजुरी ही मजुराचा योग्य मोबदला समजला जाईल. समजा; एखाद्या मजुराच्या एका दिवसाच्या किमान गरजा भागविण्यासाठी चार तासांच्या श्रमाची जरुरी लागत असेल तर चार तासात मजुराकडून जेवढे काम होऊ शकेल तेवढी त्या कामाची किमत मजुराला योग्य मोबदला म्हणून दिली जाईल. पण ह्याचा अर्थ असा नाही की मजुराला काम देणारा भाडवलदार मजुराकडून फक्त चार तासाच्या कामाची अपेक्षा करील. कारण भाडवलदाराने मजुराची श्रमशक्ति विकत घेतलेली असते मजुराच्या श्रमशक्तीवर भाडवलदाराची पूर्ण मालकी असल्यामुळे ती श्रमशक्ति शक्य तितकी राबवून घेण्याची त्याला अनिर्बंधित मोकळीक असते व कामगार अधिक गरजू असल्यामुळे मालकाला ते शक्यहि असतें. असें असल्यामुळे मजुराच्या चार तासाच्या कामाचा मोबदला त्याला दिला गेला तरी मजुराकडून चार तासापेक्षा पुष्कळच अधिक काम करून घेतलें जाते समजा; चार तासाच्या कामाची किमत देऊन मजुराकडून दहा तास काम करून घेतले गेले; तर उरलेल्या सहा तासाच्या कामाची किमत मजुराला न मिळतां मालकाला मिळते. आपल्या किमान गरजा वाढविण्याकरिता जेवढा वेळ मजुरानें काम केले पाहिजे त्यापेक्षा जास्त काम मजुराकडून नेहमीच होत असल्यामुळे जी मूल्याची निर्मिति होते तिलाच उद्देशून मार्क्सने मूल्यातील वाढावा असा शब्दप्रयोग केला. स्वतःच्या किमान गरजा भागविण्यासाठी लागणाऱ्या श्रमाचे मूल्य व प्रत्यक्ष केल्या गेलेल्या श्रमाचे मूल्य ह्याच्यातील फरक—ह्या दोहोत नेहमीच दुसरे मूल्य जास्त असते—म्हणजेच वाढावा. वाढाव्याची निर्मिति फक्त भाडवलशाहीतच होते, असे समजण्याचे कारण नाही. कारण आर्थिक व्यवस्था कोणतीहि असो; मजुराच्या श्रमशक्तीचा जास्तीत जास्त उपयोग केला असतां जें उत्पादन होते त्या उत्पादनाच्या मानाने मजुराच्या किमान गरजा पुष्कळच अल्प असतात, ह्या नियमाला बाध येत नाही. हा नियम म्हणजे एक त्रिकालाबाधित असे सत्य आहे. भाडवलशाहीचे वैशिष्ट एवढेच की, वाढाव्याचा श्रम करणाऱ्या मजुराला काही उपयोग न होता तो सर्वस्वी

मालकाच्या खिशांत जातो. मजुराला स्वतःच्या श्रमशक्तीची विक्री करण्याची ज्या आर्थिक व्यवस्थेत जरुरी भासणार नाही त्या आर्थिक व्यवस्थेंत वाढाव्याचा उपयोग मजुराला आपले राहणीमान वाढविण्यासाठीं करतां येणें शक्य आहे. भांडवलशाहीत असे होत नाही. कारण मजुराला आपली श्रमशक्ति विकावी लागते व साहजिकच ज्याला ती विकली गेली आहे तो त्या श्रमशक्तीपासून होणाऱ्या उत्पादनाचा मालक होतो. त्या उत्पादनांपैकी मजुराच्या किमान गरजा भागतील इतके उत्पादन मजुराला मजुरीच्या स्वरूपात परत करणे मालकाला अपरिहार्यच असते. कारण ज्याची श्रमशक्ति विकत घेतली आहे तो कामगार श्रम करण्यास योग्य असा सतत राहील इतकी काळजी घेणे आवश्यकच असते. किमान गरजासाठी लागणाऱ्या उत्पादनापेक्षा अधिक असणारे उत्पादन---म्हणजे वाढावा---मात्र भाडवलशाहीत ज्यानें श्रमशक्ति विकत घेतली आहे तो बळकावून बसतो भाडवलदाराच्या दृष्टीने हा वाढावा म्हणजेच भाडवलदाराचा फायदा. कारण ह्या वाढाव्यामुळे भाडवलदाराचे उत्पन्न केलेल्या खर्चापेक्षा अधिक होते. मजुराच्या दृष्टीने विचार करून भाडवलदाराच्या खिशात जाणाऱ्या वाढाव्याला मजुराची लुबाडणूक (Exploitation of Labour) असे म्हणता येईल. कारण वाढाव्याची निर्मिति सहजगत्या होत असली तरी भाडवलशाहीत वाढावा शेवटी भाडवलदाराच्या खिशात जातो. खोलवर विचार केल्यास असें दिसते की, वाढाव्याची निर्मिति मजुराच्या असहाय्यतेतून झालेली असते. उत्पादनाची अन्य साधने मजुराला उपलब्ध नसतात. ह्यामुळेच केवळ मजुराला आपल्या श्रमशक्तीची विक्री करावी लागते व आपल्या श्रमशक्तीमुळे झालेल्या उत्पादनाचा मोठा व महत्त्वाचा वाटा नाहक गमवावा लागतो. असो, अशी ही मार्क्सने प्रतिपादिलेली वाढाव्याची कल्पना आहे.

**मजुरीविषयक विवेचन**

मार्क्सने वाढाव्याचा जो सिद्धान्त सागितला त्यातच मार्क्सचा मजुरी-सिद्धान्त (Theory of Wages) व नफा सिद्धान्त (Theory of Profits) अंतर्भूत आहेत भांडवलशाहीत मजुराला जीवनातील किमान गरजा किमान मर्यादेपर्यंतच भागतील इतकेच वेतन मिळत असते. ह्याचा अर्थ अस

नव्हे की तें कधींच त्या पातळीच्या वर जात नाहीं. कधीं कधी तें त्या पातळीच्या वरहि जाऊ शकते. कारण कोणत्याहि परिस्थितींतील बाजारी मजुरी (Market Wages) भांडवलदारांच्या आपापसांतील चढाओढीमुळें ठरतें, ह्याची मार्क्सला जाणीव होती. भाडवलदाराची आपापसातील चढाओढ तीव्र स्वरूपाची असेल तर त्याचा परिणाम मजुरीवर होऊन किमान पातळीपेक्षा मजुरी अधिक होणें अगदी साहजिक आहे; पण तो परिणाम तात्पुरचाच रहाणार. कारण विशिष्ट मर्यादेपलीकडे मजुरीची पातळी गेली असता ती पूर्वस्थितीला ज्यामुळे यावी असे आघात मजुरीवर करणाऱ्या बाबी भाडवलशाहीत नेहमीच असतात. मार्क्सच्या मतें भाडवलशाहीत मजुरीवर आघात करणारी सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे कामगारांचे राखीव सैन्य (Reserve Army of Labour). भांडवलशाहीत कमी जास्त प्रमाणात जी बेकारी नेहमीच आढळते तिला उद्देशून मार्क्सनें कामगाराचें राखीव सैन्य हा शब्दप्रयोग वापरला. सदैव हजर असणाऱ्या बेकारीचा परिणाम असा होतो की, मजुरीची पातळी थोडी वर जाऊं लागली की कामावर जाणाऱ्या मजुरांत व बेकार मजुरात चढाओढ होऊं लागते व बेकार मजूर कोणत्याहि मजुरीवर काम करण्यास साहजिकच तयार असल्यामुळें मजुरीची वर जाऊं लागलेली पातळी पुनः खाली येऊं लागते. भांडवलदारांच्या आपआपसातील चढाओढीमुळे बेकारी पूर्णपणें नाहींशी झाल्यासच मजुरी कायमपणे वाढण्याचा प्रश्न असतो; पण असे सहसा होत नाही. कारण ज्यायोगें बेकारीत वाढ व्हावी असे प्रवाह भांडवलशाहीत सदा वाहत असतात. त्यांतील सर्वांत प्रमुख प्रवाह म्हणजे मानवी शक्तीकडून होणारी कामें अन्य शक्तीकडून करून घेणाऱ्या नवनवीन यंत्रांचा शोध. वैयक्तिक फायदा वाढविणे हाच ज्या आर्थिक व्यवस्थेचा आद्य हेतु आहे त्या आर्थिक व्यवस्थेंत उत्पादनखर्च कमी करणाऱ्या नवीन गोष्टी उत्पादकांकडून वापरल्या जाव्या ह्यांत नवल कांहीच नाही. त्या गोष्टी बहुशः उत्पादनाचें कामगारांवरील अवलंबित्व कमी करणाऱ्या—म्हणजेच उत्पादनार्थ लागणाऱ्या मानवी श्रमांत बचत करणाऱ्या—अशा असतात. ह्याचा परिणाम बेकारी वाढण्यांत न झाला तरच नवल! ज्या वेळी मजुरी वाढण्याचा संभव दिसू लागतो त्यावेळीं तर मानवी श्रमांत बचत

करणारी उत्पादनपद्धति वापरण्याच्या भाडवलदारांच्या उद्योगाना ऊतच येतो. राखीव सैन्यातील भरती सतत चालू असल्यामुळे त्या सैन्यांतील सैनिकाची संख्या भांडवलदाराच्या दृष्टचा भयानक इतकी कमी सहसा होत नाहीं व त्यामुळें मजुरीच्या वाढीवर आपोआपच नियत्रण बसते. मजुरीच्या वाढीवर नियंत्रण हा परिणाम माल्थसच्या लोकसंख्येच्या सिद्धान्तातहि अतर्भूत आहे. म्हणून येथे हे मुद्दाम सागितले पाहिजे की, मार्क्सला माल्थसचा लोकसख्येचा सिद्धान्त अजिबात मान्य नव्हता. तो त्या सिद्धान्ताला गावढळ समजत असे. म्हणूनच त्याने मजुरीवरील नियत्रण व लोकसख्येतील वाढ हंयाची सागड घातली नाही. मजुराचें राखीव सैन्य निर्माण होण्यास व वाढ-ण्यास लोकसंख्या वाढलीच पाहिजे असे काही नाही. लोकसख्या स्थिर असता अगर ती कमी होत असताहि लोक बेकार असू शकतात. बेकारीचे मुख्य कारण मार्क्सच्या मतें उत्पादनाचे यात्रिकीकरण करून मानवी श्रमात बचत करणें हृया भाडवलदाराच्या प्रवृत्तीत आढळतें.

**नफ्यासंबंधानें विचार**

मार्क्सचे नफ्यासबंधीचे विचार त्याच्या भाडवलशाहीच्या विवेचनात महत्त्वाचे असल्यामुळे विशेष खुलासेवार समजून घेणे प्राप्त आहे भाड-वलवाल्यांचा नफा म्हणजे त्याच्या खिशांत पडणारा वाढावा. वाढावा वाढला की, एकूण नफा वाढतो. वाढावा कमी झाला की एकूण नफा कमी होतो एकूण नफा जरी मजुरी व वस्तुमूल्य हृयाच्यातील फरकावर म्हणजे वाढाव्यावर अवलबून असला तरी नफ्याचा दर किती हे ठरवितांना मजुरी व वाढावा हृयाचा सबंधच विचारात घेऊन चालत नाही; तर वाढाव्याचा म्हणजे एकूण नफ्याचा उत्पादनांत गुंतवलेल्या एकूण भाडवलाशी काय संबंध असतो हे विचारांत घ्यावे लागते. कारण नफ्याचा दर म्हणजे $\frac{\text{एकूण नफा}}{\text{एकूण भाडवल}}$

उत्पादनांत गुतविलेल्या भांडवलाचे मार्क्सनें दोन भाग पाडले. पहिल्या भागांत यंत्रसामुग्री, इमारत, कच्चा माल, इत्यादि भांडवलरूपी वस्तूवरील खर्चाचा अंतर्भाव करून त्याला स्थिर-भाडवल (Constant Capital) असें नांव मार्क्सनें दिलें. दुसऱ्या भागांत मजुरीची गणना करून

—मजुरी भांडवलस्वरूपच असते. कारण उत्पादनाची किंमत वसूल होण्यापूर्वीच ती द्यावी लागते—त्याला **चर-भांडवल** (Variable Capital) असे नाव मार्क्सनें दिले. स्थिर-भाडवलाचे चर-भाडवलाशी जे प्रमाण असतें त्याला उद्देशून भांडवलाची घटना (Organic Composition of Capital) असा मार्क्सनें शब्दप्रयोग केला. भांडवलाच्या घटनेत अंतर्भूत असलेल्या दोन भागापैकी स्थिर-भाडवलांत वाढावा म्हणजे नफा निर्माण करण्याची कुवत नसते. स्थिर भाडवलावरील खर्च वस्तूच्या उत्पादन-खर्चांत जसाच्या तसा अतर्भूत होतो इतकेच. वाढावा सर्वस्वी चर-भाड-वलांतून निर्माण होतो. असें असलें तरी नफ्याचा दर पहातांना स्थिर-भाडवलहि लक्षात घ्यावे लागते. ह्या सर्व गोष्टी लक्षात घेतां

$$\text{नफ्याचा दर} = \frac{\text{चर-भांडवलांतून उद्भवणारा वाढावा}}{\text{स्थिर-भाडवल} + \text{चर-भाडवल}}$$

असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. तात्त्विक दृष्ट्या नफ्याचा दर व वाढाव्याचा दर ह्यामध्यें भिन्नता दाखविता येण्याजोगी आहे. वाढाव्याच्या दराचा विचार करतांना केवळ चर-भाडवलाची दखल घ्यावी लागते. $\frac{\text{वाढावा}}{\text{चर-भाडवल}}$ म्हणजेच वाढाव्याचा दर. स्थिर-भांडवलांत वाढावा निर्माण करण्याची कुवत नसली तरीसुद्धा नफ्याचा दर पहाताना ते भाडवल विचारांत घ्यावे लागत हे पहाता नफ्याचा दर वाढविण्याच्या दृष्टीने उद्योगपतीमध्ये स्थिर-भाडवल (त्याच्या जोडीने वापरलेले चर-भाडवल वाढवून) जास्तीत जास्त राबवून घेण्याची प्रवृत्ति का आढळावी ह्यावर चागला प्रकाश पडतो.

### नफ्याचा दर सर्वत्र सारखा होण्याची प्रवृत्ति

नफ्याच्या दरासबधाने मार्क्सने दोन महत्त्वाच्या गोष्टी सागितल्या-पैकी पहिली ही की, भाडवलशाहीत सर्व वस्तूच्या उत्पादनात नफ्याचा दर सारखा होण्याची प्रवृत्ति आढळते ह्याला कारण जास्तीत जास्त नफा मिळविण्याची वृत्ति. ह्या वृत्तीमुळे उत्पादनाच्या ज्या विभागात नफा अधिक सुटत असेल त्या विभागाकडे भांडवलाचा ओघ इतर विभागातून वळतो. अर्थातच त्या विभागांत भांडवल वाढून नफ्याचें मान कमी होते. इतर विभागांत भांडवल कमी होऊन त्या मानानें नफा वाढतो. असे

असल्यामुळें खुली चढाओढ असता कोणत्याहि एका उद्योगधद्यात इतर उद्योगधद्याच्या मानाने नफा जास्त अशी परिस्थिति टिकूच शकत नाही. नफ्याचा दर सर्वत्र सारखा होतो हा मार्क्सचा सिद्धान्त स्वीकारताना एक अडचण उपस्थित होते. ती अशी की, श्रमसिद्धान्तानुसार मूल्य व सारख्या दरानें नफा ह्या गोष्टी सुसंगत ठरतीलच असें नाही. उदाहरणार्थ, असे समजू की अ ह्या वस्तूच्या उत्पादनांत स्थिर-भांडवल २०, चर-भाडवल ३० व वाढावा ३० अशी परिस्थिति आहे व ब ह्या वस्तूच्या उत्पादनात ३० स्थिर-भाडवल, २५ चर-भाडवल व २५ वाढावा आहे. श्रमसिद्धान्तानुसार दोन्ही वस्तूची किमत सारखीच म्हणजे ८० होईल. दोहोंत वाढाव्याचा दर सारखाच आहे हे स्पष्टच आहे. तरीहि दोहोंत नफ्याचें प्रमाण मात्र भिन्न आहे. एकांत ५० वर ३० नफा तर दुसऱ्यात ५५ वर २५ नफा. दोहोत सारखा नफा सुटावयाचा असेल तर दोन्ही वस्तू ८० ला विकतां येत नाहीत; पण तसे केल्यास श्रमसिद्धान्ताच्या तत्त्वाला बाधा येते; कारण त्या तत्त्वाप्रमाणे वस्तूची किमत म्हणजे स्थिर-भांडवल + चर-भांडवल + वाढावा. ह्या अडचणीतून सुटायला दोन मार्ग आहेत सर्व वस्तूच्या बाबतीत भांडवलाची घटना सारखी असते, असें गृहीतच धरावयाचे हा एक मार्ग व नफ्याचा दर सारखा होण्याची प्रवृत्ति जोरदार असल्यामुळें प्रत्यक्ष बाजारातील किमती पूर्णपणें श्रम-तत्त्वानुसार ठरत नाहीत हे कबूल करणे हा दुसरा मार्ग. पैकी सुरवाती-सुरवातीच्या विवेचनात मार्क्सने पहिला मार्ग स्वीकारला; पण तो कायमचा स्वीकारणें त्याला शक्य नव्हते. कारण तसे करणे वास्तवतेला सोडून होईल ह्याची त्याला जाणीव होती. भाडवलाची घटना ही बहुताशी तात्रिक बाब असल्यामुळे सर्व वस्तूच्या बाबतीत ती सारखी असेल असे मुळीच समजता येत नाही. तात्त्विक चर्चा करताना काही काळ तसे गृहीत धरावयास हरकत नाही; पण केव्हांतरी त्या गृहीतकृत्याचा त्याग करणें जरूर आहे मार्क्सनें असेंच केलें व नतरच्या विवेचनांत वरीलपैकीं दुसरा मार्ग स्वीकारला. वस्तुमूल्याचें किमतीत रूपान्तर होतांना भाडवलशाहीतील बाजारात काहीं वस्तू त्यांच्या वास्तविक मूल्यापेक्षां जास्त किमतीला विकल्या जातात असें त्यानें प्रतिपादिलें वर घेतलेल्या उदाहरणांत नफ्याचा दर सारखा व्हावयाचा असेल तर दोन्ही वस्तूची किमत ८० होऊन चालावयाचें नाही. अ ही वस्तु

८० पेक्षां थोडचा कमी किमतीला व ब ही वस्तू ८० पेक्षां थोडचा जास्त किमतीला विकली गेली तरच नफा सारखा होईल.

यावर असा प्रश्न उपस्थित होतो की सर्वत्र नफा सारखा होतो, ह्या भाडवलशाहीतील प्रवृत्तीची योग्य दखल घ्यावयाची असल्यास मूल्याच्या श्रमतत्त्वाचा त्याग करावयास हवा का? मार्क्सच्या प्रतिकूल टीकाकारांचें म्हणणे तसें होतें. मार्क्सला मात्र तसे वाटत नव्हते. त्याचे असे म्हणणें कीं, प्रत्यक्ष बाजारातील वैयक्तिक वस्तूच्या किमती श्रमतत्त्वापासून थोडचा-फार ढळत असल्या तरी त्यामुळें मुख्य मूल्यतत्त्वाला बाध येत नाहीं. एकूण वस्तूचे एकूण मूल्य त्यावर खर्च झालेल्या श्रमाइतकेच असते. त्यातील मजुराचा वांटा श्रममूल्यतत्त्वानुसारच ठरतो. अर्थातच भाडवलवाल्याचा एकूण फायदा म्हणजे एकूण वाढावा त्या तत्त्वानुसारच ठरतो. वैयक्तिक किमती ठरल्या जातांना जें काय होतें ते एवढेच की एकूण वाढावा सर्व भांडवलदारावर सारख्या दराने वांटला जातो. ह्या दराने प्रत्येक भाडवल-वाल्याला त्याच्या एकूण भाडवलाच्या मानानें नफा मिळतो.

**भांडवलशाहीचा विकास नफ्याच्या वाढीला बाधक**

नफ्यासबंधानें मार्क्सनें सागितलेली दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे भाडवलशाहीच्या विकासाबरोबर नफ्याचा सरासरी दर कमी होत जातो हा त्याचा सिद्धान्त. ह्यासंबधात मार्क्सने सागितलेली कारण-मीमासा लक्षात घेतां हा सिद्धान्त पुढीलप्रमाणें सांगता येईल :— भांडवलशाहीमध्ये भाडवलाची वाढ होण्याची क्रिया सतत चालू असते. ह्याचें मुख्य कारण म्हणजे वैयक्तिक नफा वाढवावयाचा हीच गोष्ट डोळ्यापुढे ठेवण्याची भाडवलदाराची वृत्ति. ह्या वृत्तीमुळें वाढाव्याच्या रूपानें नफा खिशांत पडला की भांडवलदार त्याचे रूपान्तर त्वरित भांडवलांत करतात. ह्यामुळें भांडवलशाहीत भाडवलांत वाढ सारखी होत असते. भाडवलात जी वाढ होते ती मुख्यतः स्थिर-भांडवल म्हणजे यंत्रसामुग्री इमारती इ. ह्या भांडवलाच्या विभागांत होते. ह्या विभागातच विशेष वाढ होते; ह्याचें कारण असें की, उत्पादनाच्या पद्धतींत सुधारणा करून उत्पादनखर्च शक्य तेवढा कमी करावयाचा व त्या प्रकारे मजुरांची उत्पादनशक्ति वाढवून वाढाव्याच्या रूपानें मिळणारें उत्पन्न शक्य तेवढें

वाढवावयाचें; ह्याकरितां भाडवलवाले सतत धडपड करीत असतात व त्यासाठीं म्हणून भांडवलावरील खर्चाचा ओघ स्थिर-भांडवलाकडे वळविणें त्यांना जरूर वाटतें. उत्पादनपद्धतींत सुधारणा होण्यास यांत्रिक सुधारणा होणें व त्याबरोबर सुधारलेल्या प्रकारच्या यंत्रसामुग्रीची निर्मिति होणें अत्यावश्यक असते आणि ही गोष्ट तर स्थिर-भांडवलांत वाढ झाल्याशिवाय शक्य नसते. स्थिर-भांडवलात चर-भांडवलाच्या मानानें अधिक वाढ झाल्यास परिणाम असा होतो की, ज्या प्रमाणांत भाडवलांत वाढ होते त्या प्रमाणांत वाढाव्यात वाढ होत नाहीं. कारण वाढाव्यांत वाढ होण्याच्या दृष्टीनें स्थिर भांडवलांचा काही उपयोग होत नाही. वाढावा फक्त चर-भाडवलांतून निर्माण होत असल्यामुळें चर भाडवलातील वाढीचाच वाढाव्याशी संबंध असतो. चर भाडवल जर स्थिर भाडवलाच्या प्रमाणात वाढलें नाही तर त्याचा अर्थ असा होतो की, ज्या प्रमाणात एकूण भाडवल वाढतें त्या प्रमाणात त्या भाडवलापासून मिळणारा एकूण नफा वाढत नाही. ह्याचाच दुसरा अर्थ असा की, नफ्याचें मान केवळ अगर मुख्यत स्थिर-भाडवलात वाढ झाल्यास कमी होते. स्थिर-भाडवलांत वाढ होण्याची क्रिया भाडवलशाहीत सतत चालू असते, ही गोष्ट मान्य केल्यास मार्क्सच्या मतानें नफ्याचा दर कमी होणे ही गोष्ट क्रमप्राप्तच आहे. स्थिर-भाडवलात वाढ होऊनहि नफ्याचे प्रमाण कमी होऊ द्यावयाचे नसेल तर भाडवलदाराच्या हातात एकच उपाय असतो. तो म्हणजे मजुराची लुबाडणूक अधिक प्रमाणांत करून वाढावा वाढवावयाचा. मजुराचे कामाचे तास वाढविणे, त्याची मजुरी कमी करणे, इत्यादि उपायानी वाढावा वाढवतां येतो; पण हे उपाय किती झाले तरी तात्पुरत्या स्वरूपाचेच. ह्या उपायाचा अवलंब करण्यात अडचणी असतात व त्यामुळे त्यांचा अवलब मर्यादित राहाणार. सतत वाढणाऱ्या स्थिर भाडवलापुढे हे उपाय फार टिकाव धरूं शकत नाहीत. त्यामुळे भाडवलशाहीच्या विकासाबरोबर नफ्याचें प्रमाण कमी होत जाणें ही गोष्ट अटळ ठरते.

### व्यापारचक्र भांडवलशाहीचा अंगभूत भाग

नफ्याचा दर कमी होण्याची भांडवलशाहीमध्यें जी प्रवृत्ति आढळते तिचा व भाडवलशाहीमध्यें आढळणाऱ्या व्यापारचक्राचा (Trade Cycle)

अगदी नजीकचा सबंध आहे. व्यापारचक्रामुळे आर्थिक दु:स्थिति वारंवार निर्माण होते. आर्थिक दु:स्थितीची परिस्थिति निर्माण झाली असता उत्पादन कमी होते, बेकारी वाढते इत्यादि गोष्टी आर्थिक व्यवस्थेत दृष्टोत्पत्तीस येतात. ह्या गोष्टी निर्माण करणाऱ्या आर्थिक दु:स्थितीचा उगम कमी होणाऱ्या नफ्याच्या प्रमाणात आढळतो. नफ्याचा दर जो इष्ट आहे असें भाडवलवाले समजतात अगर ज्या दराची भांडवलवाल्याना संवय लागलेली असते त्यापेक्षां जेव्हा नफ्याचा दर कमी होतो त्यावेळीं वाढाव्याचें रूपातर भांडवलांत करण्याचें कार्य भांडवलवाले काही वेळ थांबवितात. ह्या काळात भांडवलांत वाढ होण्याचे थांबते; एवढेच नव्हे तर भांडवलाची गुंतवण कमी होऊं लागते. त्यामुळे अर्थातच उत्पादन कमी होणें, कमी झालेल्या उत्पादनार्थं कमी मजूर लागत असल्यामुळें बेकारी वाढणे ह्या गोष्टी आर्थिक व्यवस्थेंत दिसू लागतात. भाडवल कमी होण्याची क्रिया काही काळ चालू राहिली की, नफ्याचे प्रमाण त्या कारणामुळेच आपोआप वाढते. नफ्याचे प्रमाण वाढलें की गुतविल्या गेलेल्या भाडवलात वाढ, उत्पादनात वाढ, बेकारी कमी होणें इत्यादि गोष्टी होऊन उद्योगधंद्यास आलेल्या ओहोटीचे भरतीत रूपान्तर होतें. हा भरती–ओहोटीचा खेळ भाडवलशाहीत नेहमीच चालू असतो; कारण भाडवलदाराचें सारे लक्ष नफ्यावर असते व भाडवलाच्या कमीजास्त होण्यामुळे नफ्याचे प्रमाणहि कमीजास्त होत असतें. मार्क्सने सागितलेली व्यापारचक्राची कारणे व परिणाम सनातनवादाच्या चहात्यानाहि मान्य होण्याजोगे आहेत. पण त्यांच्या व मार्क्सच्या व्यापारचक्राच्या विवेचनात एक महत्त्वाचा फरक आहे. तो फरक असा की सनातनवाद्यांच्या मतानें व्यापारचक्र ही भाडवलशाहीचा तोल संभाळणारी एक गोष्ट आहे तर मार्क्सच्या मते असे दिसते की व्यापारचक्रातच भाडवलशाहीच्या अंतिम नाशाची बीजे आढळतात. भाडवलशाहीचें मार्क्सने केलेले विश्लेषण पूर्णपणे समजण्यासाठी वारंवार निर्माण होणारी आर्थिक दु:स्थिति शेवटी भाडवलशाहीला कशी व का मारक ठरते हें पाहिलें पाहिजे.

**व्यापारचक्र शेवटीं भांडवलशाहीला मारक ठरतें**

आर्थिक दु:स्थितीचा उगम नफ्याचें मान कमीकमी होण्याच्या प्रवृत्तीत आढळतो. आर्थिक दु:स्थितीचा उगम केवळ त्यातच असता तर ती स्थिति

तात्पुरतीच ठरून भाडवलशाहीला मारक ठरली नसती, पण आर्थिक दुःस्थिति होण्याचें त्याहूनहि एक मूलग्राही कारण भाडवलशाहींत सांपडतें. तें असें कीं, उत्पादनाच्या साधनांत भांडवलशाहींत सारखी वाढ होत असते. स्थिर-भांडवलात वाढ म्हणजे उत्पादन-साधनातच वाढ. व्यापाराला ओहोटी येते त्यावेळी ही वाढ कमी होते, हें खरे असलें तरी सर्वसाधारणपणें स्थिर भाडवल सारखे वाढतच असतें. शिवाय तुलनेनें वाढीचें प्रमाण कमीजास्त होत असलें तरी एकूण स्थिर भाडवल वाढत राहतें कारण जात्याच स्थिर-भाडवल बहुत काळ टिकणारें असें असतें. उत्पादनाचीं साधनें वाढतात, पण उत्पादनाच्या साधनांकडून होणाऱ्या उत्पादनाचा पूर्णपणें उपभोग घेतला जावा अशी परिस्थिति मात्र भाडवलशाहीत निर्माण होत नाही. भाडवलशाहीन समाज भाडवलवाले व मजूर ह्या दोन वर्गांत मुख्यतः विभागला जातो. ह्या दोन्ही वर्गाकडून ह्या नाही त्या कारणानें उत्पादनाचा भरपूर उपभोग घेतला जात नाही. मजूरवर्गाकडून तो घेतला जात नाही, कारण त्याना मिळणारे वेतन त्यांना किमान जरुरीच्या वस्तू अगदीं किमान प्रमाणांतच घेता याव्यात एवढ्या पुरतेंच असतें. ह्यापेक्षा जास्त उत्पादन झाल्यास त्याचा उपभोग घेण्याची कुवत ह्या वर्गांत नसते. भाडवलवाल्यांत तशी कुवत असते; पण आपल्या उत्पन्नाचा उपभोग घेण्याकडे व्यय करण्यापेक्षा त्याचें भाडवलात रूपान्तर करण्याचीच वृत्ति त्या वर्गांत अधिक आढळते. ह्या सर्वांचाच परिणाम उत्पादन जरुरीपेक्षां अधिक होण्यांत होतो. जरुरीपेक्षा उत्पादन अधिक ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, सर्वांच्या गरजा चांगल्या रीतीने भागल्या जातात. उत्पादन जरुरीपेक्षां अधिक ह्याचा भाडवलशाहीच्या कोशांतील अर्थ एवढाच की, जें उत्पादन झाले आहे ते स्वतःच्या उपभोगासाठी खरेदी करण्याइतकी शक्ति वा इच्छा लोकात नाही. ह्या अर्थाने भाडवलांत वाढ करण्याच्या भाडवलवाल्याच्या प्रवृत्तीमुळे वाजवीपेक्षा उत्पादन अधिक असण्याची (Over Production) किंवा निराळ्या शब्दांत तीच गोष्ट सांगावयाची असेल तर उत्पादनाच्या मानाने उपभोग कमी असण्याची परिस्थिति ( Under Consumption ) भाडवलशाहीत वारवार प्रतीत होते. ह्या परिस्थितीमुळेच मुख्यतः वर सांगितल्याप्रमाणें

नफ्याचें प्रमाण कमी होऊन आर्थिक स्थितीला ओहोटी येते. त्यामुळें उत्पादनच कमी होऊन ओहोटीचें रूपान्तर परत भरतींत होण्याची परिस्थिति निर्माण होत असली तरी एक गोष्ट अशी होते की, प्रत्येक खेपेची ओहोटी पूर्वी आलेल्या ओहोटीपेक्षां अधिक दुःस्थिति-जनक होत असते. ह्याचे कारण असें कीं, प्रत्येक खेपेस पूर्वीच्या मानानें भाडवलाचे व म्हणून उत्पादनाचें प्रमाण अधिक असल्याने उपभोगाची कमतरता अधिकच भासते. प्रत्येक खेपेच्या ओहोटीनें आर्थिक स्थिति अधिक वाईट होऊ लागली तर ज्यातून ह्या गोष्टी उद्भवतात ती आर्थिक व्यवस्थाच कोलमडून पडण्याच्या मार्गाला कालान्तरानें लागणे सहज शक्य आहे. हे खरे असेल तर वारवार होणाऱ्या दुःस्थितीमुळे भाडवलशाहीचाच नाश होणे अगदी अटळ आहे.

भाडवलशाहीचा केव्हांतरी शेवट होणारच ही कल्पना मार्क्सनें केलेल्या भाडवलशाहीच्या विश्लेषणातच अभिप्रेत आहे असें नव्हे; तर मार्क्सचे तत्त्वज्ञान व त्या तत्त्वज्ञानाच्या आधारे त्याने केलेला इतिहासाचा खुलासा व त्यावरून भविष्यकालासबधी बाधलेली अनुमाने ह्यातहि अभिप्रेत आहे. त्या सर्व गोष्टी मार्क्सच्या अर्थशास्त्राशीं अगदी निगडीत असल्यामुळें समजून घेणें अगत्याचे आहे.

### विरोध-विकासाचें तत्त्वज्ञान

मार्क्सचें तत्त्वज्ञान विरोध-विकासवाद (Theory of Dialectics) ह्या नावानें प्रसिद्ध आहे. विरोध-विकासवादाचे तत्त्व प्रथमत. हेगेल ह्या विख्यात तत्त्ववेत्त्यानें सांगितलें. हे तत्त्व त्याला वादकलेवरून सुचलें. वादविवाद चालू असतां असा अनुभव नेहमी येतो कीं, एखादा मुद्दा प्रथम सुचला की नंतर त्याला सर्वस्वी विरोधी असा मुद्दा सुचतो. त्याला उत्तर देण्यासाठी पहिला मुद्दा माडणाऱ्याला त्यापेक्षां अधिक चांगला मुद्दा मांडणें जरूर होतें. त्यालाहि विरोध झाला की, त्यांतून त्याहीपेक्षां चांगला मुद्दा उद्भवतो. असें हें सत्र सतत चालू राहतें व त्यामुळें विवाद्य विषयाला अधिकाधिक स्पष्टता येत जाते. साराश--'वादे वादे जायते तत्त्वबोधः' हें वचन आपल्याकडे सुपरिचित आहे. वादविवादांत नेहमींच विरोधातून विकास म्हणजे पुढली पायरी हा अनुभव येतो. व्यक्ति स्वतंत्र-

पणें विचार करू लागली तरी तसाच अनुभव येतो; पण वादविवादांत त्या अनुभवाची विशेष जाणीव होते. वादविवादांत आढळणाऱ्या ह्या तत्त्वालाच हेगेलनें इतिहासाचा खुलासा करणाऱ्या तत्त्वज्ञानाचा दर्जा दिला. तो देतांना वादकलातत्त्व ( Dialectic ) असे यथार्थ नाव त्याला त्यानें दिलें. वादकलातत्त्वावरून त्याने मांडलेल्या तत्त्वज्ञानाचा आशय असा :—जगतांत स्थिर असें काही नाही. त्यामुळें जगतातील प्रत्येक गोष्टींत बदल होण्याची क्रिया सतत चालू असते. बदल सर्वंच व सर्वकाळ आढळत असल्यामुळे बदल होणें हें जगताचे वैशिष्टय मानले पाहिजे. जगताच्या निरनिराळ्या अगोपागात जो बदल नेहमी होत असलेला आढळतो त्या बदलामागें एक विशिष्ट नियम आहे असेहि आढळून येते. तो नियम म्हणजे विरोधातून विकास होत जाणें. ह्या बाबतीत जरा खोलवर विचार केला तर असे वाटू लागते की, विरोध व विकास ह्या दोन्ही गोष्टी एकच आहेत की काय ? कारण अनुभव असा येतो की, विकासाचा एखादा टप्पा गाठला गेला की त्यातूनच त्याला विरोधी असे अतर्गत प्रवाह सुरू होतात. तेच प्रवाह शेवटी त्या टप्प्याला बाधक ठरतात. जेव्हा त्या प्रवाहांचा जोर अधिक होतो तेव्हां विकासाचा पुढला टप्पा गाठला जातो. तो टप्पाहि अर्थातच शाश्वत स्वरूपाचा नसतो. कारण त्या टप्प्यांतूनहि विरोधी प्रवाह निर्माण होऊन त्यांची परिणति पुढील टप्प्यात होते. अशा तऱ्हेने विरोध–विकास—विरोध–विकास हे सत्र सारखे चालू असते तात्त्विकदृष्टचा तरी ह्या सत्रात खड पडण्याचे कोणतेंच कारण दिसत नाही. त्यामुळे जगांतील कोणतीहि गोष्ट शाश्वत स्वरूपाची आहे किंवा जगतात होत असणारा बदल आज ना उद्या केव्हातरी थाबेल असे म्हणण्याला कांहीच अर्थ उरत नाही.

**आर्थिक व्यवस्था विरोध–विकास–तत्त्वाला अपवाद नाहीं**

विरोध–विकासाचें तत्त्व भांडवलशाहीला लावलें तर —आणि ते लावतां येते; कारण आर्थिक व्यवस्था त्या तत्त्वाला अपवाद नाही—असें सहजच म्हणतां येतें की, भांडवलशाही हा जगाच्या आर्थिक इतिहासांतील केवळ एक टप्पा आहे. हा टप्पा त्याच्या पूर्वीच्या टप्प्यात म्हणजे—मार्क्सनें दाखवलेले टप्पे लक्षांत घेतां—सरंजामशाहींत आपसूकच निर्माण झालेल्या

विरोधी प्रवाहांतून निर्माण होतो. सरंजामशाहीत उत्पादनाचे मुख्य साधन जी जमीन तिच्यावर सरंजामदाराचा ताबा असतो आणि प्रत्यक्ष जमिनीवर राबणारा बहुसख्य मजूरवर्ग सरजामदारांचा अक्षरश: गुलाम असतो. ह्या दोन वर्गांतील संघर्ष सरंजामशाहीतील प्रमुख अतर्गत विरोधी प्रवाह असतो. त्याशिवाय सरंजामशाहीकडून तिलाच घातक अशा एका वर्गाला जन्म दिला जातो. तो वर्ग म्हणजे लहान-मोठ्या व्यापाऱ्यांचा. ह्या व्यापाऱ्याकडूनच शेवटी सरजामशाहीचा शेवट केला जातो व त्यांच्या प्रयत्नातूनच प्रचलित भांडवलशाहीचा उदय होतो.

### भांडवलशाही अंतर्गत विरोधी प्रवाह

विरोध–विकासाच्या तत्त्वानुसार भाडवलशाहीतहि अतर्गत विरोधी प्रवाह आपसूकच निर्माण होतात. भाडवलशाहीला मारक ठरणारे विरोधी प्रवाह मुख्यत: सहा आहेत. ते असे ––(१) उत्पादनपद्धतीत जसजशी सुधारणा होत जाते तसतशी कामगाराची हलाखी वाढतच जाते. त्याचें कारण असें की––उत्पादनपद्धतीतील कोणतीहि सुधारणा––मग ती श्रमविभागणीच्या स्वरूपाची असो, उत्पादनाचे प्रमाण वाढण्याची असो किंवा उत्पादनाचें यांत्रिकीकरण होण्याची असो––उत्पादनार्थ आवश्यक असणाऱ्या मजुराची सख्या कमी करते. त्यामुळे बेकारी वाढते व बेकारीच्या दाबामुळे असणाऱ्यांचें वेतन कमी होते साहजिकच मजूरवर्ग असंतुष्ट होतो. जी वास्तविक सुधारणा असते तीच असतोषाची जनक ठरते. (२) भांडवलशाहीचा व्यवहार चढाओढीच्या तत्त्वावर चालण्यासाठी व सुकर होण्यासाठी स्वतंत्र, नागरी जीवनास सरावलेला, एकत्र येऊन काम करणारा व ज्यांतील काही भाग तरी वाकबगार आहे असा कामगारवर्ग हवा असतो. पण असा कामगारवर्ग एकदा निर्माण झाला की तोच शेवटी भाडवलशाहीच्या मुळावर येतो. कारण अशा वर्गांतूनच कामगारसंघटनेस आवश्यक असे खतपाणी मिळतें. (३) भांडवलशाहीत जे दोन वर्ग असतात त्यांचे हितसबध अगदी भिन्न असतात. वास्तविक पाहता जें उत्पादन मजुराकडून होते त्याचा पुष्कळच मोठा भाग भाडवलवाले भाडवलावरील मालकी हक्काच्या जोरावर लुबाडतात. आपल्या शक्तीच्या जोरावर जे उत्पादन केले आहे त्यात वाटा अकारण द्यावा लागावा ही गोष्ट कामगारवर्गास समजू

लागल्यावर वावगी वाटते हें तर खरेंच; पण त्याशिवाय आणखीहि एक गोष्ट अशी असते की, एकाच्या उत्पन्नांतील वाढ दुसऱ्या वर्गाचे उत्पन्न न वाढण्यावर अगर कमी होण्यावर अवलंबून असते. त्यामुळे वर्गसंघर्ष भांडवलशाहीत अगदी अटळच असतो. भांडवलशाहीच्या विकासाबरोबर दोन्ही वर्गांना सुखाचे दिवस येण्याऐवजी वर्गसंघर्ष अधिकच तीव्र होऊं लागतो. कारण नफ्याचें प्रमाण कमी होऊ लागतें व ते पूर्वपदाला आणण्यासाठी भांडवलवाला मजूरवर्गाची अधिक लुबाडणूक करण्याच्या योजना आंखूं लागतो. कामगारवर्ग अर्थातच अधिक तीव्रपणें त्या प्रयत्नांना विरोध करतो. (४) चढाओढीच्या तत्त्वावर आर्थिक व्यवस्थेची उभारणी होण्यानेंच प्रथम भांडवलशाहीचा विकास होऊ शकतो; पण चढाओढ शेवटी चढाओढीलाच मारक ठरते. चढाओढ चढाओढीला व पर्यायाने भाडवलशाहीला मारक ठरते ती दोन कारणांमुळे. पहिले कारण हें की आपला उत्पादनखर्च कमी व्हावा ह्या ईर्षेने चढाओढीत भाग घेणारे मोठ्या प्रमाणावर यांत्रिक उत्पादनाचा आर्थिक व्यवस्थेत प्रवेश करवितात. ह्या गोष्टी प्रमाणाबाहेर वाढल्या की चढाओढ फार काळ टिकाव धरूं शकत नाही. कारण कोणत्याहि वस्तूचे उत्पादन अनेक लहान उत्पादकाकडून होणें तात्त्विक दृष्टया अशक्य ठरते. मोठ्या प्रमाणावरील उत्पादनच उत्पादनखर्चाच्या दृष्टीने सोईस्कर. अशी परिस्थिति एकदा निर्माण झाली की, उत्पादनाचें केंद्रीकरण म्हणजे कोणत्याहि वस्तूचे उत्पादन थोड्या उत्पादकांकरवी होणें अपरिहार्यच होतें. अर्थातच त्या वस्तूच्या उत्पादनांत चढाओढीच्या तत्त्वाला कायमची मूठमाती मिळते. दुसरें कारण असे की, चढाओढीच्या निमित्ताने भाडवलवाल्यात आपापसात शत्रुत्वाची भावना निर्माण होते. हें शत्रुत्व चालू ठेवणे त्याना अर्थातच फायदे-शीर वाटत नाही. तें संपविण्याकरितां ते आपापसांत एकजूट तरी करितात किंवा सोक्षमोक्ष होण्याच्या दृष्टीनें भांडू लागतात. भाडवलवाल्याची आपा-पसात एकजूट झाली तर ती चढाओढीच्या तत्त्वाला चांगलीच मारक ठरते. भाडवलवाल्याचे आपापसातील शत्रुत्व तीव्र झालें तर खरी चढाओढ बाजूलाच राहून चढाओढीची वाईट बाजू प्रगट होते. त्याशिवाय भाडवलवाल्याची शक्ति वर्ग ह्या दृष्टीने, कमी होऊं लागते ते निराळेंच. ह्या सर्व गोष्टीना

भाडवलशाहीच्या विकासाबरोबर तीव्र स्वरूप प्राप्त होतें. कारण नफा कमी होऊ लागतो. आपल्या देशांत नफा कमी होऊं लागला असतां त्यावर तोडगा म्हणून अन्य देशाकडे नजर फिरवितात. त्यातूनच साम्राज्यशाही-सारख्या गोष्टी उद्भवतात. तो तोडगाहि तात्पुरताच ठरतो. कारण त्या देशांचा विकास होऊ लागला की, तेथेहि नफ्याचें प्रमाण कमी होतें. शिवाय तेथील भाडवलवाल्याबरोबर सघर्ष सुरू होतो तो निराळाच. अन्य देशात जोपर्यंत वाव आहे तोपर्यंत त्या देशावर आर्थिक स्वामित्व मिळविण्यासाठी पुढारलेल्या देशातील भाडवलवाल्यांचा सघर्ष होतो; तोहि ह्या ठिकाणी लक्षात घेतला पाहिजे. भाडवलवाल्याच्या सघर्षातूनच युद्धादि गोष्टी उद्भवतात. (५) भाडवलशाहीचा जसा विकास होतो तशी उत्पादनांच्या साधनात चागलीच भर पडते. उत्पादनाच्या साधनात व त्यापासून होणाऱ्या उत्पादनात ज्या प्रमाणात भर पडते त्या प्रमाणात एकदर समाजाची उपभोगशक्ति वाढत नाही. भाडवलशाहीचा व्यवहार आणि त्या व्यवहाराला चालना देणाऱ्या प्रवृत्तीच अशा असतात की, उपभोगशक्ति वाढण्याऐवजी अधिकाधिक मर्यादित होत जाते. त्यांतून विपुलता असूनहि दारिद्र्य हा भाडवलशाहीतील सर्वांत मोठा अतर्गत विरोध उपस्थित होतो. (६) उत्पादनाच्या सर्व विभागाची वाढ सारख्या प्रमाणात होत नाही. काही विभागात उत्पादनशक्ति अतिशय वाढून उत्पादनातहि फार वाढ होते. इतर विभागातील उत्पादन त्या मानाने तोकडे पडते. त्यामुळे भाडवल-वाल्यात आपापसांतील कुरबुरी निर्माण होतात. भांडवलशाहीतील ह्या सहा अंतर्गत विरोधाचा परिणाम मुख्यतः एकच होतो तो म्हणजे वर्ग-सघर्ष अधिकाधिक तीव्र होतो. वर्गसंघर्ष अतिशय तीव्र झाला म्हणजे त्यांतूनच भाडवलशाहीला मारक ठरणारी कामगारक्रान्ति होते आणि भांडलशाहीचा नाश होतो. भांडवशाहीची जागा समाजवादी आर्थिक व्यवस्थेकडून घेतली जाते. अशा तऱ्हेने भांडवलशाहीचा नाश विरोध-विकासाच्या तत्त्वानुसार अटळ होतो.

**मार्क्सला हेगेलचें तत्त्व मान्य पण तपशील अमान्य**

विरोधविकासाचें तत्त्व मार्क्सनें हेगेलपासून घेतलें असलें तरी हेगेलनें त्या तत्त्वज्ञानाचा जो उपयोग केला त्यापेक्षां सर्वस्वी भिन्न असा

मार्क्सनें त्याचा उपयोग केला हें स्पष्ट करणें जरूर आहे. मार्क्सने हेगेल-पासून फक्त तत्त्व घेतले पण तपशील अजिबात घेतला नाही. हेगेलनें सर्वांगपरिपूर्ण व सर्वव्यापी अशा आदर्श राज्यसंस्थेकडे बुद्धियुक्त मानवी जीवनाचा ओघ कसा वहात आहे हे दाखविण्याकरिता विरोधविकासाच्या तत्त्वाचा उपयोग करून घेतला. राज्यसंस्थेत व्यक्तिमत्वाचा लोप होऊ देण्यातच खऱ्याखुऱ्या व्यक्तिस्वातंत्र्याचा उच्चबिंदू आहे. ही जाणीव मनुष्याला विरोध-विकास-नियमानुसार होणाऱ्या विचार-संघर्षातून होते हे दाखविण्याचा हेगलने प्रयत्न केला. मार्क्सने त्याच तत्त्वाचा उपयोग निरनिराळ्या विकास टप्प्यातील वर्गसंघर्षामुळे वर्गहीन समाजव्यवस्था अखेरीस कशी प्रस्थापित होते हे दाखविण्याकरिता केला.

**इतिहासाची आर्थिक उकल**

इतिहासाची आर्थिक उकल ( Economic Interpretation of History ) हा मार्क्सच्या आर्थिक विचाराचा तिसरा भाग अतिशय महत्त्वाचा आहे. मार्क्सवादाची बैठक ह्या भागावरच अधिष्ठित आहे. मार्क्सनें इतिहासाचा जो आर्थिक उलगडा केला आहे त्याची ढोबळ तत्त्वे अगदी सरळ आहेत; ती अशी :—इतिहासाच्या ओघात समाजरचनेच्या विविध अंगात;—म्हणजे राज्यव्यवस्थेत, कायद्यात, शिक्षणक्षेत्रांत, धार्मिक कल्पनात, नीतिनियमांत—जे बदल होतात त्यांची उपपत्ति आर्थिक व्यवस्थेमध्ये जे बदल होतात त्यामध्ये आढळते. ह्या बाबतीत जास्त खोलात जाऊन तपास केला तर असेहि आढळते की, आर्थिक व्यवस्थेंतील बदलांपैकी उत्पादनपद्धतीत होणारे बदल मूलभूत स्वरूपाचे आहेत. कारण त्या बदलातूनच आर्थिक व्यवस्थेतील अन्य बदल उद्भवतात. उत्पादनपद्धतीत होणारे बदल जर एकदर आर्थिक क्षेत्रात बदल घडवून आणीत असतील, आणि आर्थिक व्यवस्थेंतील बदल जर एकदर समाजरच-नेत बदल घडवून आणीत असतील तर उत्पादनपद्धतीत होणाऱ्या बदलाला समाजरचनेची किल्लीच म्हटले पाहिजे. एखाद्या खेळण्याची किल्ली फिर-वितांच त्या खेळण्याची सारी चक्रे फिरून त्या खेळण्याला जशी गति मिळते त्याचप्रमाणें उत्पादनपद्धतीत बदल झाला की समाजरचनेच्या विविध अंगांची चक्रें फिरून एकंदर समाजाला गति मिळते. ह्या गतीचा परिणाम समाजरचना बदलण्यांत होतो.

**आर्थिक हितसंबंधावर समाजरचनेचा डोलारा उभा**

उत्पादनक्षेत्रांतील बदल परिणामीं समाजरचनेत मूलभूत बदल करण्याइतके कां बलशाली असतात, ह्याचा अधिक विस्तार केला पाहिजे. त्यासाठी समाजरचनेचे जे स्वरूप मार्क्सने दाखविले ते माहित करून घेतलें पाहिजे. तें स्वरूप पाहिले तर असे दिसून येईल की विशिष्ट उत्पादनपद्धतीनीं युक्त अशी आर्थिक व्यवस्था कोणत्याहि समाजरचनेचा पाया असून धर्मकल्पना, नीतिकल्पना, राज्यव्यवस्था, शिक्षणव्यवस्था ह्या केवळ त्या पायावर उभारलेल्या इमारती होत मार्क्सच्या ह्या कल्पनेच्या मागे आणखी एक जी कल्पना आहे. ती समजून घेतली तर इतिहासाचे आर्थिक स्पष्टीकरण समजण्यास अडचण पडत नाहीं. ती कल्पना अशी की उत्पादनपद्धति ही केवळ एक तांत्रिक बाब नसून ती एक मुख्यत सामाजिक अशी गोष्ट आहे. सामाजिक अशा अर्थानें कीं उत्पादनपद्धतीच्या स्वरूपावरच उत्पादनाचें विभाजन अवलबून असतें व विभाजनाच्या स्वरूपांतून समाजाची वर्गघटना निर्माण होते. समाजरूपी जाळयात उत्पादनपद्धतीतील महत्त्वाच्या घटकावर ज्यांचा ताबा त्याना मध्यवर्ती स्थान असतें. उत्पादन साधनाच्या मालकावर म्हणजे धनिकवर्गावर समाजांतील श्रमिकवर्ग अवलंबून असल्याने जाळयातील कमी प्रतीची स्थाने त्याच्या वाटयास येतात. जाळयातील त्याची जागा मध्यवर्ती स्थानाच्या अर्थात् आवतीभोवतीच असते. उत्पादनव्यवस्थारूपी जाळयात ज्याचे स्थान मध्यवर्ती असते त्यांचे हितसबध त्यांच्या मध्यवर्ती स्थानावरच अवलंबून असतात; म्हणूनच आपले मध्यवर्तीस्थान टिकून रहावें हीच त्यांच्या आयुष्याची प्रेरकशक्ति होऊन बसते. आपले स्थान टिकविण्यासाठी समाजाची यंत्रणा ज्या सस्थाकडून नियंत्रित होऊ शकते त्या संस्थाची—म्हणजे शिक्षण, धर्म, राज्ययंत्र, नीतिनियम ह्याची—मदत त्यांना हवी असते. ही मदत प्राप्त व्हावी ह्या हेतूने ह्या सस्थावर ताबा मिळविण्याचा ते प्रयत्न करतात व त्यांत यशस्वी होतात. त्यांना यश मिळण्याचें कारण असें की, समाजाच्या आर्थिक नाडया उत्पादनपद्धतींतील वर्चस्वामुळें त्यांच्या ताब्यात असतात व ह्या गोष्टीचा कमाल फायदा करून घेऊन समाजाचे अन्य व्यवहार त्याना काबीज करतां येतात. समाजांतील प्रमुख सस्था काबीज करण्यांत आल्या म्हणजे त्यांचा उपयोग

आर्थिक वर्चस्व टिकविण्याकडेच केला जातो. त्यामुळें समाजात नेहमीच असें आढळते की कायदे, नीतिनियम, राज्ययंत्र, धर्म, शिक्षण ह्याच्या बुडाशी एकच हेतु असतो. तो हेतु हाच की उत्पादनपद्धतीवर ज्याचे नियंत्रण असते त्याच्या हितसबंधांची जपणूक करणे. उत्पादनपद्धतीतील प्रमुख हितसबधावर समाजरचनेचा डोलारा उभारलेला असतो.; ह्या मार्क्सच्या म्हणण्यात इतका अर्थ अभिप्रेत आहे.

### उत्पादनव्यवस्था बदलली कीं समाजव्यवस्था बदलते

वरील विवेचनामुळे हे स्पष्ट होईल की, विशिष्ट उत्पादन-व्यवस्थेपासून ज्यांचा फायदा होतो ती व्यवस्था टिकावी ह्यासाठी पराकाष्ठेचे प्रयत्न करितात. परतु इतके करूनहि उत्पादनपद्धति शेवटी बदलतेच. विरोधी विकासवादी तत्त्वानुसार त्या पद्धतीला अतर्गत जो विरोध होतो तो जोरदार झाला म्हणजे ती बदलते. ती बदलली की नवीन हितसंबध निर्माण होतात. त्यामुळे नव्याच एखाद्या वर्गाला आर्थिक व्यवस्थेत वर्चस्व प्राप्त होते. त्या वर्चस्वाचा उपयोग करून घेऊन केवळ ते वर्चस्व टिकविण्याच्याच हेतूने इतर सस्थावर ताबा मिळविण्याचा तो वर्ग प्रयत्न करतो. त्या सस्था जुन्या व्यवस्थेंत ज्याचें वर्चस्व होते त्याच्या अजूनहि ताब्यांत असल्यामुळें कांही काल सघर्ष होतो; पण त्या सघर्षांत असाच अनुभव येतो की, आर्थिक शक्तीपुढे अन्य सर्व शक्ती फिक्या पडतात; म्हणूनच तत्कालीन आर्थिक व्यवस्थेच्या नाड्या ज्याच्या हातांत असतात त्यांचाच जय होतो. त्याचा जय झाला म्हणजे ह्या नव्या वर्गाच्या हित-संबंधाची जपणूक व्हावी, ह्या हेतूनें समाजातील प्रमुख सस्थांची पुनर्रचना होते व एकंदर समाजाची घटना बदलते. इतिहासाच्या ओघांत होणाऱ्या बदलाचा उलगडा आर्थिक व्यवस्थेंत होणारे बदल, त्यातहि उत्पादन-पद्धतीत होणारे बदलच करून देऊ शकतात, हें इतिहासाच्या आर्थिक स्पष्टीकरणाचें सार आहे.

### मार्क्सनें समाजवादी विचाराला शास्त्रशुद्ध स्वरूप दिलें

मार्क्सवादाची मार्क्सप्रणीत प्रमुख मूलतत्त्वें सागून झाली. आर्थिक विचाराच्या विकासाला मार्क्सने जो हातभार लावला

त्यासबधी पुढील गोष्टी सांगतां येतील. पहिली गोष्ट ही कीं मार्क्सच्या अर्थशास्त्रामुळे आर्थिक व्यवस्था समाजवादी स्वरूपाची असावी ह्या विचारास शास्त्रीय बैठक प्राप्त झाली. भाडवलशाही आर्थिक व्यवस्थेची उभारणी कामगाराच्या लुबाडणुकीवर झाली आहे आणि त्यावर कांहीतरी उपाययोजना झाली पाहिजे, हा विचार मार्क्सपूर्व सनातनवादी अर्थशास्त्रावरील हल्ल्यातहि आढळतो; पण कामगाराची लुबाडणूक निश्चित कोणत्या स्वरूपात होत आहे, कामगाराची लुबाडणूक होणे हे वैयक्तिक भाडवलवाल्याच्या इच्छेवर वा स्वभावावर अवलबून नसून कामगाराची लुबाडणूक भांडवलशाहीच्या तर्कशास्त्रातच कशी अंतर्भूत होत आहे, तसेंच भाडवलशाही आर्थिक व्यवस्थेतील दोषनिवारण ज्या एका उपायाने होणार आहे तो उपाय भांडवलशाहीच्या विकासांतून कसा उद्भवणार आहे, ह्या प्रश्नाला शास्त्रीय दृष्टीने उत्तर देण्याचे श्रेय मार्क्सप्रणीत समाजवादालाच द्यावें लागेल. मार्क्सच्या समाजवादाचें स्वरूप ध्येयवादी असले तरी स्वप्नाळू नव्हतें. मार्क्सच्या समाजवादाचें आवाहन भावनेला नसून बुद्धीला होते. म्हणूनच मार्क्सला शास्त्रीय समाजवादाचा जनक ही पदवी प्राप्त झाली आहे. ह्याचा अर्थ असा नव्हे की त्याच्या आर्थिक विचारांतील प्रत्येक बाब पुढे टिकून राहिली. ह्याचा अर्थ एवढाच की मार्क्सची विश्लेषणपद्धति शास्त्रसंमत व तर्कशास्त्राच्या नियमाला धरून होती.

**मार्क्सनें अर्थशास्त्राचा व्याप वाढविला**

दुसरी गोष्ट अशी की, मार्क्सने अर्थशास्त्राला व्यापक स्वरूप प्राप्त करून दिलें. मार्क्सपूर्व अर्थशास्त्रीय विचार प्रचलित आर्थिक व्यवस्थेपुरताच मर्यादित होता; पण मार्क्सने असें यशस्वीरीत्या दाखवून दिले की, प्रचलित आर्थिक व्यवस्था अनादि कालापासून चालत आलेली नाही. हे खरे असेल तर ती आर्थिक व्यवस्था निरन्तर नाही हे ओघानेच येते. जे प्रचलित आर्थिक व्यवस्थेला लागूं पडते तेच इतर कोणत्याहि आर्थिक व्यवस्थेला लागू पडतें. बदल होणे ही जगताची जर प्रकृति असेल तर आर्थिक व्यवस्था त्या नियमाला अपवाद असेल हे सभवनीय दिसत नाही. असें असल्यामुळें कोणतीहि आर्थिक व्यवस्था मागल्या आर्थिक व्यवस्थेचा पुढील टप्पा व पुढल्या आर्थिक व्यवस्थेचा मागील टप्पा आहे असेंच मानावें लागते. ह्या

परिस्थितीत केवळ प्रचलित आर्थिक व्यवस्थेचे विश्लेषण करून अर्थशास्त्राचें कार्य अगर व्याप्ति सपत नाही. ते विश्लेषण हा अर्थशास्त्राचा केवळ एक भाग होतो. प्रचलित आर्थिक व्यवस्थेपलीकडे जाऊन आर्थिक व्यवस्थेंत बदल कोणत्या नियमानुसार होतात हे तपासणे हाहि अर्थशास्त्राचा एक आणि महत्त्वाचा भाग मानला पाहिजे. ह्यावर कोणी असे म्हणेल की, मार्क्सचा ‘ आर्थिक व्यवस्थेत बदल होत असतो ’ हा सिद्धान्त न मानणाऱ्यानी काय करावयाचे ? ह्याला उत्तर असे की, अशा लोकानाहि प्रचलित आर्थिक व्यवस्था कायम रहाणार आहे, अशी केवळ समजूत करून घेऊन त्या आर्थिक व्यवस्थेचे विश्लेषण करीत स्वस्थ बसता येणार नाही. प्रचलित आर्थिक व्यवस्था पूर्वी का नव्हती व त्या आर्थिक व्यवस्थेवर होणारे आघात पचवूनहि ती अटळ कशी रहाणार आहे, ह्याचा खुलासा करावा लागतो. त्याच्या दृष्टीने विचार केला तरी अर्थशास्त्राची व्याप्ति वाढते.

**मार्क्सनें अर्थशास्त्राचें स्वरूप बदललें**

तिसरी गोष्ट अशी की, मार्क्सने आर्थिक व्यवस्थेची केवळ व्याप्तीच बदलली असे नव्हे; तर स्वरूपहि बदलले. सनातनवादी अर्थशास्त्रात संपत्ति हा अर्थशास्त्राचा मध्यबिंदु गणला जात होता. मार्क्सने सपत्तीपेक्षा उत्पादनपद्धतीमुळे ठरल्या जाणाऱ्या सामाजिक सबधाना व त्या सबधातून निर्माण होणाऱ्या प्रश्नाना अधिक महत्त्व दिले. वर्गनिर्मिति, वर्गभावना व वर्गसंघर्ष ह्या प्रश्नाना अर्थशास्त्रांत महत्त्व आले ते मार्क्समुळेच. मार्क्सच्या हातात अर्थशास्त्र हे खरेंखुरे सामाजिक शास्त्र बनले.

**मार्क्सनें भांडवलशाहीच्या अर्थशास्त्राचा डोलारा खिळखिळा केला**

चवथी गोष्ट अशी की, मार्क्सवादामुळे सनातनवादी अर्थशास्त्राने उभारलेला खोटचा समाधानाचा डोलारा कोसळून पडला. आर्थिक व्यवस्थेंत मर्व कांही ठीक चालले आहे, समाजातील निरनिराळ्या वर्गांचे हितसंबध अभिन्न आहेत, इत्यादि समजुती सनातनवादामुळे प्रसृत झाल्या होत्या. त्या समजुतीना मार्क्सवादानें चांगलाच धक्का दिला. त्यामुळें अर्थातच सनातन-वादाच्या मुख्य प्रमेयावर व भाडवलशाहीवर विश्वास असणाऱ्या अर्थशास्त्रज्ञात

चांगलीच गडबड उडाली व सनातनवादी अर्थशास्त्र पुनः तपासून पाहण्याची त्यांना गरज भासूं लागली. त्यांतूनच पुढील प्रकरणांत ज्याचें विवेचन केले आहे तो नवसनातनवाद उद्भवला.

मार्क्सवादाचा अर्थशास्त्रावर झालेला परिणाम हा असा आहे. मार्क्सवादाचें जगांतील भवितव्य कांही असो. केवळ अर्थशास्त्राच्या दृष्टीनें विचार करतां मार्क्सनें एका विशिष्ट विचारप्रणालीच्या व शक्तिमान् अशा अर्थशास्त्रीय विचाराला अर्थशास्त्रांत मानाचें स्थान प्राप्त करून दिलें ह्यांत शंका नाही. त्या दृष्टीने पाहता मार्क्सचें अर्थशास्त्राच्या इतिहासांतील स्थान अगदी अढळ राहील हे निश्चित.

## मार्क्सनंतरचा मार्क्सवाद

मार्क्सनतर भाडवलशाही आपल्या कर्मानें विनाश पावेल ह्या म्हणण्यांत काही अर्थ आहे का, ह्या विषयावरील वाद मार्क्सच्या अनुयायात बराच रंगला. ह्या वादाचा पूर्वपक्ष एंगल्सचा बरेच दिवसाचा मित्र व सहकारी असलेला एडवर्ड बर्नस्टेन ह्यानें १८९६–९७ साली लिहिलेल्या अनेक लेखात मांडला. त्याचे असें म्हणणे होते की, भाडवलशाहीचा नाश आपसूक होणार ही कल्पना सोडून दिली पाहिजे. ही कल्पना अनुभवान्तीं पटणारी नाही. कारण भाडवलशाही कमजोर न होता अधिक सुसघटित व सकटाला तोंड देण्यास सुसज्ज होत आहे. हे जर खरे असेल तर आर्थिक प्रवाहाच्या ओघात समाजवाद येईल असें मानता येणार नाही. सुसज्ज भाडवलशाहीपुढे कामगारक्रान्तीचा उठाव यशस्वी होईल असेंहि मानता येणार नाही. ह्या परिस्थितीत समाजवादाची प्रस्थापना हें ध्येय साकार करावयाचे असेल तर प्रचार, शिक्षण, लोकाराधना ह्या शातताप्रधान मार्गांचीच कास धरली पाहिजे. पुढारलेले जीवन समाजवादानेच शक्य होईल हें जेव्हा मनुष्याला पटेल तेव्हाच समाजवादाची प्रस्थापना होईल. इतिहासाच्या ओघात समाजवादी अर्थव्यवस्था येणारच, ह्या मार्क्सच्या मूलभूत विश्वासाशी बर्नस्टेनचें प्रतिपादन सुसंगत नाही हें स्पष्टच आहे; पण अनुभवानें मार्क्सवादात बदल करणें हें सच्च्या मार्क्सवाद्याचे कर्तव्यच आहे, अशी भूमिका घेऊन बर्नस्टेननें आपला पक्ष मांडला.

**उपभोगाची कमतरता भांडवलशाहीला मारक नाहीं.**

बर्नस्टेनच्या मतांना अधिक शास्त्रीय स्वरूपाचा पाठिबा तूगन–बॅरॉनॉवस्की ह्याने दिला. मार्क्सनें 'उत्पादनाच्या मानाने उपभोग कमी ही परिस्थिति वारवार उद्भवून त्यांतूनच भाडवलशाही अखेरीस नष्ट होईल' असें प्रतिपादिलें होते त्याला उद्देशून तूगनने १९०१ साली अशा अर्थाचें विवेचन केलें की, उपभोग कमी झाला म्हणून भाडवलदारांचे काही एक बिघडत नाही. कारण उपभोग्य वस्तूना असलेली मागणी कमी झाली तरी भाडवलदाराकडून उत्पादनाच्या यत्रसामुग्री सारख्या साधनाची खरेदी जोपर्यत चालू आहे तोपर्यत उत्पादनाला कोणताहि धोका नाही. भाडवलवाले ह्या वस्तूंवर खर्च करीत रहातात. ह्या वस्तूच्या उत्पादकाना फायदा मिळत रहातो व ह्या वस्तूचे उत्पादन अखंड चालू रहाते. ह्या सर्व प्रकरणात जर काही होत असेल तर ते एवढेच की, उपभोगवस्तूऐवजी उत्पादनवस्तूचें उत्पादन वाढते व उत्पादन-घटकाचा ओघ मोठ्या प्रमाणात तिकडे वळतो. ह्याची अर्थातच भाडवलवाल्याना मुळीच खत वाटत नाही. कारण मार्क्सनेंच म्हटल्याप्रमाणे उपभोगासाठी उत्पादन हा भांडवलशाहीतील उत्पादनाचा कधीच हेतु नसतो. फायद्यासाठी उत्पादन हा हेतु असतो. हा हेतु कोणत्याहि वस्तूच्या उत्पादनात फायदा होत असला तरी साध्य होतो.

**समाजवादी क्रान्ति अटळ नसून प्रयत्नसाध्य आहे.**

वरील विवेचनाला कौटस्की व हिलफर्डींग ह्या दोन प्रमुख मार्क्सवाद्याचा पाठिबा पहिल्या महायुद्धानतर मिळाला. तत्पूर्वी त्या मताबद्दल त्याना सहानुभूति नव्हती. १९२७ साली लिहिताना कौटस्कीने असे विधान केले की, आर्थिक अरिष्टाची व्याप्ति व भयानकता वाढत वाढत जाऊन अखेरीस भांडवलशाहीचा नाश होतो हें आता कोणालाच पटत नाही. त्याच वर्षी एका भाषणांत हिलफर्डींग ह्याने असे उद्गार काढले की, भाडवलशाहीतील अतर्गत विरोधामुळे समाजवाद येईल ही कल्पना सोडून देऊन कामगारवर्गाच्या स्वप्रयत्नानेच समाजवाद येईल असा विश्वास धारण केला पाहिजे. दैवावर हवाला ठेवून समाजवादाच्या आगमनाची वाट पहाण्यात मुळीच अर्थ नाहीं.

**उत्तरपक्षाची भूमिका**

वरील विचार मार्क्सच्या सर्व चहात्यांना पटले नसावेत हे उघडच आहे. त्यापैकीं अनेकानी उपभोगाची कमतरता भाडवलशाहीला अखेरीस मारक ठरते, ह्या मार्क्सच्या सिद्धान्ताचा हिरीरीने पुरस्कार केला. त्यामध्ये रोझा लक्झंबर्ग ह्या मार्क्सवादिनीचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. तिने व इतर मार्क्स-वाद्यानी मांडलेल्या उत्तरपक्षाचा सारांश असा की, उपभोगासाठी उत्पादन हा हेतु मनाशी बाळगून भाडवलवाले उत्पादनाला चालना देत नाहीत; हे खरें असले तरी त्याचा अर्थ असा नव्हे की, मूलभूत आर्थिक क्रिया ह्या नात्यानें उत्पादन व उपभोग एकमेकांपासून सर्वस्वी अलग करणें शक्य आहे. केलेल्या उत्पादनाला ग्राहक असतील तरच शेवटी उत्पादन किफायतशीर ठरेल. काही कालपर्यंत उपभोग्य वस्तूंची निर्मिति न करता केवळ भाडवली वस्तूची निर्मिति केल्यानें भाडवलशाही तग धरून टिकणे शक्य आहे. कारण त्या कालात भाडवलदारच एकमेकाचे ग्राहक होतात; पण असें किती काळपर्यंत चालेल ? भाडवली वस्तूचा ढीग वाढत चालला की, त्याचा उपयोग केला अगर न केला तरी तो ढीग रचण्याचें वैय्यर्थ भांडवलदाराना उमगतें. केला तरी उमगते; कारण त्यापासून उत्पादित होणाऱ्या उपभोग्य वस्तूना गिऱ्हाईक भेटत नाही. न केला तरी उमगतें; कारण भाडवली वस्तूचा केवळ ढीगच रचल्याने भाडवलदारांना कोणत्याहि प्रकारे फायदा होत नाही. मौज अशी की, कौटस्की ह्यानें १९०२ साली ह्याच पक्षाचा पाठपुरावा केला होता. हा पक्ष नेहमीच अधिक बलवान् राहिला. कारण प्रमुख मार्क्सवाद्याचा ह्याच पक्षाला पाठिंबा मिळाला. युद्धानतर पूर्वपक्ष पूर्वीच्या मानानें बलवान् झाला हें खरें; पण तुलनेने उत्तरपक्षच जोरदार होता. ह्याचें मुख्य कारण म्हणजे रशियांतील प्रमुख मार्क्सवादी लेनिन ह्याचा भांडवलशाहीचा 'नाश हा केवळ कालाचा प्रश्न आहे' ह्या मताला पाठिबा होता. मार्क्सनंतरच्या मार्क्सवादात लेनिनचें स्थान पहातां त्याच्या मतांचा अधिक परिचय करून घेतला पाहिजे.

**लेनिनचीं मतें**

लेनिनला भांडवलशाही नष्ट होणार याबद्दल यत्किंचितहि सदेह नव्हता. भांडवलशाही जाणार हा विश्वास तर त्याने बाळगलाच; पण भांडवलशाहीचा नाश कसा होणार ह्यासंबंधीचे मार्क्सचें विवेचन त्यानें एक पायरी पुढें

नेले. त्यानें असें प्रतिपादिलें की, नष्ट पावण्यापूर्वी भाडवलशाहीचे प्रथम साम्राज्यशाहीत रूपान्तर होतें. लेनिनच्या मतें साम्राज्यशाही (Imperialism) ही भांडवलशाहीच्या विकासातील शेवटची पायरी आहे. ह्या पायरीप्रत भांडवलशाही पोंचली की, तिच्या विनाशाला प्रारंभ होऊन समाजाची पावलें समाजवादाच्या रोखाने पडू लागतात. साम्राज्यशाही हा आर्थिक इतिहासांतील प्रमुख टप्पा नसून भाडवलशाही व समाजवाद ह्यामधील उपटप्पा आहे साम्राज्यशाहीत भाडवलशाहीतील अतर्गत विरोध तीव्रतम होतात. भांडवलशाहीच्या डबक्यांतील गाळ वाढून भाडवलशाहीचा गाडा त्यात अधिकाधिक खोलवर रुतत जातो. त्यापुढें भाडवलशाहीचा विकास अशक्य होतो. कामगारक्रान्तीच्या पुरस्कर्त्यांना सुवर्णसधि मिळते. त्या सधीचा त्यानी क्रान्तीचा उठाव करण्यासाठी फायदा घेतल्यास समाजवादाच्या उदयाला अधिक वेळ लागत नाहीं.

**साम्राज्यशाहीच्या खुणा**

भाडवलशाही साम्राज्यशाही ह्या अवस्थेप्रत पोहोचली, हे ओळखण्याच्या लेनिनने पाच खुणा सागितल्या. त्या येणेप्रमाणें :— (१) उत्पादनाचें व भाडवलाचे इतके केंद्रीकरण होते की, मूठभर मक्तेदार आर्थिक व्यवस्थेची सर्व सूत्रे हालविण्यास समर्थ होतात. (२) पेढीनिर्मित भाडवल व औद्योगिक भाडवल ह्याचा ताबा एकाच गटाच्या हाती जाऊन तो ––म्हणजे धनिक भाडवलदाराचा गट––बलिष्ठ होतो. (३) भांडवलाची मोठ्या प्रमाणावर निर्यात होऊं लागते. (४) राष्ट्रीय मक्तेदारीचें रूपान्तर आंतरराष्ट्रीय मक्तेदारीत होते. आंतरराष्ट्रीय महत्त्वाच्या सर्व वस्तूची बाजारपेठ मक्तेदाराच्या वर्चस्वाखाली येते.जागतिक पुरवठ्यावर मक्तेदाराचा ताबा सपूर्णपणे प्रस्थापित होतो. (५) सबध जगाची विभागणी प्रमुख भाडवलशाही राष्ट्रात होते ह्या पांच खुणा कोणत्याहि परिस्थितीत पटल्या की, 'त्यावेळी साम्राज्यशाही अवस्था चालू आहे असे खुशाल समजावे' असें लेनिनचे म्हणणे होतें. 'साम्राज्यशाहीची परिणति भयानक स्वरूपाच्या युद्धांत होऊन त्यातून भाडवलशाही जिवत बाहेर पडू शकत नाही.' हे लेनिनच्या तद्विषयक विचारांचें सार सांगतां येईल. लेनिनचे हे विचार साम्राज्यशाही––भाडवलशाहीची अतिम व्यवस्था' (Imperialism–The Highest Stage of Capitalism) ह्या त्याच्या ग्रथांत आढळतात. हे विचार व्यक्त करताना त्याने असा

सिद्धान्त मांडला की, साम्राज्यशाहीच्या कालात युद्धें अटळ आहेत. कारण सर्व देशातील भाडवलशाही सारख्या गतीने विकसित होत नाही. एवढेंच नव्हे तर प्रत्येक देशातसुद्धा उद्योगधंद्याची वाढ समप्रमाणांत होत नाही. भाडवलदाराच्या आपआपसातील चढाओढीचें रूपान्तर परस्परशत्रुत्वांत होऊन ते हमरीतुमरीवर येतात ते ह्याच कारणामुळे. भाडवलदाराच्या आपापसातील वैषम्यामुळे प्रत्येक भाडवलशाही देशात अतर्गत भानगडी होत असतातच, पण भाडवलशाही देशा-देशांत जेव्हा वैषम्य सुरू होते तेव्हा त्याचे परिणाम भयानक होतात. भाडवलशाही राष्ट्रात जगाची वाटणी झालेली असते; पण त्यातील प्रत्येक राष्ट्राला आपल्या स्वार्थासाठी नेहमीच पुनर्वाटणी हवी असते त्यानिमित्त ज्या कुरबुरी सुरू होतात त्याचीच परिणति युद्धांत––नव्हे महायुद्धात––होते. युद्धाने ह्या भानगडी कायमच्या मिटत तर नाहीतच; पण त्या वाढतात मात्र. युद्धाचे परिणाम निरनिराळ्या राष्ट्रावर वेगवेगळ्या प्रमाणात होतात आणि त्यातून उद्‌भवलेल्या असतोषातून पुढील युद्धाची तयारी सुरू होते. असे प्रत्येक युद्ध भाडवलशाहीचा विनाशकाल जवळ आणते.

### स्टॅलिन व ट्रॉटस्की ह्यांचा वाद

लेनिनच्या वरील मताचा स्टॅलिननें जोरदार पुरस्कार तर केलाच; पण त्यातून त्याने असा अर्थ काढला कीं, जगभर समाजवादी क्रान्ति होण्याच्या दृष्टीनें एक राष्ट्र समाजवादी प्रथम होऊन ते सुसघटित व बलिष्ठ झाले तरी ते पुरेसे होते त्याचें ह्या बाबतीत असे म्हणणे की, "शेवटचे जागतिक युद्ध ह्या समाजवादी राष्ट्रांत व इतर भाडवलशाही राष्ट्रात होते. ह्या युद्धात समाजवादी राष्ट्राचा जय ठरलेलाच असतो. कारण त्या युद्धापूर्वी आपआपसात झालेल्या युद्धात भाडवलशाही राष्ट्रे कमकुवत झालेली असतात." ट्रॉटस्की ह्यानें ही भूमिका मानली नाही. कारण साम्राज्यशाहीच्या काळात भाडवलशाही कमकुवत न होता अधिक सुसघटित होत जाते तेव्हा जागतिक समाजवादी क्रान्ति व्हावयाची असेल तर सर्व देशात कामगार क्रान्तीची बीजें स्वतत्रपणें रोवली गेली पाहिजेत, भांडवलशाही जगात एक समाजवादी राष्ट्र टिकाव धरणें अशक्य, असे त्याचें म्हणणे होतें.

### मार्क्सवादाचें राजकीय व वैचारिक क्षेत्रांतील यश

भाडवलशाहीतील अंतर्गत विरोधामुळेच 'भाडवलशाहीचा नाश होईल का?' ह्या प्रश्नावर झालेल्या चर्चेचे पडसाद सर्व देशात उमटून

मार्क्सवादांत दुफळी निर्माण झाली. मार्क्सवादाच्या सिद्धान्ताप्रमाणें भांडवलशाही कमजोर होऊन विनाशाप्रत चालली आहे ह्या घटनेचा फायदा घेऊन कामगारानी क्रान्ति घडवून आणण्यानेंच समाजवाद प्रस्थापित होईल असें सर्वसाधारणपणे साम्यवादी नावाने ओळखल्या जाणाऱ्या मार्क्सवादी पक्षांना वाटतें. ह्याच्या उलट समाजवाद ही आर्थिक विकासाची अटळ परिणति नसून एक विशेष प्रकारची आर्थिक व्यवस्था आहे. ती आर्थिक व्यवस्था इष्ट आहे अशी खात्री करून घेऊन व ती इतराना शाततेच्या मार्गानें पटवून देण्यानेच समाजवादाची प्रस्थापना टिकाऊ स्वरूपांत होईल. त्यायोगें त्या आर्थिक व्यवस्थेला नैतिक अधिष्ठानहि लाभेल असे सर्वसाधारणपणें समाजवादी नावानें ओळखल्या जाणाऱ्या मार्क्सवादी पक्षाचे धोरण असते. ह्या विषयांत अधिक शिरण्याचें येथें प्रयोजन नाही. ह्या विषयाचा उल्लेख करण्याचें कारण एवढेंच की, राजकारणावर मार्क्सवादाचे काय परिणाम झाले हे स्पष्ट व्हावे. आर्थिक विचाराचा राजकारणावर परिणाम होतो ह्या सत्याचा अनुभव मार्क्सवादाच्या बाबतीत फारच आला. इतर आर्थिक विचाराप्रमाणें मार्क्सवादाचा परिणाम केवळ प्रस्थापित सरकारचें आर्थिक धोरण बदलले जाण्यांत न होता, प्रस्थापित सरकारला जोरदार विरोध निर्माण होण्यात झाला. एका देशात तर ह्या विरोधानें क्रान्तीच्या मार्गाने प्रस्थापित सरकार उलथून पाडून नवीन स्वरूपातील सरकार प्रस्थापित करण्याचे यश मिळविलें. मार्क्सवादाचा परिणाम राज्यशास्त्रावर झाला. राज्यसंस्थेचें स्वरूप व तिची कार्यें ह्यासंबधीच्या कल्पना पार बदलून गेल्या. इतर शास्त्रांतहि---भौतिकशास्त्रांतहि---मार्क्सवादाचे पडसाद उमटले. मार्क्सवादाला मिळालेल्या ह्या घवघवीत यशाचे कारण असे आहे की, मार्क्सवाद हा केवळ एक तात्त्विक विचार नसून एका बलवान् चळवळीचा पाया आहे. स्वतः मार्क्स हा एक पट्टीचा कार्यकर्ता व क्रान्तीपर समाजवादी चळवळीचा नेता होता हें सर्वश्रुत आहे कार्य व विचार ह्याची सांगड झाल्यामुळे मार्क्सवादाला एका नवीन प्रकारच्या धर्माचें स्वरूप प्राप्त झालें असल्यास नवल नाही. ह्या सर्व गोष्टींमुळेच मार्क्सला व मार्क्सवादाला अर्थशास्त्राच्याच नव्हे; तर जगाच्या राजकीय व वैचारिक इतिहासांत अमरत्व प्राप्त झालें.

---

मूल्याचा विरोधाभास स्मिथनें दाखवला खरा; पण ह्या विरोधाभासाची करावयाला हवी होती तेवढी चिकित्सा त्यानें केली नाही. ती त्याने केली असती तर त्याला हें सहज उमगले असते कीं, त्या विरोधाभासाला सहज सुचणारा शास्त्रीय खुलासा आहे. तो खुलासा असा की, बाजारांत ज्यांना अल्प मूल्य असते त्या वस्तूचा पुरवठा स्वतंत्रपणें नव्हे, तर मागणीच्या मानानें अतिशय असतो. काही वस्तूंच्या बाबतींत तो इतका असतो की, त्या वस्तूंना मूल्यच प्राप्त होऊं शकत नाही. उदाहरणार्थ हवा. ह्याच्या उलट बाजारांत मूल्य फार असणाऱ्या वस्तूचा पुरवठा मागणीच्या मानाने अल्प असतो. त्या दिशेनें स्मिथनें विचार केला असता तर मागणीची बाजू त्याला डावलतां आली नसती. तसें न करतां वस्तूच्या मूल्याला पुरवठ्याच्या बाजूकडील मानवी श्रमच जबाबदार आहेत असें ठरवून त्या दिशेनेच त्यानें विचार सुरू केला. त्याचा परिणाम म्हणून मागणीच्या बाजूकडे अजिबात दुर्लक्ष झाले. स्मिथची मुळांतली चूक पुढें दुरुस्त झाली नाही त्यातूनच रिकार्डो—मार्क्सचा श्रमसिद्धान्त उद्‌भवला उत्पादनखर्चसिद्धान्त पुढे मांडून श्रमसिद्धान्तांतील आत्यंतिकता मिलने नाहीशी केली हें खरे; पण त्यामुळें भांडवलदार उद्योगपतिवर्गाच्या विभाजनांतील वांट्याचे जरी समर्थन होऊं शकलें तरी त्यामुळें मागणीच्या बाजूला न्याय मिळाला असे म्हणतां येत नाही. त्या बाजूची उपेक्षा चालूच राहिली. सारांश——स्मिथची मुळातली चूक दुरुस्त झाली नाही. एवढेंच नव्हे, तर ती अर्थशास्त्राला चांगलीच भोवली. त्या चुकीमुळेंच श्रमसिद्धान्त तडीस नेऊन त्यावर क्रान्तिकारक अर्थशास्त्राची उभारणी मार्क्सला करता आली.

### वस्तूवर किती श्रम खर्च पडले हा विचार अप्रस्तुत

मूल्यप्रतिपादनांत मागणीचा विचार अजिबात न करणे हे नव-सनातनवाद्यांच्या मतें अगदीं अयोग्य होतें. इतकेच नव्हे तर एक पायरी पुढें जाऊन असेंहि म्हणावयाची त्यांची तयारी होती कीं, वस्तूचें मूल्य मागणीच्या बाजूकडूनच ठरविलें जातें. एखाद्या वस्तूच्या मूल्याचा विचार करतांना त्या वस्तूच्या उत्पादनाला किती खर्च आला, त्या वस्तूकरतां किती मानवी श्रम खर्च पडले हा विचार अगदीं अप्रस्तुत आहे. मुख्य प्रश्न असा असतो कीं, त्या वस्तूकरतां गरज आहे किंवा नाहीं आणि गरज असली

तर त्या गरजेची तीव्रता कितपत आहे? एखाद्या वस्तूच्या उत्पादनाकरितां पुष्कळ मानवी श्रम खर्च पडले आणि उत्पादनानंतर जर असें आढळून आले कीं ती वस्तु कोणालाच नको आहे; तर केवळ श्रम खर्च झाले आहेत, म्हणून त्या वस्तूला बाजारांत कोणी किंमत देईल काय? हें शक्य नाहीं. ह्याच्या उलट विशेष श्रमाशिवाय उत्पादित केल्या गेलेल्या वस्तूला भरपूर किंमत येते असा अनुभव बाजारात अनेकदा येतो. अशा वस्तूची गरज ज्याला तीव्रतेने भासत असेल तो त्या वस्तूकरितां भरपूर किंमत देण्यास तयार असतो आणि ती देतांना त्या वस्तूवर किती प्रमाणांत मानवी श्रम खर्च पडले असतील ह्याचा विचार करण्याचीसुद्धा त्याला जरुरी भासत नाही. हें सर्व जर खरे असेल तर मूल्यसिद्धान्त प्रतिपादतांना मागणीच्या बाजूचाच प्रामुख्याने विचार झाला पाहिजे. वस्तूकरिता असणाऱ्या गरजेचे बाजारांत मागणीत कसें रूपान्तर होतें, त्या मागणीची तीव्रता कशावर अवलबून असते, ती कशी मोजता येते आणि मागणीची तीव्रता मूल्य ठरले जाण्यास कशी मदत करते ह्या दिशेने मूल्य कसे ठरते हे पाहिले गेलें पाहिजे, असे नवसनातनवाद्याचें म्हणणें होते. ह्या दिशेने जाऊन नव्या मूल्यसिद्धान्ताची बीजें रोवण्याचें श्रेय जेव्हॉन्स, मेजर व वॉलरॉस ह्या त्रयीकडे जाते. त्यांचे प्रमुख ग्रंथ अनुक्रमें १८७१, १८७१, १८७४ मध्ये प्रसिद्ध झाले.

### जेव्हॉन्सचा मूल्यसिद्धान्त

'वस्तूचें मूल्य संपूर्णतया उपभोग्यतेवर अवलंबून असतें' हे जेव्हॉन्सचे वाक्य अर्थशास्त्रात शिरलेल्या नव्या दृष्टिकोनाची यथार्थ कल्पना देतें. नव्या अर्थशास्त्राची--नवसनातनवादाची--मध्यवर्ती कल्पना म्हणून ह्या वाक्याकडे केव्हांहि बोट दाखवितां येईल. ह्या वाक्यामुळे अर्थशास्त्रात १८७० नतर झालेला बदल स्पष्टपणे उमजतो. हा बदल चागलाच क्रान्तिकारक होता ह्यांत शंका नाही. सनातनवादाच्या प्रमुख अर्थशास्त्रज्ञाना--विशेषत: अॅडम-स्मिथला--उपभोग्यता हा वस्तूचा एक महत्त्वाचा गुण आहे ही कल्पना अपरिचित होती असें नाहीं; पण वस्तूची उपभोग्यता मूल्यसिद्धान्ताचा पाया होऊं शकेल अशी कल्पना त्यांनी कधीच केली नव्हती. मूल्यसिद्धान्ताच पाया शोधनांना त्यांनीं आपली दृष्टि नेहमीच व्यक्तिमनापासून

अलग असणाऱ्या (Objective) अशा स्वतंत्र गोष्टीकडे वळविली होती. मूल्यसिद्धान्ताचें प्रतिपादन करतांना व्यक्तीच्या मनोव्यापारांचा अभ्यास करण्याची गरजच त्याना भासली नव्हती. उपभोग्यतेला वस्तुमूल्यात मध्यवर्ती स्थान आहे असा आग्रह धरून जेव्हॉन्सने व्यक्तीच्या मनोव्यापाराकडे अर्थशास्त्रज्ञाचें व पर्यायाने अर्थशास्त्राचें लक्ष वेधलें. ह्यानतर मानसशास्त्राला अर्थशास्त्राच्या दृष्टीने महत्त्व यावे व अर्थशास्त्र अधिकाधिक व्यक्तिनिष्ठ अथवा स्वयकेन्द्रित (Subjective) व्हावे हे साहजिकच होतें.

**सुखवाद जेव्हॉन्सच्या विवेचनाचा पाया**

मूल्य ठरण्याच्या क्रियेत मागणीच्या बाजूला प्रमुख स्थान देण्याच्या दृष्टीने व्यक्तीच्या गरजा व त्या गरजांचे बाजारात प्रकट होणारे स्वरूप ह्याचा अभ्यास करण्याची जेव्हॉन्सला जरुरी वाटली. वस्तूला उपभोग्यता असते म्हणजे काय व त्या उपभोग्यतेचा बाजारातील मागणीशी संबध काय ह्याचा खुलासा करणें त्याला आवश्यकच होते. उपभोग्यता म्हणजे काय ह्याचा खुलासा करताना जेव्हॉन्सच्या वेळी बरीच मान्यता पावलेल्या सुखवादाच्या (Hedonism) तत्त्वज्ञानाचा त्यानें आश्रय केला. अर्थात् हे तत्त्वज्ञान त्याला स्वतःला पटत होते; म्हणूनच त्याने त्याचा अवलंब केला, हे वेगळे सांगण्याचे कारण नाही. सुखवादाच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे जास्तीत जास्त सुख मिळविणे हें मनुष्याचे जीवितध्येय असते. हे ध्येयच त्याला कार्यप्रवृत्त करीत असते. ह्या ध्येयाच्या दिशेनेच त्याचे मनोव्यापार चाललेले असतात कोणत्याहि गोष्टीबद्दल निर्णय घेताना त्यापासून कितपत सुख होतें, त्यापासून आपले जास्तीत जास्त सुख मिळण्याचे ध्येय कितपत साध्य होतें, ह्याचाच तो विचार करीत असतो. सुखवादाच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें मनुष्याचे मन म्हणजे सुखाची नोद करणारे व त्याचे मापन करणारें यंत्रच असें म्हणण्यास हरकत नाही.

**उपभोग्यतेचा अर्थ**

निरनिराळ्या वस्तूना बाजारांत जी मागणी असते त्यासंबंधीं खुलासा करतांना जेव्हॉन्सनें सुखवादाचा आश्रय केला. उपभोग्यता म्हणजे व्यक्तीला सुख देण्याची वस्तूमध्यें असलेली कुवत, अशी त्यानें उपभोग्यतेची व्याख्या केली. बाजारांत जाऊन वस्तूकरितां मागणी करण्यास व्यक्ति प्रवृत्त

होते, ती वस्तूमध्ये उपभोग्यता अर्थात् सुख देण्याची कुवत असते म्हणूनच; वस्तूच्या उत्पादनांत मानवी श्रम खर्ची पडलेले असतात, म्हणून नव्हे; असें त्यानें प्रतिपादिलें. बाजारांतील मागणीच्या बाजूचे संपूर्ण स्पष्टीकरण करण्यासाठी कोणत्याहि वस्तूसाठीं मागणी कां उद्भवते एवढेच सांगून भागत नाही, तर ती मागणी विशिष्ट मर्यादेपर्यंतच कां असते हेहि सांगावे लागते. ह्याची जेव्हॉन्सला जाणीव होती- मागणीची मर्यादा कशी ठरली जाते, ह्याचा खुलासा करतांना जास्तीत जास्त सुख प्राप्त करून घ्यावयाचें, ह्या मनुष्याच्या प्रवृत्तीचा अवलंब त्याने केला. तत्पूर्वी उपभोग्यतेसबधी त्याने एक महत्त्वाचा सिद्धान्त माडिला. तो सिद्धान्त असा की, वस्तूचा उपभोग जसजसा वाढत जातो तसतशी वस्तूची उपभोग्यता कमी होत जाते. कोणत्याहि वस्तूचा उपभोग अगदी लहान लहान माप एकामागून एक उपभोगीत केला जातो अशी कल्पना केली तर असें आढळते की, प्रत्येक पुढल्या मापाची उपभोग्यता त्याच्या पूर्वीच्या मापाच्या उपभोग्यतेपेक्षां कमी असते. ह्या प्रकारें विचार केला असतां वस्तूची एकूण उपभोग्यता व कोणत्याहि एका क्षणीची उपभोग्यता ह्या भिन्न गोष्टी आहेत, हे लक्षांत येते. वस्तूची एकूण उपभोग्यता म्हणजे वस्तूच्या उपभोगापासून मिळालेले एकूण सुख. कोणत्याहि क्षणीची उपभोग्यता म्हणजे त्या क्षणी उपभोगिलेल्या शेवटच्या मापापासून मिळालेले सुख. उपभोगाची क्रिया चालू असता एखाद्या क्षणी ज्या मापाच्या उपभोगाचा विचार चालू आहे त्याला कोणत्याहि क्षणीची उपभोग्यता असें नांव देता येईल. कोणत्याहि क्षणीच्या उपभोग्यतेला जेव्हॉन्सनें 'अतिम किंवा कडेची उपभोग्यता' (Final Degree of Utility) असे नांव दिलें. अंतिम उपभोग्यतेला जेव्हॉन्सच्या मूल्यसिद्धान्ताच्या विवेचनांत मूलभूत स्थान आहे.

**कडेची उपभोग्यता व मूल्य**

पुरवठ्याच्या वाढत्या प्रमाणाबरोबर वस्तूची कडेची उपभोग्यता कमी कमी होत जाते ह्या सिद्धान्ताच्या आधारावर बाजारात वस्तूचे मूल्य कसें ठरतें ह्याची मीमांसा जेव्हॉन्सनें केली. खुली चढाओढ असतां बाजारांत होणारी पहिली गोष्ट म्हणजे कोणत्याहि वस्तूची किमत सर्वत्र एकच होते ह्याकरितां जेव्हॉन्सनें दिलेलें कारण असें होते की, गणदष्टया कोणत्याहि

वस्तूची सर्व परिमाणें (Unit) सारखी असल्यामुळे कोणत्याहि परिमाणाला अधिक किमत द्यावयाचे कोणत्याहि व्यक्तीला कारण पडत नाहीं. हे परिमाण घेतले काय अगर तें घेतलें काय ह्याबद्दल व्यक्ति पूर्णपणें बेफिकीर असते. अशा परिस्थितींत एकच किमत न ठरली तरच नवल ! बाजारात होणारी दुसरी गोष्ट म्हणजे वस्तूच्या कडेच्या उपभोग्यतेनुसार वस्तूची किमत ठरली जाते. बाजारांतील वस्तूची कडेची उपभोग्यता म्हणजे वस्तूचा जो पुरवठा असेल त्या पुरवठ्यातील शेवटच्या परिमाणाची उपभोग्यता. ही उपभोग्यता वस्तुमूल्य ठरविते. कारण ह्या उपभोग्यतेपेक्षा अधिक मूल्य देण्यास बाजारांतील कोणताही ग्राहक तयार नसतो.

**मेंजर**

नवसनातनवादी मूल्यसिद्धान्ताचा दुसरा प्रतिपादक मेजर. त्यानेहि आपल्या विवेचनाला सुरवात मानवी गरजाच्या विवेचनानेंच केली. मेजरने उपभोग्यतेची व्याख्या ' मानवी गरज भागविण्याची वस्तूची शक्ति, ' अशी केली. ही शक्ति ज्या गोष्टीत असते त्याना उद्देशून मेजरनें 'वस्तु' हा शब्दप्रयोग केला. वस्तु साकारच असली पाहिजे असा त्याचा आग्रह नव्हता. वस्तु व वस्तूची उपभोग्यता म्हणजे काय हे सागितल्यानंतर मेजरने एक महत्त्वाची गोष्ट केली; ती म्हणजे अर्थशास्त्राच्या दृष्टीने वस्तू–वस्तूतील फरक समजावून सागणें. त्यासाठी मेजरने दोन प्रकारे वस्तूचें वर्गीकरण केले. प्रथम श्रेणीतल्या, द्वितीय श्रेणीतल्या, तृतीय श्रेणीतल्या वस्तू हा वस्तूच्या वर्गीकरणाचा पहिला प्रकार. ज्या वस्तू ताबडतोब मानवी गरजा भागवू शकतात त्या प्रथम श्रेणीतल्या वस्तू होत. ज्या वस्तू अप्रत्यक्षपणे—म्हणजे प्रथम श्रेणीतल्या वस्तू उत्पादन करण्यास मदत करून मानवी गरजा भागवूं शकतात त्या द्वितीय श्रेणीतल्या वस्तू होत. उदाहरणार्थ—यंत्रसामुग्री. हें वर्गीकरण मूल्यसिद्धान्ताच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. कारण द्वितीय श्रेणीतल्या वस्तूंचेंच रूपान्तर प्रथम श्रेणीतल्या वस्तूत होत असतें आणि त्यामुळे द्वितीय श्रेणीतल्या वस्तूच्या मूल्यावर प्रथम श्रेणीतल्या वस्तूचे मूल्य अवलंबून असते.

**आर्थिक व नार्थिक वस्तू**

मेजरनें केलेलें वस्तूचें दुसऱ्या प्रकारचें वर्गीकरण म्हणजे आर्थिक वस्तू (Economic Goods) व नार्थिक वस्तू (Non–Economic Goods)

ज्या वस्तूचा सांठा--पुरवठा--त्या वस्तूकरितां असलेल्या गरजेच्या मानानें अल्प असतो त्या वस्तूंना मेजरनें आर्थिक वस्तू असे नांव दिले. ज्या वस्तूचा साठा गरजेच्या मानानें भरपूर--अगदी सर्वांची गरज पूर्णपणे भागेल इतका--असतो त्या नार्थिक वस्तू. आर्थिक व नार्थिक वस्तू ह्यांच्यांतला फरक कायम स्वरूपाचा नसतो. आज ज्या वस्तू आर्थिक आहेत त्या साठा भरपूर झाल्याने उद्या नार्थिक होतील. ह्याच्या उलट आजच्या नार्थिक वस्तू उद्यां आर्थिक होऊ शकतील, असो. वस्तूतील आर्थिक व नार्थिक वस्तू हा फरक मूल्याच्या दृष्टीनें अत्यत महत्त्वाचा आहे. कारण मेजरच्या मते वस्तूच्या कमतरतेच्या जाणिवेमुळें वस्तूला मूल्य प्राप्त होते. ज्या वस्तूचा पुरवठा भरपूर असतो त्या वस्तूना मूल्य असू शकत नाही. कारण त्या वस्तूची कोणासहि किंमत वाटत नाही. ह्याच्या उलट ज्या वस्तू मर्यादित असतात त्या वस्तूचे महत्त्व व्यक्तीला चटकन् पटतें. कारण त्या वस्तू आपल्याला लाभाव्यात म्हणून प्रत्येक व्यक्ति धडपडत असते. वस्तूच्या टंचाईची जाणीव झाल्यामुळें वस्तूबद्दल व्यक्तीला जें महत्त्व वाटते तें महत्त्व--म्हणजेच वस्तूचे व्यक्तीच्या दृष्टीनें मूल्य--हे मूल्य मानसिकच असणार हें उघड आहे. कारण एखाद्या वस्तूचे मूल्य प्रत्येक व्यक्तीच्या दृष्टीने सारखेच असेल असें नाही. ते त्या वस्तूच्या गरजेसंबंधी व्यक्तीला वाटणारी तीव्रता व वस्तूच्या टचाईची व्यक्तीला होणारी जाणीव ह्याच्या प्रमाणावर अवलबून राहील. ह्यापैकी टचाईची जाणीव, वस्तूच्या सांठ्याबद्दल व्यक्तीला असणारे ज्ञान व त्याच प्रकारच्या अन्य गोष्टी यावर अवलबून असते गरजेची तीव्रता मेंजरच्या मतें मुख्यत दोन गोष्टीवर अवलंबून असते. पहिली गोष्ट म्हणजे गरजेचें स्वरूप. कांही वस्तूकरितां असलेली गरज स्वाभाविकरीत्याच अधिक तीव्र असते. ज्या वस्तूंवर आपलें जीवनच अवलंबून असते अशा वस्तूना जरुरीच्या वस्तू म्हणतां येईल. उदाहरणार्थ हवा, पाणी व अन्न. अशा वस्तूकरितां असलेली गरज अत्यत तीव्र असते. त्या मानानें इतर वस्तूकरिता असलेली गरज कमी तीव्र असते. गरजेची तीव्रता जीवर अवलबून असते ती दुसरी गोष्ट म्हणजे एखाद्या वस्तूकरितां असलेली गरज आधीच ज्या मर्यादेपर्यंत भागली असेल ती मर्यादा. वस्तूकरितां असलेली गरज जसजशी अधिकाधिक भागली जाईल तसतशी त्या गरजेची तीव्रता कमी कमी होत जाते. त्यामुळें व्यक्तीकडून वस्तूला

देण्यांत येणारें महत्त्वहि कमी होत जातें. वस्तूचें व्यक्तीला वाटणारें महत्त्व कमी कमी होत जाते हे सागण्यात मेजरच्या मनात जेव्हॉन्सप्रमाणेंच कडेची उपभोग्यता अभिप्रेत आहे, हें स्पष्ट आहे. कडेची उपभोग्यता ह्याला मेजरनें आणखीहि एक विशिष्ट अर्थ दिला आहे. तो असा :––अनेक वस्तू अशा असतात की त्यांचा निरनिराळ्या गरजा भागविण्यासाठी उपयोग होऊ शकतो. ह्या सर्व गरजा सारख्याच तीव्र नसतात. तर कमीअधिक तीव्र असतात. ह्यांपैकी जी गरज अत्यत कमी तीव्र असते त्या गरजेच्या बाबतीतील उपभोग्यता ती कडेची उपभोग्यता. ह्या उपभोग्यतेवर व्यक्तीकडून वस्तूच्या प्रत्येक परिमाणाला देण्यात येणारे महत्त्व अवलबून असतें. त्या त्या परिमाणाच्या उपभोगानें जी सर्वात कमी तीव्रतेची गरज व्यक्ति भागवू शकते ती गरज भागविण्यामुळें मिळालेल्या समाधानाला ते ते परिमाण न मिळाल्याने व्यक्ति मुकते. त्या समाधानाचें व्यक्तीच्या दृष्टीने जें महत्त्व असते तें त्या परिमाणाचें महत्त्व असते. ह्या महत्त्वास त्या परिमाणाचे मानसिक मूल्य म्हणण्यास हरकत नाही. असो. कडेच्या उपभोग्यतेमुळें वस्तूचे मूल्य ठरते असे मेजरचेहि मत होते. त्याचे हे मत जेव्हॉन्सप्रमाणेच आहे हे स्पष्ट आहे. पण त्याच्या विवेचनात सुखवादाला थारा मिळाला नाही हे लक्षात ठेवण्याजोगे आहे.

**वॉलरास**

जेव्हॉन्स-मेजरप्रमाणेच वॉलरॉसनेसुद्धा उपभोग्यता व टचाई यांवर मूल्य सिद्धान्ताची उभारणी केली. आपल्याजवळील वस्तूची कांठावरील उपभोग्यता सारखी करावयाची व्यक्तीमध्ये जी प्रवृत्ति असते त्यातून अदलाबदलीचा उद्भव होतो. ह्या प्रवृत्तीमुळें आपल्याजवळील कांही वस्तूंच्या सांठ्यापैकी कांही भाग दुसऱ्यांना––ज्यांना जरुरी आहे त्यांना––व्यक्ति देऊ इच्छिते व त्या वस्तूच्या मोबदल्यांत आपल्याला जरूर असलेल्या वस्तू मिळवू इच्छिते. ह्या सर्वांचा परिणाम प्रत्येक वस्तूकरितां बाजारांत मागणी व पुरवठा ही दोन्ही निर्माण होण्यांत होतो. मागणी व पुरवठा ह्या दोन्ही गोष्टी किंमतीशी संबधित असतात; कारण वस्तूला किती प्रमाणांत मागणी करावयाची अगर तिची किती प्रमाणांत विक्री करावयाची हें प्रत्येक व्यक्ति किंमत पाहून ठरवीत असते. कारण द्यावी लागणारी किंमत व वस्तूची उपभोग्यता

ह्याचा मेळ व्यक्ति घालू इच्छीत असते. व्यक्तीव्यक्तीच्या मागणीची व व्यक्तीव्यक्तीकडून निरनिराळ्या किमतीना होणाऱ्या पुरवठ्याची बेरीज करून हरएक किमतीला कोणत्याहि वस्तूकरिता बाजारात किती मागणी आहे व किती पुरवठा आहे हे सहज काढता येते. ही माहिती मिळाल्यानतर बाजारात त्या वस्तूचे काय मूल्य ठरले जाईल ह्याचे अनुमान करणे कठिण नाही जी किमत असता वस्तूकरिता मागणी व वस्तूचा पुरवठा ही सारखी असतील ती किमत बाजारात शेवटी ठरेल. ह्या किमतीपेक्षा अन्य कोणतीहि किमत बाजारात प्रस्थापित झाली असता बाजारात स्थिरता निर्माण होणार नाही. कारण ज्या किमतीला मागणीपेक्षा पुरवठा अधिक अगर पुरवठ्यापेक्षा मागणी अधिक अशी बाजारात परिस्थिति असेल ती किमत असता मागणीवाल्याकडून अगर पुरवठावाल्याकडून बाजारात हालचाल चालूच ठवली जाईल ज्या किमतीला मागणी व पुरवठा दोन्ही सारख्या आहेत तो किमत ग्राहक व विक्रेते ह्या दोहोनाहि समाधानकारक वाटेल व त्या किमतीलाच बाजारात स्थिरता प्रस्थापित होईल. अशा किमतीला स्थिरताप्रस्थापक किमत म्हणता येईल वॉलरॉसनेहि वस्तूच्या मागणीच्या बाजूला महत्त्व दिले असले तरी त्यानेहि सुखवादाला फारसे महत्त्व दिले नाही मागणीच्या बाजूचा खुलासा मिळविण्यापलीकडे व्यक्तीच्या मनोव्यापारांत शिरण्याची जरुरी नाही अशी मेंजरप्रमाणे त्याचीहि वृत्ति होती. उपभोग्यता जास्तीत जास्त मिळवावयाची हे मानसशास्त्र त्याला मान्य होते. पण त्याचे बाजारात काय परिणाम होतात त्याचे गणिती ठोकताळे बसविण्याकडेच त्याने अधिक लक्ष पुरविले. बाजारात सर्व वस्तूच्या बाबतीत स्थिरता कोणत्या परिस्थितीत होते हा प्रश्न त्याने प्रामुख्याने हाताळला.

### नव्या मूल्यसिद्धान्ताचा अर्थशास्त्रावर परिणाम

अशा प्रकारे जेव्हॉन्स, मेंजर वॉलरास ह्यानी एकाच वेळी पण स्वतन्त्रपणे श्रमसिद्धान्ताच्या जागी नव्या मूल्यसिद्धान्ताची प्रस्थापना केली. पुरवठ्याच्या बाजूला महत्त्व न देता उपभोग ह्या वैयक्तिक क्रियेला महत्त्व द्यावयाचे, हे ह्या नव्या मूल्यसिद्धान्ताचे वैशिष्टच होते. व्यक्तिमनाशी सबधित असलेल्या उपभोग्यतेवर आधारलेल्या नव्या मूल्यसिद्धान्तामुळे

एखाद्या वस्तूच्या उत्पादनाला खर्च किती होतो ह्यापेक्षा त्या वस्तूमुळें कोणाची तरी गरज भागते की नाही, कोणाला तरी समाधान प्राप्त होतें कीं नाहीं, ह्याला अधिक महत्त्व दिलें पाहिजे, ही कल्पना अर्थशास्त्रात रूढ झाली. ही कल्पना अर्थशास्त्रांत रूढ होण्याचा अर्थशास्त्रावर परिणाम वरवर दिसू शकतो त्यापेक्षां पुष्कळच अधिक झाला. त्या कल्पनेमुळे अर्थ-शास्त्र हें व्यक्तिनिष्ठ शास्त्र बनले. व्यक्ति नि व्यक्तीच्या गरजा भागविण्या-पासून व्यक्तीला मिळणारे समाधान ह्याना अर्थशास्त्रात प्रधान स्थान प्राप्त झालें. श्रमसिद्धान्तामुळें--विशेषत. श्रमसिद्धान्ताच्या मार्क्सकृत विवेचनामुळें --उत्पादन व विभाजन ह्यास मिळालेलें महत्त्व कमी होऊन उपभोगाला, महत्त्व प्राप्त झालें. एखाद्या वर्गावर अन्याय होतो आहे की नाही, हे तपासण्यापेक्षा व्यक्तीला जास्तीत जास्त समाधान लाभत आहे किंवा नाही, मिळालेल्या उत्पन्नाचा जास्तीत जास्त समाधान मिळविण्यासाठी उपयोग होईल अशी आर्थिक व्यवस्था आहे किंवा नाही, ह्या प्रश्नावर अर्थशास्त्रात भर देण्यांत येऊं लागला. समाधान ही अत्यत वैयक्तिक बाब असल्यामुळे व्यक्ति कोणत्या वस्तूकरिता गरज व्यक्त करते, त्या वस्तूकरितां गरज व्यक्त करणे समाजाच्या दृष्टीने योग्य आहे किंवा नाही हे प्रश्न अर्थशास्त्राच्या कक्षे-बाहेरचे आहेत, अशी विचारसरणी सुरू होण्यास मदत झाली. सारांश, नव्या नव्या मूल्यसिद्धान्ताचा परिणाम अर्थशास्त्राच्या एखादढुसऱ्या भागापुरता मर्यादित न राहता सबध अर्थशास्त्रावरच झाला.

**नवा विभाजनसिद्धान्त**

मूल्यसिद्धान्ताच्या पाठोपाठ विभाजनतत्त्वाचीहि कसून छाननी झाली. त्याचा परिणाम म्हणून उत्पादनाच्या सर्व घटकाना लावता येणारा नवाच विभाजनसिद्धान्त पुढे आला. ह्या नव्या सिद्धान्ताचें नांव काठावरील उत्पादनक्षमतासिद्धान्त. (Theory of Marginal Productivity). नव-मतवादानें मान्य केलेल्या विभाजनसिद्धान्तांतील महत्त्वाचे तत्त्व हे की, भांडवल व मानवी श्रम ह्या दोन्ही घटकांची उत्पादनाला होणारी मदत एकाच मापानें मोजली जाते व त्यानुसार त्या घटकाची किंमत केली जाते. तें माप म्हणजे त्या घटकाच्या कांठावरील भागामुळें उत्पादनांत पडणारी भर. भांडवल व मानवी श्रम ह्या दोहोंची किंमत म्हणजेच त्या घटकाचा एकूण

उत्पादनातील वाटा एकाच तत्त्वानुसार ठरत असल्यामुळे व त्या तत्त्वांत एखाद्या घटकाची उत्पादनाला काय मदत होते हे बरोबर अजमावण्याची शक्ति असल्यामुळे त्या तत्त्वानुसार जर उत्पादनाचें विभाजन झाले तर एखाद्या घटकावर अन्याय होतो असे म्हणता यावयाचें नाही. काठावरील उत्पादनशक्तीवर आधारलेल्या नवसनातनवादाच्या विभाजनसिद्धान्तात ही गोष्ट अभिप्रेत आहे.

**नवा विभाजनसिद्धान्त नव्या मूल्यसिद्धान्ताचीच पुढली पायरी**

काठावरील उत्पादनक्षमतेवर आधारलेल्या विभाजनसिद्धान्ताची कल्पना काठावरील उपभोग्यतेवर आधारलेल्या मूल्यसिद्धान्ताचीच पुढली पायरी होती. काठावरील उपभोग्यतेमुळे वस्तुमूल्य ठरले तर घटकमूल्य का ठरले जाऊ नये हा प्रश्न विचारवताना पडणे साहजिक होते. घटकमूल्य व वस्तुमूल्य ह्यात एवढाच फरक करणें जरूर होते की, उपभोग्यते-ऐवजी उत्पादनक्षमतेवर घटकमूल्य अवलबून ठेवावयाचे. त्या फरकाचें कारण उघड आहे उत्पादनाचे घटक कोणासहि त्या घटकापासून प्रत्यक्ष समाधान लाभते म्हणून नको असतात. उत्पादनाचे घटक हवे असतात, ह्याचे कारण त्या घटकामध्ये उत्पादनक्षमता असते हेच असते. तेव्हां घटकाच्या उत्पादनक्षमतेवर घटकाचे मूल्य ठरले जाणे अपरिहार्य आहे. काठावरील उपभोग्यतेमुळें जर वस्तूची गरज भागविण्याची शक्ति मोजली जाऊ शकते तर एखाद्या घटकाची उत्पादनशक्ति अजमावण्यास काठावरील भागाची उत्पादनक्षमता हे माप का मानले जाऊ नये? ह्या प्रश्नाचें नवसनातनवाद्यानीं 'जरूर मानले जावे' असे उत्तर दिले व त्यामुळें विभाजनाचा काठावरील उत्पादनक्षमतासिद्धान्त नवसनातनवादाचा एक आवश्यक भाग होऊन बसला.

**नव्या विभाजनसिद्धान्ताचें श्रेय मुख्यतः मेंजरला**

कांठावरील उत्पादनक्षमतेवर आधारलेल्या नव्या विभाजनसिद्धान्ताचें बीज रोवण्याचे श्रेय मुख्यतः मेंजरला दिले पाहिजे. ह्या सिद्धान्ताला अनुकूल अशी कांही सूचक विधाने जेव्हॉन्सच्या लिखाणात आढळत असली तरी त्याना संघटित स्वरूप नसल्यामुळे नव्या विभाजनसिद्धान्ताचा पाया जेव्हॉन्सने घातला असें म्हणतां येत नाही. मेंजरनें मात्र नव्या मूल्यसिद्धा-न्ताचा विभाजनक्षेत्रांत विस्तार विशेष व्यवस्थितरीत्या केला. ह्यामुळें

नव्या विभाजनसिद्धान्ताची कल्पना येण्यासाठी मेजरपासून सुरुवात करण्यास हरकत नाहीं.

**मेंजरचें विभाजनतत्त्वाचें विवेचन**

मेजरने केलेल्या विभाजनासंबंधीच्या विवेचनाचा सारांश थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगता येईल. वस्तूचे वर्गीकरण वरिष्ठ श्रेणीतल्या वस्तू आणि कनिष्ठ श्रेणीतल्या वस्तू असे करता येईल. वरिष्ठ श्रणीतल्या वस्तू म्हणजे ज्या अप्रत्यक्षपणे म्हणजेच उपभोग्य वस्तूच्या निर्मितीला हातभार लावून मानवी गरजा भागविण्याला मदत करतात अशा वस्तू. अशा वस्तूंना उत्पादनवस्तू ( Production Goods) असेहि म्हणता येईल. उत्पादनवस्तूची किंमत ज्या उपभोग्य वस्तूच्या निर्मितीला त्या त्या उत्पादनवस्तु मदत करतात त्याच्या अपेक्षित किंमतीवर नेहमीच अवलंबून असते. असे होणे अपरिहार्य आहे. ह्या नियमाला अपवाद नाही. उत्पादनाला वेळ लागतो; म्हणूनच अपेक्षित किंमतीचा प्रश्न उद्भवतो. उत्पादनवस्तूच्या कोणत्याहि भागाची किंमत तो भाग उत्पादनात आल्यामुळे उपभोग्य वस्तूच्या उत्पादनात जी भर पडते त्यावर अवलंबून असते ही भर किती हे काढायचे असले तर तो भाग उत्पादनात आल्यामुळे होणारे एकूण उत्पादन आणि तो भाग उत्पादनात नसताना होणारे एकूण उत्पादन ह्याच्यातला फरक अजमावला की झाले. हा फरक प्रत्यक्ष वस्तुतहि अजमावता येतो किंवा पैशातहि अजमावता येतो. शेवटच्या भागामुळे उत्पादन जितक्या परिमाणाने वाढले असेल तितकी परिमाणे म्हणजे प्रत्यक्ष वस्तुरूप फरक; त्या परिमाणाची बाजारातील एकूण किंमत म्हणजे पैशाच्या मापाने मोजलेला फरक. हा फरक म्हणजेच घटकमूल्य. उत्पादन वस्तूचे मूल्य ठरविण्याची ही पद्धति घटकाचे मूल्य ठरण्याच्या बाबतीत अमलांत येते कारण उत्पादनाच्या दृष्टीने उत्पादनाचे घटक म्हणजे उत्पादनवस्तूच. मेंजरच्या विभाजनासंबंधीच्या विवेचनावरून कांठावरील उत्पादनक्षमतेच्या विभाजनसिद्धान्ताची सुरुवात मेजरनें केली आहे हे स्पष्ट दिसून येते.

**विभाजनतत्त्वांचा विकास**

मेजरने ज्या विभाजनतत्त्वाचें सूतोवाच केले ती विभाजनतत्त्वें विकसित करण्याचें श्रेय निश्चित कोणाला द्यावे ह्याबद्दल मतभेद असला

तरी अलीकडील बरेच अर्थशास्त्रज्ञ हे श्रेय विकस्डीड ह्या इंग्लिश अर्थशास्त्रज्ञाला देतात त्याच्या मते नवी विभाजनतत्त्वे प्रगल्भ स्वरूपात प्रथम विकस्डीडच्या 'विभाजनतत्त्वाचे साधिकरण' (Co-ordination of the Laws of Distribution) ह्या १८९४ साली प्रसिद्ध झालेल्या ग्रथात आढळते. त्या ग्रथातील मतानाच विकस्डीडच्या १९१० मधील ग्रथात (Commonsense of Political Economy) विशेषच धार आली. विकस्डीडची विभाजनविषयक मते फारच उद्बोधक आहेत स्वत चीं विभाजनतत्त्वे माडण्यापूर्वी त्याने विभाजनाचा विचार करण्याच्या सनातनवादी पद्धतीवर जोरदार टीका केली त्या टीकेचा आशय असा की, जमीन, भाडवल व मानवी श्रम ह्या प्रत्येक उत्पादनघटकाचा स्वतत्रपणें विचार करून उत्पादनाला त्याच्याकडून स्वतत्र स्वरूपाची मदत होते असें गृहीत धरून व ते उदाहरणाने सिद्ध करून प्रत्येक घटकाबद्दल स्वतत्र सिद्धान्त पुढे माडण्याची पद्धति अगदी चूक आहे त्या पद्धतीमुळे उत्पादन-विवेचनाला अकारण विस्कळीतपणा येतो हे तर खरेच; पण त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे उत्पादनाला हातभार लावण्याच्या बाबतीत सर्व घटक समान भूमिकेवर असतात, ही महत्त्वाची गोष्ट दृष्टीआड होते. सर्व घटकाची समान भूमिका आहे असे न मानले तर प्रत्येक घटकाकडून उत्पादनाला किती प्रमाणात हातभार लागतो ह्याची तुलना करता येत नाही; किबहुना तुलना करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही ह्यावर उत्तम उपाय म्हणजे विभाजनतत्त्वे एका सूत्रात गोवावयाची. ते सूत्र म्हणजे प्रत्येक घटकाने उत्पादनाला लावलेला हातभार एकाच मापाने मोजावयाचा. ते माप म्हणजे उत्पादनघटकाच्या काठावरील परिमाणाने उत्पादनांत टाकलेली भर. (Marginal Productivity of a factor) घटकाची काठावरील— म्हणजे वापरात असलेल्या शेवटच्या परिमाणाकडून उत्पादनात टाकलेली भर —उत्पादनक्षमता मोजावयाचा विकस्डीडने सुचविलेला मार्ग म्हणजे घटकाचें प्रमाण कायम ठेवून ज्या घटकाची काठावरील उत्पादनक्षमता मोजावयाची असेल त्याच घटकाच्या वापरात एक परिमाणाची भर घालावयाची. त्यामुळें उत्पादनांत जी वाढ होईल तीच त्या घटकाची काठावरील उत्पादनक्षमता. कांठावरील उत्पादनक्षमता मोजावयाचा दुसराहि एक मार्ग आहे तो म्हणजे

त्या विशिष्ट उत्पादनघटकाचा वापर एका परिमाणाने कमी करावयाचा. त्यामुळें जेवढे उत्पादन कमी होईल ती त्या घटकाची काठावरील उत्पादन-क्षमता. हा मार्ग पुढे विकसेलने सुचविला वस्तूच्या काठावरील उपभोग्यतेनें ज्याप्रमाणे वस्तूचे मूल्य ठरते त्याचप्रमाणे घटकाच्या कांठावरील उत्पादन-क्षमतेवरून घटकांचे मूल्य ठरते विभाजनाच्या कांठावरील उत्पादनक्षमता-सिद्धान्तामध्ये एक गोष्ट गृहीत आहे. ती ही की उत्पादनात इतर घटकांचें प्रमाण कायम ठेवून एखाद्या घटकाचा वापर कमीजास्त करणे शक्य असतें. (Substitutibility of Factors) काठावरील परिमाणाच्या बाबतीत ही शक्यता नक्कीच असते ह्या गृहीतकृत्याची जाणीव विक्स्डीडला होती हे त्याच्या लिखाणात स्पष्ट झाले आहे.

**क्लार्क याचे विचार**

विक्स्डीड–विकसेलनतर काठावरील उत्पादनक्षमता-सिद्धान्त पुढे नेण्याचे कार्य जे. बी क्लार्क ह्या अमेरिकन अर्थशास्त्रज्ञाने केले. त्याचे विचार १९१९ साली प्रसिद्ध झालेल्या 'संपत्तीचे विभाजन' (The Distribution of wealth ) ह्या ग्रंथात व्यक्त झाले. त्या विचाराचा थोडक्यात साराश पुढीलप्रमाणे आहे --खुल्या चढाओढीची परिस्थिति असता प्रत्येक घटकाचे मूल्य त्या घटकाच्या काठावरील उत्पादनक्षमतेवरून ठरते. कोणत्याहि घटकाची काठावरील उत्पादनक्षमता--त्या घटकाचा वापर एका परिमाणाने वाढवला अगर कमी केला असता--उत्पादनात पडणाऱ्या फरकाएवढी असते त्या फरकाची बाजारातील किंमत हे त्या घटकाचे मूल्य घटकाच्या प्रत्येक परिमाणाला सारखेच मूल्य देण्यात येते. कारण गुणदृष्टचा कोणत्याहि घटकाचे सर्वच भाग सारखे असतात. त्यामुळें त्याच्या मूल्यांत फरक करता येत नाही गुणदृष्टया सर्वच भाग सारखे असूनहि घटकाची काठा-वरील उत्पादनक्षमता--म्हणजे प्रत्येक पुढल्या भागामळे एकूण उत्पादनात पडणारी भर--कमी होत जाते ह्याचे कारण घटत्या फळाच्या सिद्धान्तात आढळते. ह्या सिद्धान्तानुसार इतर घटकाचें प्रमाण कायम ठेवून कोणत्याहि एकाच घटकाच्या प्रमाणात वाढ केली असतां उत्पादनात भर पडते; पण उत्पादनात पडणाऱ्या भरीचे प्रमाण अधिकाधिक कमी होत जातें. म्हणजेच घटकाचे प्रमाण वाढविलें असतां घटकाची कांठावरील उत्पादन-

क्षमता कमी कमी होत जाते. अर्थातच त्याचबरोबर घटकाचे मूल्यहि कमी होते. उत्पादनाच्या घटकाना काम देणारा उद्योगपति घटकाच्या काठावरील उत्पादनक्षमतेइतके मूल्य घटक मालकास द्यावयास केव्हाहि तयार असतो. कांठावरील उत्पादनक्षमतेप्रमाणे घटकाचे मूल्य ठरले जाणें हा नियम मानवी श्रम ह्या उत्पादन घटकाला जसा लागू पडतो तसाच भाडवल ह्या घटकालाहि लागू पडतो हे दोन घटक वगळता उत्पादनाचे दोन घटक उरतात. ते म्हणजे निसर्गाची देणगी किंवा जमीन आणि उद्योगपति. ह्यापैकी जमीन हा घटक सनातनी अर्थशास्त्राने स्वतंत्र घटक धरला असला तरी तसे करण्यास कोणतेहि सबळ कारण नाही. जमीन हा घटक स्वतंत्र धरण्यास सनातनवादी अर्थशास्त्रज्ञानी दोन कारणें दिली होती जमिनीचा पुरवठा वाढत नाही, हे पहिले कारण व घटत्या फळाचा सिद्धान्त जमीन ह्या घटकालाच लागू पडतो हे दुसरे कारण. ही दोन्ही कारणे फुसकी आहेत. जमिनीचा एकूण पुरवठा इतर घटकाच्या पुरवठ्याप्रमाणे वाढू शकत नाही; ही गोष्ट खरी असली तरी कोणत्याहि एका वस्तूच्या उत्पादनाच्या दृष्टीने विचार केल्यास जमीन ह्या घटकाचा पुरवठा ठरीव नसतो. तो कमीजास्त करता येतो. घटत्या फळाचा सिद्धान्त जमिनीलाच लागू पडतो, ह्या सनातनवादी अर्थशास्त्राच्या प्रमेयात काहीच अर्थ नाही. इतर घटकाचे प्रमाण स्थिर ठेवून कोणत्याहि एका घटकाचे प्रमाण वाढविले असता घटत्या फळाच्या सिद्धान्ताच्या अमलाखाली थोड्याफार वेळात तो घटक येतो असा अनुभव आहे. जमिनीला स्वतंत्र घटकाचे स्थान देणे जरूर नसल्यामुळे जमीन ह्या घटकाचा अंतर्भाव भाडवल ह्या घटकातच करण्यास हरकत नाही उत्पादनाच्या दृष्टीने जमीन हा भाडवलाचाच एक प्रकार आहे हे नाकारता यावयाचे नाही हे मान्य केल्यास त्याचा साहजिकच अर्थ असा होतो की काठावरील उत्पादनक्षमतेमुळे घटकाचे वेतन ठरते हा नियम सनातनी अर्थशास्त्रज्ञानी ज्याला जमीन म्हटले त्यालाहि लागू पडतो. आता राहिला उद्योगपति. उद्योगपतीच्या कार्यापैकी जो भाग मानवी श्रमाच्या स्वरूपाचा असतो तो अर्थातच काठावरील उत्पादनक्षमतेच्या नियमाच्या अमलाखाली येतो. जो तसा नसतो त्याचा विचार करण्याचे कारण नाही. कारण स्थिर परि-

स्थितीमध्यें उत्पादनातील धोका पत्करणे इत्यादि गोष्टीस उद्योगपतीच्या खास कार्याची गरज नसते. अशा परिस्थितीतील उत्पादनांत अविभाज्य असे धोके संभवनीय नाहीत. थोडक्यात खुली चढाओढ असतां घटकाचे मूल्य ( म्हणजे त्याचा उत्पादनांतील वाटा ) कांठावरील उत्पादनक्षमतेच्या नियमानुसार ठरले जाते. एकच नियम सर्व घटकांना सारखाच लागू पडत असल्यामुळें त्यापैकी एखाद्या घटकावर अन्याय होतो किंवा एकाद्या घटकाची दुसऱ्या घटकाकडून लुबाडणूक केली जाते असें म्हणणे चूक आहे.

**उत्पादनतत्त्वांची पुनर्घटना**

मूल्यतत्त्वे व विभाजनतत्त्वे ह्यात वरीलप्रमाणे स्थित्यतर होत असता त्यातून उत्पादनतत्त्वाचीहि (Theory of Production) पुनर्घटना झाली. उत्पादनखर्च निश्चित कशास म्हणावे व त्या खर्चास कारणीभूत होणारे उत्पादनघटक निश्चित कोणते कार्य करतात, हे उत्पादनाच्या बाबतीतील महत्त्वाचे प्रश्न आहेत. हे दोन्ही प्रश्न नवसनातनवादाच्या अमदानीत चागलेच घुमळून निघाले. त्या दोन्ही प्रश्नावर नवसनातनवादाला स्वतःचे असे काहीतरी म्हणावयाचे होते, हे खालील विवेचनावरून स्पष्ट होईल.

उत्पादनखर्च म्हणजे केवळ पैशाच्या रूपाने उद्योगपतीना पडणारा खर्च ( Money Cost of Production ) नसून त्याच्या मागें असणारा खराखुरा खर्च ( Real Cost of Production ) होय. वास्तव खर्चाच्या निश्चित स्वरूपाचा शोध अर्थशास्त्राने घेणे आवश्यक आहे, हे सनातनवादी मडळीनाच प्रतीत झाले होतें, पण उत्पादनाच्या बाबतीत निरनिराळ्या घटकाना भिन्न भिन्न स्वरूपाचा त्रास असतो– उदाहरणार्थ, मजुराना शारीरिक त्रास, तर भाडवलदाराना उपभोगनिग्रहामुळें पडणाऱ्या मनावरील दडपणाचा त्रास, असतो––अशी त्याची समजूत होती हे सर्व त्रास एकाच स्वरूपाचे आहेत व ते सर्व व्यक्तीच्या मनोव्यापाराशी संबंधित आहेत, ही कल्पना नवसनातनवादानेच प्रथम पुढें मांडली. ह्या विषयाचा प्रारभहि जेव्हॉन्सनेच केला.

**उत्पादनक्रियेमुळें असुखाची निर्मिति होते**

जेव्हॉन्सचे म्हणणे असे होतें की उत्पादित वस्तू मनुष्याला सुख देत असल्या तरी प्रत्यक्ष उत्पादनक्रिया सुखदायक नाही त्या उत्पादनक्रियेला हातभार लावणाऱ्या घटक-मालकाना असुखच (Disutility) अनुभवावें लागते उदाहरणार्थ, श्रम करणारा कामगार त्याला उत्पादन सुखाचे वाटत नाही. जेव्हॉन्सनें श्रमाची व्याख्याच मुळी शारीरिक त्रासातून उद्भवणारे मानसिक असुख अशी केली. श्रम करण्यात असुख असते, दु:ख होते, त्यामुळें श्रम करण्यास कोणीच सहसा तयार होत नाही, श्रम टाळण्याचीच प्रवृत्ति अधिक असते, अशी सुरवात करून मनुष्य श्रम करावयास प्रवृत्त होतो तो केवळ भावी सुखाच्या आशेने, असे त्याने प्रतिपादले. मानवी मन हा एक अतिसूक्ष्म तराजू असून त्यात उत्पादनक्रियेपासून उद्भवणारे असुख व उत्पादित वस्तू-पासून मिळणारे सुख ह्याची तुलना करूनच उत्पादनात होणारे असुख सोसूनहि उत्पादन करावयाचे की नाही, हा निर्णय घेतला जातो अशी जेव्हॉन्सची कल्पना होती. कामगारानाहि मानसिकच असुख होते. हे दाखविल्यानतर तेच तत्त्व भाडवलदार उद्योगपतीना लागू करणे अगदी सोपे होते उद्योग-पतीना उत्पादनातील धोके स्वीकारावे लागतात, तेव्हा त्याना सोसावा लागणारा त्रास मानसिक असतो, हे उघडच आहे. भाडवलाचा पुरवठा कर-णाऱ्याना उपभोगनिग्रह करावा लागून मानसिक त्रास -- जेव्हॉन्सच्या भाषेत असुख--अनुभवावा लागतो हे सिनिअॉरने दाखविलेच होते. तीच कल्पना असुख हा शब्दप्रयोग करून जेव्हॉन्सने स्वीकारली. ह्या कल्पनेत एक मोठा दोष होता तो दोष असा की, बहुधा बचत श्रीमत लोकाकडून म्हणजे ज्याच्या बहुतेक गरजा भागविल्यानतरहि ज्याच्याजवळ शिल्लक उरते अशा लोका-कडून केली जाते अशा लोकाना उपभोगनिग्रहाचा त्रास होतो असे म्हणण्यात काहीच स्वारस्य नव्हते हा दोष निवारण्याचा प्रयत्न बोम्बावर्क ह्या ऑस्ट्रियन अर्थशास्त्रज्ञाने १८८४ साली प्रसिद्ध झालेल्या आपल्या ग्रथात ( Positive Theory of Capital ) केला. त्याने असे दाखवून दिले की वर्तमानकालीन उपभोग भविष्यकालीन उपभोगापेक्षा श्रेष्ठ असतो त्यामुळे वर्तमानकालीन उपभोगाकडे मनुष्याची प्रवृत्ति आढळते. वर्तमानकालीन उपभोग अधिक महत्त्वाचा मानला जातो, ह्याची बोम्बावर्कनें तीन कारणे

दिली. तीं अशी —मनुष्यस्वभावातील उपजत उतावळेपणा, भविष्यकालासंबधीच्या अनिश्चिततेमुळे आज उपभोगाचा मोह आवरला तरी त्याचा मोबदला भावी कालातील उपभोगाच्या रूपाने मिळेल अशी खात्री नसते. म्हणून आजच्या उपभोगाला प्राप्त होणारे महत्त्व व भविष्यकाळाकरिता तरतूद करण्याची जरुरी असलेल्या व नसलेल्या अशा दोन्ही प्रकारच्या, लोकाकडून हातात असलेल्याची किमत अधिक केली जाते. हे सत्य भावी काळाकरता ज्याना तरतूद करावयाची जरुरी भासत नाही त्याच्यात वर्तमानकालीन उपभोगाची प्रवृत्ति जोरदार असणे साहजिक म्हणता येईल. ज्याना तशी जरुरी भासते त्याचा वर्तमानकालहि हलाखीचाच असतो यामुळे हातातील वस्तूचे महत्त्व त्याना असतेच असते वर्तमानकालातला उपभोग भविष्यकालातील उपभोगापेक्षा महत्त्वाचा असे प्रत्येक व्यक्ति समजत असल्यानेच बचत करणाऱ्याना व्याज द्यावे लागते, असें बोम्बावर्कचे व्याजाचे समर्थन होते. बचत करणे ह्याचा अर्थ अधिक महत्त्वाचा वर्तमानकालीन उपभोग सोडून कमी महत्त्वाचा भविष्यकालीन उपभोग पत्करणे ह्यात असुख आहे. कारण उपभोगाकरिता थाबावे लागते. थाबण्याची किमत म्हणून बचत करणारे व्याजाची मागणी करतात साराश, व्याज ही उपभोगप्रतीक्षेची ( Waiting ) किमत आहे असे बोम्बावर्कचे मत होते

**अन्य-वस्तू-वर्जन-सिद्धान्त**

असुखाची कल्पना सुखवादी जेव्हॉन्सला सुचावी हे स्वाभाविक होते. ही कल्पना व त्या अनुषगाने अर्थशास्त्रात आलेला खऱ्याखुऱ्या उत्पादनखर्चाचा सिद्धान्त पुढेहि अर्थशास्त्रात बराच काळपर्यंत रेगाळला. एर्थवर्थ, क्लार्क, ह्या मडळीनी त्या सिद्धान्ताला पाठिबा दिला होता; त्या सिद्धान्ताला बाजूला टाकणारा उत्पादनखर्चाचा सिद्धान्तहि जेव्हॉन्सनतर लवकरच पुढे आला. त्या सिद्धान्ताचे नाव "अन्य-वस्तू-वर्जन सिद्धान्त. ( Theory of alternate or opportunity Cost )" जेव्हॉन्सचा सिद्धान्त नवसनातनवादातील बऱ्याच लोकाना पसत पडला नाही. ह्याची दोन कारणें होती. एकतर सुखवादी तत्त्वज्ञानाचा अप्रिय वास जेव्हॉन्सच्या सिद्धान्ताला होता आणि शिवाय असुखाची भावना ही एक मानसिक क्रिया असल्यामुळे ती मोजणीय

नाहीं. जेव्हॉन्सचा सिद्धान्त स्वीकारला की, मनुष्य म्हणजे केवळ सुखाच्या मागे धावणारा प्राणी आणि सुख-असुखाचे मापन करणारे यंत्र, अशी त्याच्याबद्दल विचित्र कल्पना होते ती समजूत खोटी असो अगर नसो; पण उगाच गैरसमजुतीला कारण होणारा सिद्धान्त अकारण कशाला स्वीकारावा असें दुसरा सिद्धान्त माडणाऱ्या नवसनातनवाद्याचे म्हणणे होते.

**वैसरनें केलेली अन्यवस्तूवर्जन सिद्धान्ताची मांडणी**

उत्पादनखर्चाचा अन्य-वस्तू-वर्जन-सिद्धान्त मेंजर–वॉलरास ह्यानीच सूचित केला होता, पण त्याची व्यवस्थित माडणी करण्याचे श्रेय वैसर ह्याला मिळाले त्याच्या १८८९ मधील ग्रथात (Natural Value) ह्या सिद्धान्ताची सुव्यस्थित माडणी आढळते. त्या सिद्धान्ताचा आशय असा होता की, एका वस्तूचा उत्पादनखर्च ती वस्तु उत्पादन करण्यामुळे अन्य ज्या वस्तू वर्ज कराव्या लागतात त्याच्या प्रमाणावरून मोजला जावा एका वस्तूच्या उत्पादनामुळे अन्य वस्तूचे उत्पादन आपोआपच वर्ज होते. ह्याची कारणें विशिष्ट परिस्थितीत आहेत. ती अशी की, उत्पादनाच्या सर्वच घटकात एकापेक्षा अधिक वस्तु उत्पादन करण्याची कुवत असते. पण एका वेळी त्याचा उपयोग एकाच वस्तूच्या उत्पादनासाठी करता येतो. उदाहरणार्थ :—एखाद्या जमिनीत जोधळ्याचें अगर कापसाचे उत्पादन होऊ शकत असले तरी एकाच वेळी ती जमीन कापसाच्या व जोंधळ्याच्या उत्पादनासाठी वापरणे अशक्य आहे. अशा परिस्थितीत घटकाचा उपयोग कोणत्यातरी एखाद्या वस्तूच्या उत्पादनासाठी करावयाचे ठरविले—हा निर्णय घेण्याची आवश्यकता घटकाच्या विविध उपयोगामुळे निर्माण होते—तर त्यापासून होणारे इतर वस्तूचे उत्पादन वर्ज मानावे लागते कापसासाठी जमीन वापरावयाचे एकदा ठरले की जोंधळा वर्ज जे जमिनीला लागू तेच श्रम, भाडवल व उद्योगपति या घटकाना लागू. अशा परिस्थितींत वैसरचे म्हणणे असे कीं, एखाद्या वस्तूच्या उत्पादनावर घटकाचे जेवढे प्रमाण खर्च पडते तेवढेच प्रमाण खर्च केल्यानें इतर वस्तूचे जेवढे प्रमाण उत्पादित होऊ शकेल तो त्या वस्तूचा उत्पादनखर्च. त्या खर्चाएवढी किमत आली तर उत्पादन

करणें आर्थिक दृष्टया योग्य ठरेल. उदाहरणानें हे स्पष्ट होईल एका दिवसाच्या श्रमाने एखादा सुतार एक कपाट अगर दोन टेबले अगर चार खुर्च्या तयार करू शकत असला तर एका कपाटाचा उत्पादनखर्च दोन टेबले अगर चार खुर्च्या असे म्हणता येईल. दोन टेबलांइतकी अगर चार खुर्च्याइतकी किमत कपाटाला आली तरच कपाटावर श्रमाचा खर्च आर्थिक दृष्टया योग्य ठरेल. बाजारात स्थिरतेची परिस्थिति तशा किमती प्रस्थापित झाल्या तरच ठरेल. बाजारांत कपाटाची किमत दोन टेबलाच्या किमतीपेक्षा अधिक असेल तर कपाटाचे उत्पादन करण्याची प्रवृत्ति वाढेल. कमी असेल तर टेबलाचे उत्पादन वाढेल. वरवर पहाता हा सिद्धान्त श्रम-सिद्धान्ताला अनुकूल दिसेल; पण तो गैरसमज टाळण्याकरिता हे स्पष्ट केलें पाहिजे की, ह्या सिद्धान्ताच्या प्रवक्त्याना मुळात बाजारातील किमती गरजेच्या तीव्रतेने ठरतात हे मान्य होते. शिवाय उत्पादनाचे श्रमाशिवाय इतरहि घटक असतात व त्या सर्वांना वरील विवेचन लागू होते हे त्याना मान्य होते. ह्या दोन्ही गोष्टी श्रमसिद्धान्तवाले कदापि मान्य करणार नाहीत. ह्या सिद्धान्ताचा उपयोग करून वैसरने असा निष्कर्ष काढला की, उत्पादनाच्या उपलब्ध घटकाची निरनिराळ्या वस्तूच्या उत्पादनात अशा प्रकारे वाटणी केली जाते की, त्या घटकाची काठावरील उत्पादनक्षमता त्या घटकाच्या विविध उपयोगात सारखी आहे असे झाल्यासच उपलब्ध साधनांचा जास्तीत जास्त चागला उपयोग होतो. एखाद्या वस्तूच्या उत्पादनात एखाद्या घटकाची काठावरील उत्पादनक्षमता दुसऱ्या वस्तूच्या उत्पादनांतील काठावरील उत्पादन क्षमतेपेक्षा कमी असेल तर पहिल्या वस्तूचे उत्पादन वाढवून दुसऱ्या वस्तूचे उत्पादन कमी करणे लाभदायक होते जेथे एखादा घटक अधिक उपयुक्त तिथे तो अधिक प्रमाणात वापरला जावा हें सरळच आहे.

### उत्पादनखर्चाची विकस्डीडनें केलेली व्याख्या

वैसरच्या उत्पादनखर्चसिद्धान्ताला कमीजास्त प्रमाणांत मान्यता ब्रोम्बावर्क, विकमेल, विकस्डीड, ह्यांनी मान्यता दिली होती इग्लंड-मध्ये तो सिद्धान्त प्रथम विकस्डीडने आपल्या १९१० तील ग्रथांत माडला. त्यानें उत्पादनखर्चाची व्याख्याच पुढीलप्रमाणे केली —एखाद्या-

वस्तूचा उत्पादनखर्च म्हणजे ती वस्तु उत्पादन केल्यामुळे इतर ज्या ज्या वस्तूचे उत्पादन अशक्य झाले. त्याची किमत (अर्थात् त्या विशिष्ट प्रमाणाची).

### उत्पादन-घटकांचें नवीन प्रकारें वर्गीकरण

उत्पादनाचे घटक व त्यांचे उत्पादनांतील कार्य ह्याची नवसनातन-वादाच्या कालात पुरेशी चर्चा झाली. ह्याबाबतीत प्रथमच ही गोष्ट सागितली पाहिजे की, नवसनातनवादानें जमीन ह्या घटकाचे स्वतंत्र अस्तित्वच अमान्य केले. अर्थात् ही गोष्ट एकदम झाली नाही. जमिनीचे अस्तित्व स्वतंत्र घटक ह्या नात्याने नाकारण्याची वृत्ति प्रामुख्याने प्रथम क्लार्कच्या लिखाणात दिसली. क्लार्कच्या मते भांडवली वस्तूचा विशेष प्रकार ह्याशिवाय जमिनीला दुसरे स्थान नाही. थोडक्यात--जमीन हा भांड-वलाचाच एक भाग होय. जमिनीला स्वतंत्र घटक मानण्याची सना-तनवादी अर्थशास्त्रज्ञानी दोन कारणे दिली होती. ती म्हणजे जमिनीचा मर्यादित पुरवठा व जमिनी जमिनीच्या-दर्जातील फरक. क्लार्कच्या मते ही दोन्ही कारणे फुसकी आहेत. एका कोणत्याहि विशिष्ट वेळी प्रत्येक घटकाचा पुरवठा मर्यादित असतो शिवाय प्रत्येक घटकाच्या परिमाणाच्या दर्जा-दर्जात फरक असतो दोन कामगाराची उत्पादन-क्षमता सारखी असते असे म्हणता येईल काय ? ह्याहि पुढे जाऊन विकस्टीड ह्याचे असे म्हणणें होते की, ज्याचे विशिष्ट उपयोग आहेत असे घटक व ज्याची उपयुक्तता विविध आहे असे घटक असेच वर्गीकरण करणे योग्य होईल. कोणत्याहि वस्तूचे उत्पादन घेतले तर त्याला लागणाऱ्या कांही गोष्टी अशा असतील की, त्याच्या ऐवजी दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीचा उपयोग करताच येणार नाही; तर काही अशा असतील की त्याचा एक-मेकाऐवजी उपयोग करता येईल. अशा परिस्थितीत श्रम, भांडवल व जमीन असें ठोकळेबाज वर्गीकरण करण्यात अर्थ नाही.

### उत्पादनांतील भांडवलाचें कार्य

उत्पादनात भांडवलाचे कार्य कोणते ह्याची सुस्पष्ट कल्पना बोम्बा-वर्क ह्याने त्याच्या उपरोक्त ग्रथात पुढे मांडली. त्याच्या मते दीर्घकाल

खाणाऱ्या उत्पादनपद्धतीचा अवलब सुलभ करणें हे भाडवलाचें उत्पादनांतील खरे कार्य आहे. अधिक वेळ लागणाऱ्या उत्पादनपद्धतींचा अवलंब करण्याची जरुरी पडते. कारण ताबडतोब उत्पादन शक्य करणाऱ्या उत्पादनपद्धपेतीक्षा त्या अधिक उत्पादक असतात. यत्राच्या मदतीशिवाय केलेले उत्पादन ताबडतोब होऊं शकते ही गोष्ट खरी; पण यत्राच्या उत्पादनशक्तीचा त्या उत्पादनाला लाभ मिळत नाहीं; पण यांत्रिक उत्पादन दीर्घकालपर्यंत चालू असते. कारण यंत्रनिर्मितीचा काळ उत्पादनाच्या काळातच धरावा लागतो. उत्पादनाचा काळ वाढला तर मध्यतरीच्या काळात उत्पादकाना उपजीविका पुरविण्याचीहि जबाबदारी वाढते. त्यासाठीच भाडवल लागते तेव्हा उत्पादन पुरें होईपर्यंत थाबण्याची कुवत उत्पादनात गुतलेल्याना प्राप्त करून देणे हेंच भाडवलाचें कार्य उत्पादनकालात मजुराची मजुरी व कच्च्या मालाची खरेदी ह्यासाठीच उद्योगपतीना भाडवलाची जरुरी भासते व ते भाडवलाची मागणी करतात. उत्पादनाला वेळ लागतो म्हणून भांडवलाची आवश्यकता निर्माण होते व अधिक काळ लागणाऱ्या उत्पादनपद्धती अधिक उत्पादक असतात. असे बोम्बावर्कपूर्वी जेव्हॉन्स व मेजर ह्या दोघानी सुचविलें होते. ह्यासबधात भावी फलासाठी आगाऊ श्रम करणें केवळ भाडवलामुळें शक्य होते असे जेव्हॉन्सनें लिहिले; तर उत्पादनकाळाची मुदत वाढविली असतांच भाडवल वाढते आणि जेवढे भांडवल वाढवावे तेवढी उत्पादनशक्ति वाढते असे मेंजरनें प्रतिपादिले. बोम्बावर्कनंतर एजवर्थ, विकसेल, प्रभृतीनीं बोम्बावर्कला मान्यता दिली. उत्पादनाचा काळ वाढू लागला म्हणजे प्रत्यक्ष उपभोग वस्तू उत्पादिणाऱ्यांचे प्रमाण कमी होऊ लागतें पण त्यामुळे उपभोग्य वस्तूचे उत्पादन कमी न होतां उलट वाढतेच असें विकसेलने ( Lectures on Political Economy) दाखवून दिले.

**उद्योगपतींचीं कार्यें**

उद्योगपतीच्या कार्यासबंधीं कल्पना येण्यासाठी वॉलरॉस व एजवर्थ ह्याच्याकडे वळलें पाहिजे. वॉलरासनें आपल्या ग्रंथांत ( Elements of Pure Political Economy ) उद्योगपतींची कार्यें अगदीं स्पष्ट केलीं. त्याच्या मते उद्योगपति हा निरनिराळे घटक भाड्यानें घेऊन त्यांना एकत्रित

करून उत्पादन शक्य करणारा असतो. तात्त्विक दृष्ट्या श्रम आणि भांडवल ह्यापैकी कोणत्याहि घटकाच्या एखाद्या परिमाणावरहि उद्योगपतीची मालकी असण्याचे कारण नाही; पण प्रत्यक्षात उद्योगपति थोड्याफार प्रमाणांत घटक–मालकहि असतो. उद्योगपति ह्या नात्याने त्याला दोन प्रकारच्या बाजारांना तोंड द्यावे लागते. पैकी घटकाच्या बाजारात उद्योगपतीची भूमिका ग्राहकाची असते आणि उपभोग्य वस्तूच्या बाजारात त्याची ही भूमिका विक्रेत्याची असते. खुली चढाओढ दोन्ही बाजारात असल्यास उद्योगपतीला शेवटी असें आढळून येते की, दीर्घकाळचा विचार करता शुद्ध नफ्याच्या रूपाने त्याच्या पदरात काहीच पडत नाही. कारण खुल्या चढाओढीत दीर्घ काळची स्थिरताप्रस्थापक किंमत उत्पादनखर्चाइतकीच असते.

**एजवर्थचें उद्योगपतीविषयक विवेचन**

वॉलरॉसनतर एजवर्थ ह्याने उद्योगपतीची कार्ये ह्या विषयाची विस्तृत चर्चा केली. ( Collected Papers relating to Political Economy ). भाडवलदार ब उद्योगपति एकच ही सनातनवाद्याची कल्पना, भांडवलाची उसनवारी करून त्याच्या आधारावर उत्पादनातील धोके पत्करणारा ही उद्योगपतीची भूमिका ही त्यानतर आलेली कल्पना व उद्योगपति म्हणजे केवळ बिननफ्याचा व्यवस्थापक ही वॉलरॉसची कल्पना ह्यांचा एजवर्थने व्यवस्थित परामर्ष घेतला. वरीलपैकी सनातनवाद्याची कल्पना वस्तुस्थितीच्या व तात्त्विक विवेचनाच्या दृष्टीने त्याला असमर्थनीय वाटली. तात्त्विक दृष्टीने असमर्थनीय असण्याचे कारण असे की त्यात नफा व व्याज ह्या दोन अगदी भिन्न प्रकारच्या उत्पन्नाची गफलत होते वस्तुस्थितीच्या दृष्टीने असमर्थनीय होण्याचे कारण म्हणजे स्वत:च्या भाडवलावर व्यवहार करणारे उद्योगपती कमी होत होते. उसन्या भाडवलावर धोके पत्करणारा ही उद्योगपतीची भूमिका एजवर्थला त्यांतल्या त्यात मान्य होती; पण उद्योगपतीचा नफा शून्य होतो, ही वॉलरॉसची कल्पना त्याने अमान्य केली. उद्योगपतीला फायदा होत नसेल तर त्याला उद्योग करायला प्रोत्साहन तरी कोणतें असा प्रश्न त्याने केला. शिवाय प्रत्यक्षांतील उद्योगपतीची उत्पन्ने पहाता त्यांना फायदा–तोटा काहीच होत नाही, असे म्हणणें चमत्कारिक दिसते असे त्याचे म्हणणें होतें. त्याला

उत्तर देण्याचा क्लार्क ह्याने (१८९९) प्रयत्न केला. त्याने असे दाखवून दिले की खुली चढाओढ व अचल आर्थिक स्थिति असता उत्पादनात धोका नसतो तेव्हा तात्त्विक दृष्ट्या उत्पादनातील धोके उद्योगपति स्वीकारीत असला तरी व्यवहारांत धोके नसल्यामुळे त्याला फक्त व्यवस्थापकाचे कार्य करावे लागते. अर्थात् त्याला धोका पत्करल्याबद्दल कांही मिळण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. व्यवस्थापकाच्या कामाबद्दल त्याला जे काही मिळते त्याला नफा म्हणता येत नाही. क्लार्कचे हे उत्तर एजवर्थ ह्याने मानले नसते कारण आपल्या लिखाणात एके ठिकाणी त्याने असा प्रश्न केला आहे की, व्यवहारात ज्याला कोणताहि धोका घ्यावा लागत नाही त्याला उद्योगपति म्हणून त्या शब्दाचा गैरवापर--ओढाताण--तरी कशाला करावा ? ह्या प्रश्नाला उत्तर १९२१ मधील आपल्या ग्रथात ( Risk Uncertainty and Profit ) नाईट ह्या अमेरिकन अर्थशास्त्रज्ञाने दिले. त्याचे म्हणणे असे की, अचल आर्थिक परिस्थितीमध्ये चालू उत्पादनात धोका असतोच एकतर कोणताच बदल न होणारी आर्थिक व्यवस्था हा अचल ह्या शब्दाचा अर्थ नाही बारीकसारीक बदल व त्या बदलामुळे निर्माण होणारी अनिश्चितता तशा प्रकारच्या आर्थिक व्यवस्थेतहि असते. शिवाय अचल आर्थिक व्यवस्था अचल राहीलच की नाही ह्याबद्दलची अनिश्चितता असते ह्या दोन प्रकारच्या अनिश्चिततेमुळे त्या आर्थिक व्यवस्थेत धोका संभवतो. म्हणूनच उद्योगपतीची जरूरी भासते

**घटत्या, वाढत्या व स्थिर फळाचे सिद्धान्त**

घटत्या फळाचा सिद्धान्त ( Law of Diminishing Returns ) सर्वसामान्यपणे सर्व नवसनातनवाद्यानी मान्य केला. तसें करणे जरूरच होते कारण त्या सिद्धान्तावर काठावरील उत्पादनक्षमतेच्या विभाजनाचा सिद्धान्त आधारलेला होता. तो सिद्धान्त त्यानी इतका मान्य केला की, त्या सिद्धान्ताचा पुरावा देण्याची विशेष कोशीस करण्याचीहि त्याना जरुरी वाटली नाही. विकस्डीडने ह्या सिद्धान्ताचे एक उघड दिसणारी, सर्वत्र आढळणारी आणि म्हणूनच एक सामान्य स्वरूपाची वस्तुस्थिति असें वर्णन केले. आर्थिक वस्तुस्थितीला एक सर्वव्यापी व सर्वत्र आढळणारा सिद्धान्त असे क्लार्कने त्याला म्हटले. जमिनीचें प्रमाण स्थिर ठेवून इतर घटकाचे प्रमाण

वाढवावे. तसे उत्पादन वाढत नाही हे अनुभवानेच सिद्ध झालेलें सत्य आहे, असे वॉलरॉसने लिहिले. तसे नसते तर जमिनीच्या एका लहानशा तुकड्या-पासून वाटेल तेवढे उत्पादन शक्य झाले असते असे त्याचे म्हणणे होते. नाही म्हणावयाला विकमेल ह्याने मात्र भरपूर गणीत माडून गणिताच्या शास्त्रा-नुसारसुद्धा घटत्या फळाचा सिद्धान्त अटळ आहे हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला.

**घटत्या फळाचा सिद्धान्त म्हणजेच वाढत्या खर्चाचा सिद्धान्त**

घटत्या फळाच्या सिद्धान्ताबद्दल नवसनातनवाद्यानी विशेष गोष्ट केली ती ही की, तो सिद्धान्त फक्त जमिनीलाच लागू पडतो अशी सनातनवादाने त्या सिद्धान्तावर जी निष्कारण मर्यादा घातली होती ती दूर केली. कोण-त्याहि घटकाचे प्रमाण स्थिर राखून इतर घटकाचे प्रमाण वाढविले असता हा सिद्धान्त अनुभवास येतो असे त्याचे म्हणणे होते. घटत्या फळाच्या सिद्धान्ताला वाढत्या खर्चाचा सिद्धान्तहि ( Law of Increasing Cost ) म्हणता येईल कारण ह्या सिद्धान्ताचा अमल सुरू झाला की प्रथम काठावरील उत्पादनखर्च (Marginal Cost of Production ) व नतर सरासरी उत्पादनखर्च ( Average Cost of Production ) वाढू लागतो.

**वाढत्या फळाचा सिद्धान्त**

घटत्या फळाच्या सिद्धान्तात नवसनातनवाद्यानी सुधारणा केली; तर वाढत्या फळाचा सिद्धान्त ( Law of Increasing Returns ) त्यानी नव्यानेच पुढे माडला. इतर घटकाचे प्रमाण कायम ठेवून एका घटकाचे प्रमाण वाढविले असता काही काळपर्यंत उत्पादन वाढते; एवढेच नव्हे तर उत्पादनवाढीचे प्रमाण त्या विशिष्ट घटकात केलेल्या वाढीच्या प्रमाणापेक्षा जास्त असते, हा त्या सिद्धान्ताचा आशय आहे हा सिद्धान्त विकस्डीडने पुढील शब्दात सागितला :—एखाद्या वस्तूचे उत्पादन दुप्पट करावयाचें असल्यास सर्व घटकाचे प्रमाण वाढवावे लागतें असे नाही. काही घटकाचे प्रमाण दुप्पटीपेक्षा कमी वाढविले तरीसुद्धा उत्पादन दुप्पट अगर अधिक होऊ शकते कारखानदारीत ही परिस्थिति विशेष अनुभवास येते, असे त्याचे म्हणणें होते वाढत्या फळाच्या सिद्धान्तामुळे काठावरील उत्पादनखर्च व त्या अनुषगाने सरासरी खर्च कमी होतो. म्हणूनच ह्या सिद्धान्ताला घटत्या

उत्पादनखर्चाचा सिद्धान्त ( Law of Diminishing Cost ) असेंहि म्हणतात. मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाचे फायदे ह्या सिद्धान्ताच्या अमलातून उद्भवतात. घटत्या उत्पादनखर्चाच्या सिद्धान्ताचा अमल जोंपर्यंत चालू आहे तोपर्यंत चढाओढीच्या तत्त्वावर आधारलेल्या बाजारात स्थिरता प्रस्थापित होणार नाही, हे विकसेलने दाखवून दिले. चढाओढीत सर्वांत कमी जी किमत असेल त्याच किमतीला स्थिरता प्राप्त होते. कारण जो कमी दराने विकतो त्याच्याकडून घेण्याची ग्राहकाची वृत्ति असते. जोंपर्यंत उत्पादनखर्च घटत आहे तोपर्यंत सर्वांत कमी किमत कोणती ते ठरणारच नाही; म्हणून स्थिरता प्रस्थापित होणारच नाही हे उघडच आहे.

**घटत्या व वाढत्या फळाचे सिद्धान्त एकमेकांच्या उलट नाहींत**

घटत्या व वाढत्या फळाच्या सिद्धान्तांचे सपूर्ण व सुदर विवेचन एजवर्थने केले. त्याच्या विवेचनाचे पहिले वैशिष्टय़ असे की, घटत्या व वाढत्या फळाचे सिद्धान्त एकमेकाच्या उलट असतात--म्हणजे एकमेकापासून अगदी भिन्न असतात--असे समजण्याचे मुळीच कारण नाही, असे त्याने दाखवून दिले. वस्तुस्थिति अशी असते की, उत्पादनाच्या कोणत्याहि घटकावर प्रथम काही काळपर्यंत वाढत्या फळाचा अमल असतो; म्हणजे त्या घटकाचे प्रमाण वाढविले म्हणजे त्या प्रमाणापेक्षा जास्त प्रमाणात उत्पादन वाढते; पण त्यानंतर घटत्या फळाचा अमल सुरू होतो, म्हणजे धटकाचे प्रमाण वाढते त्यापेक्षा कमी प्रमाणात उत्पादन **वाढतें.** घटत्या फळाचा अमल एकदां सुरू झाला म्हणजे तो थोपविता येत नाही. त्याच्या विवेचनाचे दुसरे वैशिष्टय़ असे की, त्याने घटत्या-वाढत्या फळाचे अत्यत शास्त्रीय असें कारण दिलें. एजवर्थचे विवेचन लक्षात घेतल्यास नवसनातनवादाची भूमिका स्पष्टपणें उमजेल.

**उत्पादनफलसिद्धान्त**

उत्पादनांत दोन्ही सिद्धान्त क्रमाने अनुभवास येत असल्यामुळे दोन्ही सिद्धान्त एकत्र करून त्यांची, उत्पादनफलसिद्धान्त (Laws of Returns) ह्या नांवाखाली एकत्र माहिती त्याने दिली. ती अशी :--कोणत्याहि

उत्पादनघटकाची परिमाणे एकामागून एक वापरली असतां जर पहिल्या परिमाणापासून होणारे उत्पादन दुसऱ्या परिमाणापासूनच्या उत्पादनापेक्षा कमी असेल तर वाढत्या फळाच्या सिद्धान्ताचा अमल आहे असे समजावे. ह्याच्या उलट पहिल्या परिमाणापासूनचे उत्पादन दुसऱ्या परिमाणापासूनच्या उत्पादनापेक्षा जास्त असेल तर घटत्या फळाच्या सिद्धान्ताचा अमल आहे असें समजावे. घटत्या फळाचा सिद्धान्त शेतकीत व वाढत्या फळाचा सिद्धान्त कारखानदारीत अनुभवास येतो ह्या म्हणण्यात तथ्य नाही दोन्ही सिद्धान्त सर्व प्रकारच्या उत्पादनात प्रथम वाढत्या फळाचा व नतर घटत्या फळाचा ह्या क्रमाने अनुभवास येतात वाढत्या फळाचा सिद्धान्त अनुभवास येण्याचे मुख्य कारण म्हणजे घटकाच्या परिमाणाची अविभाज्यता (Indivisibility of Factor Units) अविभाज्य परिमाणाला काही विशिष्ट उत्पादनशक्ति असते. त्या विशिष्ट उत्पादनशक्तीचा पुरेपूर फायदा जोपर्यंत घेतला गेला नाही तोंपर्यंत वाढते फळ असते घटत्या फळाचा सिद्धान्त अनुभवास येतो, ह्याचे कारण एका घटकाऐवजी दुसरा घटक वापरता येण्याची अशक्यता (Non-substitutability of Factors of Production) असे सागतां येईल. एका घटकाऐवजी दुसरा घटक वापरणे जर केव्हाहि शक्य झाले असते तर कोणत्याहि घटकाची मर्यादितता भासली नसती. कारण दुसरे घटक त्याऐवजी वाढवून उत्पादन वाढविता आले असते ते शक्य नसल्याने दुसरे घटक वाढविले तरी स्थिर घटकाचे प्रमाण वाढल्याने जे काम झाले असते ते त्याच्याकडून होत नाही घटत्या-वाढत्या फळाच्या सिद्धान्ताचा योग्य समन्वय झाल्यास स्थिर फळाचा ( Constant Returns ) अनुभव येतो. स्थिर फळ असता काठावरील अगर सरासरी उत्पादनखर्च वाढत नाही; म्हणूनच स्थिर फळाच्या सिद्धान्ताला स्थिर खर्चाचा सिद्धान्त ( Law of Constant Costs ) असेहि म्हणतात.

**उपभोगतत्त्वप्रणाली**

नवसनातनवादानें उत्पादन विभाजन, विनिमय ह्याच्या बाबतीत जुन्या तत्त्वप्रणाली (Theory) च्या जागी नव्या तत्त्वप्रणालीची प्रस्थापना केली तर उपभोगतत्त्वप्रणाली (Theory of Consumption) त्याच्यामुळेंच प्रथम अर्थशास्त्रांत आली. उपभोग ह्या क्रियेची जाणीव सनातनवाद्याना नसावी

असे म्हणता येत नाही; पण अर्थशास्त्र हे सामाजिक शास्त्र आहे व उपभोग ही केवळ वैयक्तिक बाब आहे, असे त्याना वाटत असल्यामुळे उपभोगाकडे त्यानी जाणूनबुजून दुर्लक्ष केले असावे उपभोगक्रियेची उपेक्षा करण्याची सनातनवृत्ति नवसनातनवाद्याना पसत पडणे शक्य नव्हतें. कारण श्रमविभागणीमुळे आर्थिक व्यवस्थेला सामाजिक स्वरूप प्राप्त होत असले तरी आर्थिक व्यवस्थेचे---श्रमविभागणीचेसुद्धा---मूळ व्यक्तीच्या गरजात व त्या भागविण्याच्या प्रयत्नात आढळत असल्यामुळे अर्थशास्त्राचा अभ्यास उपभोग क्रियेच्या विवेचनाने सुरू होणे जरूर आहे, असे त्याचे मत होते. शिवाय अर्थशास्त्राचे सिद्धान्त सर्वत्र लागू पडणारे आहेत, अशी त्याची भावना असल्याने सनातनवादी अर्थशास्त्र स्वीकारले तर श्रमविभागणीपूर्व आर्थिक व्यवस्थेशी अर्थशास्त्राचा विशेष सबध नाही, असा जो अनवस्था प्रसंग ओढवतो तो त्याना मानवणे शक्य नव्हते. जगाच्या एका कोपऱ्यांत एखाद्या बेटावर एखादीच व्यक्ति रहात असली तरी त्या व्यक्तीची वर्तणूक अर्थशास्त्राच्या सिद्धान्तात बसते, म्हणजे जेथे जेथे मनुष्य आहे तेथे तेथे अर्थशास्त्र आहे असा त्याचा दावा होता. त्यामुळेच त्यानी उपभोगाच्या वैयक्तिक क्रियेला प्राधान्य दिले. त्यामुळेच अलीकडील अर्थशास्त्रावरील पुस्तकात उपभोगतत्त्वप्रणालीची चर्चा प्रथम व मग इतर विवेचन असा क्रम आढळतो.

**प्रत्येक वस्तूची कडेची उपभोग्यता सारखी करण्याची प्रवृत्ति**

उपभोगतत्त्वांचे विवेचन प्रथम जेव्हॉन्सच्या ग्रथात (१८७१) आढळावे हे क्रमप्राप्तच होते. जास्तीत जास्त सुख मिळविण्याची मानवी प्रवृत्ति लक्षात घेऊन जेव्हॉन्सने आपला उपभोगाचा सिद्धान्त पुढे माडला. तो असा की, "जेव्हा एखाद्या वस्तूचे अनेक उपयोग असतात तेव्हा त्या वस्तूचा उपभोग अशा तऱ्हेने केला जातो की, प्रत्येक उपभोगाच्या बाबतीत अंतिम उपभोग्यता सारखी असावी (Law of Equi-Marginal Utility)." ते साधेपर्यंत एका वस्तूचे प्रमाण कमी करून त्याऐवजी दुसऱ्या वस्तूचे प्रमाण वाढविण्याची क्रिया (Principle of Substitution) सतत चालू असते. ते जेव्हा साधते तेव्हाच व्यक्तीला जास्तीत जास्त सुख लाभते असा त्याचा दावा होता. एखाद्या उपयोगाच्या बाबतीतील कडेची उपभोग्यता दुसऱ्या उपयोगांतील कडेच्या उपभोग्यतेपेक्षा कमी असली तर त्याचा अर्थ असा

की, तो दुसरा उपयोग वाढविल्याने सुख जास्त लाभूं शकेल. जेव्हा सर्व उपयोगाच्या बाबतीत अंतिम सुख सारखे लाभते तेव्हा असा बदल करण्याचें कारण पडत नाही बदल केल्यास एकंदर सुख कमीच होतें ज्याचे विविध उपयोग आहेत अशा वस्तूचे सर्वांत उत्तम उदाहरण म्हणजे पैसा. पैशाला जेव्हॉन्सचा सिद्धान्त लागू केला तर असें म्हणता येईल की, आपल्या पैशातील उत्पन्नापासून जास्तीत जास्त सुख मिळवावें अशी व्यक्तीची साहजिकच इच्छा असल्यामुळें व्यक्ति आपल्या पैशातील उत्पन्नाची अशा प्रकारे विभागणी करील कीं, प्रत्येक वस्तूची अंतिम उपभोग्यता सारखी असावी. जेव्हॉन्सने जवळ जवळ याच शब्दात पैशाच्या विभागणीचा सिद्धान्त पुढे माडला. जेव्हॉन्सचा सुखवाद मान्य असणाऱ्या सर्व नवसनातनवाद्यानी त्याच्या उपभोगतत्त्वांना मान्यता दिली.

**उपभोगतत्त्वाचें परेटोकृत नावीन्यपूर्ण विवेचन**

जेव्हॉन्सचें उपभोगतत्त्वाचें विवेचन त्याला मान्य असलेल्या सुखवादाने पछाडलें आहे हे स्पष्टच दिसतें. सुखवादाची बाधा झालेल्या उत्पादनखर्चतत्त्वाची अर्थशास्त्रातून हकालपट्टी करण्याची प्रक्रिया जेव्हा सुरू झाली तेव्हां त्याचे पडसाद उपभोगतत्त्वात उमटणें साहजिकच होते. हे पडसाद प्रामुख्याने परेटो (१८४८–१९२३) ह्या इटालियन अर्थशास्त्रज्ञाच्या लिखाणात उमटले. परेटोच्या पहिल्या प्रमुख ग्रथात (१८९६) सुखवादी मूल्यसिद्धान्त स्वीकारला असला तरी तो त्याला फारसा पटत नव्हता हे स्पष्टपणे दिसतें. त्या सिद्धान्ताचे उच्चाटन करण्याच्या दिशेने त्याची पावले लवकरच पडू लागली. त्यात त्याला यश येऊन उपभोगाविषयी नवीन तत्त्वे त्याने आपल्या १९०६ मधील ग्रथात (Manual of Political Economy) मांडली. ती तत्त्वे स्वीकारल्यास सुख मोजण्याचा प्रयत्न करून व्यक्ति जास्तीत जास्त सुख मिळविण्याचा प्रयत्न करते किंवा नाही, त्याची अर्थशास्त्राने पूसतपास करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. कोणत्याहि शास्त्राने त्या भानगडीत पडू नये. कारण उपभोग्यता मोजणीय नसते. तेव्हा ती मोजण्यावर आधारलेलें कोणतेहि तत्त्व शास्त्राच्या कक्षेंत बसत नाहीं. मग अर्थशास्त्राने करावे तरी काय? अर्थशास्त्राने वस्तूला व्यक्ति मागणी करते त्या अर्थीं त्या वस्तूची उपभोग्यता त्याला

जाणवत असते, एवढे गृहीत धरून निरनिराळ्या वस्तूची ज्या प्रमाणात व्यक्ति मागणी करते त्यासंबधी सिद्धान्त माडावा. तो सिद्धान्त मूल्याचा पाया म्हणून पुरेसा होईल परेटोने स्वत. असा सिद्धान्त माडला की, निरनिराळ्या वस्तू वेगवेगळ्या प्रमाणात ज्यात एकत्र आल्या आहेत अशा अनेक वस्तुसमूहातून कोणत्या वस्तुसमूहाची निवड करावी, असा प्रश्न व्यक्तीपुढें उभा रहातो. त्यांतील प्रत्येक वस्तुसमूहापासून नक्की किती सुख मिळेल हे व्यक्तीला मोजतां येणे अशक्य असते, पण अमुक एखाद्या वस्तुसमूहापासून मिळणाऱ्या समाधानापेक्षा कमी अगर जास्त समाधान अमुक एका वस्तुसमूहापासून मिळते ह्याची जाणीव व्यक्तीला असते. सारखे समाधान देणाऱ्या वस्तुसमूहापैकी कोणत्या समूहाची निवड करावी असा प्रश्न उद्भवला असता त्या सबंधात व्यक्ति पूर्णपणे बेफिकीर असते कमी अधिक समाधान देणाऱ्या वस्तुसमूहातून कशाची निवड करावयाची असा प्रश्न उद्भवल्यास जास्त समाधान देणाऱ्या समूहाची निवड करील हे उघड आहे. परेटोचे विवेचन मान्य केल्यास व्यक्तीकडून सुखाचे सूक्ष्ममापन कसें केले जातें, ह्या प्रश्नाची शहानिशा करण्याचे अर्थशास्त्राला कारण पडत नाही. त्या विवेचनाचें वैशिष्टय असे की, त्या विवेचनाचा एकदर रोख असा आहे की, जास्तीत जास्त समाधान देणाऱ्या वस्तूसमूहाची व्यक्ति निवड करते हे खरे असले तरी जास्तीत जास्त सुख मिळविण्याच्या मागे व्यक्ति असते असे म्हणण्याचा अर्थशास्त्राला अधिकारहि नाही किवा कारणहि नाही. एखाद्या वस्तुसमूहाची व्यक्ति निवड करते. ह्यावरून---कोणत्याहि कारणामुळे असो---तो वस्तुसमूह व्यक्तीला सर्वात पसत असतो, असे गृहीत धरून पुढे चालू लागावयाचे; म्हणजे त्याचे मूल्यावर काय परिणाम होतात एवढ्याचीच चौकशी करावयाची.

**परेटोच्या मतांचा अधिक पुरस्कार**

परेटोच्या उपभोगविवेचनाचा आश्रय घेऊन अगदी अलीकडे अलीकडे---म्हणजे १९३९ साली---प्रा. हिक्स ह्या विद्यमान् अर्थशास्त्रज्ञाने एक महत्त्वाचा ग्रंथ लिहिला आहे ( Value and Capital). त्या ग्रंथांत प्रथम उपभोग्यतेची जुनी कल्पना कशी चूक आहे हें प्रथम दाखवून नंतर परेटोने स्वीकारलेल्या

भूमिकेचे हिक्स ह्यानी समर्थन केले. त्याच्या मते पहिल्या पिढीतल्या नव-सनातनवाद्यानी उपभोग्यता मोजणीय नाही, हे अनेक वेळा स्वतःच मान्य केले असता उपभोग्यता मोजणीय आहे, अशी ज्यात समजूत होते असा घटत्या उपभोग्यतेचा सिद्धान्त व त्यावर आधारलेल्या मूल्याचा सिद्धान्त स्वीकारला. त्याच्या साऱ्याच प्रतिपादनात हा एक मोठाच दोष राहिला. वास्तविक पाहता उपभोग्यता मोजली जाण्याच्या प्रश्नाशी अर्थशास्त्राला कांहीच कर्तव्य नाही. दोन वस्तुसमूहापैकी एखाद्या वस्तुसमूहाची व्यक्ती-कडून निवड होत असली तर निवडलेल्या वस्तुसमूहाकडून न निवडलेल्या वस्तुसमूहापासून मिळणाऱ्या समाधानापेक्षा निश्चित किती समाधान जास्त मिळते ह्या प्रश्नाची उठाठेव करायचे अर्थशास्त्राला काय कारण ? व्यक्ति ज्या अर्थी त्या वस्तुसमूहाची निवड करते त्या अर्थी त्याची समाधानशक्ति न निवडलेल्या वस्तुसमूहापेक्षा अधिक आहे असे व्यक्तीला वाटत असले पाहिजे, एवढे गृहीत धरले की, अर्थशास्त्राचे काम झाले परेटो-हिक्स ह्याचें प्रतिपादन स्वीकारल्यास उपभोगाचा व त्याबरोबर घटत्या उपभोग्यतेचा सिद्धान्त ह्याना अर्थशास्त्रात स्थान रहात नाही त्या जागी सारखे समा-धान देणाऱ्या वस्तुसमूहातून निवड करण्यातील मनुष्याची बेफिकीर वृत्ति ( Law of Indifference ) व आपल्या उत्पन्नाच्या मर्यादेत त्यातल्या त्यात अधिक समाधान देण्याची शक्ति असलेल्या वस्तूसमूहाची निवड करण्याची प्रवृत्ति ह्याचा त्यांच्या वस्तूच्या निवडीवर कसा परिणाम होतो, त्या निवडीत त्याचे उत्पन्न, आवडी-निवडी अगर बाजारातील किंमती बदलल्या म्हणजे कसा फरक पडतो इत्यादि गोष्टीचें विवेचन येते. ह्या विवेचनात विस्ताराने येथे जाण्याचे प्रयोजन नाही कारण त्यामुळे अर्थशास्त्राचे स्वरूप बदलते कीं कसे हे अजून निश्चित ठरावयाचे आहे.

**अर्थशास्त्राच्या कार्याबद्दलच्या कल्पनांत क्रान्तिकारक बदल**

नवसनातनवाद्यानी अर्थशास्त्राची जी पुनर्घटना सुरू केली ती अर्थ-शास्त्राच्या विशिष्ट सिद्धान्तापुरतीच मर्यादित न राहता अर्थशास्त्राला संपूर्णपणे व्यापणारी व्हावी; म्हणजे अर्थशास्त्रातील सिद्धान्ताच्या पुनर्घटने-बरोबर अर्थशास्त्राचीच पुनर्घटना व्हावी; व त्यामुळें अर्थशास्त्राची व्याख्या, स्वरूप व व्याप्ति ह्यांबद्दल कल्पनात मूलग्राही बदल व्हावा हें अपरिहार्यच

होते. असे काही होणार ह्याची पूर्वसूचना विकस्डीडच्या ग्रथातच (१९१०) मिळाली होती. सनातनवाद्यानी साकार सपत्ति हा अर्थशास्त्राचा विषय मानून सपत्तीचा उपभोग, उत्पादन, विनिमय व विभाजन ह्यापुरती व ह्या गोष्टी सुलभ करणाऱ्या पैसा ह्या सस्थेपुरती अर्थशास्त्राची व्याप्ति मर्यादित केली होती. अर्थशात्र हे प्रधानत. सत्यशोधक अर्थशास्त्र आहे अशीच त्याची कल्पना होती, पण अर्थशास्त्राचे सत्यसशोधन केवळ सत्यशोधनाकरितां न होता मानवी सौख्य वाढविण्याला कारणीभूत व्हावे; तसें होण्यातच अर्थशास्त्राचे सार्थक आहे असे त्याना मनापासून वाटत होते.

## आर्थिक प्रश्न अर्थशास्त्राचा विषय

विकस्डीड यानें सनातनवादी कल्पनाचा पूर्णपणें त्याग करून मनुष्याची आर्थिक वर्तणूक हा अर्थशास्त्राचा विषय आहे असें प्रतिपादन केले. मनुष्याच्या गरजा अमर्यादित पण भागविण्याची साधने मात्र मर्यादित, अशी परिस्थिति असते; म्हणून मर्यादित साधनाचा जास्तीत जास्त उपयोग करून घेण्याचा प्रश्न उद्भवतो. हा प्रश्न म्हणजेच आर्थिक प्रश्न हा प्रश्न सोडविण्याच्या मनुष्याच्या प्रयत्नाचा शास्त्रीय पद्धतीने व केवळ सत्य-शोधनाच्या दृष्टीने केलेला अभ्यास म्हणजेच अर्थशास्त्र.

## प्रा. राबिन्स ह्यांची कामगिरी

विकस्डीडच्या विचारापासून स्फूर्ति घेऊन त्याना परिणामी स्वरूप प्राप्त करून देण्याची कामगिरी प्रा. रॉबिन्स ह्यानी १९३५ साली प्रसिद्ध झालेल्या आपल्या ग्रथात (The Nature and Significance of Economic Science) केली. त्याच्या ग्रथाने नवसनातनवाद्याच्या कार्या-वर कळस चळविला गेला व नवसनातनवादाने आरभिलेली अर्थशास्त्राची पुनर्घटना पुरी झाली असे म्हणण्यास हरकत नाही.

## अर्थशास्त्राची नवी व्याख्या

प्रा. रॉबिन्स ह्यानी अर्थशास्त्राची व्याख्या पुढीलप्रमाणे केली.— "अर्थशास्त्र म्हणजे मर्यादित साधनाचा अमर्यादित गरजा भागविण्यासाठी होणाऱ्या वापराचा अभ्यास." मर्यादित साधने व अमर्यादित गरजा ह्याच्या

ओढाताणीतून निर्माण होणाऱ्या प्रश्नाला प्रा. रॉबिन्स ह्यानी "आर्थिक प्रश्न सोडविण्यासाठी मनुष्य जे प्रयत्न करतो त्याचा अभ्यास म्हणजेच अर्थशास्त्र" असे प्रतिपादिले. आर्थिक प्रश्न उद्‌भवण्यास वस्तुस्थितीची चार वैशिष्टचे कारणीभूत होतात असें त्यानी दाखविले. ती चार वैशिष्टचे अशी :-- (१) गरजा अमर्यादित असतात. (२) गरजा भागविण्याची साधनें मर्यादित असतात. (३) गरजाची निवड कमीअधिक असते तसेच प्रत्येक गरज पुरी भागविली पाहिजे अशीहि निकड नसते. कारण अत्यंत जरुरीची वस्तु घेतली तरी तिच्याकरितां असणारी गरज ती जसजशी भागविली जावी तसतशी कमी तीव्र होऊन प्रथम कमी तीव्र वाटणाऱ्या गरजा त्या मानानें अधिक तीव्र वाटू लागतात. (४) साधने मर्यादित असली तरी त्याचे उपयोग विविध असतात. त्यामुळे अमुक एक गरज भागविण्यासाठीच ती वापरली पाहिजेत; नाहीतर ती फुकट जातील असे बधन सहसा नसते साधनाची विविध उपयुक्तता घटकाच्या मूळ स्थितीत प्रकर्षाने आढळते. पैकी पहिल्या व दुसऱ्या वैशिष्टचामुळे आर्थिक प्रश्न उद्‌भवतो; तिसऱ्या व चौथ्या वैशिष्टचामुळे तो सोडविण्याचा प्रयत्न करणे सुलभ होते. गरजाच्या मानानें साधने मर्यादित नसती तर आर्थिक प्रश्न उद्‌भवला नसता. तो उद्भवतो म्हणून कोणत्या गरजा किती प्रमाणात भागवावयाच्या हे मनुष्याला ठरवावे लागतें. गरजा कमीअधिक निकडीच्या नसत्या तर हे ठरविता येणे शक्य होऊनहि साधनें विशिष्ट उपयोगासाठी वापरणें शक्य आहे, असे बंधन असते तर त्या ठरविण्याचा काही उपयोग झाला नसता. अमर्यादित गरजा व मर्यादित साधने ह्याचा मेळ घालण्यासाठी मनुष्याला गरजाची निवड करावी लागते. तसेच साधनाची उत्पादनशक्ति वाढवावी लागते. हे सर्व कसे केले जाते ह्याचा अभ्यास करणें हे अर्थशास्त्राचे कार्य आहे. आर्थिक प्रश्न सोडविण्याचे प्रयत्न सामाजिक असतात. म्हणून अर्थशास्त्राला सामाजिक स्वरूप प्राप्त होत असलें तरी गरजा वैयक्तिक असतात. त्यांची निकड व्यक्तीलाच भासते. निरनिराळ्या व्यक्तींना गरजाची तीव्रता जी भासते तिची तुलना करतां येत नाही; हें अर्थशास्त्राने विसरता कामा नये. सारांश--अर्थशास्त्र हें प्रधानतः व्यक्तिनिष्ठ आहे.

### साकार वस्तु म्हणजे संपत्ति नव्हे

वरील आशयाचे विचार प्रा. रॉबिन्स ह्यानी मांडले. त्यांच्या विचारांतील दोन मुद्द्याचा स्वतन्त्रपणे उल्लेख केला पाहिजे. त्यातील पहिला मुद्दा असा की, साकार वस्तु म्हणजेच सपत्ति असें मानून केवळ तशाच गरजाचा विचार करावा असे बंधन अर्थशास्त्राने स्वत:वर घालून घेण्याचें कारण नाही. तसे बधन वस्तुस्थितीशी विसगत आहे. कारण निराकार वस्तूकरताहि मनुष्याच्या गरजा असतात--उदाहरणार्थ, सगीताची गरज--त्या भागविण्याची निकड व्यक्तीला भासते. एवढेच नव्हे तर कित्येकदां त्या गरजा अधिक तीव्र भासतात त्यांच्याकरिता साकार साधने खर्ची पडत असतातच. शिवाय अशा बंधनामुळे "अर्थशास्त्रज्ञाची दृष्टि भौतिक आहे. लौकिक सुखाच्या मागे लागलेल्या मनुष्याचे चित्रणच अर्थशास्त्राकडून होते" असा निष्कारण गैरसमज पसरतो. गरजामध्ये भेदाभेद करण्याचे अर्थशास्त्राला प्रयोजन नाही. ज्या गरजाची मनुष्याला आच वाटते त्या गरजा तो कशा भागवितो एवढाच अर्थशास्त्राचा विषय आहे.

### कल्याणाची उठाठेव अर्थशास्त्राला कशाला ?

दुसरा मुद्दा असा की गरजाच्या इष्टानिष्टतेची चर्चा अर्थशास्त्रांत अप्रस्तुत आहे. कोणत्या गरजा भागविल्यानें, मानवी कल्याणात वाढ होईल ह्याचा विचार अर्थशास्त्राने करावा असे काही अर्थशास्त्रज्ञाना वाटते; पण असा विचार अर्थशास्त्र करू लागले तर अर्थशास्त्राचे शास्त्रीयत्वच नष्ट होईल. निश्चित कल्याण (Welfare) कशाला म्हणावें हे तत्त्वज्ञानालाहि अजून उमगले नाही. त्या प्रश्नाच्या मतभेदाला इतका वाव आहे की त्या प्रश्नाला अर्थशास्त्रात शिरकाव करू दिला तर प्रत्येक अर्थशास्त्रज्ञाचे स्वतत्र अर्थशास्त्र अशी परिस्थिति उद्भवेल ! गरजा कोणत्याहि असोत; त्या भागविण्यापासून मिळणाऱ्या समाधानाला कल्याण मानलें तरी अडचणी येतात. गरजा भागविण्यापासून होणारें समाधान ही इतकी वैयक्तिक बाब आहे की, त्यांत लक्ष घालून एकदर सौख्याची वाढ हे उद्दिष्ट अर्थशास्त्राने स्वीकारले तर निरनिराळ्या व्यक्तीना निरनिराळ्या वस्तूंपासून मिळणाऱ्या समाधानाची तुलना करावी लागेल. तशी तुलना करता येत नाहीं. ती करण्याचा प्रश्न

उपस्थित करणेंहि चूक. कारण समाधान मोजणीय नाही अशा परिस्थितीत सौख्याची उठाठेव अर्थशास्त्राने कशाला करावी ? ती करणे मूल्यशोधक अशा इतर शास्त्राचे कार्य आहे. आपल्या परीने ती शास्त्रे तें कार्य करीतहि आहेत. अर्थशास्त्राने निव्वळ सत्यशोधनावर संतुष्ट राहिले पाहिजे

**द्रव्यनिधि-सिद्धान्ताचें ठोकळेबाज स्वरूप**

आतापर्यंत नवसनातनवादाचें जें विवेचन केलें त्यात पैसा ही सस्था व त्याबद्दलचे प्रश्न ह्याना स्पर्शसुद्धा केला नाही. त्याचे कारण असें की, अग्रगण्य नवसनातनवाद्यानी उपभोग, उत्पादन, विभाजन, विनिमय ह्या भागाकडे ज्या प्रमाणात लक्ष पुरविले त्या प्रमाणात पैसा ह्या संस्थेकडे लक्ष दिले नाही--किंबहुना मुळीच दिले नाही--असे म्हटले तरी चालेल; त्याचा अर्थ असा नाही की--त्या सबंधात काहीच विचार झाला नाही पण, हे दुसरे कारण म्हणून सागता येईल--हा विचार जुन्या विचाराची पुनर्घटना ह्या स्वरूपाचा नव्हता. रिकार्डोचे पैशासबधी जे विचार होते त्या विचारानाच रेखीव आणि काहीसे ठोकळेबाज असे स्वरूप नवसनातनवादाच्या कालात दिले गेले पैशाच्या पुरवठ्याचा पैशाच्या मूल्यावर विशेष परिणाम होतो, हे रिकार्डो-मिल ह्याना मान्य होतेच. तोच विचार पैशाचे मूल्य केवळ पुरवठ्यामुळे ठरते, पैशाचा पुरवठा व पैशाचे मूल्य ह्याचा सबध व्यस्त असतो. पैशाच्या पुरवठ्यात ज्या प्रमाणात फरक पडतो, त्याच प्रमाणात पण उलट दिशेने पैशाचे मूल्य बदलते. म्हणजे पैसा जेवढा वाढवावा तेवढे त्याचे मूल्य कमी होतें. आणि तो जेवढा कमी करावा तेवढे त्याचे मूल्य कमी होते, हा आग्रही सिद्धान्त प्रा. फिशर ह्यानी माडला. पैशाच्या पुरवठ्यात त्यांनी पैसा व त्याचा भ्रमणवेग, तसेच पेढीनिर्मित पैसा व त्याचा भ्रमणवेग ह्याचा अतर्भाव केला. सर्व पैसा देशातील उत्पादनावर खर्च होत असतो व उत्पादन पैशाच्या वाढण्यामुळे अगर कमी होण्यामुळे वाढत अगर कमी होत नाही असे गृहीत धरून त्यानी आपले प्रतिपादन केले ते करताना पैसा × भ्रमणवेग × पतपैसा × भ्रमणवेग = उत्पादन × किमतीमान ($MV + MV = PT$) ह्या समीकरणाचा अवलब केला हे नमूद कले पाहिजे.

**खरेदीशक्ति-समानता-सिद्धान्त**

हुडणावळीच्या दरासंबंधी—म्हणजे पैशाच्या देशाबाहेरील मूल्या-सबधी—कोणत्याहि देशाच्या पैशाचे देशांतील व देशाबाहेरील मूल्य सारखेच असते, अशा बेतानेंच दीर्घकालीन हुंडणावळीचे दर ठरले जातात. हा विचार सनातनवादाला मान्य होताच हाच विचार खरेदीशक्ति-समानता-सिद्धान्त (Purchasing Power Parity Theory) ह्या स्वरूपांत कॅसल ह्या अर्थशास्त्रज्ञाने माडला. त्याचे म्हणणे असे कीं देशांतील पैशाचे स्वरूप काहीहि असो; कोणताहि हुडणावळीचा दर दीर्घ कालाचा विचार करता टिकाऊ ठरावयाचा असेल तर त्या दरामुळे कोणत्याहि देशाच्या पैशाची अंतर्गत व देशाबाहेरील खरेदीशक्ति सारखी झाली पाहिजे. ह्याचाच अर्थ असा की देशां-देशातील पैशांची खरेदीशक्ति सर्वत्र सारखी झाली पाहिजे. ती सारखी होईल अशाच दरांना दीर्घकालीन हुंडणावळीचा दर म्हणतां येईल.

**सुवर्णपरिमाणाचा पुरस्कार**

"आर्थिक व्यवस्थेचा कारभार सुलभ करणें एवढेंच पैशाचे कार्य आहे. ह्यापलीकडे पैशाला अवास्तव महत्त्व देण्याचे कारण नाही." हें सनातन तत्त्व नवसनातनवादाच्या कालांतहि मान्यता पावले होते. "हे कार्य पैशाकडून व्यवस्थित केले जावयाचें असेल तर पैशाचे मूल्य शक्य तेवढे स्थिर राहिले पाहिजे व त्याकरितां पैशाच्या पुरवठ्यांत ढवळाढवळ करणारा अधिकार कोणत्याहि मानवी शक्तीला देतां कामा नये" हे सनातनवाद्यांचे मत नवसनातनवादाच्या कालांतहि अर्थशास्त्रज्ञाना पटत होते. हे सर्व साध्य होण्यासाठी सनातनवाद्यांनी सुवर्णपरिमाणाचा पुरस्कार करण्यास आरंभ केला होता. तोच पुरस्कार नवसनातनवाद्यांनी पुढें चालू ठेवला. इतकेंच नव्हे तर त्यांच्या सुवर्णपरिमाणावरील विश्वासाला भक्तीचें स्वरूप आले. सुवर्णपरिमाणाचे सर्व खरेखोटे फायदे नवसनातनवादाच्या कालांत बहारीने रंगविले गेले. सुवर्णपरिमाणाची लोकप्रियता १९१४ सालापूर्वी इतकी शिगेला पोंचली होती की, त्याव्यतिरिक्त दुसऱ्या चलनव्यवस्थेचा विचारहि रानटीपणाचें समजलें जात असे. विकसेलनें विसंवादी सूर काढला

होता व आपसूक कोणतीहि चलनव्यवस्था नीट चालणार नाही. तेव्हा चलनव्यवस्था नियंत्रित केली पाहिजे असे प्रतिपादिले होते, हे नमूद केले पाहिजे सुवर्णपरिमाणाची लोकप्रियता १९१४ नंतरच्या घटनांनी ढासळली; पण सामान्यत: नवसनातनवादी गणली जाणारी मंडळी त्याला चिकटूनच राहिली. सुवर्णपरिमाणाच्या मौलिक तत्त्वापासून ढळल्यामुळे जगावर अनवस्थाप्रसंग ओढवला आहे असे प्रतिपादन १९१४ नंतर त्यांनी चालूच ठेविले.

### आल्फ्रेड मार्शल

नवसनातनवादाचे विवेचन करताना त्या संप्रदायाच्या एका प्रमुख प्रतिनिधीचा नामनिर्देशापलीकडे उल्लेख करण्याचे आतापर्यंत मुद्दामच टाळले. कारण ज्याची स्वतंत्र माहिती दिली पाहिजे अशा योग्यतेचा तो प्रतिनिधि आहे तो प्रतिनिधि म्हणजे सुप्रसिद्ध इंग्लिश अर्थशास्त्रज्ञ मार्शल. मार्शलवर स्वतंत्रपणे लिहिले पाहिजे. कारण सनातनवाद्यापैकी मार्शलच्या लिखाणाचा अतिशय गाजावाजा झाला त्याला जेवढी लोकप्रियता लाभली तेवढी कोणालाच लाभली नाही तसे पाहू गेले तर मार्शल हा मूळचा गणितप्रेमी. १८६१ मध्ये वयाच्या १९ व्या वर्षी त्याला ऑक्सफर्ड विद्यापीठात शिष्यवृत्ति मिळत होती; पण ती स्वीकारली असती तर त्याला जुन्या भाषांच्या अभ्यासात गर्क व्हावे लागले असते. ते पसंत न पडून शिष्यवृत्ति न स्वीकारता, पित्याच्या इच्छेविरुद्ध त्याने केवळ गणिताच्या अभ्यासासाठीं (असे सांगतात की मार्शलच्या बापाला गणिताच्या पुस्तकाचे दर्शनहि सहन होत नसे. शाळेपासून जुन्या भाषांचा अभ्यास मार्शलवर लादण्यात आला होता. गणिताचे पुस्तक खिशात लपवून शाळेत जाताना वाटेत त्याचा तो अभ्यास करीत असे) चुलत्याकडून मिळणाऱ्या कर्जाऊ रकमेच्या आधारावर त्याने केंब्रिज विद्यापीठात प्रवेश मिळविला. तेथे १८६५ साली त्यानें रँगलर ही सन्माननीय पदवी मिळविली. पदवीपरीक्षेत तो दुसरा आला. त्यानंतर विज्ञानाचा अभ्यास करण्याचा त्याचा विचार होता, पण त्यानंतर १८६७ साली सहज हातात मिळालेल्या एका ग्रंथामुळें त्याचे लक्ष तत्त्वज्ञानाकडे वेधले गेले. तत्त्वज्ञानविषयक सखोल विचार करता त्याला ही गोष्ट प्रतीत झाली की, मनुष्याचे इहलौकिक प्रश्न सुटण्याचा मार्ग सापडल्याशिवाय

जीवनापलीकडच्या प्रश्नांची चर्चा व्यर्थ आहे. ह्याचा परिणाम म्हणून त्याचें लक्ष अर्थशास्त्राकडे गेले. त्या वेळचा प्रमाणभूत मिलचा ग्रंथ त्याने विशेष अभ्यासला हे सागणे नकोच. त्याच्या बद्धीची जाणीव विद्यापीठाच्या त्या वेळच्या अधिकाऱ्याना असल्याने त्याच्याकरितां नैतिक शास्त्राचा अभ्यासक अशी जागा मुद्दाम निर्माण करून त्याला देण्यांत आली त्यावेळी नैतिक शास्त्राच्या अभ्यासात अर्थशास्त्राचा अंतर्भाव होत असे. त्याचा फायदा घेऊन त्याने अर्थशास्त्राकडे विशेष लक्ष पुरविले. १८६८ ते १८७७ पर्यंत ही जागा त्याने सभाळली. १८७६ मध्ये त्याचा विवाह त्याच विद्यापीठातील एका विद्यार्थिनीशी झाला; पण त्यामुळे त्याला आपल्या नोकरीला मुकावे लागले. कारण त्या वेळी विद्यापीठात विवाहितांना शिष्यवृत्ति धारण करण्याची परवानगी नव्हती. १८७७ ते १८८४ पर्यंत ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या एका कॉलेजात अर्थशास्त्राचा प्राध्यापक म्हणून त्याने काम केले त्यापैकी पहिली चार वर्षे तो प्राचार्य होता; पण केवळ अभ्यासाला वेळ मिळावा म्हणून त्याने प्राचार्यपद आपणहून सोडले. १८८४ मध्यें केंब्रिज विद्यापीठात अर्थशास्त्राचा प्राध्यापक ही अत्यत सन्माननीय जागा त्याला देऊं करण्यात आली व ती त्याने स्वीकारली. त्या जागेवर २४ वर्षे म्हणजे वयाच्या ६६ व्या वर्षापर्यंत काम करून १९०८ मध्ये त्यानें त्या जागेचा राजीनामा दिला. तेव्हा निवृत्ति-वेतनाची तरतूद नसल्यामुळे मृत्यूपर्यंत त्याला हे काम करता आले असते; पण वृद्धापकाळामुळे रोजचे काम संभाळून आपल्या विषयात अधिक मनन व लेखन करणें कठिण वाटल्यामुळें त्याने राजीनामा दिला हे विशेष नमूद करण्यासारखे आहे आपल्या आवडीचे काम करीत असता १९२४ मध्ये वयाच्या ८२ व्या वर्षी त्याला मृत्यु आला. नोकरीत असता व नोकरी सोडल्यानंतर त्यानें जें लिखाण केलें त्यापैकी १८७९ मधील त्याचा उद्योगधंद्यावरील ग्रंथ, १८९० मधील त्याचा अर्थशास्त्राची तत्त्वे (Principles of Economics) हा ग्रथ, १९१९ मधील उद्योगधंदे व व्यापार हा ग्रथ व १९२३ मध्यें म्हणजे त्याच्या मृत्यूच्या आदल्या वर्षीच प्रसिद्ध झालेला पैसा ह्या संस्थेवरील ग्रथ हें लिखाण विशेष प्रसिद्ध आहे. ह्या सर्व लिखाणाला अतिशय मान्यता मिळाली, ह्यावरून त्याचें हे लिखाण निर्विवाद मौलिक आहे.

## सनातनवाद व नवसनातनवाद ह्यांचा समन्वय

मार्शलला लाभलेल्या अलोट लोकप्रियतेचे रहस्य नवसनातनवादाच्या प्रतिपादनात त्याने जी विशिष्ट भूमिका घेतली तिच्यांत आढळतें. सनातनवादाचा ग्राह्यांश घेऊन नवसनातनवादाचे प्रतिपादन करावयाचें ही त्याची भूमिका होती एका अर्थाने त्याच्या कामगिरीचे स्वरूप मिलच्या कामगिरीप्रमाणे होतें. मिलने ज्याप्रमाणे सनातनवाद व नवसनातनवाद ह्यात समन्वय साधण्याचा प्रयत्न केला त्याचप्रमाणे सनातनवाद व नवसनातनवाद ह्यांच्यात समन्वय साधण्याचा मार्शलने प्रयत्न केला. इंग्लंडसारख्या रूढिप्रिय देशाला ही भूमिका फारच मानवावी ह्यात नवल नव्हते सनातनवाद पूर्णपणे डावलून नवसनातनवादाच्या सर्व मताचे जोरदार समर्थन करणारा मार्शलचा समकालीनच असणारा विकस्टीड विशेष लोकप्रिय झाला नाही हे विशेष लक्षात ठेवण्याजोगे आहे. केवळ लोकप्रियता लाभावी म्हणून मार्शलने एक विशिष्ट भूमिका स्वीकारली, असे येथे सूचित करण्याचा यत्किंचितहि हेतु नाही; हे येथे मुद्दाम नमूद केले पाहिजे. मार्शलने स्वीकारलेली भूमिका त्याच्या सर्वकष बुद्धिमत्तेतूनच उद्‌भवली होती. गणित, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र व नीतिशास्त्र ह्या विषयाचा अभ्यास करीत करीत त्याने अर्थशास्त्रांत प्रवेश केला होता. ही घटना त्याच्याकडून सनातनवादाला योग्य न्याय दिला जाण्यास कारणीभूत झाली. ह्याच घटनेमुळे इतर नवसनातनवाद्याप्रमाणे अर्थशास्त्राच्या एखाद्या भागातच डुबून न राहतां अर्थशास्त्राचा सर्वांगीण विचार त्याने केला. मार्शलला त्याचें विविध विषयातील प्रावीण्य ज्याप्रमाणें उपयोगी पडले त्याचप्रमाणे त्याचे स्थानमहात्म्य व १८९० मध्यें त्याचा ग्रंथ प्रकाशित झाला, ही घटना ह्या गोष्टीहि उपयोगी पडल्या. केंब्रिजसारख्या प्रतिष्ठित विद्यापीठात अर्थशास्त्राचा प्रमुख प्राध्यापक हे स्थान विभूषित करण्याचा मान सतत २४ वर्षे मिळावा ही कांहीं लहानसहान संधि नव्हे. ह्या अवधीत अनेक हुषार विद्यार्थी त्याच्या हाताखालून गेले. त्यांपैकी अनेक जगाच्या निरनिराळ्या भागांत अध्यापनहि करूं लागले त्यांच्याकरवी मार्शलच्या विचाराचा जेवढा प्रसार झाला तेवढा एरवी केवळ ग्रथ लिहिण्याने झाला नसता. १८९० मध्ये त्याचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. ही घटना महत्त्वाची अशा अर्थानें की, तत्पूर्वी इतर नव

सनातनवाद्याचे प्रमुख लिखाण प्रसिद्ध झाले होतें. त्यामुळे नवसनातनवादावर अखेरचा हात फिरविण्याची संधि त्याला लाभली. त्यात त्याचा तोटाहि झाला कारण नवसनातनवादातील अनेक कल्पना त्याला स्वतत्रपणें स्फुरल्या असूनहि दुसऱ्याना त्या सुचून त्यानी आधी प्रकाशित केल्यामुळे त्याचे श्रेय त्याना मिळाले. पण असे असूनहि नवसनातनवादावर अखेरचा हात फिरवितां फिरविता त्यात त्याने स्वतःची अशी ठाशीव भर घातली. नवसनातनवादाचे अत्यत आकर्षक, प्रातिनिधिक, अत्यत प्रमाणभूत, अतिविविध असे स्वरूप त्याच्या लिखाणात आढळत असल्यामुळे त्याच्या विचारांची माहिती करून घेणे अगत्याचे ठरणारे आहे. त्याच्या विचाराचा साराश अर्थशास्त्रात त्यानें घातलेल्या भरीसह, पुढे दिला आहे :—

**अर्थशास्त्राची व्याख्या—स्वरूप व कार्य**

मार्शलने अर्थशास्त्राचे वर्णन पुढीलप्रमाणे केले. सौख्याला आवश्यक अशा मूर्त वस्तू मिळविणे व त्याचा उपयोग करणें ह्यासाठीं मनुष्य जो प्रयत्न करतो त्याच्याशी अर्थशास्त्राचा निकटचा सबध आहे एका अर्थाने अर्थशास्त्र म्हणजे संपत्तीचा अभ्यास तर दुसऱ्या अर्थाने मानवी जीवनाच्या एका विशिष्ट शाखेचा—ज्या शाखेचा दैनदिन जीवनाशी सबध येतो त्या शाखेचा—अभ्यास, संपत्तीचा अभ्यास, मनुष्याचाहि कांही प्रमाणात का होईना, अभ्यास होतो. कारण सपत्ति मिळविण्यासाठी व्यक्ति जो उद्योग करते आणि एकदर तिला सपत्तिसुख ज्या प्रमाणात मिळते त्याचा तिच्या गुणवत्तेवर अतोनात परिणाम होतो. गरिबी व सस्कृति ह्यांचा सगम होणे कठिण आहे. कारण गरिबीमुळें जो शारीरिक, मानसिक व नैतिक ऱ्हास होतो तो सस्कृतिवर्धनाला विघातक आहे. गरिबीचा अभ्यास म्हणजेच मानवसमाजाच्या ऱ्हासाचा अभ्यास. ॲरीस्टॉटल्प्रमाणें गरिबी निसर्गनियमाना धरूनच आहे, असे मानले तर गरिबी नाहीशी कशी करता येईल, ह्या प्रश्नाच्या अभ्यासाला कांही अर्थ रहात नाही; पण औद्योगिक क्रान्तीमुळे गरिबी नाहीशी करता येईल अशी आशा उत्पन्न झाली आहे त्यामुळे अर्थशास्त्राचा अभ्यास महत्त्वाचा झाला आहे. मात्र उपरोक्त प्रश्नाचे उत्तर केवळ अर्थशास्त्र देऊ शकेल असे कोणी समजूं नये. नैतिक व राजकीय कारणेहि गरिबीला जबाबदार असतात. त्यांच्या

बद्दल अर्थशास्त्रज्ञाला केवळ तर्क करतां येतो; पण त्याशिवाय उपरोक्त प्रश्नाचें उत्तर अर्थशास्त्राच्या कक्षेंत येणाऱ्या कांहीं सत्य गोष्टीवरहि अवलंबून असते. अशा गोष्टींचा शोध करणें, त्यावरून गरिबीची मीमांसा करणे, त्यातून उद्भवलेली उपाययोजना सुचविणें व अशा रीतीनें मानवी सौख्याला हातभार लावणे ही अर्थशास्त्राची कार्ये आहेत. सुदैवाने ही कार्ये पार पाडणाऱ्या अर्थशास्त्राला शास्त्राचे स्वरूप येणे शक्य आहे. कारण संपत्ति मिळविताना व तिचा उपयोग करताना मनुष्य जे हेतू मनांत धरून वागत असतो ते हेतू पैशात व्यक्त होत असतात; अतएव मोजणीय असतात. मात्र एकाच रकमेने व्यक्त झालेल्या हेतूची तीव्रता सारखीच असते असे अर्थशास्त्राला समजून चालणे भाग आहे. त्या बाबतीत सुदैव एवढेच की, हे सर्वदा खरें नसले तरी सरासरी मानानें खरे असतें. हेतूची मोजणीयता मान्य केली तरी कोणतीहि गोष्ट करताना हिशोबी वृत्तीने मनुष्य वागतो असें ठरत नाही, पण ह्याहि बाबतीत समाधानाची गोष्ट अशी की, मानवी जीवनाच्या ज्या भागाशी अर्थशास्त्राचा निकटचा संबंध आहे त्या भागात मनुष्य सामान्यतः हिशोबी वृत्तीनें वागतो. अशा भागाशी अर्थशास्त्राचा संबंध असल्यामुळेच असा गैरसमज पसरला आहे की, मनुष्याच्या स्वार्थी कृत्यांचा अभ्यास म्हणजेच अर्थशास्त्र; हा समज अगदी निखालस खोटा आहे. कारण पैसा मिळविण्यामागील हेतु जसा नीच असू शकतो तसाच तो उच्चहि असू शकतो. केवळ साधन म्हणून मनुष्य पैशाच्या पाठीमागे लागतो. तसेंच पैशात मोजणीय असलेल्या गोष्टीना अर्थशास्त्रात प्रमुख स्थान असले तरी कामापासून मिळणारे सुख, सत्तेची हाव, मनुष्याचे स्ववर्गप्रेम व निष्ठा, कौटुंबिक प्रेम आणि निरनिराळ्या प्रकारच्या समूहाचा घटक ह्या नात्याने मनुष्यावर पडणारी जबाबदारी ह्याचा अर्थशास्त्रात अगदीच विचार होत नाही असें नाही अभ्यास केल्यानंतर आपल्या सिद्धान्ताची मांडणी करण्यापूर्वी अर्थशास्त्रज्ञाना ह्या सर्व गोष्टी विचारात घ्याव्या लागतात. तशा त्या लक्षांत घेतल्या जातात ह्याची साक्ष अर्थशास्त्राच्या इतिहासांत आढळते. त्या गोष्टी लक्षांत घेतल्या जातात, ह्याची साक्ष अर्थशास्त्राच्या सिद्धान्ताच्या स्वरूपातहि मिळते. मोजणीय नसलेल्या गोष्टीचा अर्थशास्त्राला विचार करावा

लागत असल्यामुळें अर्थशास्त्राच्या सिद्धान्तात भौतिक शास्त्रातील सिद्धान्तांच्या मानानें निश्चितता कमी असते. तसेच कोणत्या गोष्टींवर सिद्धान्त आधारलेले आहेत, त्यांतील कोणत्या गृहीत धरलेल्या आहेत, हे स्पष्ट करण्याची दक्षता अर्थशास्त्राला नेहमीच घ्यावी लागते; पण त्यामुळे अर्थशास्त्राच्या शास्त्रत्वाला कमीपणा येतो असें समजण्याचे मुळीच कारण नाहीं. कारण तसे पाहू गेलें असता प्रत्येक शास्त्राचे सिद्धान्त जरतरच्या स्वरूपाचे असणें अपरिहार्य आहे. अर्थशास्त्र शास्त्र आहे, सामाजिक शास्त्र आहे, सत्यशोधक शास्त्र आहे

**उपभोग**

रानटी मनुष्याच्या गरजा थोड्या असतात; पण प्रगतीबरोबर वैचित्र्याकरितां वैचित्र्याची आवड मनुष्यात निर्माण होते. अन्न, वस्त्र, निवारा ह्या प्राथमिक गरजाच्या बाबतीतहि हे दृष्टोत्पत्तीस येते. त्याशिवाय दुसऱ्याहून आपण वेगळे आहोंत असें भासविण्याची किंवा खरोखरीच कशात तरी प्राविण्य सपादन करून ते सिद्ध करण्याची इच्छा मनुष्याच्या मनांत निर्माण होऊ लागते. त्यामुळे नव्या नव्या गरजा उद्भवू लागतात ह्याचा परिणाम गरजा हळूहळू अपरिमित होण्यांत होतो. सुरवाती–सुरवातीला गरजा भागविण्यासाठी मनुष्य प्रयत्न करतो, तर नंतर नव्या नव्या उद्योगातून नव्या गरजा उद्भवतात अशा रीतीने गरजा व उद्योग परस्परपूरक आहेत. साराश––गरजाचा अभ्यास महत्त्वाचा असला तरी केवळ मानवी गरजा म्हणजेच अर्थशास्त्राचें जीवितसर्वस्व, असे मानणें चूक होईल. गरजा व उद्योग म्हणजेच उपभोग व उत्पादन ह्याना अर्थशास्त्रात सारखेच प्राधान्य मिळालें पाहिजे (मार्शलकृत सनातनवाद—नवसनातनवाद—समन्वयाचें पहिलें उदाहरण).

**घटती उपभोग्यता व उपभोक्त्याचा वाढावा**

वस्तूला उपभोग्यता असते म्हणून वस्तूकरितां गरज निर्माण होते. गरजा अमर्यादित असल्या तरी प्रत्येक गरज मर्यादित आहे. कारण जसजसा वस्तूचा उपभोग वाढवीत जावा तसतशी तिची उपभोग्यता कमी होत जाते–– अर्थात् उपभोगक्रिया सतत चालू असली व दरम्यानच्या काळात कोणताहि

बदल न झाला तरच कोणत्याहि क्षणी शेवटचें जे परिमाण उपभोगिलें असेल त्याची उपभोग्यता म्हणजे काठावरील उपभोग्यता. ( Marginal Utility ) त्या वेळी उपभोगिलेल्या सर्व परिमाणाच्या उपभोग्यतेच्या बेरजेला एकूण उपभोग्यता ( Total Utility ) म्हणतां येईल. पैकी कांठावरील उपभोग्यतेला अर्थशास्त्रात फार महत्त्व आहे. कारण कोणत्याहि क्षणी कांठावरील उपभोग्यता ज्या पैशाच्या रकमेंत व्यक्त होऊं शकेल तेवढीच रक्कम बाजारात किंमतरूपाने द्यावयास व्यक्ति तयार होते. घटत्या उपभोग्यतेच्या सिद्धान्तानुसार काठावरील उपभोग्यता कमी कमी होत असल्यानें कोणतीहि वस्तु अधिक प्रमाणात खरेदी करण्यास व्यक्ति प्रवृत्त व्हावयाची असेल तर वस्तूची किमत कमी व्हावी लागते. याच सिद्धान्तानुसार किंमत वाढल्यास खरेदी कमी करण्यास व्यक्ति प्रवृत्त होते. कमी किंमतीला जास्त खरेदी व जास्त किंमतीला कमी खरेदी ही प्रवृत्ति प्रत्येक व्यक्तींत आढळते. त्याचेच प्रतिबिंब बाजारात पडून त्याचे रूपान्तर मागणीच्या सिद्धान्तात (Law of Demand) होते. किमत व मागणी ह्याचा संबंध व्यस्त असतो; म्हणजे "किमत कमी झाली की मागणी वाढते व किंमत वाढली की मागणी कमी होते" हा मागणीचा सिद्धान्त. ह्या सिद्धान्ताचा प्रत्यय जेव्हा बाजारांत येतो तेव्हा असें आढळते कीं, किमत थोडी वाढली अगर कमी झाली की त्याचा परिणाम मागणीवर सर्व वस्तूंच्या बाबतीत सारखा होत नाही. किमतीतील फरकाच्या मानाने मागणीवरील परिणाम जास्त असला तर त्या वस्तूकरता असलेली मागणी लवचिक (Elastic) समजण्यात येते. किमतींतील परिणाम त्या मानाने कमी असला तर मागणी ताठर (Inelastic) समजण्यात येते. साधारणपणे चैनीच्या वस्तू आणि अनेक उपभोग असणाऱ्या वस्तू ह्याच्याकरिता असलेली मागणी लवचिक व उलटपक्षी गरजेच्या वस्तू आणि एखादाच उपयोग असलेल्या वस्तू ह्याच्याकरितां असलेली मागणी ताठर असते. अशा तऱ्हेने उपभोगक्रिया ज्या नियमानी बद्ध असते त्यांचा परिणाम बाजारातील किमतीवर होतो. ह्याच्या उलट किमतीचाहि उपभोगक्रियेवर परिणाम होतो. बाजारातील प्रत्येक वस्तूची किमत पाहूनच त्या वस्तूचा उपभोग कोठें थांबवावा हे व्यक्ति ठरवीत असते. बाजारातील किंमत व उपभोग ह्यांचा आणखी एका कारणाने महत्त्वाचा संबंध आहे.

बाजारांतील किमत काठावरील उपभोग्यतेने ठरत असल्यामुळें ( तीसुद्धां वस्तु खरीदण्यास अत्यत कमी उत्सुक असलेल्या व्यक्तीची काठावरील उपभोग्यता) आणि कांठावरील उपभोग्यता X उपभोगलेली परिमाणें ह्यामुळे व्यक्त होणारी उपभोग्यता, वस्तूच्या एकूण उपभोग्यतेपेक्षा नेहमीच कमी असल्यामुळे, उपभोक्त्याला असे आढळून येते की, द्याव्या लागणाऱ्या किमतीपेक्षां मिळणारे समाधान अधिक आहे. केवळ बाजारातील किमत कमी असल्यामुळें किमतीच्या मानाने उपभोक्त्याला जे जादा समाधान प्राप्त होतें त्याला उपभोक्त्याचा वाढावा (Consumers Surplus) असें म्हणता येईल (मार्शलच्या ह्या सर्व विवेचनात त्याचे नवसनातनवादित्व व्यक्त होते. ह्या विवेचनात आलेल्या मागणीचा लवचिकपणा (Elasticity of Demand) व उपभोक्त्याचा वाढावा ह्या कल्पना खास मार्शलच्या होत्या ).

**उत्पादनाचें स्वरूप**

जमीन, श्रम, व भाडवल हे तीन उत्पादनाचे घटक आहेत. जमिनीत निसर्गाच्या सर्व देणग्याचा, श्रमात शारीरिक त्रासाचा व भाडवलात साकार वस्तुनिर्मितीकरता आगाऊ सांठा केलेल्या तरतुदीचा अतर्भाव होतो. भाडवलांत संचित ज्ञान व उत्पादनाकरितां केलेल्या व्यवस्थेचाहि उल्लेख केला पाहिजे. जमीन व श्रम हे प्राथमिक घटक आहेत. कारण भाडवलाची निर्मिति त्या दोहोंपासून झालेली असते; पण सोयीकरिता भांडवल ह्या घटकाचा स्वतत्रपणें उल्लेख केला पाहिजे. जमीन, श्रम व भाडवल ह्या घटकांना उत्पादनाप्रीत्यर्थ जी झीज सोसावी लागते तिच्या रूपाने त्याचा उत्पादनास हातभार लागतो. जमीन ही निसर्गाची देणगी असल्यामुळे तिची झीज कोणा व्यक्तीला सोसावी लागण्याचा प्रश्न उपस्थित होत नाही. श्रमाची झीज कामगाराला सोसावी लागते. काहीं प्रकारचे श्रम आनंददायक असतात; हे खरें असलें तरी सर्वसाधारणपणें श्रमामुळें मानसिक व शारीरिक दमणूक होऊन असुख उद्‌भवतें. त्यांत भोंवतालचे वातावरण रोगट असले किंवा सहकारी अप्रिय असले तर भर पडते. कामाचा ताण व काळ जितका अधिक तितके असुख अधिक. उपभोगाकरितां थांबावें लागण्याच्या रूपानें भाडवलनिर्मितीकरतां झीज सोसावी लागते. ताबडतोब उपलब्ध होऊं शकणारा उपभोग वर्ज करून

त्याऐवजी भावी कालात उपभोग उपलब्ध होण्याची सोय करावयाची मनुष्याला इच्छा असते; म्हणूनच उपभोगाकरिता थाबण्याचा प्रश्न उद्भवतो. ह्या क्रियेला उद्देशून उपभोगनिग्रह हा शब्दप्रयोग करण्यात आला आहे. तो तितकासा बरोबर नाही. त्या शब्दप्रयोगातून सद्यःकालीन उपभोग स्थगित करणाऱ्याना फार मोठा त्याग करावा लागतो, असा जो ध्वनि निघतो तो अयोग्य आहे. कारण ज्याची उत्पन्ने मोठी अशाच्याकडून जी भांडवल-निर्मिति होते त्याच्या बाबतीत त्याग शब्द वापरणें अनुचित ठरेल. प्रतीक्षा हा शब्द सर्व प्रकारच्या व सर्व लोकांकडून होणाऱ्या भाडवलनिर्मितीसाठीं अधिक सयुक्तिक आहे (हे सर्व विवेचन मार्शलची नवसनातनवादी प्रवृत्ति दर्शविते).

**घटत्या फळाचा सिद्धान्त**

"जमिनीचे प्रमाण तेच ठेवून भाडवलाचे व मानवी श्रमाचें प्रमाण वाढवीत गेल्यास (मध्यंतरीच्या काळात शेतकी कलेत सुधारणा न झाल्यास), उत्पादनांत होणाऱ्या वाढीचे प्रमाण भाडवल व श्रम ह्यांत केलेल्या वाढीच्या प्रमाणापेक्षा कमी असेल." ह्या शब्दात वरील सिद्धान्त सांगतां येईल. ह्या सिद्धान्ताचा अमल ताबडतोब सुरू होत नाही कारण प्रथम प्रथम जमिनीच्या मानाने भाडवल व श्रम ह्याचे प्रमाण इतके अपुरें असतें की उत्पादन अधिक प्रमाणात वाढते. हा प्रकार लौकरच थांबून वरील सिद्धान्त अमलात येतो. अनुभव हाच ह्या सिद्धान्ताचा मोठा पुरावा आहे. स्वदेशत्याग करून परदेशात गेलेल्याची इतिहासात पुष्कळ उदाहरणें आहेत. त्यापैकी बहुतेक ह्या सिद्धान्ताचा पुरावाच होत. उत्पादनपद्धतींत सुधारणा केल्याने ह्या सिद्धान्ताचा अमल थोपविता येईल; पण शेवटीं घटत्या फळाची प्रवृत्ति जोरदार होणे अपरिहार्य आहे. त्यामुळेंच उत्पादनांत अमर्याद वाढ करणे केव्हाहि अशक्यच असते. घटत्या फळाच्या सिद्धान्ताचे प्रतिपादन करताना उत्तम दर्जाच्या जमिनीची मशागत प्रथम केली जाते; नंतर त्यापेक्षा कमी दर्जाची जमीन वापरली जाते इत्यादि गोष्टी सांगण्याची रिकार्डोला गरज नव्हती. त्यामुळे त्याचें प्रतिपादन अचूक झाले नाही. तसेंच त्या सिद्धान्तामुळें निराशावादी सूर काढण्यांत रिकार्डोनें जरा घाईच केली; पण ह्या सर्वांबद्दल रिकार्डोला फारसा दोष

न देता---कारण उत्पादनकलेत पुढें झालेल्या सुधारणाची त्याला तेव्हा कल्पना असणे शक्य नव्हते---त्याच्या सिद्धान्तातील मुख्य तत्त्वाकडे पाहिले पाहिजे ( सनातनी अर्थशास्त्रज्ञावर कठोर टीका न करता त्याच्या लिखाणातील ग्रा च भाग घ्यावयाचा ही मार्शलची प्रवृत्ति ह्यांत व्यक्त झाली आहे).

**लोकसंख्यासिद्धान्त**

" जनावराच्या बाबतीत तात्कालिक परिस्थितीने संख्यावाढीचे स्वरूप ठरतें, तर मनुष्याच्या बाबतीत गतकालापासून चालत आलेली रूढि व भावी कालासंबंधींच्या अपेक्षा ह्याचाहि वाढीवर परिणाम होतो, हे प्रथम लक्षात घेतले पाहिजे. हे लक्षात घेऊनच माल्थसच्या सिद्धान्ताचे विवेचन केले पाहिजे त्या सिद्धान्ताचे तीन भाग पडतात. स्वखुषीने घातलेल्या अगर निसर्गाने लादलेल्या बंधनांनी लोकसंख्या नियंत्रित न झाल्यास ती बेसुमार वाढते, हा इतिहासांतील अनुभवच आहे, हा पहिला भाग. लोकसंख्येतील अनुभवाच्या वाढीच्या मानाने धान्योत्पादनातील वाढ नेहमीच अल्प असते, हाहि अनुभव इतिहासात आढळतो हा दुसरा भाग. आणि जे आजपर्यंत झाले तेच पुढे होणार, ह्या न्यायाने मानवाचे भवितव्य भीषण आहे, हा तिसरा भाग. पैकी पहिल्या भागाविषयीच्या माल्थसच्या विवेचनाची ग्राह्यता आजहि कायम आहे, पण त्याचे दुसऱ्या भागातील विवेचन आर्थिक प्रगतीने खोटे ठरविले आहे आणि त्यामुळे तिसऱ्या भागातील त्याच्या निराशावादी अनुमानात काही अर्थ उद्भवला नाही. पण तरीसुद्धा त्याच्या विवेचनाची उपयुक्तता कमी होत नाही लोकसंख्येवरील नियंत्रणे वाढत न गेल्यास चांगले राहाणीमान कायम टिकणे अशक्य आहे, हे स्थूलमानाने अगदी खरे आहे ( मार्शलची ही भूमिका आत्यंतिकता टाकून विवेचन करण्याच्या त्याच्या वृत्तीला साजेशीच होती).

**संख्येपेक्षां दर्जाचा प्रश्न अधिक महत्त्वाचा**

लोकसंख्येपेक्षा लोकाच्या उत्पादनक्षमतेचा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे. कांही धंद्यात उत्पादनक्षमता शारीरिक श्रम करण्याच्या कुवतीवर मुख्यतः अवलंबून असते; तर काही धंद्यात शारीरिक कुवतीबरोबर मनाची कुवतहि पहावा लागते. हवा, एकदर राहाणीमान, विश्रांतीची उपलब्धता,

कामात बदल होण्याची, स्वातंत्र्य मिळण्याची, हुद्द्यात वाढ होण्याची शक्यता, धंद्याचे स्वरूप, राहणीमान नैसर्गिक कीं कृत्रिम (नागरी) आहे, इत्यादि गोष्टीचा उत्पादनक्षमतेवर परिणाम होतो. ह्या सर्व गोष्टी जेथे अनुकूल असतील तेथें उत्पादनक्षमता वाढते. अन्यपक्षी वाढत नाही.

**भांडवल**

उत्पादनासाठी भांडवलाची गरज वाढली आहे व अधिकाधिक वाढत आहे. भांडवलाच्या निर्मितीसाठी बचत करण्याची जरुरी असते. ह्या बाबतीत बचत करण्याची शक्यता व वृत्ति ह्यांना महत्त्व आहे. पैकी जरुरीच्या खर्चापेक्षा उत्पादन जेव्हा जास्त असेल, तेव्हा बचत करण्याची शक्यता निर्माण होते अर्थात् सुखवस्तु लोकानाच ते शक्य असते. भविष्यकाळातील गरजामुळें बचत करण्याची वृत्ति निर्माण होते. काही लोक स्वत करिता बचत करतात हे खरे आहे, पण बचतीची वृत्ति निर्माण होण्यास कुटुंबप्रेम अतिशय जबाबदार असते वेळप्रसगी स्वतःच्या पोटाला चिमटा घेऊन आपल्या प्रेमामुळे मुलाबाळाकरितां तरतूद करावयाची ही वृत्ति मानवात असल्यानेच गरिबाकडूनहि भांडवलनिर्मिति होते.

**उत्पादनव्यवस्था**

उत्पादनव्यवस्था हा प्रचलित आर्थिक व्यवस्थेचा सर्वात महत्त्वाचा भाग आहे उत्पादनाच्या सूत्रीकरणाची व्यवस्था चागली असली तर उत्पादनक्षमता वाढते हे सर्वश्रुत आहे "त्या त्या वेळच्या परिस्थितीत जगण्याला जे लायक असतात तेच जगण्याच्या स्पर्धेत जगतात," हा प्राणिसृष्टीला डार्विनने लावलेला नियम उत्पादनव्यवस्थेला लावता येण्याजोगा आहे. त्यामुळेच उत्पादनव्यवस्थेत सुधारणाहि होत असते प्रचलित उत्पादनव्यवस्था पूर्वीच्या उत्पादनव्यवस्थाच्या मानाने श्रेष्ठ आहे; म्हणूनच ती प्रस्थापित होऊन बरेच दिवस टिकून राहिली आहे हे ओघानेच येते. अशा उत्पादनव्यवस्थेबद्दल अॅडम स्मिथ व त्याच्या अनुयायाना उत्साह वाटावा हे साहजिकच होते; पण तो उत्साह व्यक्त करताना स्मिथनें जो सयम दाखविला तो त्याच्या अनुयायांत उतरला नाहीं. त्यामुळे जे काहीं आहे तें चागलेच आहे असे मानण्याची चूक त्याच्याकडून झाली. त्यांच्या अतिशयोक्तिपूर्ण व उत्साहभरित वर्णनानें प्रचलित उत्पादनव्यवस्थेचा तोटाच झाला आहे कारण त्या व्यवस्थेचे दोष

अधिकारवाणीने त्यांच्याकडून दाखविले गेले नाहींत. प्रचलित व्यवस्थेच्या विरोधकांकडून आणि अतिशयोक्तीच्या स्वरूपांत तिचें वर्णन करणाऱ्या प्रचलित उत्पादनव्यवस्थेच्या मित्राकडून त्या व्यवस्थेवर जो अन्याय झाला आहे तो निवारण्याला प्रचलित व्यवस्थेचें अत्यंत वास्तव वर्णन करणे अवश्य आहे. त्यामुळें तिचें श्रेष्ठत्वहि कळून येईल व दोषहि उमजतील.

**श्रमविभागणी व यांत्रिक उत्पादन**

श्रमविभागणी हे प्रचलित उत्पादनव्यवस्थेचे पहिले वैशिष्टच आहे. त्यानें मिळणारे फायदे 'सवयीनें परिपूर्णता येते' ह्या सर्वश्रुत तत्त्वाचेच निदर्शक आहेत. संवयीनें शरीराच्या हालचाली न कळत होण्यानेच हे फायदे उद्‌भवतात. संवयीने येणारी सुलभता बौद्धिक कामाच्या बाबतीतहि अनुभवास येते. तेंच तेच काम सारखे करण्याने जो कटाळा येतो त्याचा कामावर अनिष्ट परिणाम होतो व अनुभव सकुचित झाल्याचाहि कामावर अनिष्ट परिणाम होतो. हे लक्षांत घेऊनहि--विशेषतः शारीरिक श्रमांच्या बाबतींत---एकाच कामावर लक्ष केंद्रित केल्याने पारगतता येते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. श्रमविभागणीमुळें कामाला विशिष्ट पद्धत लागून ते काम पुढें यत्राकडून केले जाण्याचा संभव उद्‌भवतो; हाहि श्रमविभागणीचाच फायदा म्हणून सांगतां येईल. हा फायदा अनुभवास येण्याचे कारण म्हणजे ज्यांत तोचतोपणा आहे असें काम यत्राकडून अधिकाधिक प्रमाणांत करून घेतलें जात आहे.

यंत्रांचा वाढता उपयोग हें प्रचलित उत्पादनव्यवस्थेचे दुसरे वैशिष्टच आहे. कामगारवर्गावर यत्राचे पुष्कळच परिणाम होतात. पहिला परिणाम म्हणजे केवळ शारीरिक श्रमाची ज्यात जरूर असे व तोचतोपणामुळें कंटाळवाणे वाटणारें काम यत्राकरवी केले गेल्यामुळें बुद्धीची ज्यांत जरुरी आहे अशा कामाना भाव येतो. त्यामुळें अर्थातच कामगारावर पडणारा शारीरिक ताण कमी होतो हेंहि नमूद केलें पाहिजे दुसरा परिणाम म्हणजे एका धंद्यातून दुसऱ्या धंद्यात जाणे कामगारांना अधिक सुलभ होते. तिसरा महत्त्वाचा परिणाम म्हणजे कामातील तोचतोपणा नाहींसा झाल्यानें जीवनांतील तोचतोपणाहि नाहीसा होतो.

**मोठ्या प्रमाणावरील उत्पादन**

उत्पादनाचें मोठे प्रमाण हे प्रचलित उत्पादनव्यवस्थेचें तिसरे वैशिष्ट्य आहे. मोठ्या प्रमाणावरील उत्पादनामुळे यंत्रसामुग्रीचा जास्तीत जास्त उपयोग करून घेतां येतो; त्याचप्रमाणें निरनिराळ्या प्रकारचे गुण असणाऱ्या कामगारांनाहि भरपूर काम देता येऊन प्रत्येकाच्या बुद्धीचा फायदा मिळवता येतो (ह्यांमध्यें अतिबुद्धिमान् अशा व्यवस्थापकाचाहि समावेश होतो) आणि उत्पादनास लागणाऱ्या जिनसाची काटकसर करता येते. वाया जाणारा माल एकत्र केल्यास त्याचाहि कांहीतरी उपयोग करून घेतां येतो हे मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाचे प्रमुख फायदे आहेत. "मोठ्या प्रमाणावरील उत्पादनामुळे सर्वसाधारणपणें उत्पादनखर्चांत कपात होते." ह्या एका वाक्यांत मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाच्या फायद्याचे वर्णन करतां येईल. खर्चांत कपात मुख्यतः दोन कारणामुळे होते. ती कारणे म्हणजे अंतर्गत काटकसर (Internal Economies) व बाह्य काटकसर (External Economies). वर दिलेले फायदे उपलब्ध झाल्याने खर्चांत जी काटकसर होते ती अंतर्गत काटकसर. एकाच प्रकारचे कारखाने विशिष्ट भागात केंद्रित झाल्याने जे फायदे मिळतात त्यामुळे किंवा मोठ्या प्रमाणावर कच्च्या मालाची अगर घटकाची खरेदी केल्याने जी काटकसर करता येते तिला कारखानाबाह्य काटकसर म्हणता येईल. त्या त्या धंद्यात शक्य असणारी अंतर्गत व बाह्य काटकसर पूर्णपणे करता आल्यामुळे ज्या कारखान्याचा उत्पादनखर्च जेवढा आवश्यक तेवढाच होतो अशा कारखान्याला प्रातिनिधिक कारखाना (Representative Firm) असे म्हणता येईल. प्रत्येक धंद्यातील परिस्थिति वेगळी असल्याने प्रत्येक धंद्यातील प्रातिनिधिक कारखान्याचा आकार भिन्न असावा हे क्रमप्राप्तच आहे.

(उत्पादनव्यवस्थेचे उत्साही पण संयमित वर्णन करण्यात मार्शलवर स्मिथ आणि मिल ह्या सनातनवाद्यांची छाप पडली होती हे स्पष्ट दिसते. अंतर्गत व बाह्य काटकसर हा भेद व प्रातिनिधिक कारखाना ही कल्पना ह्या गोष्टी मार्शलनेच प्रथम अर्थशास्त्रांत आणल्या.)

**मूल्यविवेचन**

वस्तुमूल्य कसे ठरतें ह्याचें विवरण करतांना दोन महत्त्वाचे भेद लक्षांत घेतले पाहिजेत. प्रथम बाजारी किंमत, अल्पकालीन किंमत व दीर्घ-

कालीन किमत ह्याच्यातील फरक लक्षात घेतला पाहिजे. बाजारी किंमत म्हणजे कोणत्याहि क्षणीं बाजारात स्थिरता प्रस्थापित करणारी किंमत. अल्पकालीन किमत म्हणजे अल्पकालाचा--म्हणजे ज्या काळात उत्पादनात आगाऊच गुतलेल्या उत्पादनघटकांचा भरपूर उपयोग केल्याने पुरवठा वाढू शकतो. अशा काळाचा विचार—केला असता जी किमत बाजारात स्थिरता प्रस्थापित करूं शकते ती किमत. दीर्घकालीन किमत म्हणजे ज्या काळात उत्पादनाचे घटक वाढवून पुरवठयात वाटेल तेवढी वाढ करता येते त्या कालाच्या दृष्टीनें विचार करता ठरणारी स्थिरताप्रस्थापक किमत. कोणत्याहि क्षणी पुरवठा अगदी ताठर असतो; अल्पकाळात पुरवठा काहीसा लवचिक असतो व दीर्घकालात पुरवठा अगदी लवचिक असतो; म्हणूनच हे कालभेद करावे लागतात. दीर्घकालीन किमत ही सर्वात महत्त्वाची. त्या किमतीचा विचार करताना वस्तूच्या बाजारात चढाओढ (Competition) आहे की मक्तेदारी (Monopoly) आहे ह्याचाहि विचार करावा लागतो.

**बाजारी किमत**

बाजारी किमत (Market Value) त्या त्या वेळच्या मागणी-पुरवठ्याच्या परिस्थितीनें ठरते. मागणीच्या परिस्थितीवरून कोणती किमत असतां ग्राहक किती प्रमाणात वस्तु खरेदी करावयास तयार आहेत हे कळते कोणत्याहि पुरवठ्याची काठावरील उपभोग्यता जेवढी असेल तेवढें मूल्य द्यावयास ग्राहक तयार असतात. पुरवठ्याच्या परिस्थितीवरून त्याच किमती असता किती प्रमाणात पुरवठा करावयास विक्रेते तयार आहेत हे कळते. विक्रेत्यांची ह्या बाबतीतली तयारी वस्तूचे स्वरूप--म्हणजे वस्तु लवकर नष्ट होणारी आहे की कसें--त्याची पैशाची गरज व नजीकच्या भविष्यकाळात किमती कशा ठरतील ह्या बाबतीतील त्याच्या अपेक्षा इतक्या गोष्टीवर अवलंबून असते. निरनिराळ्या किमती असता वस्तूकरता मागणी व वस्तूचा पुरवठा किती असेल हे एकदा ठरले म्हणजे ज्या किमतीत मागणी व पुरवठा ही दोन्ही सारखी असतील तीच किमत बाजारात स्थिरता प्रस्थापित करू शकते. बाजारी किमत ठरण्याच्या क्रियेत मागणीच्या बाजूला पुरवठ्याच्या बाजूपेक्षा अधिक महत्त्व असतें. बाजारी किमत नेहमीच काठावरील उपभोग्यतेइतकी असते.

**दीर्घकालीन स्थिरता प्रस्थापक किमत**

बाजारी किमत उत्पादनखर्चाइतकीच असेल असा नेम नाही. ती उत्पादनखर्चापेक्षां अधिक असल्यास उत्पादकाना नफा होऊन ते पुरवठा वाढविण्यास उत्सुक असतात. ती कमी असल्यास त्याना तोटा होऊन ते पुरवठा कमी करूं पहातात. अल्प मुदतीत ही गोष्ट उत्पादकाना रुचेल इतक्या प्रमाणात शक्य नसते. त्यामुळें अल्पकालीन स्थिरता प्रस्थापित करणारी किमत बाजारी किमतीपेक्षा भिन्न असली तरी तीहि उत्पादन-खर्चाइतकीच असेल असा नेम नाहीं. दीर्घकालाचा विचार केला तर मात्र असें ठामपणे म्हणता येते की, दीर्घकालीन स्थिरताप्रस्थापक किमत (Normal Value) उत्पादनखर्चाइतकीच असली पाहिजे. ती एकच किमत अशी असते कीं पुरवठ्यात कोणत्याहि दिशेने बदल करण्यास उत्पादकाना प्रोत्साहन नसते

**उत्पादनखर्च**

दीर्घकालीन किमत ठरण्यात उत्पादनखर्चाचा वाटा मोठा असल्यामुळे उत्पादनखर्चाची कल्पना नीट समजून घेतली पाहिजे. उत्पादनखर्च म्हणजे प्रातिनिधिक कारखान्याचा उत्पादनखर्च हें प्रथम लक्षात घेतले पाहिजे. त्या उत्पादनखर्चाचे दोन महत्त्वाचे भाग पडतात. ते म्हणजे मुख्य खर्च (Prime Cost) व आनुषगिक खर्च (Supplementary Cost). उत्पादनाचे प्रमाण कांहीहि असले तरी, जो खर्च केलाच पाहिजे त्या खर्चाला आनुषगिक खर्च म्हणता येईल. यत्रसामग्री साफसूफ, तदुरूस्त ठेवण्याचा खर्च व व्यवस्थापक, कार्यालय, ह्याच्यावरील किमान खर्च ह्या स्वरूपाचा असतो. पुरवठ्याच्या प्रमाणाबरोबर ज्या खर्चात फरक पडतो तो मुख्य खर्च. कच्च्या मालावरील खर्च ह्या स्वरूपाचा असतो. उत्पादनखर्चाबद्दल दुसरी लक्षात ठेवावयाची गोष्ट म्हणजे दीर्घकालीन उत्पादनखर्चांत सामान्य नफ्याचा अतर्भाव केला पाहिजे. तिसरी गोष्ट म्हणजे प्रातिनिधिक कारखान्याच्या उत्पादनखर्चाचा विचार करतानाहि काठावरील उत्पादनखर्चाचा विचार केला पाहिजे. कांठावरील उत्पादनखर्च म्हणजे उत्पादिलेल्या शेवटच्या परिमाणामुळे एकूण उत्पादनखर्चांत पडलेली भर. कांठावरील उत्पादनखर्च महत्त्वाचा असतो. कारण कोणत्याहि परिमाणाचे उत्पादन करावयाचे की नाही हे ठरविताना उद्योगपति त्या परिमाणामुळे उत्पादनखर्चांत पडणाऱ्या भरीइतकी किमत

येईल की नाही ह्याचा विचार करतो ती न आल्यास त्या परिमाणाचें उत्पादन तोटयाचे ठरते. चौथी गोष्ट म्हणजे उत्पादनखर्च प्रथम पैशांत मोजला गेला तरी त्याच्या मागे घटकाना सोसाव्या लागणाऱ्या झिजेच्या रूपानें खरा उत्पादनखर्च उभा असतो. पैशांतील उत्पादनखर्च व वास्तव उत्पादनखर्च ह्याच्यांतील सबंधाचा विचार करणें अगत्याचें असते. वरील चिकित्सा चढाओढीला लागू पडते. मक्तेदारी असता दीर्घकालीन किमत उत्पादनखर्चाइतकी असेल असे सांगता येत नाही. पुरवठयाच्या बाजूवर संपूर्ण ताबा असल्यानें आपल्याला अत्यत इष्ट अशी किमत ठरेल अशी व्यवस्था मक्तेदाराला करता येते. मागणी-पुरवठयाची दीर्घकालीन परिस्थिति विचारात घेऊन मक्तेदार पुरवठयाचे प्रमाण अशा बेताने ठरवतो की, त्याला जास्तीत जास्त नफा व्हावा. तो पुरवठा बाजारांत मागणीच्या बाजूकडून ज्या किमतीला स्वीकारला जाईल ती किमत म्हणजे मक्तेदारीतील दीर्घकालीन किमत.

(मार्शलची मूल्यचिकित्सा नवसनातनवाद व सनातनवाद ह्याच्यांत त्यानें केलेल्या समन्वयाचे उत्कृष्ट उदाहरण आहे. नवसनातनवादाने मागणीच्या बाजूला व सनातनवादाने पुरवठयाच्या बाजूला महत्त्व दिलें. मार्शलने दोन्ही बाजू सारख्याच महत्त्वाच्या कशा आहेत हे दाखवून दिलें. ते करतांना निरनिराळया कालमर्यादा घेऊन मूल्यविवरण करण्याची जी पद्धति त्याने घालून दिली तो तरी त्याची अर्थशास्त्राला खास देणगी असें म्हणता येईल. मुख्य खर्च व आनुषगिक खर्च हा भेद त्याचाच)

**विभाजनचिकित्सा**

मजुरी : मजुराची उत्पादनक्षमता सारखी आहे व त्याचा पुरवठा म्हणजे लोकसख्या स्थिर आहे असे धरून चालले तर मजुरी ठरण्यांत मागणीची बाजू महत्त्वाची असते उत्पादनक्षमता सारखी आहे हे गृहीत तत्त्व सोडून दिले तरी मागणीच्या महत्त्वात कमतरता येत नाही. मजुराच्या दर्जादर्जातील फरक विचारात घेतला तर एवढेच म्हणावे लागते कीं, दर्जातील फरकामुळे मजुराचे अनेक वर्ग पडतात. त्या प्रत्येक वर्गातील मजुराना असणारी मागणी व त्याचा पुरवठा ह्यामुळें मजुरी ठरते. पुरवठा स्थिर आहे असें मानले तर अर्थातच मागणीची बाजू महत्त्वाची होऊन बसते. मागणीच्या बाजूकडून मजुरी जर मुख्यतः ठरली गेली

तर मजुरी प्रत्येक वर्गातील काठावरील मजुराच्या उत्पादनक्षमतेएवढी असते. सर्व वर्गांचा विचार केला तर असें म्हणता येते की, उत्पादनक्षमतेतील फरकाचे स्वच्छ प्रतिबिंब मजुरीत पडते; म्हणजे उत्पादनक्षमता ज्या प्रमाणांत कमीजास्त असते त्याच प्रमाणांत मजुरी कमीजास्त असते. 'कांठावरील उत्पादनक्षमताच मजुरीचें नियंत्रण करते,' हे तत्त्व मजुरीचा सिद्धान्त म्हणून संपूर्णपणें स्वीकारता येत नाही. कारण त्यात पुरवठ्याच्या बाजूचा व्हावा तसा विचार होत नाही. ठरलेल्या मजुरीचा पुरवठ्यावरहि परिणाम होतो. पुरवठ्याच्या बाजूचा विचार करणे अगत्याचे आहे व त्या मानाने कठीण आहे. मजुरीचा पुरवठ्यावर परिणाम होतो, ह्याचे तावडतोब परिणाम करणारे कारण म्हणजे मजुरी वाढली की अधिक काम करण्याची मजुरात असलेली नैसर्गिक प्रवृत्ति. दीर्घकाळाचा विचार करता वाढत्या मजुरीचे काय परिणाम होतात हे निश्चयाने सांगणे अधिकच कठीण आहे. कारण त्यात अनेक गोष्टी विचारात घ्याव्या लागतात. सर्वसाधारणपणें वाढत्या मजुरीमुळे लोकसंख्या वाढते असे म्हणता येईल. पण जननसंख्येत वाढ होऊनच ती वाढते असे म्हणणे चूक होईल. मजुरी वाढली की विवाह करून संसार थाटणे तरुण कामगारांना अधिक सुलभ होते हें खरें; पण अनुभव असा की, मजुरांच्या स्थितीत कायम स्वरूपाची सुधारणा झाल्यास जननमान कमीच होते लोकसंख्या वाढते ती मुख्यतः मृत्यूचें मान अधिक चांगल्या राहणीमानामुळे कमी होते म्हणून. मृत्युसंख्या कमी झाल्यानें लोकसंख्या वाढली तर मजुरी कमी होईल असे ठामपणें म्हणता येत नाहीं. कारण वाढत्या मजुरीमुळे राहणीमान तर वाढतेच; पण मजुरांची उत्पादनक्षमताहि वाढते. वाढत्या राहणीमुळें मजुरीबद्दलच्या अपेक्षा वाढतात, उत्पादनक्षमतेमुळे त्या भागवणें शक्य होतें. मात्र मजुरी सारखी वाढत राहिली तर उत्पादनक्षमता सारखी वाढत राहील असें कोणीं समजू नये. ठराविक मर्यादेपलीकडे उपभोग वाढला तर उत्पादनक्षमता वाढत नाही. जरुरीच्या व सुखाच्या वस्तू जोंपर्यंत मजुराला उपलब्ध झाल्या नाहींत तोंपर्यंत उत्पादनक्षमता वाढते चैनीच्या वस्तूहि उपलब्ध होतात. इतकें राहणीमान वाढतें की त्यानंतरची वाढ उत्पादनक्षमता वाढवीत नाहीं.

**व्याज**

व्याज म्हणजे भाडवलाकरिता द्यावी लागणारी किमत. अन्य किमती-प्रमाणेच भाडवलाचीसुद्धा बाजारी किमत असते. ती अशा बेताने ठरते की, भाडवलाचा पुरवठा व भाडवलाकरितां असणारी सारखी मागणी व्हावी. भाडवलाची उसनवारी करणारे व्याज द्यावयास का तयार होतात व भाडवल उसने द्यावयास तयार असणारे व्याजाची अपेक्षा का करतात ह्याची कारणें स्पष्ट आहेत. अर्थशास्त्रात त्याचा खुलासा नव्याने आला असला तरी व्यापाऱ्याना तो फार पूर्वीपासून अवगत आहे. भांडवलापासून काहीतरी लाभ होत असल्याशिवाय--मग त्या लाभाचे स्वरूप काहीहि असो--' भाडवलाला किमत द्यावयास कोणीहि तयार होणार नाही, हे सर्वश्रुत आहे. तसेच हेहि सर्वश्रुत आहे की, भाडवल फुकट उसने द्यावयास कोणीहि तयार होणार नाही. कारण ज्याच्याजवळ भाडवल पडून राहते त्यानाहि हें माहीत असते की, त्याचा दुसऱ्या कोणास तरी फायदेशीर उपयोग होऊं शकतो ज्याना उपयोग होतो ते किमत द्यावयास तयार असतात. किमत मिळेल ही अपेक्षा असल्यावर फुकट कोण देणार? भाडवलाची उसनवारी करणारे किमत द्यावयास तयार असतात. ह्या घटनेचा खुलासा खोलवर विचार करून शोधला तर भाडवल हा उत्पादनाचा उत्पादक घटक आहे हे कारण सापडेल. भाडवलाचे उत्पादकत्व नाकारून उत्पादनाचे सर्व श्रेय मानवी श्रम ह्या घटकाला देण्यात मार्क्सने फार मोठी चूक केली. भाडवलाची फोड केली तर असे दिसून येईल की, भाडवल हें शारीरिक श्रम व उपभोगप्रतीक्षा ह्यातून उद्भवते. पैकी उपभोगप्रतीक्षा ह्या गोष्टीचे अस्तित्व नाकारूनच सुरुवात केली तरच व्याज देणे हें असमर्थनीय आहे हे सिद्ध होईल, पण हे सिद्ध करताना चुकीची गोष्ट गृहीत धरावी लागते, ह्याची जाणीव मार्क्सने मुळींच दाखविली नाही. उपभोगप्रतीक्षेशिवाय भाडवलनिर्मिति अशक्य आहे व मानवी श्रमाला भाडवलाची जोड दिली तर उत्पादन अनेक पटीने वाढतें. ह्या दोन गोष्टी एकदां उमगल्या की, व्याज का घेतले जाते व दिलें जातें, ह्या दोन्ही प्रश्नांबर चांगलाच प्रकाश पडतो. ह्या दोन्ही गोष्टी स्मिथला संदिग्धपणे व रिकार्डोला असंदिग्धपणे उमगल्या होत्या त्या त्याना

फारशा उमगल्या नव्हत्या असें म्हणून आपण काही नवीन सागत आहोत, असा आव आणण्यात बोम्बावर्कने त्याच्यावर अन्यायच केला उत्पादनाची कालमर्यादा ज्या पद्धतीत अधिक ती पद्धत अधिक उत्पादक. म्हणून दीर्घकाल लागणाऱ्या पद्धतीचा अवलब करण्यासाठी व्याज द्यावे लागतें. ह्या बोम्बावर्कने स्वत उपस्थित केलेल्या मुद्यातहि फारसा दम नाही. कारण वेळ जास्त लागूनहि उत्पादन कमी अशी अनेक उदाहरणे आहेत. शिवाय ह्या बाबतीत खरी परिस्थिति अशी आहे की, व्याज द्यावे लागतें म्हणून दीर्घकाल लागणाऱ्या उत्पादनपद्धती उत्पादक असल्या तरच वापरल्या जातात व्याज द्यावे लागते ही प्राथमिक बाब आहे.

**नफा**

उत्पादनाची जबाबदारी व सूत्रे धारण करणाऱ्याना नफा मिळतो उत्पादनव्यवस्थेतील सूत्रधारकाचे (Undertakers) दोन भाग पाडता येतात. पहिल्या भागात सुधारलेल्या उत्पादनपद्धती वापरण्याचें धाडस करणाऱ्या सूत्रधारकाचा समावेश होतो. दुसऱ्या भागात जुन्या मार्गानेच जाणाऱ्या सूत्रधारकाना स्थान देता येते. पहिल्या वर्गातील लोकाचें काम अर्थातच अधिक कठीण असते. त्याची जादा बक्षिसी मिळाली तरच ते करावयाला लोक प्रवृत्त होतील हे उघड आहे. नवा मार्ग अवलंबिणाऱ्याना वाव किती मिळेल हे अर्थातच धद्याच्या स्वरूपावर अवलबून असते काही धद्यात बदल होणे स्वभावतच कठीण असते. थोडासा बदल करावयाचा म्हटले तरी त्याला फार अवधि लागतो. अशा धद्यात धाडसी उद्योगपतीना वाव थोडा असतो. म्हणूनच त्याच्या बक्षिसाची अपेक्षाहि जादा असते. ह्याच्या उलट काही धंद्यात थोड्याशा धाडसाला भरपूर व त्वरित फळ मिळते.

नफ्याचा विचार करता पहिली जी गोष्ट जाणवते ती ही की, गुतविलेले भाडवल प्रत्येक खेपेस पूर्णपणे वसूल झाल्यानतर मिळालेला वसूल भाडवलापेक्षा अधिक असल्याने जो नफा मिळतो तो नफा (Profits on the Turn-over) प्रत्येक धद्यात सारखा असत नाही. कारण तो नफा भाडवल वसूल व्हावयास लागणारा वेळ व कष्ट ह्यावर अवलंबून असतो. ह्या बाबतीत एवढेंच फारतर म्हणता येईल की, प्रत्येक प्रकारच्या व्यापारांत

योग्य मानला गेलेला असा एक ठरीव वसूल झालेल्या भाडवलावर मिळणाऱ्या नफ्याचा दर असतो. हा दर अर्थातच त्या व्यापाराची पद्धति बदलली अगर भाडवलवसुलीला लागणारा वेळ कमीजास्त झाला तर बदलतो. प्रत्येक खेपेला भाडवलवसुलीनतर मिळणाऱ्या नफ्याच्या दराऐवजी वार्षिक नफ्याच्या दराकडे ( Profits Per Annum ) लक्ष पुरवलें तर मात्र असें दिसून येते की, सर्वसाधारपणें ह्या दरात डोळ्यात भरण्याइतका फरक नसतो. जो थोडा असतो त्याची कारणेहि सहज सागता येण्याजोगी असतात गुंतविलेल्या भाडवलाच्या मानानें व्यवस्था पाहण्याचे काम जेव्हा कष्टप्रद असते तेव्हांच वार्षिक नफा अधिक असतो. व्यवस्था पाहण्याचे काम कष्टप्रद दोन कारणामुळे होऊ शकते. प्रत्यक्ष व्यवस्था लावण्याचें काम कठीण म्हणून, किंवा उत्पादनात स्वीकारावा लागणारा धोका अधिक म्हणून ते कष्टप्रद होते. कष्टप्रद काम करावयास जे उद्योगपती पुढे येतात त्याच्यात पात्रताहि अधिक असावी लागते. त्याना मिळालेला अधिक नफा अधिक पात्रतेबद्दल मिळणारे उत्पन्न ( पात्रतेमुळें पडणारा उत्पन्नातील फरक मजुरा-मजुरांत सुद्धा आढळतो) समजून बाजूला काढले तर सर्व उद्योगात सामान्य नफ्याचे प्रमाण सारखेच असते, असे म्हणण्यास प्रत्यवाय उरत नाही. सामान्य वार्षिक नफ्याचा दर उत्पादनखर्चांत समाविष्ट केला जातो. एकाच धद्यातील कामगाराना अगर उद्योगपतीना मिळणाऱ्या उत्पन्नातहि फरक पडतो असें आढळते. ह्या उत्पन्नांतील फरकाला सारावजा उत्पन्न (Quasi Rent) असें नाव देण्यास हरकत नाही. सारावजा उत्पन्न, मजुरी व व्याज ह्याच्या बाबतीतहि आढळते ( सारावजा उत्पन्न ही कल्पना मार्शलची ).

**नफ्याचें समर्थन**

एकंदर विचार केला तर असे म्हणता येईल की, समाजाला उद्योगपतीचें काम स्वस्तातच मिळते. समाजांत ते काम कोणीतरी केले पाहिजे, असें असतें त्या कामाच्या महत्त्वाच्या मानानें उद्योगपतीना मिळणारा नफा अल्पच म्हटला पाहिजे. इतर सर्व घटकाच्या बाबतीत उत्पादनाला त्याच्याकडून लावल्या जाणाऱ्या हातभाराच्या मानानें त्या घटकांच्या परिमाणांची किंमत जास्त असते. त्या घटकांचा वापर कमी करून त्या मानाने स्वस्त असलेल्या

घटकाचा वापर अधिक करण्याचे तत्त्व ( Principle of Substitution ) समाजाला आचरता येते. उद्योगपतीच्या द्वाराच समाज हे तत्त्व प्रत्यक्षात उतरवीत असतो. उद्योगपतीच्या बाबतीत मात्र ह्या तत्त्वाचे आचरण समाजाला कठीण होते. कारण ते कार्य कोणा व्यक्तीच्या द्वारा होऊ शकत नाही. त्या बाबतीत जे काही थोडेबहुत व स्थूल स्वरूपाचे कार्य होते ते उद्योगपतीमधील चढाओढीमुळे. ह्या चढाओढीत ज्याचे काम समाजाला महाग वाटते ते उद्योगपती टिकाव धरू शकत नाहीत उद्योगपतीचे काम समाजाला स्वस्त दराने मिळण्यास चढाओढ फार मोठ्या प्रमाणात मदत करते हे कबूल करणे भाग आहे.

**सारा**

जमिनीपासून जे उत्पन्न मिळते त्याचे दोन भाग होतात. पहिल्या भागात जमिनीच्या उपजत गुणामुळे जे उत्पन्न मिळते त्याचा समावेश होतो. दुसऱ्या भागांत जमिनीत कायम स्वरूपाच्या सुधारणा करण्यामुळे जे उत्पन्न मिळते त्याचा समावेश होतो जमिनीच्या उपजत गुणामुळे जें उत्पन्न मिळते तोच खरा सारा कायम स्वरूपाच्या सुधारणा केल्यामुळे जें उत्पन्न मिळते ते व्याजाच्या रूपाचे आहे असे मानले पाहिजे. कारण कायम स्वरूपाच्या सुधारणा करण्याकरिता खर्च करावा लागतो; पण ह्या बाबतीत एक गोष्ट लक्षात घेणे अत्यंत जरूर आहे. ती ही की जमिनीत सुधारणा केल्यानतर जमिनीच्या गुणापैकी उपजत गुण कोणते व सुधारणा केल्यामुळे जमिनीला प्राप्त झालेले गुण कोणते हे ठरविणे कठीण असते. ह्यावर उपाय एवढाच की, ज्या वेळेला जमिनीच्या उत्पन्नाचा विचार करावयाचा असेल त्या वेळेपूर्वी जमिनीत केलेल्या सुधारणामुळे जमिनीला प्राप्त झालेले गुण जमिनीचे उपजत गुण असे समजले पाहिजेत. ह्याचाच अर्थ असा की कोणत्याहि विशिष्ट वेळी जमिनीचा जो दर्जा असतो त्या दर्जामुळे जमिनीच्या उत्पादनाला जो हातभार लागतो तो साऱ्याच्या स्वरूपाचा असें मानावयास हवे.

**आर्थिक प्रगतीचा परिणाम :—उत्पादनावर**

आर्थिक प्रगतीचे उत्पादनावर होणारे परिणाम इष्ट असेच असतात. औद्योगिक क्रान्तीचे इंग्लंडवर झालेले परिणाम पाहातां असे निःसदिग्धपणे

म्हणतां येईल की, जीवनदृष्टया अत्यत गरजेच्या वस्तूंचा उत्पादनखर्च आर्थिक प्रगतीमुळें पुष्कळच कमी होतो. कांही वस्तूच्या बाबतींत उत्पादन-खर्च कमी होण्याचे प्रमाण इतके आहे की, १९ व्या शतकाच्या सुरवातीला त्याची कल्पनासुद्धां करता आली नसती. धान्य, मांस, घरे, कापडचोपड, पाणी, प्रकाश आणि वाहतुकीची साधने ह्या गोष्टी पूर्वीपेक्षा कितीतरी कमी श्रमांत म्हणजे कमी खर्चांत आता मिळवतां येतात. ह्या जीवनावश्यक वस्तूच्या बरोबरीने जीवनांत आराम देणाऱ्या आणि जीवनाला उजळा देणाऱ्या अनेक वस्तू मिळविण्याच्या बाबतीत औद्योगिक क्रान्तीने निर्माण केलेली सुलभता लक्षात घेतल्यास पुढारलेले जीवन व्यतीत करण्यास औद्योगिक क्रान्तीने किती सहाय्य केले आहे ह्याची तत्काळ कल्पना येते. आर्थिक प्रगतीमुळे राष्ट्रीय उत्पन्न वाढते म्हणूनच हे सर्व शक्य होते.

### आर्थिक प्रगतीचा परिणाम :--विभाजनावर

आर्थिक प्रगतीचे उत्पादनावर काय परिणाम होतात हेच केवळ लक्षांत घेऊन चालावयाचें नाही. आर्थिक प्रगतीचे विभाजनावर---म्हणजेच निर-निराळ्या घटकाच्या उत्पादनातील वांटयांवर---काय परिणाम होतात ह्यांचाहि तपास केला पाहिजे. ह्या बाबतीत सर्वसाधारणपणें प्रथमच हे म्हणतां येते की, ज्याचा वाटा करावयाचा तेंच वाढले---म्हणजे एकूण उत्पादनच वाढले की---प्रत्येक घटकाची प्राप्ति एकंदरीने वाढतेच. प्रत्येक घटकाची प्राप्ति आर्थिक प्रगतीमुळे एकदरीने (Absolutely) वाढते. एवढ्यावरहि सतुष्ट राहून चालावयाचे नाही. ती तुलनेने (Relatively) ---म्हणजे इतर घटकाच्या मानाने---वाढते की कसे हेंहि परीक्षिले पाहिजे.

### विभाजनावरील परिणामाचा तुलनात्मक विचार

तुलनेनें पाहिलें तर माल्थसने केलेले व रिकार्डोनें अनुमोदन दिलेले "देशाच्या भरभराटीचा फायदा अधिकतर जमीनदारांना मिळतो कारण जमिनीचे मूल्य अधिक प्रमाणांत वाढते" हें विधान आपणांसहि मान्य करावे लागतें. आर्थिक प्रगतीच्या ओघात जमिनीचे मूल्य---जमिनीचा पुरवठा मर्यादित असल्यामुळें---वाढून उत्पादनातील जमीनदारांचा वांटा जसा वाढतो

तसा भाडवल ह्या घटकाचा वाटा वाढत नाही. भाडवल ह्या घटकाची प्राप्ति तुलनेने कमी होते. कारण भाडवलाची गरज एका अर्थानें तरी आर्थिक प्रगतीमुळे कमी होते आणि भांडवलपुरवठा मात्र वाढतो. भाडवलाची गरज एवढ्याच अर्थाने कमी होते की, इतर वस्तुबरोबरच भाडवली वस्तूचाहि उत्पादनखर्च कमी होतो. म्हणजेच थोड्या श्रमात अधिक भाडवली वस्तू मिळवता येतात. पैशाच्याहि भाषेत ही कल्पना व्यक्त करावयाची असल्यास असे म्हणता येईल की, पैसारूपी थोड्या भाडवलात अधिक वस्तुरूपी भाडवल मिळविता येते. भांडवलाचा पुरवठा वाढतो कारण एक तर वाढत्या सपत्तीमुळे बचत करण्याची शक्ति वाढते आणि शिवाय सुधारलेला मनुष्य भावी सुखासाठी वर्तमान सुखाचा त्याग करण्यास अधिक प्रमाणात तयार होतो कारण भविष्यकाळासबधी निश्चित अदाज बाधणे त्याला अधिक प्रमाणात शक्य असते असा अनुभव आहे आर्थिक प्रगतीमुळे भाडवलावरील व्याज जसे कमी होते त्याचप्रमाणे नफाहि कमी होऊ पाहातो भाडवल जितके जास्त वाढवावे तितकी त्याची फायदेशीर गुतवण कठीण होते. हे तर नफा कमी होण्याचे कारण आहेच, पण प्रगतीमुळे धोका पत्करणे व व्यवस्था लावणे ही विशेष योग्यता लागणारी कामे करणाऱ्याची सख्या वाढून त्याची प्राप्ति कमी होऊ लागते हेहि कारण आहे असामान्य योग्यता असणाऱ्याची प्राप्ति मात्र आर्थिक प्रगतीमुळे वाढते. कारण पुरवठा वाढण्याची क्रिया त्याच्या बाबतीत लागू होत नाही त्याचे मूल्य द्यावयाची लोकाची कुवत मात्र वाढते वाहतुकीच्या सुधारणामुळे जगात कोठेहि जास्त प्राप्ति होत असेल तर त्याना जाता येते, हेहि लक्षात घेतले पाहिजे. विशेष योग्यता असणाऱ्याची प्राप्ति कमी न व्हावी हा नियम नफ्याप्रमाणेच मजूरीसहि लागू पडतो; पण सामान्य कामगाराची मजुरी पाहिली तर ती मात्र तुलनेने पाहाता वाढत असते. स्त्रिया, मुले, मुलीसुद्धा लवकरच मिळवत्या होऊ लागतात. हे लक्षात घेता कामगाराचे कौटुबिक उत्पन्न वाढतेच; ह्यात शका घ्यावयाचे कारण नाही. बेकारीमुळे एकदर कामगारवर्गाचे उत्पन्न कमी होते की काय असा सदेह उत्पन्न होण्यास अवकाश मिळतो. ह्या बाबतीत हे लक्षात ठेवणे अत्यत जरूर आहे की बेकारीची वर्णने नेहमीच अतिशयोक्तीनीं भरलेली असतात.

**पैसा**

पैशाला आर्थिक व्यवस्थेत मुख्यत दोन कार्ये करावी लागतात. पहिले कार्य विनिमयाचें साधन होऊन विनिमयव्यवहाराला मदत करावयाची. दुसरे कार्य म्हणजे मूल्याचे माप होऊन वायद्याच्या व्यवहारानाहि मदत करावयाची. आर्थिक व्यवहारात अनेक प्रकारचे वायदे करावे लागतात पैशाची कार्यें पैशाकडून व्यवस्थित व्हावयाची असल्यास पैसा म्हणून वापरण्यात येणारी वस्तु सर्वमान्य तर हवीच; पण त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे पैशाचे सर्वसाधारण मूल्य स्थिर असले पाहिजे पैशाचे मूल्य कसे ठरते ह्या प्रश्नाचे विवेचन करता पैशाचा पुरवठा व पैशाकरिता मागणी ह्या दोन्ही गोष्टीचा विचार केला पाहिजे. स्थूल मानाने पैशाचा पुरवठा × भ्रमणवेग = देशांतील सर्व व्यवहाराची एकूण किंमत. हे समीकरण बरोबर आहे; पण त्या समीकरणाने पैशाचा भ्रमणवेग ठरला जाऊन अमुक एक पैसा अमुक एक किमतीमान राखले जाण्याच्या दृष्टीने कसा पुरेसा पडतो, ह्या महत्त्वाच्या गोष्टीचा बोध होत नाही पैशाकरिता मागणी ह्या गोष्टीचा त्या दृष्टीने विचार झाला पाहिजे. देशांतील प्रत्येक व्यक्तीला आपल्या खरेदीशक्तीचा काही भाग केव्हांहि वापरता येईल, ह्या स्वरूपात म्हणजे पैशाच्या रूपांत ठेवावेंसें वाटत असते. त्यामुळेच त्या व्यक्तीची पैशाकरितां मागणी उद्‌भवते, अशा प्रकारे उद्‌भवणारी देशातील सर्व लोकाची मागणी एकच केली कीं देशाची पैशाकरिता मागणी समजते ह्या मागणीचा एकूण उत्पादनाशी जो सबध असेल त्याच सबंधानुसार किमतीमान ठरते. मागणी ह्या कल्पनेचा हा विशिष्ट अर्थ लक्षात ठेवल्यास स्थूल मानानें द्रव्यनिधिसिद्धान्ताला मान्यता द्यावयास हरकत नाही. मागणीचा हा अर्थ लक्षात घेतल्यास कागदी पैसा वाढून किमती वाढू लागल्यास पैशाच्या पुरवठ्यात ज्या प्रमाणात वाढ होते त्या प्रमाणापेक्षा अधिक पैशाचे मूल्य का पडतें ह्यावर प्रकाश वाढतो. पैशाचे मूल्य कमी होऊं लागले की पैसा जवळ ठेवण्याची लोकांची उत्सुकता कमी होते. त्यामुळे ते वेगानें पैशाचा खर्च करू लागतात. त्यामुळें पैशाचा परिणामकारक पुरवठा वाढतो व किंमती अधिक पडतात. ह्यामुळे पैशाचा पुरवठा नियंत्रित होईल, अशा योजनेची जरुरी भासते. शक्तिमान् सरकारला कागदी पैशाचा

पुरवठा किमतीमान स्थिर राहील ह्या बेतानें नियत्रित करणे कठीण नसते ही गोष्ट खरी; पण पैशाचें रूपान्तर एखाद्या धातूत केव्हाहि निश्चित करता येईल अशी व्यवस्था केल्यास पुरवठ्यावर आपसूकच नियत्रण राहाते. अल्प-कालाचा विचार केल्यास एखाद्या धातूचा कागदी पैशाचा पाया म्हणून स्वीकार करण्यास हरकत नाही, पण दीर्घकालाचा विचार करता एखाद्या धातूच्या नैसर्गिक पुरवठ्यावर पैशाचा पुरवठा अवलबून ठेवणे योग्य नाही त्या दृष्टीने सोने व चादी ह्याचा स्वीकार करणे योग्य होईल. दोन्ही धातूचा परस्पर स्वीकार केल्यास ग्रेशॅमच्या सिद्धान्ताचा अमल टाळावयाचा असल्याम त्याचा सबध स्थिर राखण्याचा प्रश्न उद्‌भवतो, पण ते अशक्य आहे असे नाही.

**नवसनातनवादाची तात्त्विक भूमिका**

मागील एका प्रकरणात मिलच्या ग्रथाचा विस्तृत साराश ज्या हेतूने देण्यात आला त्याच हेतूने वर मार्शलच्या मताचा विस्तृत साराश देण्यात आला आहे. त्या साराशामुळे नवसनातनवादी मडळीच्या अर्थशास्त्रीय कल्पना समजू शकतात. १९१४ पूर्वीचे अर्थशास्त्र स्थूल मानाने मार्शल-प्रणीत अर्थशास्त्र होते असे म्हणण्यास हरकत नाही. त्या अर्थशास्त्राला काही तात्त्विक बैठक होती का असा प्रश्न ह्या प्रसगी उपस्थित करणे अयोग्य होणार नाही ह्या बाबतीत एवढेच सागता येईल की, नवसनातन-वादी प्रथम सनातनवादी व नतर 'नव' असल्याने त्यातील सर्वांना सरकारचे धोरण अनियत्रणवादी असावे हें मान्य होते नवसनातनवाद्यापैकी कित्येकानी अनियत्रणवादाचा प्रत्यक्ष असा पुरस्कार केला नाही; पण त्याच्या लिखाणाचा रोखच असा होता की त्यातून अनियत्रणवादी धोरण सूचित व्हावे. उदाहरणार्थ, खुली चढाओढ असली तरच साधनांचा जास्तीत जास्त उपयोग होऊ शकतो, आणि वस्तूची किमत कमीत कमी होते. असे म्हणणाऱ्याला किवा काठावरील उत्पादन तत्त्वाने कोणावरहि अन्याय होत नाही असे म्हणणाऱ्याना अनियंत्रणवादाचा उघड पुरस्कार करावा लागत नाही. चढाओढीच्या तत्त्वावर आर्थिक व्यवहार आधारलेले असतात किवा घटकाना कांठावरील उत्पादनक्षमतेइतकेच वेतन मिळतें ह्या त्यांच्या गृहीतकृत्यातच सरकारने लक्ष घालून आर्थिक व्यवहारांत ढवळाढवळ करू नये ह्या मताचा अतर्भाव होतो. नवसनातनवाद्यांपैकी बहुतेकानीं जगांत खुली

चढाओढ असते हे गृहीत धरूनच आपली मते माडली. शिवाय त्यांच्यात व्यक्तिवाद्याचाच प्रामुख्याने भरणा होता. प्रत्येक व्यक्तीला जास्तीत जास्त सुख हवे असते आणि आपले सुख कशांत आहे व ते कसे प्राप्त करून घ्यावें हे अवगत असते; असे एकदा मान्य केले की, सरकारकडून आर्थिक व्यवहाराचें नियत्रण व्हावे की नाही हा प्रश्नच उपस्थित होत नाही. प्रत्येक व्यक्तीला आपल्या सुखाची साधना करण्यास पूर्ण मोकळीक असावी असें ओघानेच येते सरकारने आर्थिक व्यवहारावर कोणतेंहि नियत्रण घालू नये. सरकारने आर्थिक व्यवहारांवर नियत्रण न घातल्यास प्रत्येक व्यक्तीला जास्तीत जास्त सुख मिळवता येते. त्यांत कोणावरहि अन्याय होत नाही, अशी सर्वसाधारण-पणे सर्व नवसनातनवाद्याची भूमिका होती. त्यातील काही तर ह्या बाबतीत आत्यतिक होते. मार्शलसारख्या काही विचारी मंडळीना मात्र व्यक्तिहित व समाजहित भिन्न असू शकेल ह्याची जाणीव होती. अशा प्रसगी सरकारी नियत्रणांना त्याचा विरोध नव्हता, मार्शलप्रभृतीची सरकारच्या नियत्रणासबंधीची भूमिका मार्शलच्या पाठीतील विद्यमान् अर्थशास्त्रज्ञ पिगू ह्याने चागल्या प्रकारे माडली आहे आपल्या ग्रथाला त्याने कल्याणाचें अर्थशास्त्र (Economise of Welfare) नांव दिलें आहे संपत्ति व कल्याण ह्याच्यात केव्हां केव्हा विरोध निर्माण होतो हे त्यांत दाखविण्यात आले आहे. असा विरोध जेव्हां निर्माण होतो तेव्हा कल्या-णाची साधना म्हणून सरकारी नियत्रणाना मार्शल व त्याच्या शिष्याचा विरोध नव्हता पण एकदरींत मार्शलसकट सर्व नवसनातनवादी अनियत्रण-वादी धोरणाचे ( Laisse Faire Policy ) पुरस्कर्ते होते असे म्हण-ण्यास हरकत नाहीं. त्याचा अनियत्रणाचा पुरस्कार अतर्गत व्यवहारांना जितका लागू होता तितकाच आतरराष्ट्रीय व्यवहाराना लागू होता. मानवी गरजा भागविण्याला उपयुक्त असणाऱ्या जगातील सर्व साधनाचा जास्तीत जास्त उपयोग करून घ्यावयाचा असल्यास खुल्या व्यापाराच्या तत्त्वाला मान्यता दिल्याशिवाय गत्यंतर नाही, असा त्यांचा ह्या बाबतीतील विवेचनाचा सूर होता. साराश, सनातनवाद्यांनी पुरस्कारिलेल्या अनियंत्रण-वादी धोरणाला नवीन मुद्दे उपस्थित करून नवसनातनवाद्यांनी पाठिंबा दिला असे म्हणतां येईल. त्यांच्या मुद्द्यांत त्यांचीं गृहीततत्त्वें मान्य केल्यास

अधिक शास्त्रशुद्धता होती व त्यामुळे अदृश्य हाताच्या मदतीची त्याना स्मिथप्रमाणे गरज भासली नाही हे कबूल करावें लागते.

**नवसनातनवाद्यांची अर्थशास्त्रीय कामगिरी**

नवसनातनवाद्याचे आर्थिक लिखाण साकल्याने पाहू गेले असतां एका गोष्टीची तीव्रतेने जाणीव होते. ती गोष्ट ही की नवसनातनवाद्याच्या लिखाणात शास्त्रशुद्धता भरपूर आढळत असली तरी त्याना मिळालेले यश केवळ तात्रिक व त्यामुळे मर्यादितच समजावे लागते. जगात सर्वत्र अत्यत निर्भेळ अशी चढाओढ आढळते असें गृहीत धरले किवा स्वसुखामागे मनुष्य धावत असतो, आपले सुख कशात आहे हे ज्याचे त्यालाच समजते ह्या गोष्टी गृहीत धरल्या की, नवसनातनवाद्याच्या अर्थशास्त्राला मान्यता देण्यास कोणतीच हरकत नाही; पण स्वसुख कशात आहे हे व्यक्तीला खरोखरच समजते काय ? स्वसुखाकरिता व्यक्तीला धडपड करण्याची मोकळीक देण्याने सर्वाना सुख लाभेल ह्याची शाश्वती आहे काय ? जगात निर्भेळ चढाओढ असते हे खरे काय ? व्यक्ति-व्यक्तीतील उत्पन्नातील फरकाचा घटक बाजारातील चढाओढीवर काही परिणाम होत नाही असे मानणे योग्य आहे काय ? वर्गभावना, वर्गसघर्ष ह्या गोष्टी आर्थिक व्यवहारात नसतात काय ? त्याचा आर्थिक व्यवहारावर काहीच परिणाम होत नाही काय ? इत्यादि मूलभूत प्रश्न उपस्थित केल्यास नवसनातनवादाचा एकागीपणा, त्यातील तात्रिकता इत्यादि गोष्टी ताबडतोब लक्षात यतात. वरील मूलभूत प्रश्न ज्या अर्थशास्त्राने उपस्थित केले त्या अर्थशास्त्राची म्हणजे मार्क्सवादाची नवसनातनवादाने उपेक्षाच केली ही उपेक्षा मार्क्सवादाला बाधक न ठरतां परिणामी नवसनातनवादालाच बाधक ठरली. कारण पहिल्या महायुद्धानतरच्या नव्या जगात मार्क्सवादी अर्थशास्त्राचे सामर्थ्य ज्या प्रमाणात स्पष्ट झाले त्याच प्रमाणात नवसनातनवादाचा तोकडेपणा नजरेत भरला. स्वत च निर्मिलेल्या कल्पना सृष्टीत स्वत ला गुरफटून घेऊन वास्तवसृष्टीला विसरून जाणाऱ्याना जो अनुभव येतो तोच नवसनातनवाद्याना आला. कालदृष्ट्या व गुणदृष्ट्या नवसनातनवादाचे यश मर्यादित राहणे अपरिहार्यच होते.

एकोणीसाव्या शतकाच्या उतरार्धात अर्थशास्त्रावर ज्याचा विशेषेकरून पगडा बसला होता त्या नवसनातनवादाचा विचार मागील प्रकरणात केला त्यावरून पहिल्या महायुद्धापूर्वी अर्थशास्त्राची काय स्थिति होती ह्याची कल्पना येऊ शकेल. ह्या शेवटच्या प्रकरणात अर्थशास्त्राच्या आजच्या स्थितीची कल्पना यावी ह्या दृष्टीने अर्थशास्त्रात आज म्हणजे प्रमुखत पहिल्या महायुद्धानंतर जे विचारप्रवाह वाहत आहेत, आज जे प्रश्न चर्चिले जात आहेत, आज जे वाद उपस्थित झाले आहेत, त्याचे थोडेंसे दिग्दर्शन करावयाचे योजिले आहे.

**नवसनातनवाद ही भांडवलशाहीची प्रतिक्रिया**

मागील प्रकरणांतील विवेचनावरून हे सहजच लक्षात येऊ शकेल की नवसनातनवाद ही मार्क्सवादाची प्रतिक्रिया होती. मार्क्सवादाने भाडवल-शाहीवर जो हल्ला चढविला त्या हल्ल्यापासून भाडवलशाहीचें सरक्षण करणें हा नवसनातनवादाचा प्रत्यक्ष नसला तरी प्रच्छन्न हेतु होता. त्याकरिता मार्क्सने प्रतिपादिलेला मूल्याचा श्रमसिद्धान्त व विभाजनाचा पिळवणूक सिद्धान्त फोल असून मूल्याचे व विभाजनाचे नियमन निराळ्याच तत्त्वा-नुसार होते व ती तत्त्वे सर्व वस्तूना, सर्व वर्गाना सारखीच लागू पडतात हे सिद्ध करणें भाग होते. हे करण्यात नवसनातनवाद बऱ्याच प्रमाणात यशस्वी झाला हे कबूल केले पाहिजे. पण इतके असूनहि भाडवलशाहीचा सपूर्ण बचाव नवसनातनवाद करू शकला नाही तसें करणे अशक्यच होते. कारण नवसनातनवादाने पुरस्कारिलेले मूल्य व विभाजन सिद्धान्त ज्या गृहीततत्त्वावर आधारलेले होते त्या गृहीतकृत्याना पोषक अशी परिस्थिति भाडवलशाहीत अभावानेच तळपत होती

**खुली व निर्भेळ चढाओढ व्यवहारांत अशक्य**

खुली व निर्भेळ चढाओढ (Perfect and Pure Competition) अस्तित्वांत असणें भाडवलशाहीचा व्यवहार कोणा व्यक्तीवर अगर वर्गावर अन्याय न होता चालावयाचा असेल तर अवश्य असते. भाडवलशाहीच्या सुरुवातीला तरी अशी चढाओढ होती की नाही हे

सांगता येत नाही; पण एक गोष्ट निश्चित की भांडवलशाहीच्या विकासाबरोबर वस्तूच्या बाजारात खुली व निर्मळ चढाओढ असणे सपूर्णपणे अशक्य झाले. याचे कारण असे की, भांडवलशाहीच्या विकासाबरोबर उद्योगपतीच्या उत्पादनपद्धती सुधारून अधिक नफा मिळविण्याच्या चढा-ओढीमुळे उत्पादनाचे झपाट्याने यांत्रिकीकरण झाले. त्याचे दोन परिणाम झाले. पहिला परिणाम असा की, कोणत्याहि वस्तूच्या उत्पादनासाठी अतिशय मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतविण्याची जरुरी भासू लागली. दुसरा परिणाम असा की, मोठ्या प्रमाणातील उत्पादनच फायद्याचे ठरू लागले. जेव्हा मोठ्या प्रमाणावरील उत्पादन फायद्याचे असते व उत्पादनासाठी लागणाऱ्या भांडवलाचे प्रमाणहि मोठे असते तेव्हा खुल्या चढाओढीची जी प्रमुख अट की "वस्तूच्या ग्राहकाप्रमाणे वस्तूचे विक्रेतेहि--उत्पादकहि--अनेक असावेत" तिचा बाजारात टिकाव लागू शकत नाही. उत्पादकाची संख्या कमी कमी होऊन उत्पादन अधिकाधिक मक्तेदारीयुक्त होणे व त्याचबरोबर चढाओढीतील खुलेपणा व निर्मळपणा नष्ट होणे ह्या भांडवलशाहीच्या विकासात ओघानेच येणाऱ्या गोष्टी आहेत. भांडवलशाहीच्या विकासाबरोबर केवळ वस्तूच्या बाजारातील खुलेपणा व निर्मळपणा नष्ट होतो असे नव्हे; तर घटकाच्या बाजारातील खुलेपणा व निर्मळपणा--विशेषतः मानवी श्रम ह्या घटकाच्या बाजारातील--नष्ट होतो. घटकाच्या बाजारात खुलेपणा व निर्मळ-पणा निर्माण होण्यासाठी व टिकण्यासाठी एका गोष्टीची जरुरी असते. ती गोष्ट म्हणजे कोणत्याहि घटकाचे ग्राहक व विक्रेते बरोबरीच्या नात्याने बाजारांत आले पाहिजेत. भांडवलशाहीचा विकास झाल्यानंतर व काही अंशाने तत्पूर्वीहि भांडवलशाहीत मानवी श्रमाच्या बाजारात ही गोष्ट आढळत नाही. ह्या बाजारात मानवी श्रमाचा विक्रेता जो कामगार व त्याचा ग्राहक जो भांडवलदार त्याचे नातें केवळ नांवापुरतेच बरोबरीचे असते. तात्त्विक दृष्ट्या ते एवढ्याच अर्थाने बरोबरीचें असते की मजुरा-वर भांडवलदारांचा प्रत्यक्ष असा कोणताच अधिकार नसतो. सौदा करण्यास, करार करण्यास, देवाण-घेवाण करण्यास तत्त्वत दोघेहि पूर्ण व सारखेच स्वतंत्र असतात; पण ही गोष्ट केवळ तत्त्वतःच बरोबर आहे, हे विकसित

भाडवलशाहीतील एक उघड दिसणारे सत्य आहे. भांडवलदार व मजूर हे वर्ग तत्त्वत. समान दर्जाचे असले तरी ह्यापैकी दुसरा वर्ग बाजारात कमजोर असतो; त्याचें कारण तो अशिक्षित असतो हे तर आहेच; पण त्याहिपेक्षा मोठे कारण म्हणजे आपल्या प्रत्यक्ष जीवनाच्या बाबतीत तो परावलंबी असतो; उत्पादनाची साधने ज्याच्या मालकी हक्काखाली असतात त्या भाडवलदार वर्गावरच तो अवलंबून असतो हे आहे. ह्या परिस्थितीत मजुरीच्या बाबतीत दोन वर्गाकडून बरोबरीच्या नात्याने सौदा ठरणे कसे शक्य आहे? मजुरांची उत्पादनक्षमता कितीहि असो; बाजारातील त्याची बाजू कमजोर असल्यामुळे शेवटी मिळेल त्या मजुरीवर त्याला सतुष्ट राहावे लागते हे नाकारता येत नाही. त्यावर तोडगा म्हणून मजूरसंघटना निघतात; पण त्यामुळे मजुरीच्या बाजारातील खुलेपणा अधिकच नष्ट होतो. आर्थिक दृष्टीने मजुरी न ठरता मालक प्रबळ की मजूरसघटना प्रबळ ह्यावर मजुरी ठरू लागते. असो. अशा प्रकारे भाडवलशाहीच्या विकासावरोबर वस्तूच्या व घटकाच्या बाजारातील खुलेपण व निर्मळपणा नष्ट झाल्यामुळें त्या गृहीततत्त्वावर आधारलेल्या नवसनातनवादाच्या मूल्य व विभाजन सिद्धान्ताना फारसा अर्थ उरत नाही.

### अशुद्ध चढाओढीचें अर्थशास्त्र

खुली व निर्मळ चढाओढ अर्थशास्त्राचे गृहीततत्त्व म्हणून निरुपयोगी आहे. हा विचार जोरदारपणे पुढें माडून अशुद्ध चढाओढीचे (Imperfect Competition) परिणाम काय होतात, ह्या संबधीच्या चर्चेला चालना देण्याचे श्रेय जोन रॉबिन्सन व एडवर्ड चेबरलेन ह्या दोघाना दिले पाहिजे. जोन रॉबिन्सन ह्यानी आपल्या अशुद्ध चढाओढीचे अर्थशास्त्र (Economise of Imperfect Competition) ह्या ग्रंथात व चेम्बरलेन ह्यानी मक्तेदारीयुक्त चढाओढ (Monopolistic Competition) ह्या आपल्या ग्रथांत ही चर्चा केली आहे. त्यानी केलेल्या विवेचनाचा आशय असा सांगता येईल की, निर्भेळ चढाओढ व मक्तेदारी ह्या केवळ तात्त्विक दृष्ट्या शक्य अशा गोष्टी आहेत. प्रत्यक्षांत ह्या गोष्टी केवळ अपवाद म्हणून आढळतात. जिच्यात मक्तेदारीची भेसळ आहे अशी चढाओढ म्हणजेच अशुद्ध वा मक्तेदारीयुक्त चढाओढ. हा प्रत्यक्ष आर्थिक व्यवहारांतील नियम

आहे. खुल्या चढाओढीची दोन वैशिष्टयें आहेत. विक्रेत्यांची अफाट सख्या हें पहिले वैशिष्टच व ग्राहकाचा ओढा विशिष्ट विक्रेत्याकडे असत नाही, हे दुसरे वैशिष्टच. खुल्या चढाओढीची ही वैशिष्टचे प्रत्यक्ष व्यवहारात अभावानेच तळपतात. मोठचा प्रमाणावरील उत्पादन किफायतशीर होऊ लागले की, उत्पादनाचे प्रमाण साहजिकच वाढू लागून कोणत्याहि वस्तूच्या विक्रेत्यांची सख्या कमी होऊ लागते. हा झाला आर्थिक विकासाचा परिणाम, पण दुसरी गोष्ट याहिपेक्षा मूलभूत आहे ती अशी की निरनिराळचा उत्पादकाकडून उत्पादिलेली वस्तु नावाने एकच असली तरी ग्राहकांना जणू काय त्या भिन्न वस्तूच आहेत असें वाटू शकते. कारण प्रत्येक उत्पादकाच्या वस्तूला जाहिरातबाजीमुळे म्हणा अगर अन्य कशामुळे म्हणा; खरेखोटे गुणावगुण चिकटले जातात. त्याचा परिणाम विशिष्ट उत्पादकाचे विशिष्ट ग्राहक अशी परिस्थिति बाजारात निर्माण होण्यात होतो. काही थोडे ग्राहकच असे असतात की, विशिष्ट उत्पादकाबद्दल त्याचा आग्रह नसतो. बहुसख्य ग्राहक विशिष्ट विक्रेत्याबद्दल सकारण अगर अकारण आग्रह धरू लागले की, खुली चढाओढ राहू शकत नाही. खुल्या चढाओढीचा अभाव आर्थिक विकासाचा परिणाम नसून नैसर्गिक आहे. म्हणूनच खुली चढाओढ हा अपवाद व अशुद्ध चढाओढ हा नियम मानला पाहिजे. निर्भेळ चढाओढ हा जसा अपवाद तसाच निर्भेळ मक्तेदारी हाहि अपवादच. एकुलता एक उत्पादक आणि त्याने उत्पादिलेल्या वस्तूबद्दल दुसरी वस्तु वापरता येण्याची असंभाव्यता ही दोन निर्भेळ मक्तेदारीची वैशिष्टचे आहेत ही दोन्ही वैशिष्टचे एकत्रित रीत्या अपवादरूपानेच आढळतात. दूरत्वाने कोणतीहि वस्तु दुसऱ्या वस्तूच्या ऐवजी वापरता येते तो भाग जरी सोडून दिला तरी प्रत्येक वस्तूऐवजी वापरता येणाऱ्या चार दोन तरी वस्तू असतातच. ह्याच कारणानें शुद्ध मक्तेदारी मुख्यत आढळत नाही. अशुद्ध चढाओढीमुळें धड खुल्या चढाओढीचे फायदेहि मिळत नाहीत, किवा मक्तेदारीचेहि मिळत नाहीत. खुली चढाओढ असल्यास उत्पादकांच्या एकमेकातील चढाओढीमुळें उत्पादकाला वस्तूची किमत शक्य तेवढी कमी करण्याची जरुरी भासते. त्यामुळे उत्पादनखर्च शक्य तेवढा कमी व्हावा अशी त्याची सतत धडपड चालू असते. ह्याचा फायदा शेवटी

उपभोक्त्याना मिळून वस्तूची किमत शक्य तेवढी कमी होते. म्हणजेच साधनाचा अपव्यय टळतो. खुल्या चढाओढीचे हे फायदे आहेत. मक्तेदारीचेसुद्धा काही फायदे असतात; त्यातील प्रमुख म्हणजे उत्पादनाचे प्रमाण वाढल्याने मिळणारे फायदे, संशोधनाला वाव इत्यादि आहेत. अशुद्ध चढाओढीत वरीलपैकी कोणताहि फायदा मिळत नाही. जाहिरातबाजी-सारख्या गोष्टीत अपव्यय मात्र होतो.

**विकसित भांडवलशाहींतील अन्य दोष व नवसनातनवादाची भूमिका**

भांडवलशाहीच्या विकासाबरोबर जसजशी आर्थिक विषमता वाढत जाते तसतसे दुसरे अनेक दोषहि भांडवलशाहीत शिरूं लागतात. त्यापैकी दोन प्रमुख दोष म्हणजे कायम स्वरूपाची बेकारी व सदैव चालू राहाणारे व्यापारचक्र. भांडवलशाहीत हे दोष असणें अपरिहार्य आहे हे मार्क्सने दाखवून दिले होते. त्या दोषाकडे नवसनातनवादाने कानाडोळाच केला त्या दोषाच्या बाबतीत नवसनातनवादाने स्वीकारलेली भूमिका सनातनवादाच्या भूमिकेहून फारशी भिन्न नव्हती स्थूलपणे ती अशी होती की खुल्या व निर्मळ चढाओढीच्या मार्गात अडथळे उत्पन्न केल्यानें अर्थशास्त्राच्या सिद्धान्ताना अमलांत येण्यास वाव न मिळाल्याकारणाने हे दोष आर्थिक व्यवस्थेत उद्‌भवतात. हे दोष भांडवलशाहीचे नसून भांडवल-शाहीच्या मूलतत्त्वास बाधक असे प्रवाह आर्थिक व्यवस्थेत अविरोध वाहून देण्याच्या प्रवृत्तीचे हे दोष आहेत. नवसनातनवादाने हीच भूमिका स्वीकारली. उदाहरणार्थ, भांडवलशाहींत आढळणाऱ्या बेकारीच्या बाबतीत नवसनातनवादाचा एक पुरस्कर्ता पिगू ह्याने असें प्रतिपादिले की, कोणत्याहि कारणामुळें वाजवीपेक्षा म्हणजे काठावरील उत्पादनापेक्षा अधिक मजुरी ठरली असता व त्या ठिकाणी ती कृत्रिम रीत्या ठेवली गेली असतां बेकारी निर्माण होते. सरकारच्या कायद्यामुळे असो अगर मजूरसंघटनांच्या दडपणामुळें असो; मजुरी वाजवीपेक्षा जास्त झाली म्हणजे मानवी श्रमाच्या पुरवठ्या-पेक्षा मागणी कमी होते व बेकारी निर्माण होते. ह्या परिस्थितीत बेकारीचा दोष आर्थिक व्यवस्थेंत शिरण्याचें कारण म्हणून भांडवलशाहीला जबाबदार धरतां येणार नाही. पुरवठा लक्षात घेतां ' मानवी श्रमाच्या कांठावरील उत्पादनशक्तीनुसार मजुरी ठरली जाते ' ह्या आर्थिक सिद्धान्ताच्या अमलांत

जाणूनबुजून व्यत्यय आणणारें सरकार अगर मजूरसंघटना ह्यांनाच त्याबाबत जबाबदार धरले पाहिजे. भाडवलशाहीतील बेकारीचें कारण लक्षात घेता बेकारी निवारणाचा उपाय अगदी स्पष्ट आहे. तो म्हणजे मजुरी कमी करणे. कामगारवर्ग ह्या तोडग्यास कबूल असेल तर बेकारी आपसूक नाहीशी होईल. नसेल तर बेकारीची जबाबदारी भाडवलशाहीच्या माथी येणार नाही. अशी थोडक्यात बेकारीच्या बाबतीत नवसनातनवादाची भूमिका होती

व्यापारचक्राच्या बाबतीत नवसनातनवादाच्या आद्य प्रवर्तकांत विशेष विवेचन आढळत नसलें तरी नवसनातनवादाच्या विसाव्या शतकांतील अनुयायांचे विचार पाहिले तर असे म्हणता येईल की, व्यापारचक्र आर्थिक व्यवस्थेतील फार मोठा दोष आहे, हे नवसनातनवाद्याना मान्यच नव्हतें. ह्या बाबतीत नवसनातनवाद्याची भूमिका सामान्यपणे अशी होती की, "भाडवलशाहीत उत्पादन, व्यापार इत्यादिकांना मधूनमधून भरती येते. त्याच्या पाठोपाठ ओहोटी लागते. ही गोष्ट भाडवलशाहीच्या निश्चित विनाशाची द्योतक आहे" हे मार्क्सचे मत बरोबर नसून व्यापारचक्राकडे उत्पादन नि व्यापार ह्यांचा तोल संभाळणारा एक प्रवाह ह्या दृष्टीनेंच पाहिले पाहिजे व्यापारचक्राचे--विशेषत: उत्पादन. व्यापार ह्याना लागणाऱ्या ओहोटीचे म्हणजेच मंदीचे---तात्कालिक परिणाम वाईट असतात हे कबूल केले पाहिजे; पण दूरगामी दृष्टीने पाहिले असता मदीमुळे उत्साहाच्या भरात होत असलेल्या भांडवलाच्या गुतवणीला पायबंद बसतो आणि त्यामुळे साधनाचा अपव्यय टळतो, हे लक्षात घ्यावयास हवे. त्या दृष्टीनें विचार केला असता व्यापारचक्र हा अपव्यय टाळणारा व मागणी-पुरवठ्यातील तफावत दूर करणारा प्रवाह आहे व तो शेवटी आर्थिक व्यवस्थेतील स्थिरतेलाच मदत करतो असें म्हटले पाहिजे. असें हे सनातनवाद्याचे व्यापारचक्राचे समर्थन होते

**मार्क्सवादाचे निर्मूलन करण्यांत नवसनातनवाद अयशस्वी**

भाडवलशाहीतील दोष म्हणून समजल्या गेलेल्या गोष्टीचा खुलासा वा समर्थन करून ज्याला दोष म्हणण्यांत येते ते दोष असल्यास त्यांची जबाबदारी भाडवलशाहीवर नसून भाडवलशाहीच्या व्यवहारात व्यत्यय

आणणाऱ्यावर आहे हे सिद्ध करण्यांत नवसनातनवाद फारसा यशस्वी झाला नाही. त्या दोषाच्या बाबतींत भांडवलशाहीवर मार्क्सने चढविलेल्या हल्ल्यावर समपक उत्तर नवसनातनवाद देऊं शकला नाही. 'अत्यंत खुली व विशुद्ध' चढाओढ प्रस्थापित झाली असता भांडवलशाहीचे दोष बऱ्याच प्रमाणात नाहीसे होतील, हे प्रतिपादन मान्य करणारे लोकसुद्धा असे दाखवून देतात कीं, मनुष्यस्वभाव लक्षात घेता आणि भांडवलशाहीत अपरिहार्य असणारी वाढती आर्थिक विषमता लक्षात घेतां खुली व निर्मळ चढाओढ प्रस्थापित होणे सर्वथैव अशक्य आहे; तेव्हा त्याला द्यावयास सरळ उत्तर नवसनातनवादाजवळ नाही. म्हणूनच भांडवलशाहीचा बचाव पूर्णपणे करण्यास नवसनातनवाद असमर्थ ठरला. मार्क्सने केलेली भांडवलशाहीची चिरफाड व त्याने वर्तविलेले भांडवलशाहीच्या अंतिम नाशाचे भविष्य ह्या गोष्टी अबाधितच राहिल्या. नवसनातनवादाला मार्क्सवादाचे निर्मूलन करता आले नाही. पहिल्या महायुद्धानें, त्यानंतर झालेल्या रशियातील समाजवादी क्रान्तीने व महायुद्धानंतर भांडवलशाही जगावर कोसळलेल्या अत्यंत भयानक अशा मंदीच्या लाटेने (The Great Depression) १९२९–३४ तर मार्क्सवादी आर्थिक विचाराला बहरच आला. ह्या सर्वांचा परिणाम असा झाला की, भांडवलशाही आर्थिक व्यवस्था की समाजवादी आर्थिक व्यवस्था ह्या प्रश्नाचे तात्त्विक स्वरूप पूर्णपणे नाहीसे होऊन तो ज्याच्यावर ताबडतोब निर्णय घेतला गेला पाहिजे, असा व्यावहारिक प्रश्न होऊन बसला. ह्या प्रश्नावर अर्थातच सर्वत्र चर्चा सुरू झाली. ह्या चर्चेचे अर्थशास्त्रांत जे साद-पडसाद उमटत आहेत त्यानाच अर्थशास्त्रातील आजचे विचारप्रवाह असे म्हणतां येईल. त्या पडसादाचे स्वरूप काय आहे ह्याचे विवेचन खाली केले आहे.

### आजच्या अर्थविचारांतील चार प्रमुख संप्रदाय

भांडवलशाही आर्थिक व्यवस्था की समाजवादी आर्थिक व्यवस्था ह्या चर्चेत भाग घेणाऱ्या अर्थशास्त्रज्ञांचे साधारणपणे चार भाग पाडता येतील. ते असे :—व्यक्तिस्वातंत्र्यावर उभारलेली भांडवलशाही, नियोजित समाजवादी आर्थिक व्यवस्थेपेक्षा बरी असे म्हणणारा वर्ग, भांडवलशाही नको व समाजवादहि नको असें म्हणणारा वर्ग, समाजवादी आर्थिक व्यवस्था उत्तम

असें म्हणणारा वर्ग व समाजवाद व भांडवलशाही ह्याचा समन्वय करूं पहाणारा वर्ग. ह्या प्रत्येक विभागांतील अर्थशास्त्रज्ञाचे काय विचार आहेत हे क्रमश पाहूं.

**भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांचा समाजवादावरील हल्ला**

भाडवलशाहीचा अजून पुरस्कार करणाऱ्यामध्यें दोन उपगट आहेत. पहिल्या उपगटांतील अर्थशास्त्रज्ञाना निर्भेळ भाडवलशाहीच पसन आहे. दुसऱ्या गटातील लोकाना भाडवलशाही हवी पण ती नियत्रित असावी, असे वाटते. कारण योग्य अशा नियत्रणानी भाडवलशाहीचा कारभार सुधारूं शकेल व भांडवलशाहीतील प्रमुख दोष नाहीसे करता येतील असा त्याचा विश्वास आहे. पहिल्या गटातील भाडवलशाहीच्या पुरस्कर्त्यानी अलीकडे एक नवा पवित्रा धारण केला आहे; तो म्हणजे समाजवादावर हल्ला करण्याचा. भांडवलशाहीच्या सध्याच्या स्वरूपात त्यात उघड उघड दिसत असलेले दोष नाकारणे अत्यत कठीण आहे. हे जाणूनच भाडवलशाहीचे पुरस्कर्ते सध्या असा दावा माडीत आहेत की, भाडवलशाहीत काहीहि दोष असले तरी समाजवादाचे जे सभवनीय असे गभीर परिणाम आहेत त्यापुढे भाडवलशाहीचे दोष काहीच नव्हेत; तेव्हा दगडापेक्षा वीट मऊ ह्या न्यायाने समाजवादापेक्षा भाडवलशाहीच बरी. भाडवलशाही हवी असेल तर ती जितक्या विशुद्ध स्वरूपांत असेल म्हणजे तिची मूलतत्त्वे जितक्या प्रमाणात राखिली जातील तितके ते उत्तम हे ओघाने आलेच. तेव्हा त्या दृष्टीने प्रयत्न करणे हें सर्वांत उत्कृष्ट आर्थिक धोरण होय. साराश, भाडवलशाहीचे सरक्षण करण्याचा उत्तम उपाय म्हणून सध्यां निर्भेळ भाडवलशाहीच्या पुरस्कर्त्यानी आक्रमक धोरण स्वीकारलेले असून समाजवादाचे परिणाम कोणकोणत्या प्रकारे घातक होण्याचा सभव आहे ह्याचे तात्त्विक विवेचन करण्याच्या उद्योगात ते मग्न आहेत ह्या उपगटाचे धुरीण मैझेस हे आहेत असे मानता येईल. कारण १९२०सालीं एक लेख लिहून त्यानी समाजवादाविरुद्ध आघाडी उघडली. त्याशिवाय प्रा. रॉबिन्स, प्रा. हायक ही मंडळी ह्या गटात मोडतात. ह्या गटातील सर्वच अर्थशास्त्रज्ञ विद्वान्, प्रतिष्ठित व मूलग्राही विचार करणारे असल्यामुळे त्यांच्या विचाराला महत्त्व प्राप्त झाले असल्यास नवल नाही. आजचा आर्थिक विचार समजून घ्यावयाचा असल्यास त्याचा विचार समजून घेणें

अत्यावश्यक आहे. नियोजित आर्थिक व्यवस्थेच्या हितचितकांनाहि त्यांच्या विचाराची दखल घेणे जरूर आहे, कारण नियोजित अर्थव्यवस्थेत त्यानी दाखविलेले दोष गभीर स्वरूपाचे आहेत. ह्या दोषाचे दिग्दर्शन प्रमुखत: प्रा हायक ह्यानी सपादिलेल्या आर्थिक नियोजन (Collectivist Economic Planning) ह्या नियोजनविरोधी लेखसग्रहात व त्यानी लिहिलेल्या गुलामगिरीचा रस्ता (Raod to Serfdum) ह्या ग्रथात आढळते.

**समाजवादांत व्यक्तिस्वातंत्र्याचें अपहरण होतें**

हायक प्रभृतीच्या मतें समाजवादाचा पहिला दोष म्हणजे समाजवादांत व्यक्तिस्वातंत्र्याला स्थान नाही नियोजन व व्यक्तिस्वातंत्र्य ह्याचे विळ्या-भोपळ्याइतके सख्य आहे. नियोजनाच्या तत्त्वावर आधारलेल्या आर्थिक व्यवस्थेंत उपभोगाचे अगर उत्पादनाचें स्वातंत्र्य व्यक्तीला देतां येणे शक्य नाही. त्या व्यवस्थेत स्वत:चा धंदा निवडण्याचे स्वातंत्र्यसुद्धा व्यक्तीला राहाणार नाही. इतकेच काय तर प्रचलित व्यवस्थेवर टीका करण्याचा अधिकार, जो लोकशाहीतील सर्वात मूलभूत अधिकार समजला जातो तोहि व्यक्तीला देतां येणार नाही. नियोजनात्मक आर्थिक व्यवस्थेत उपभोग—उत्पादन—धद्याची निवड ह्या बाबतीतले व्यक्तिस्वातंत्र्य—ज्याला आर्थिक स्वातत्र्य म्हणता येईल—व्यक्तीला राहाणार नाही. कारण त्या सर्व गोष्टी नियोजन करण्याचा अधिकार ज्यांच्या हातात त्याच्याकडून ठरविल्या जातील त्याच्या-कडून देशातील लोकाची ह्या बाबतीतली मते काय आहेत, त्याना काय हवें आहे, हे अजमावण्याचा प्रयत्न अगदीच केला जाणार नाही असे नाही; पण कितीहि प्रयत्न केला तरी शेवटी घेतलेले निर्णय सर्वांना अनुकूल राहण्याचा सभव कमी आणि स्वत:ला पटो अगर न पटो; सर्वांना ते पाळावे मात्र लागणार. शिवाय त्या निर्णयावर निर्णय घेण्याची अतिम जबाबदारी ज्याची, त्याच्या आवडीनिवडीचा पगडा अधिक बसणार हे उघड आहे दुसरी गोष्ट अशी की, एकदा निर्णय घेऊन नियोजन सुरू झालें कीं त्या निर्णयांत बदल करण्यास अवकाश फारसा राहाणार नाहीं. कारण नियोजनासबंधींच्या निर्णयांत पुन: पुन बदल करण्यानें साधनांचा अपव्यय होण्याचा सभव निर्माण होतो. भांडवलशाहीत उपभोक्त्याना आपले निर्णय बदलण्यांचा अधिकार केव्हांहि असतो. त्यामुळे थोडाबहुत साधनाचा अपव्यय होत असला तरी त्याची

ठोकर एखाद दुसऱ्या व्यक्तीला बसते. नियोजनात चुका झाल्या की त्याची ठोकर समाजाला बसते. नियोजनावर टीका करण्याचे फारसे स्वातत्र्य व्यक्तीला देणे सरकारला परवडणार नाही. नियोजनामुळें सर्व आर्थिक व्यवहाराचे सरकारीकरण होते व सत्तचे केंद्रीकरणहि अपरिहार्य ठरतें हेहि लक्षात ठेवावयास हवे.

**नियोजित आर्थिक व्यवस्था कार्यक्षम असणे अशक्य**

नियोजित आर्थिक व्यवस्थेचा दुसरा प्रमुख दोष म्हणजें आर्थिक व्यवस्थेची कार्यें पार पाडण्यात ती आर्थिक व्यवस्था कार्यक्षम ठरणार नाहीं अशी साधार भीति वाटते. अमर्यादित गरजा व मर्यादित साधने ह्यांमुळें आर्थिक प्रश्न उपस्थित होतो. तो सोडविण्यासाठी अमर्यादित गरजा व मर्यादित साधनें ह्याचा योग्य असा समन्वय घालण्याचें बिकट काम आर्थिक व्यवस्थेला पार पाडावें लागतें. हें काम पार पाडावयाचे असल्यास कोणत्या गरजा अधिक महत्त्वाच्या, हे समजण्याचा मार्ग आर्थिक व्यवस्थेत असावा लागतो. सध्यांच्या आर्थिक व्यवस्थेत वस्तूचे पैशातोल मूल्य त्या वस्तूच्याकरितां असलेल्या गरजेचें महत्त्वमापन करणारें यंत्र आहे. त्या यंत्राचा व्यवहार सुरळीत चालण्यास प्रचलित आर्थिक व्यवस्थेतील बाजार ही सस्था (जेथें प्रत्येक वस्तूचे ग्राहक व विक्रेते एकत्र येऊन वस्तूची किंमत ठरविण्यास हातभार लावतात ती सस्था) जबाबदार आहे. नियोजित आर्थिक व्यवस्थेत अशी सस्था अस्तित्वांत असणे शक्य नाही. कारण बाजार ह्या सस्थेला उपभोग व उत्पादनस्वातत्र्य असेल तरच अर्थ आहे. उपभोगस्वातंत्र्य असेल तरच वस्तूचा बाजार भरूं शकतो. उत्पादनस्वातत्र्य असल्यासच घटकांचा बाजार अस्तित्वात येऊ शकतो. उत्पादन व उपभोगस्वातंत्र्य अबाधित राखून बाजार ही संस्था अस्तित्वात ठेवणे नियोजित आर्थिक व्यवस्थेला परवडण्याजोगे नाही. कारण बाजार ही सस्था असणें ह्याचा अर्थ त्या सस्थेने दिलेल्या आदेशानुसार कोणत्या वस्तूचे उत्पादन करावयाचें, ते किती प्रमाणांत करावयाचे हे ठरविणे असा होतो. बाजारच्या लहरीवर उत्पादनविषयक निर्णय अवलंबून राहिले तर पूर्वनियोजना-

नुसार उत्पादन ह्याला काहीच अर्थ उरत नाही. तेव्हां बाजार ही संस्था व नियोजन ह्या परस्परविरोधी गोष्टी आहेत. बाजार ह्या संस्थेच्या अभावी मानवी गरजाचे अचूक महत्त्वमापन करणे अत्यत कठीण आहे. तो प्रश्न यशस्वी रीत्या सोडविण्यास नियोजित आर्थिक व्यवस्थेत अन्य असे दुसरे साधन दिसत नाही नियोजन करण्याची अतिम जबाबदारी ज्याच्यावर आहे त्याच्या लहरीवरच उत्पादनाचे निर्णय शेवटी अवलबून असणे अपरिहार्य आहे. आर्थिक प्रश्न सोडविण्याचा हा मार्ग योग्य आहे असे म्हणता येत नाही. हा मार्ग अवलबिला गेला असता जे नको ते उत्पादिले जाण्याची व जे उत्पादिले आहे ते लोकावर लादलें जाण्याची भीति उत्पन्न होते. साराश, गरजाचे महत्त्वमापन ही अत्यत महत्त्वाची गोष्ट नियोजित आर्थिक व्यवस्थेत होऊं शकत नसल्यामुळे साधनाचा अपव्यय होण्याचा संभव नियोजित आर्थिक व्यवस्थेत असतो.

**नियोजित आर्थिक व्यवस्थेत प्रोत्साहनाचा अभाव**

नियोजित आर्थिक व्यवस्थेचा तिसरा दोष म्हणजे नियोजित आर्थिक व्यवस्थेत व्यक्तीला कार्यप्रवृत्त करणारे कोणतेहि प्रोत्साहन नसते; प्रचलित आर्थिक व्यवस्थेत स्वत ची आर्थिक स्थिति सुधारण्यासाटी स्वप्रयत्नाने झटण्याची व्यक्तीला पूर्ण मुभा असल्याने उद्योगशील होण्यास त्याला प्रोत्साहन राहते. व्यक्तीच्या साहसी वृत्तीलाहि भरपूर वाव असतो; पण नियोजनात ह्या दोन्ही गोष्टी नाहीशा होतात. सर्वच वरून ठरत असल्यामुळ व्यक्तीला आपली बुद्धि अगर साहस दाखविण्यास वाव नसतो काम चोख केल्यानें लाभ होईल अशी आशाहि नसते. नियोजित आर्थिक व्यवस्था प्रस्थापित झाल्याबरोबर मनुष्यस्वभाव बदलेल व दृश्य अशा कोणत्याहि प्रोत्साहनाशिवाय मनुष्य कार्यप्रवृत्त होईल असे मानण्यांत अर्थ नाही; कारण मनुष्यस्वभाव असा बदलत नाही नि स्वार्थबुद्धीनें मनुष्य वागू लागला तर समाज आहे त्या स्थितीतच फारतर कसाबसा तगून राहील, पण असा समाज प्रगतिशील असणें अशक्य. कारण प्रोत्साहन असल्याशिवाय प्रगति होऊं शकत नाहीं. प्रगति व्यक्तिकरवींच होते आणि व्यक्तीस प्रोत्साहन असल्याशिवाय ती प्रगति घडवून आणण्यास मदत करीत नाही. समाजवाद प्रगतिशील तर राहोच पण प्रगतिपराङमुख होईल अशी भीति वाटते,

कारण सुधारणेला विरोध करण्याची नोकरशाहीची प्रवृत्ति समाजवादांत प्रकर्षानें आढळण्याचा संभव आहे. कारण नियोजन म्हटले कीं नोकरशाही आलीच. त्यातूनहि समाजवाद प्रगतिशील ठरलाच तर बेकारी व्यापारचक्र हे दोष त्यात उद्भवणार; कारण हे दोष भांडवलशाहीचे नसून भांडवलशाहीत होणाऱ्या आर्थिक प्रगतीचे आहेत. साराश—स्वार्थी बुद्धीने प्रत्येक मनुष्य वागला तरी समाजहित साधेल असे मानण्याची स्मिथने चूक केली तर निःस्वार्थबुद्धीने मनुष्य वागल्यास समाजहित साधेल असे मानण्याची चूक समाजवादी करतात.

## नियंत्रित भांडवलशाहीचा पुरस्कार

भांडवलशाहीचे बरेचसे दोष भांडवलशाहीच्या मूलभूत वैशिष्ट्याशी खेळ केल्याने उद्भवतात असे भांडवलशाहीचा पुरस्कार करणाऱ्या पहिल्या गटातील अर्थशास्त्रज्ञाचे मत आहे. ह्याकरिता ते असे सुचवितात की, सरकारनें आपली किमान कामेच तेवढी करावीत व अनिर्बंध उत्पादनस्वातंत्र्याला पूर्ण वाव देऊन उत्पादनात खुली व निर्भेळ चढाओढ चालू शकेल अशा परिस्थितीचें पुनरुज्जीवन करावे. ह्यापलीकडे सरकारने आर्थिक व्यवस्थेत कोणतीहि ढवळाढवळ करू नये. भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांत निर्भेळ, अनियंत्रित भांडवलशाहीचा पाठपुरावा करणाऱ्या अर्थशास्त्रज्ञाची संख्या सध्या थोडी असून ती घटत चालली आहे. भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्या अशा बऱ्याच अर्थशास्त्रज्ञाना आता असे वाटू लागले आहे की, नेहमीची बेकारी व संपत्तीच्या विषम वाटणीमुळे बहुसंख्य वर्गाला वाटणारी कमालीची आर्थिक असुरक्षितता म्हणजे किमान गरजा भागविण्यासंबंधीची अशाश्वती—हे भांडवलशाहीचे दोष नाकारण्यात अर्थ नाही. ते दोष भांडवलशाहीच्या मूलभूत वैशिष्ट्याचे पुनःप्रस्थापन केल्याने नाहीसे होतील ह्या भ्रमात राहण्यात अर्थ नाही. त्यावर उत्तम उपाय म्हणजे ते दोष खरोखरच कां उद्भवतात ह्याचा तपास करून भांडवलशाहीचा सागाडा कायम ठेवून ते दोष कसे निवारतां येतील ह्याचा विचार झाला पाहिजे. ह्या त्यांच्या वाटण्याचा अर्थशास्त्रावर फारच इष्ट असा परिणाम झाला आहे. तो असा कीं, भांडवलशाहीत तत्कालीन अगर कायमच्या बेकारीसारख्या गोष्टी का उद्भवतात व त्या गोष्टी नाहींशा

करण्याचें भांडवलशाहीजवळ काहीं साधन आहे का ह्याची नव्या दमानें चर्चा अर्थशास्त्रात सुरू झाली आहे व ही चर्चा अद्यापहि थाबली आहे असे म्हणता येत नाही.

**लॉर्ड कीन्स**

वर उल्लेखिलेला आर्थिक विचार म्हणजेच भाडवलशाहीच्या पुरस्कर्त्या अर्थशास्त्रातील दुसऱ्या उपगटाचा विचार. ह्या विचाराचे धुरीण जॉन मायनार्ड कीन्स हे इंग्लिश अर्थशास्त्रज्ञ मानले जातात. कीन्स ह्यांचा आर्थिक विचार हा आजचा प्रमुख अर्थशास्त्रज्ञमान्य आर्थिक विचार होय. त्या दृष्टीने पहाता कीन्स ह्याना आधुनिक अर्थशास्त्राचे अध्वर्यु म्हणणें चूक ठरणार नाही. आजच्या अर्थशास्त्रातील कीन्स ह्यांचे स्थान किती वरचें आहे हे लक्षात घेता त्याच्याबद्दल थोडी अधिक माहिती करून देणें योग्य ठरेल.

कीन्स ह्यांचा जन्म १८८३ मध्ये झाला शाळेपासून त्याचा विशेष ओढा गणिताकडे होता. शाळेंत गणित विषयांत. जी बक्षिसें मिळवतां येण्याजोगी होतीं ती सर्व त्यानी मिळविली. शालेय शिक्षणानंतर त्यांनी केंब्रिज विद्यापीठात प्रवेश केला. तेथेंहि गणितातील प्रावीण्याबद्दल त्याना भरपूर प्रसिद्धि मिळाली. त्याशिवाय वक्तृत्वामुळे व सर्वांत मनमोकळेपणानें मिसळण्याच्या वृत्तीमुळेंहि त्यांना विद्यार्थिप्रियता लाभली. गणित विषय घेऊन अत्यंत सन्माननीय रीत्या ते पदवी परीक्षेंत उत्तीर्ण झाले, हें सांगावयास नकोच. पदवीपरीक्षेनतर सनदी नोकरांच्या परीक्षेला बसण्याचें त्यानी ठरविले त्या परीक्षेसाठी गणिताशिवाय राज्यशास्त्र, नीतिशास्त्र, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, तर्कशास्त्र, व अर्थशास्त्र हे विषय त्यांनी घेतले व त्या निमित्ताने त्याचा अर्थशास्त्राशी प्रथम परिचय झाला. अर्थशास्त्राची तयारी करण्यासाठी म्हणून त्यानी मार्शलची केंब्रिज विद्यापीठातील व्याख्याने ऐकलीं व त्या व्याख्यानामुळें अर्थशास्त्रात त्याना विशेष गोडी वाटूं लागली. तल्लख बुद्धीमुळे अर्थशास्त्र हा नवीन विषय असतांहि त्यांत त्यांनीं अल्पावधींत इतकी प्रगति केली की, त्यांच्या एका उत्तरावर मार्शलने "हें उत्तर फारच बुद्धिमत्तेचे निदर्शक आहे भावी आयुष्यांत तुम्ही अर्थशास्त्रज्ञ म्हणून चमकलांत तर मला आनंद होईल. निदान तुमचा भावी

धंदा अर्थशास्त्रातील प्रावीण्याचा भरपूर उपयोग होईल, असाच असेल अशी मी आशा बाळगतो" असा शेरा मारला. इतकी बुद्धिमत्ता असता सनदी नोकराच्या परीक्षेंत त्याचे यश सहजसुलभ ठरावें हे ओघानेच येते. १९०६ मध्ये ही परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर मोठ्या हुद्द्याच्या जागेवर ' इडिया ऑफिस ' मध्ये त्याची नेमणूक झाली. तेथें दोन वर्षेंच काम करून १९०८ मध्ये मार्शलच्या सल्ल्यावरून त्यानी केंब्रिज विद्यापीठात अर्थशास्त्राच्या अध्यापकाची जागा स्वीकारली. उत्कृष्ट शिक्षक व पट्टीचे अर्थशास्त्रज्ञ म्हणून त्याची कीर्ति लवकरच सर्वत्र पसरली. त्यामुळेंच १९११ मध्ये इंग्लंडमधील अर्थशास्त्राला वाहिलेल्या सुप्रसिद्ध त्रैमासिकाच्या सपादकाची जागा त्याना देण्यात आली. केंब्रिजमधील त्याचे अध्यापनाचे कार्य चालूच राहिले. केंब्रिज विद्यापीठात अध्यापक व इग्लडमधील प्रमुख अर्थशास्त्रीय त्रैमासिकाचा सपादक ह्या अर्थशास्त्रक्षेत्रातील अत्यत मोक्याच्या जागा होत. ह्या दोन्ही जागा दीर्घकालपर्यंत लाभण्याचा कीन्स ह्याना भरपूर फायदा झाला व त्यानीहि तो मोकळेपणे करून घेतला. ह्या जागावरून त्यानी आपले अर्थशास्त्रीय विचार जगापुढे प्रामुख्याने माडले. सरकारकडून अनेक समित्यावर त्याची नेमणूक होत असे. पहिल्या महायुद्धात तर सरकारने फडणिशी खात्यात सल्लागार म्हणून त्याची नेमणूक केली. १९१५ ते १९ ह्या काळात ते काम त्यानी केले. १९१९ मध्ये त्यानी राजिनामा दिला कारण जर्मनीवर लादण्यांत आलेल्या तहाच्या आर्थिक भागाबद्दल त्याचे व तत्कालीन सरकारचे पटले नाही. त्यानतर तत्काळ त्यानी लिहिलेले तहाचे आर्थिक परिणाम ( Economic Consequences of Peace ) हे पुस्तक त्यात उठविलेल्या सरकारवरील अत्यत शास्त्रीय टीकेच्या झोडीमुळे फारच गाजलें सामान्यतः १९२५ पर्यंतचे त्याचे आर्थिक विचार पाहिले तर मार्शलप्रणीत अर्थशास्त्र म्हणजे अर्थशास्त्रातील शेवटचा शब्द अशी त्याची समजून होती असें दिसते. १९२२ साली एका प्रस्तावनेत त्यानी असे लिहिले कीं, " धंदेवाईक अर्थशास्त्रज्ञाला अर्थशास्त्राचे सिद्धान्त उत्तम रीतीनें दुसऱ्यांना समजून देणे अगर त्याचा प्रत्यक्ष व्यवहारात उपयोग करावा ह्या हेतूने सत्यसंशोधन करणें ह्यापलीकडे कांही करावयाचे उरलें नाही. " ह्याचा अर्थ असा की, अर्थशास्त्राच्या स्वरूपात त्यापुढे कांहीं बदल

होईल असे त्यांना त्या वेळी वाटत नव्हतें; पण थोडक्याच अवधीत त्यांच्या विचारात क्रान्ति झाली आणि नवीन स्वरूपांतील अर्थशास्त्राचे प्रवर्तक ह्या नात्याने कीन्ससाहेब जगापुढे उभे राहिले. १९३० मधील पैसा ह्या सस्थेवरील त्याच्या महाप्रबधात (Treatise on Money) त्यांचे नवे स्वरूप फारसें व्यक्त झाले नाही; पण मधल्या मदीमुळेच की काय त्यांच्या क्रान्तिकारक स्वरूपास अधिक चालना मिळाली व १९३६ साली एका ग्रथाने (General Theory of Interest, Employment and Money) त्यानी नवीन स्वरूपांतील भांडवलशाही अर्थशास्त्राची प्रस्थापना केली. दुसऱ्या महायुद्धातहि सरकारनें त्यांची खूप मदत घेतली. १९४७ मध्यें ते निधन पावले.

### कीन्स ह्यांचा आर्थिक विचार

कीन्स ह्याच्या आर्थिक विचारात व्याजाचा दर कसा ठरतो ह्या-सबंधीचे मध्यवर्ती विवेचन महत्त्वाचे आहे. त्याच्या मते व्याजाचा दर व प्रत्यक्ष भाडवलाची मागणी व पुरवठा ह्याचा परस्पर सबध काही नसून पैसारूपी भाडवलाचा पुरवठा व मागणी ह्याच्याशी व्याजाच्या दराचा संबध जोडला पाहिजे. पैसारूपी भाडवलाकरिता असलेली मागणी त्या पैशाचें प्रत्यक्ष भाडवलात रूपान्तर करून ते भाडवल उत्पादनात गुतविल्याने जो फायदा सुटतो त्यावर अवलबून असते. ह्या फायद्यापेक्षा जास्त व्याज द्यावयास उद्योगपति तयार नसतात. मागणीच्या बाजूचें कीन्सने केलेले विवेचन परपरागत अर्थशास्त्रातील विवेचनापेक्षा भिन्न नाही हें दिसून येईलच. कीन्सच्या विवेचनाचे वैशिष्टच पुरवठ्याच्या बाजूत आहे त्याच्या मते भाडवलाचा पुरवठा लोक किती पैसा कर्जाऊ देऊं इच्छितात व कोणत्या दराने कर्जाऊ देऊं इच्छितात ह्यावर अवलबून असतो. पुरवठा करणारे किती पैसा कर्जाऊ देऊ इच्छितात हे त्याना रोख पैशाची —म्हणजे तो जवळ असण्याची—कितपत गरज भासते ह्यावर अवलबून असते. आपल्या गरजेपुरता रोख पैसा जवळ ठेवून बाकीचा पैसा कर्जाऊ देण्यास लोकाची तयारी असते. अर्थात् कर्जाऊ दिलेल्या पैशांवर व्याज मिळावें अशी त्याची अपेक्षा असते. ह्या अपेक्षेची मर्यादा रोख पैसा जवळ असण्याचें ज्याला त्याला जे महत्त्व वाटतें त्यावर अवलंबून असते. कर्जाऊ पैसा दिला नसता तर तो लोकांजवळ रोख राहिला असता तो कर्जाऊ दिल्याने रोख

पसा जवळ असण्याचे फायदे बुडवावे लागतात. ह्या फायद्याचे लोकाना जें महत्त्व वाटते त्यावर व्याजाची अपेक्षा अवलंबून असते. सामान्यत. असें म्हणता येईल की, जितकी जवळ रोख रक्कम जास्त तितके तिचे महत्त्व कमी. कारण वेळप्रसगी जरूर पडण्याचे रोख पैशाचे जे प्रमुख कार्य ते कार्य सुकररीत्या व्हावयास विशिष्ट मर्यादेपर्यंतच रोख पैसा जवळ असणे इष्ट असते. ती मर्यादा एकदा ओलाडली की रोख पैशाचे महत्त्व कमी कमी होऊ लागते.

लोकाजवळ एकूण रोख पैसा किती असू शकतो ? ह्या प्रश्नाचे उत्तर असे कीं, सरकारने जेवढा पैसा काढला असेल तेवढाच रोख पैसा लोकां-जवळ---म्हणजे कोणा-ना-कोणाच्या तरी खिशात--असू शकतो. सरकारने काढलेला एकुण पैसा जेवढा असेल तेवढाच पैसा रोख पैसा म्हणून जवळ ठेवावासा वाटावा, असे जो व्याजाचा दर असता लोकास वाटते तोच व्याजाचा दर ठरला जातो. सरकारने काढलेला पैसा कोणत्या-ना-कोणत्या कारणाने कमी झाला की लोकाजवळील रोख पैसा कमी होऊन रोखीचें महत्त्व वाढतें व व्याजाचा दरहि वाढतो. ह्याच्या उलट देशातील पैसा वाढला म्हणजे लोकाजवळील रोख रक्कम वाढते व त्याचबरोबर रोखीचें महत्त्व कमी होते; अर्थातच व्याजाचा दर कमी होतो. अशा प्रकारे व्याजाचा दर देशात एकण पैसा किती आहे ह्यावर अवलबून असतो.

**व्याजाचा दर व रोजगारी ह्यांचा संबध**

एका बाजूला पैशाचा पुरवठा व दुसऱ्या बाजने रोखीचे महत्त्व ह्याच्या सघर्षामुळे ठरलेल्या व्याजाच्या दराला कीन्ससाहेबाच्या मजुरां-करिता असणारी मागणी कशी ठरली जाते ह्यासबधीच्या विवेचनांत प्रमुख स्थान आहे. कारण त्याना असे वाटते की, प्रचलित व्याजाचा दर लक्षात घेऊन जेवढी भाडवलाची गुतवण फायदेशीर ठरते---म्हणजे त्यापासून सुटणारा फायदा प्रचलित व्याजाच्या दरापेक्षां अधिक असतो---तेवढेंच भांडवल उत्पादनात गुतवलें जातें. गुतवलेल्या भाडवलापासून होणाऱ्या उत्पा-दनासाठी जेवढे मजूर लागतात तेवढ्याना आर्थिक व्यवस्थेत काम मिळतें. कोणत्याहि क्षणी बेकारी अजिबात शिल्लक राहाणार नाही इतकें भांडवल उत्पादनांत गुंतवले जाईल ह्याची मुळीच शाश्वति नाही.

कोणत्याहि क्षणी उत्पादनार्थ लागणाऱ्या मजुराची संख्या जेव्हा काम मिळवू इच्छिणाऱ्याच्या संख्येपेक्षा कमी असेल तेव्हा बेकारी निर्माण होते. ही बेकारी मजुरानी स्वखुषीनें मजुरी कमी करून घेतली अगर अन्य उपायानी ती कमी केली गेली तर नष्ट होईल ही सनातनवादी अगर नवसनातनवादी समजूत कोन्स ह्याच्या मते बरोबर नाही. "बेकारी असते याचें कारण मजुराना पुरेशी मागणी नसते म्हणून. मजुराकरिता पुरेशी मागणी नसते ती पुरेशी मागणी निर्माण होण्याइतकी भाडवलाची गुंतवण होत नाही म्हणून. भाडवलाची गुंतवण पुरेशी होत नाही तो जरूर ती भाडवलाची गुंतवण होण्यास अनुकूल असा व्याजाचा दर नसतो म्हणजे वाजवी दरापेक्षा तो जास्त असतो म्हणून." अशी ही कीन्सकृत बेकारीची मीमासा आहे. ह्या मीमामेत बेकारीचा संबंध व्याजाच्या दराशीं जोडण्यात आला आहे.

**बेकारी नाहींशी करणे सरकारला सहज शक्य**

बेकारीचा संबंध व्याजाच्या दराशी जोडणे व व्याजाच्या दराचा संबंध पैशाच्या पुरवठ्याशी जोडणे ह्याचा अर्थ अगदी स्पष्ट आहे. ह्याचा अर्थ असा की बेकारी नाहीशी करणें सरकारला सहज शक्य आहे. पैशाचा पुरवठा ही आर्थिक व्यवस्थेतील—भाडवलशाही आर्थिक व्यवस्थेतील देखील—सरकारनियंत्रित बाब आहे. त्यामुळे सरकारला अशा रीतीने पैशाचा पुरवठा नियंत्रित करण्यास अडचण पडू नये की, त्यामुळे व्याजाचा इष्ट असा दर—म्हणजे जो दर असता बेकारी अजिबात नसण्याइतकी भाडवलाची गुंतवण होऊ शकेल असा दर—प्रस्थापित व्हावा. साराश, योग्य असे आर्थिक धोरण सरकारने ठेवल्यास व त्या धोरणाचा प्रमुख भाग म्हणून व्याजाच्या दरावर लक्ष ठेवल्यास भाडवलशाहीतहि बेकारीविरहित आर्थिक व्यवस्था निर्माण करणे शक्य आहे" असा कीन्ससाहेबाच्या विवेचनाचा आशय होता. त्याच्या विवेचनात जी आर्थिक व्यवस्था अभिप्रेत आहे त्याला नियंत्रित भाडवलशाही असे म्हणण्यास हरकत नाही. भाडवलशाहीची चौकट कायम ठेवूनहि केवळ पैसा ह्या संस्थेवरील नियंत्रण करण्याची सत्ता सरकारकडून दूरदर्शीपणे वापरण्यात आली तर भांडवलशाहीतील प्रमुख दोष—बेकारी—नष्ट करता येईल. त्यासाठी व त्यापुरते भाडवशाहीचे नियंत्रण करण्यास हरकत नाही एवढे कीन्सच्या विवेचनांत सामावलेलें आहे.

**संपत्तीची समान वांटणी उपकारकच**

बेकारीची मीमासा करण्याच्या ओघात कीन्स ह्यांनी आणखी एक विचार मांडला. तो असा की संपत्तीचे उत्पादन जसे वाढते तसा सपत्तीचा उपभोग वाढत नाही. कारण वाढत्या सपत्तीबरोबर उपभोगप्रवृत्ति (Propensity to Consume) कमी होत जाते उपभोगप्रवृत्ति कमी झाली की संपत्तीची बचत वाढते. ती जितकी वाढते तितका भाडवलाच्या गुतवणीचा प्रश्न बिकट होतो. कारण बचत वाढून एका बाजूने भाडवलाचा पुरवठा वाढतो तर दुसऱ्या बाजूने उपभोग कमी झाल्याने उत्पादनाचा किफायतशीरपणा कमी होतो अर्थातच उत्पादन कमी होऊन बेकारी वाढावी असा प्रवाह आर्थिक व्यवस्थेत निर्माण होतो. तो धोका टाळावयाचा असल्यास सरकारला अधिकच जागरूक रहावे लागते. तशी वेळ न येऊं देण्यासाठी संपत्तीची समान वाटणी हा एक उत्तम उपाय आहे. सपत्तीची समान वाटणी केल्याने उपभोग वाढतो. कारण ज्याची उपभोगप्रवृत्ति कमी झालेली असते अशाकडून ज्यांना उपभोग वाढवणे शक्य असते अशाकडे येते. अशा प्रकारे सपत्तीची विषम वाटणी ह्या भाडवलशाहीच्या प्रमुख दोषाचें निराकरण सुसपन्न भाडवलशाही राष्ट्राला उपकारकच ठरते.

**सामाजिक सुरक्षितता**

प्रचलित आर्थिक व्यवस्थेंत कायमची असणारी आणि मधूनमधून तीव्र स्वरूप धारण करणारी बेकारी हा जितका गंभीर दोष आहे तितकाच आणखी एक गंभीर दोष आहे. तो दोष म्हणजे बहुसख्य लोकांना वाटणारी कमालीची आर्थिक असुरक्षितता ( Economic Insecurity ). आर्थिक सुरक्षितता ह्याचा अर्थ आपल्या किमान गरजा तरी आयुष्यांत निश्चित व नेहमीच भागतील ह्यासबधी वाटणारी खात्री. प्रचलित आर्थिक व्यवस्थेंत अशी खात्री बहुसख्य लोकांना वाटत नाही. कारण नेहमीच हातावर पोट अशी त्याची परिस्थिति असते. बेकारी ज्यायोगे नष्ट होईल असें आर्थिक धोरण जरी सरकारने स्वीकारलें तरी ज्यांना नोकरी आहे--पण ज्याचे पोट सदैव हातावर आहे--त्याना आर्थिक सुरक्षितता लाभूं शकत नाही. कारण प्रत्येक व्यक्तीच्या जीवनांत अशा काही वेळा असतातच की त्या वेळी व्यक्ति आपल्या श्रमाने आपली उपजीविका करूं शकत नाही. त्या वेळी त्या व्यक्तीला

इतरावरच अवलंबून रहावें लागतें. अशा वेळापैकी प्रमुख म्हणजे बाल्यावस्था, वृद्धावस्था व आजारीपणा. ह्याशिवाय कुटुंबपोषणाची जबाबदारी ज्याच्यावर आहे त्या कर्त्या पुरुषाच्या अकालीं मृत्यूमळें अगर औद्योगिक अपघातामुळे त्याला प्राप्त होणाऱ्या कायमच्या अपघातामुळे कुटुंबच्या कुटुंब उघड्यावर पडल्यामुळे त्यातील सर्वांना प्राप्त होणारे परावलम्बित्व निराळेच. जन्मापासून आंधळे, बहिरे अगर मुके व पगू असल्यामुळे काहीं व्यक्तींना जन्मभर इतरावर अवलबून राहावे लागते; ह्याचाहि ह्या ठिकाणी उल्लेख केला पाहिजे व्यक्तीवर परावलबित्वाचा जेव्हा प्रसग ओढवेल तेव्हा व्यक्तीच्या पालनपोषणाची जबाबदारी समाजाने उचलली पाहिजे, हा विचार नवा नाही. सयुक्त कुटुबीयसस्थेमध्ये हेच तत्त्व प्रमुखतः आहे. निरनिराळ्या धर्मग्रंथात हाच उपदेश आहे की दयचा ओघ असहायाकडे वळवा. आपत्काली व्यक्तीला समाजाने सहाय्य करावे. हा विचार आजच्या अर्थशास्त्रात नव्या स्वरूपात अवतीर्ण झाला असून त्याला सामाजिक सुरक्षितता म्हणजे समाजाकडून व्यक्तीला मिळवून देण्यात आलेली आर्थिक सुरक्षितता असे नाव लाभले आहे. नव्या स्वरूपातील सामाजिक सुरक्षिततेची दोन वैशिष्टये आहेत. पहिले असे की आर्थिक सुरक्षितता लाभून भूकमुक्तता व्यक्तीला आयुष्यात सदैव लाभेल अशी व्यवस्था समाजाने करणे. ही म्हणजे व्यक्तीवर समाजाने केलेली कृपा नसून तो व्यक्तीचा हक्क आणि ते समाजाचे कर्तव्य आहे अशी कल्पना त्यात मान्य झाली आहे. दुसरे वैशिष्टच असे की, व्यक्तीला आर्थिक सुरक्षितता मिळवून देण्याची जबाबदारी सरकारनेच उचलली पाहिजे, होहि कल्पना त्यात आहे.

सामाजिक सुरक्षिततेची नव्या स्वरूपातील कल्पना भाडवलशाहीचे नियत्रण करून तिच्यातील प्रमुख दोष घालविणे शक्य आहे अशी भावना असणाऱ्या काही अर्थशास्त्रज्ञानी अत्यत निष्ठेने उचलून धरली आहे. व्यक्तीला आर्थिक सुरक्षितता कोणकोणत्या मार्गांनी उपलब्ध करून देतां येईल, व्यक्तीला कोणकोणत्या प्रसगात समाजाच्या मदतीची गरज भासते, ह्यासंबधी विचारयोजना करण्यांत ते मग्न आहेत. त्याच्या तपशिलाशीं आपल्याला कांहीच कर्तव्य नाही; पण त्याच्या विचारयोजनांतील मुख्य गोष्ट ही की, भांडवलाची चौकट जशीच्या तशी कायम ठेवून केवळ सरकारनें

योग्य आर्थिक धोरण स्वीकारल्याने व्यक्तीला आर्थिक सुरक्षितता लाभूं शकेल असें त्यांना वाटतें. त्यांच्या मनांत असलेले योग्य आर्थिक धोरण सरकारची अर्थव्यवस्था ह्या अर्थशास्त्राच्या विभागात पडते ते धोरण म्हणजे संपत्तीत लोळत पडल्यामुळें ज्याना जीवनात कमालीची आर्थिक सुरक्षितता लाभली आहे त्याच्याकडून प्राधान्ये करून कररूपाने पैसा वसूल करून तो ज्याची मिळकत जीवनाच्या किमान गरजा भागविण्यासहि अपुरी आहे, त्यांच्यावर खर्च करून त्याना आपल्या किमान गरजा भागविण्याची संधि द्यावयाची. तसेच त्याना त्याच्या आपत्काली—म्हणजे त्याना आपल्या चरितार्थासाठी जरूर ते श्रम करण्याची कुवत नसते त्या वेळी—त्याच्या गरजा भागवावयाच्या. अशा रीतीने त्याना आर्थिक सुरक्षितता प्राप्त करून द्यावयाची. हे धोरण व त्याचबरोबर बेकारी नष्ट करावयाचें आर्थिक धोरण सरकारने स्वीकारल्यास भांडवलशाहीचे दोन ठळक दोष—बेकारी व आर्थिक विषमतेमुळे निर्माण होणारी आर्थिक असुरक्षितता—नाहीसे होऊन भांडवलशाहीबद्दल तक्रार करण्यास कोणास जागा रहाणार नाही असा त्याना विश्वास वाटतो.

**गांधीवादी आर्थिक विचार**

भांडवलशाही आर्थिक व्यवस्था की समाजवादी आर्थिक व्यवस्था ह्याचा वाद चालू असता वैयक्तिक फायदा हेच उद्दिष्ट मानणारी भांडवलशाहीहि नको व सगळ्याचेच राष्ट्रीयीकरण करून आर्थिक स्वातंत्र्याचे अपहरण करणारा व अनैसर्गिक अशी आर्थिक समता प्रस्थापित करणारा समाजवादहि नको असे म्हणणारा एक पंथ काही विचारवंताची मने काबीज करू पहात आहे. तो पंथ गांधीवादी अर्थशास्त्राचा पुरस्कार करणाऱ्याचा. आपल्या गरजा शक्य तेवढ्या कमी करावयाच्या व यंत्राचा उपयोग केल्याशिवाय म्हणजे मानवी श्रमावरच मुख्यत: विसंबून त्या भागवावयाच्या ही गांधीजींनी पुरस्कारिलेल्या आर्थिक व्यवस्थेची प्रमुख दोन वैशिष्टये आहेत.

अर्थशास्त्राच्या चष्म्यातून गांधीप्रणीत आर्थिक व्यवस्थेकडे पाहिले असता असें दिसून येते की, अमर्याद गरजा व मर्यादित साधने ह्यामुळे निर्माण होणाऱ्या आर्थिक प्रश्न सोडविण्याच्या दोन मार्गापैकी दुसरा मार्ग गांधीजींनी पसंत केला आहे. आर्थिक प्रश्न सोडविण्याचे दोन मार्ग; पैकीं

पहिला मार्ग म्हणजे अमर्याद गरजा जास्तीत जास्त प्रमाणात भागविण्या-साठी साधनाची उत्पादनशक्ति जास्तीत जास्त वाढविण्यासाठी परा-काष्ठेचा प्रयत्न करावयाचा—भांडवलशाहीने हाच मार्ग अवलंबिला. समाजवादालाहि हा मार्ग पसत आहे. फरक एवढाच की हा मार्ग अवलबिताना इतराचे काहीहि होवो; स्वत च्या गरजा जास्तीत जास्त भागल्या पाहिजेत ह्या व्यक्तीच्या स्वार्थी भावनेला उत्तेजित करावयास पाहिजे, असें भांडवलशाही म्हणते ह्याच्या उलट उत्पादनाच्या साधना-वर सर्व समाजाची मालकी असल्यानें गरजा भागण्याच्या बाबतीत कांही व्यक्तीची मिरासदारी न राहता वाढत्या उत्पादनशक्तीचा फायदा सर्वांनाच मिळू शकेल; व तसा तो मिळाला पाहिजे असे समाजवादाला वाटते. साधनाची उत्पादनशक्ति वाढविण्याच्या बाबतीत दोहोचे एकमत आहे. आर्थिक प्रश्न सोडविण्याचा दुसरा मार्ग म्हणजे गरजाच कमी करणे आर्थिक प्रश्न सोडविण्याचा दुसरा मार्ग अवलबिल्यास साधनाची उत्पादन-शक्ति वाढविण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. हा मार्ग अवलबिल्यास व्यक्तीला समाधान व स्वातत्र्य ही दोन्ही लाभतील असा गाधीवादाचा प्रामाणिक विश्वास आहे. साधनाची उत्पादनशक्ति वाढविण्याच्या उद्योगाला मनुष्य एकदा लागला की, समाधान व स्वातत्र्य ही दोन्ही तो घालवून बसतो, असे गांधीजीना वाटत असे. साधनाची उत्पादनशक्ति वाढविण्याच्या उद्योगात माणसाला समाधान मिळत नाही. कारण साधनाची उत्पादनशक्ति कितीहि वाढविली तरी अमर्याद गरजा अमर्यादच राहातात. त्याच्या मागे लाग-लेल्या मनुष्याला त्याचा हव्यास अधिकाधिक वाटू लागतो. त्या हव्यासातच असमाधानाची बीजे असतात भांडवलशाहीत तर हव्यासातून उद्‌भवलेल्या असमाधानाबरोबर इतरहि अनेक वाईट गोष्टी येतात. गरजा भागविण्याच्या बाबतीत वैयक्तिक स्पर्धा सुरू झाली म्हणजे तिचे स्वरूप नेहमीच आरोग्य-प्रद असेल असे नाही. नव्हे तें तसे नसतेच! वैयक्तिक स्पर्धेवर विसबणाऱ्या आर्थिक व्यवस्थेंत आर्थिक समता असणेंच अशक्य. आर्थिक विषमतेबरोबर परस्पर सघर्ष इत्यादि गोष्टी आल्याच. समाजवादी आर्थिक व्यवस्थेत ह्यांतील कांहीं दोष नसले तरी असमाधान पूर्णपणें नष्ट होणें शक्य नाही. कारण समाजवादसुद्धां साधनांची उत्पादनशक्ति वाढविणें हें साध्य मानतो.

साधनांची उत्पादनशक्ति वाढविण्याचा हव्यास धरलेल्या मनुष्याला आर्थिक स्वातंत्र्य गमवावे लागते. कारण आतांपर्यतचा अनुभव असा आहे की, उत्पादनाचे प्रमाण अजस्त्र झाल्याशिवाय व श्रमविभागाचे तत्त्व आत्यतिकतेच्या शिगेला पोहोचल्याशिवाय साधनाची उत्पादनशक्ति वाढत नाही. मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाबरोबर सत्तेचे केंद्रीकरण अपरिहार्य होते. नियोजनात्मक आर्थिक व्यवस्था तर केन्द्रीकरणाशिवाय व्यवहार्यच होत नाही. श्रमविभागणीवर आधारलेल्या मोठ्या प्रमाणावरील यांत्रिक उत्पादनाने आर्थिक व्यवस्थेलाच एक प्रकारे एका अजस्त्र यंत्राचे स्वरूप येते. मनुष्याला त्या यंत्रातल्या एका बारीकातल्या बारीक खिळ्याची अवस्था प्राप्त होते. पराकाष्ठेचे परावलंबित्व हा त्याचा जीवनाचा क्रम होतो ह्या परिस्थितीत त्याचे स्वातंत्र्य कोठल्या कोठें लुप्त होते ह्याचा पत्तासुद्धा लागत नाही. साधनांची उत्पादनशक्ति वाढविण्याच्या हव्यासांतून निपजणाऱ्या असमाधानावर व पारतंत्र्यावर उत्तम तोडगा म्हणजे गरजानाच मर्यादा घालणे होय. मर्यादा अशा प्रकारे घालव्या की, प्रत्येक व्यक्तीला स्वश्रमाने आपल्या गरजा पुऱ्या करता यतील. गांधीवादी अर्थशास्त्राचे थोडक्यात सार हे असें आहे. त्या अर्थशास्त्रात श्रमविभागणी, मोठ्या प्रमाणावर उत्पादनयंत्रे, अजस्त्र उद्योगधंद्याचे स्थानीकरण ह्या साधनाच्या उत्पादनशक्तीला थारा नाही. स्पर्धा, नफ्याचा हव्यास, मक्तेदारी ह्याना वाव नाही. आर्थिक समता आहे की विषमता आहे, ह्याची फारशी पर्वा नाही. संप, संघर्ष, वर्गकलह, इत्यादि कल्पनाचें वारेसुद्धा नाही गांधीवाद भांडवलशाहीला जवळचा की समाजवादाला जवळ ह्याचें निश्चित उत्तर हें की, गांधीवादी अर्थशास्त्राचे दोहोंपैकी कोणाशीहि साम्य नाही. भांडवलशाहीचे आणि गांधीवादी अर्थशास्त्राचे जवळचे नाते नाही हे उघडच आहे. कारण वैयक्तिक नफ्याचा हव्यास हा भांडवलशाहीचा आत्मा तर गांधीवादाला नेमके त्याचेच वावडे! समाजवादाचें गांधीवादाशी त्यातल्या त्यात निकटचे नाते आहे. असा समज करून घेणारे हे विसरतात की, समाजवादाचे ध्येय व कार्यपद्धति आणि गांधीवादाचे ध्येय व कार्यपद्धति ही मूलत:च भिन्न आहेत. गांधीवादी आर्थिक व्यवस्थेत भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेपेक्षा अधिक आर्थिक समता असेल, पण ती आर्थिक व्यवस्थेचे ध्येय म्हणून नव्हे; तर गरजांच्या विस्तारावर

घातलेल्या बंधनाचा केवळ एक परिणाम म्हणून. गाधीवाद म्हणजेच समाजवाद किंवा गाधीवादाचा व समाजवादाचा समन्वय करता येईल ही समजूत भोळसट आहे.

**गांधीवादी अर्थशास्त्रावरील दोन महत्त्वाचे आक्षेप**

गाधीवादी अर्थशास्त्रावर विचार केला तर असें दिसून येईल की त्या अर्थशास्त्राच्या विचारप्रणालीत नवीन असे कांही नाही. सुसस्कृत मनाला जिचा उबग येईल अशी परिस्थिति भांडवलशाहीनें निर्माण केल्यापासून साधनाची उत्पादनशक्ति वाढविण्यास हव्यासाला राम राम ठोकावा व यांत्रिक युग सुरू होण्यापूर्वीची आर्थिक व्यवस्थाच पुन्हा स्वीकारावी, असे विचार अनक वेळा व्यक्त करण्यात आले आहेत. त्या विचाराची सुधारलेली आवृत्ति म्हणजेच गाधीवादी अर्थशास्त्र. सुधारलेली अशा अर्थाने की, त्या विचाराला निश्चित अशा तत्त्वज्ञानाची बैठक देण्याचे व त्या विचाराची सुसंगत अशी माडणी करण्याचे कार्य गाधीवादी अर्थशास्त्राने केले आहे.

गाधीवादी अर्थशास्त्रावर दोन महत्त्वाचे आक्षेप घेण्यांस आले आहेत. पहिला आक्षेप असा की, ते अर्थशास्त्र पराभूत मनोवृत्तीचे द्योतक आहे. आर्थिक प्रश्नाला धिटाईने तोड देण्यापेक्षा तो टाळण्याकडे गाधीवादाचा कल आहे साधनाची उत्पादनशक्ति वाढवूनहि भाडवलशाहीत त्या शक्तीचा होणारा विचका टाळता येणारच नाहीं, अशी समाजवाद्यांच्या मते निराधार असलेली अकारण भीति त्यात आहे. दुसरा आक्षेप असा कीं, साधनाची उत्पादनशक्ति वाढवू नये असें आतां कितीहि वाटले तरी आतां त्याचा उपयोग नाही. कारण सध्यां वाढलेली शक्तीच इतकी आहे की ती गांधीवादी अर्थशास्त्राच्या पचनशक्तीची सीमा तिनें केव्हाच ओलाडली आहे. गाधीवादी अर्थशास्त्र व्यवहारतेच्या कक्षेत आणावयाचे असल्यास त्या शक्तीचा संहारच करावयास हवा. असा संहार करणें इष्ट आहे काय ? तो इष्ट आहे असें ठरण्यापूर्वी तें जरूर आहे त्याशिवाय चालावयाचेंच नाही, असें हडसून खडसून सिद्ध झालें पाहिजे. गांधीवादानें तें सिद्ध केलें आहे असें म्हणता येत नाहीं. शिवाय वाढलेल्या शक्तीचा संहार करणें इतिहासाला मागें ओढण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे. असे प्रयत्न कधींच यशस्वी होत

नाहीत हा अनुभव आहे. असो. गांधीवादी अर्थशास्त्राचे विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. अर्थशास्त्रीय विचाराची ती एक दिशा आहे एवढे लक्षात घेतले की पुरे.

**आजचा समाजवादी आर्थिक विचार**

भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्या अर्थशास्त्रज्ञानी समाजवादाचे दोष दिग्दर्शित करण्याचा जो नवा पवित्रा धारण केला आहे त्याचा समाजवादी अर्थशास्त्रावर अनुकूल असाच परिणाम झाला आहे. समाजवादी आर्थिक व्यवस्थेवर जी टीका होत आहे ती टीका समाजवादी अर्थशास्त्रज्ञाना खचित विचार करावयास लावणारी ठरली आहे. त्या टीकेला उत्तर देण्याची जबाबदारी समाजवादी नियोजन हीच इष्ट अशी आर्थिक व्यवस्था आहे असें मानणाऱ्या अर्थशास्त्रज्ञावर पडली आहे व समाधानाची गोष्ट अशी की, ती जबाबदारी टाळण्याचा अजिबात प्रयत्न न करता समाजवादाची इष्टता बुद्धिवादाचा कस लावून सिद्ध करण्याचा खटाटोप आजचे अर्थशास्त्रज्ञ करीत आहेत व बऱ्याच प्रमाणात त्याना यशहि मिळाले आहे समाजवादाच्या तथाकथित दोषाना समाजवाद्याचें उत्तर काय आहे हे समजून घेण्यापूर्वी हे स्पष्ट केले पाहिजे की कीन्स याच्या धुरीणत्वाखाली मान्यता मिळालेल्या नियंत्रित भांडवलशाहीच्या अर्थशास्त्राविषयी आजच्या समाजवादी अर्थशास्त्रज्ञाना फारशी सहानुभूति वाटत नाही. नियंत्रित भांडवलशाहीने भांडवलशाहीचे दोष नाहीसे होणार नाहीत असे त्याना वाटते; ह्याचे कारण कीन्सचा आर्थिक विचार संपूर्णतया चुकीचा आहे असे नसून तो आर्थिक विचार अमलात आणण्याची जबाबदारी ज्या राज्यसंस्थेकडे आहे ती राज्यसंस्था भांडवलशाहीत स्वतंत्र व निःपक्षपाती नसते हे आहे. भांडवलशाहीत, मग ती नियंत्रित भांडवलशाही असो अगर अनियंत्रित असो. शासनसंस्थेवर एका विशिष्ट वर्गाचाच ताबा असतो व त्या वर्गाकडून भांडवलशाहीच्या कारभारावर घातलेली नियंत्रणें विशिष्ट मर्यादेपलीकडे जाणार नाहीत अशी खबरदारी अवश्य घेतली जाते. सारांश, भांडवलशाहीचा साचा कायम ठेवून समाजवादाचे फायदे पदरांत पडतील अशी अपेक्षा करणें धाडसाचें होईल. दोन परस्परविरोधी गोष्टी फार काळ संघर्ष झाल्याशिवाय एकत्र राहूं शकतील ह्या भ्रमांत राहणें निखालस

वेडेपणाचें होईल असा स्पष्ट इषारा आजचे समाजवादी अर्थशास्त्रज्ञ देऊं इच्छितात.

नियत्रित भाडवलशाहीचे वैफल्य पटवून देणे समाजवादी अर्थशास्त्रज्ञाना कठीण जात नसले तरी भाडवलशाही-पुरस्कर्त्या समर्थ अर्थशास्त्रज्ञानी समाजवाद तरी दोषरहित कुठे आहे ते दाखवा असे एक प्रकारचें जें आव्हान दिले आहे ते आव्हान स्वीकारण्याची कामगिरी मात्र बरीच जड आहे मात्र ते आव्हान स्वीकारले गेले असून आर्थिक स्वातत्र्य, गरजाचे मूल्यमापन ह्या गोष्टीना समाजवादी अर्थव्यवस्थेमळे कोणताहि बाध येत नाही हे सिद्ध करण्यात आजचे समाजवादी अर्थशास्त्रज्ञ गुतलेले आहेत. समाजवादी आर्थिक व्यवस्था कशी चालेल ह्याचे विवेचन करण्याचे जे प्रयत्न आज चालू आहेत त्यामध्यें बार्बारा वूटन, डिकिन्सन, मॉरिस डॉब, लॉजे व पॉल स्वीझी ह्या समाजवादी अर्थशास्त्रज्ञाचा विशेष उल्लेख केला पाहिजे. त्यानी समाजवादातर्फे जी कैफियत पुढे मांडली आहे ती आता थोडक्यांत पाहू.

**बाजार ही संस्था समाजवादांतहि टिकवितां येईल**

बाजार ह्या संस्थेचे मार्गदर्शन समाजवादाला लाभणार नाही आणि म्हणून गरजांचे व साधनांचे मूल्यमापन समाजवादाला करितां येणार नांहीं ह्या समजुतीवर समाजवादी आर्थिक व्यवस्थेवरील मैझेस प्रभृत्तीचा हल्ला आधारलेला होता. पण ह्या समजुतीत कांही अर्थ नाही असे आजचे समाजवादी लेखक दाखवून देत आहेत. समाजवादी आर्थिक व्यवस्थेत उपभोग्य वस्तूचा बाजार चालू ठेवण्यास कोणतीच हरकत नाही असें दाखविण्याचा पहिला प्रयत्न १९२८ साली टेलर ह्या अमेरिकेतील दिवगत अर्थशास्त्रज्ञाने केला. टेलर ह्यानी असें प्रतिपादिले कीं, उत्पादन घटकांची निरनिराळ्या क्षेत्रांत वांटणी करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे उपभोग्य वस्तूच्या बाबतीत बाजार ही संस्था चालूं ठेवणें व व्यक्तीला आपलें उत्पन्न हव्या त्या वस्तूवर खर्च करूं देणे. हा मार्ग अनुसरण्यास समाजवादी आर्थिक व्यवस्थेला कोणतीच हरकत नाही. हा मार्ग अनुसरण्याचें समाजवादी आर्थिक व्यवस्थेनें ठरविल्यास ज्या वस्तूचा उत्पादनखर्च भरून येईल अशाच उपभोग्य वस्तूचें उत्पादन त्या आर्थिक व्यवस्थेला करावे लागेल.

त्यासाठी अर्थातच उत्पादनघटकाचे मूल्य ठरवावें लागते. हे ठरविण्या-साठीं टेलर ह्यांच्या मतें प्रयोगपद्धतीचा अवलंब करावा लागतो. जम-विलेल्या माहितीचा लक्षपूर्वक अभ्यास करून प्रथम नियोजनसमितीकडून घटकाच्या किमती ढोबळ मानानें ठरविल्या जातील. अनुभवानें त्यांत बदल केला जाईल. चुका झाल्या तर त्या तावडतोब दृष्टोत्पत्तीस येतील. मुळांत ठरलेली किमत फार असेल तर घटकांचा पुरवठा जरुरीपेक्षा जास्त आहे असें आढळेल अन्य पक्षी घटकांची टंचाई भासेल. असे कांहीं झाल्यास घटकमूल्य बदलावें लागेल. असें करता करतां जे मूल्य असता घटकाच्या बाबतीत मागणी-पुरवठा ज्यामुळें सारखा होतो असे मूल्य आढळेल, ते मूल्य जमेला घेऊन उत्पादनखर्चाइतकी किमत आली तरच एखादी वस्तु उत्पादित करावयाची, असें उत्पादनास जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्यांनी ठरविल्यास समाजवादातहि घटकांचा योग्य प्रकारे उपयोग केला जाईल, असा टेलर यानी निर्वाळा दिला.

**बाजार ही संस्था समाजवादांत अधिक कार्यक्षम**

टेलर ह्याचे विवेचन १९३७ साली ‘समाजवादाचें अर्थशास्त्र’ ह्या शीर्षकाखाली लिहिलेल्या एका लेखात डॉ. ऑस्कर लॉंगे ह्यानी पुढे नेले त्यानीं असे दाखविलें की उपभोग्य वस्तूंच्या बाबतीत व स्वतःच्या धंद्याची निवड करण्याच्या बाबतीत व्यक्तीस समाजवादालाहि स्वातंत्र्य द्यावें लागेल. उपभोगाच्या वस्तूंना आकारावयाच्या व मजुराना द्यावयाच्या किमती नियोजन समिति ठरवील. समाजवादांत यंत्रासारख्या भांडवली वस्तूंच्या व कच्च्या मालाच्या बाबतीत मात्र खुला बाजार अस्तित्वांत असणार नाही. त्यांच्या किमती हिशेबाच्या सोयीसाठी मध्यवर्ती नियोजन समितीकडून ठरवल्या जातील. नियोजन समितीने ठरविलेल्या किमती गृहीत धरून सरासरी उत्पादनखर्च कमीच होईल, अशा प्रकारें उत्पादनघटकांचा वापर करावयाचा व वस्तूची किमत व काठावरील उत्पादनखर्च समान पातळी-वर येतील इतकें उत्पादनाचें प्रमाण ठेवावयाचे, असा आदेश नियोजन समितीकडून प्रत्येक उत्पादनशाखेच्या जबाबदार अधिकारी मंडळाला

दिला जाईल. तो आदेश त्यांच्याकडून पाळला गेला तर वस्तूंच्या व घटकांच्या गृहीत किमती असता उत्पादन योग्य अशा प्रमाणांतच झाले असें म्हणता येईल. यांत अडचण एवढीच कीं नियोजन समितीला ठरवाव्या लागणाऱ्या किमती नियोजन समितीनें कशा ठरवावयाच्या ? त्याला उत्तर असें कीं, टेलर ह्यानी दर्शविलेल्या प्रयोगपद्धतीनें ते सहज शक्य होईल. भांडवलशाहींतहि उद्योगपतींकडून प्रयोगपद्धतीचाच अवलब केला जातो. समाजवादांत ही पद्धत अधिक कार्यक्षमतेनें चालण्याचा संभव अधिक. कारण एकटयादुकटया उद्योगपतीपेक्षां मध्यवर्ती नियोजन समितीला आर्थिक परिस्थितीचें सम्यक् ज्ञान अधिक असते असें लॉंगे ह्यांनी प्रतिपादिलें; म्हणजेच बाजार ही संस्था समाजवादाला त्याज्य तर नाहीच; पण तीच सस्था समाजवादांत अधिक कार्यक्षम होईल असें प्रतिपादून प्रतिपक्षीयाचा डाव त्यानी त्यांच्यावरच उलटविला.

लॉंगे ह्याच्या सूचनांवर स्विझी ह्यानी अशी टीका केली आहे की, त्यांनी सुचविलेली पद्धति स्वीकारल्यास मध्यवर्ती नियोजन समितीला नियोजनांपेक्षां किमती ठरविण्याचेंच कार्य करावें लागतें, हें बरोबर नाही कारण नियोजन ह्यांत अभिप्रेत असलेल्या कल्पनेला त्यामुळे अर्थ राहात नाही. त्यावर उत्तम उपाय म्हणजे मध्यवर्ती नियोजन समितीकडूनच उत्पादन-विषयक सर्व निर्णय घेतले जातील अशी व्यवस्था करावयाची. नियोजन समितीने मागील अनुभव जमेस घेऊन—म्हणजे सरासरी मानाने कोणत्या वस्तू लोकांना किती प्रमाणांत हव्या असतात, त्यासाठी किती किंमत द्यावयास ते तयार असतात, ह्या सर्व गोष्टीविषयी सरकारच्या आर्थिक संशोधन खात्याने जमविलेली माहिती लक्षात घेऊन—निर्णय घ्यावयाचे. उपभोक्त्याच्या आवडीनिवडी व त्याचे उत्पन्न ह्यात फार मोठ्या प्रमाणांत बदल होत नाहीत. मद गतीनेच ते होत असतात आणि त्यामुळे ते लक्षांत घेऊन उत्पादनविषयक निर्णयांत बदल करणें फारसे कठीण काम आहे असें नाहीं.

**समाजांत व्यक्तिस्वातंत्र्याचें अपहरण होतें ही भीति निराधार**

समाजवादी आर्थिक व्यवस्था कशी चालेल ह्यासंबंधीं अधिक खोलात जाण्याचें कारण नाहीं. वरील विवेचनाचा अर्थ एवढाच घ्यावयाचा की,

सर्वांच्या इच्छा लक्षांत घेऊन उपलब्ध साधनांचा जास्तीत जास्त फायदा करून घ्यावयाचा. ह्या आर्थिक व्यवस्थेच्या प्रधान कार्यांत कार्यक्षमता संपादन करणें समाजवादी आर्थिक व्यवस्थेला दुष्कर असलें तरी असाध्य नाही, असा आजच्या प्रमुख समाजवादानुकूल अर्थशास्त्रज्ञाना विश्वास वाटतो. आर्थिक व्यवस्थेचें कार्य करीत असतां उपभोगस्वातंत्र्य व स्वत:चा धंदा निवडण्याचें स्वातंत्र्य ह्या मूलभूत आर्थिक स्वातंत्र्यावर गदा येण्याचें समाजवादांत काहीच कारण नाही. कारण उपभोग्य वस्तु व श्रम ह्याच्या बाबतीत बाजार ही संस्था राहू शकेल असाहि त्याना विश्वास वाटतो इतकेच नव्हे तर तत्त्वतः आर्थिक स्वातंत्र्य आज सर्वांना असले तरी वस्तुत तें थोड्यानाच उपभोगता येतें. ही परिस्थिति नाहीशी होऊन आर्थिक स्वातंत्र्याचा लाभ सर्वांना होईल असे त्याना वाटते आर्थिक स्वातंत्र्य जर समाजवादात अबाधित राहिले तर राजकीय व सांस्कृतिक स्वातंत्र्याला बाध कां यावा हे समजत नाही समाजवादाच्या मूलतत्त्वांना ज्या योगे बाध येईल असें स्वातंत्र्य अर्थातच व्यक्तीला लाभणार नाही; पण असें स्वातंत्र्य कोणत्याच समाजात कधीच दिलें जात नाही. समाजवादाच्या मूलतत्त्वाच्या चौकटीतहि व्यक्तीला भरपूर स्वातंत्र्य लाभू शकतें. नियोजन करणारे मंडळ लोकशाही तत्त्वाने निवडता येते. सांस्कृतिक विविधता समाजवादांतहि टिकूं शकते. सारांश, व्यक्तिस्वातंत्र्याला समाजवादानें बाध येईल ही भीति निराधार व गैरसमजावर आधारलेली आहे असेंच आजचे समाजवादी अर्थशास्त्रज्ञ मानतात. " बाजार ही संस्था फक्त भांडवलशाहीतच असू शकते, समाजवादात असू शकत नाही. " हें मैझेसचे विधान विचार न करता मान्य केलें गेल्यामुळें हा गैरसमज पसरला आहे, असें त्याचे म्हणणे आहे.

### समाजवादांत प्रोत्साहन नाहीं हा आक्षेप फोल

समाजवादी आर्थिक व्यवस्थेंत व्यक्तीला कार्यप्रवृत्त करण्यास कोणतेच प्रोत्साहन नाहीं हा आक्षेपहि आजच्या समाजवादी अर्थशास्त्रज्ञाना फोल वाटतो. प्रोत्साहनाचा विचार करतांना आजच्या आर्थिक व्यवस्थेतील श्रमिकवर्ग व धनिकवर्ग ह्यांचा वेगवेगळा विचार केला पाहिजे. श्रमिकवर्ग दोन प्रकारच्या प्रोत्साहनाखालीं काम करीत असतो. काम चांगलें केल्यास आपली आर्थिक स्थिति सुधारेल ही आशा हे स्पष्ट प्रोत्साहन व कामांत

चुकारपणा केल्यास शिक्षा होईल ही भीति हें अकरणात्मक प्रोत्साहन त्याला कार्यप्रवृत्त करीत असतें ह्या दोन्ही गोष्टी समाजवादात असतील. एवढेच नव्हे तर अधिक चागल्या प्रकारे त्याचे अस्तित्व भासेल. काम चागले केल्यास आपणास फायदा होईल, अशी आजच्या आर्थिक व्यवस्थेंत श्रमिकाला फक्त आशा वाटते; खात्री नसते अनुभव तर असा येतो की अधिक श्रमाचा बराचसा भाग फायद्याच्या रूपाने मालकाकडूनच लुबाडला जातो. समाजवादी आर्थिक व्यवस्थेत असें व्हावयाचें मुळीच कारण नाही. समाजवादी आर्थिक व्यवस्थेची ध्येयें व कार्यपद्धती कामगारांना एकदां समजली की, आपण अधिक काम केल्यास त्याचा फायदा सर्वाप्रमाणें आपल्यालाहि होईल अशी खात्री प्रत्येक कामगाराला वाटण्यास कोणतीच हरकत नाही. कामात हलगर्जीपणा केल्यास शिक्षा होईल अशी भीति आजच्या कामगाराला वाटते ही गोष्ट खरी; पण त्या भीतीत एक प्रकारचा कडवटपणा असतो. कडवटपणा अशासाठी की कामांत चुकारपणा केला नसताहि तो त्याच्यावर लादला जातो असा त्याला पुष्कळदां अनुभव येतो. काम चांगले करूनहि खोटी शिक्षा मिळू लागली तर कालान्तरानें शिक्षेची भीति नाहीशी होते. समाजवादांत असें होण्याचें कारण नाही. कामांत चुकारपणा कशास म्हणावयाचें, त्याचें मापन कसें करावयाचे, चुकीनें गांभीर्य व त्याबद्दल दिली जाणारी शिक्षा ह्यांचा परस्पर सबंध कसा ठरवावयाचा ह्याचा समाजवादांत अधिक शास्त्रीय विचार होईल व त्या संबंधांत अधिक शास्त्रीय पद्धति अमलांत येईल असा संभव असतो. सारांश, कामगारवर्गाच्या बाबतीत आजचीच प्रोत्साहने अधिक चागल्या प्रकारें काम देतील असा आजच्या समाजवादी अर्थशास्त्रज्ञाचा दावा आहे.

**नफ्याचें आमिष इष्टहि नाहीं व जरुरहि नाहीं**

धनिक वर्गाच्या प्रोत्साहनाबद्दल असें म्हणतां येईल की, स्वतःलाच फायदा व्हावा, मग इतरांचे काहीं झालें तरी चालेल, अशा तऱ्हेचें प्रोत्साहन आर्थिक व्यवस्थेत असणें इष्ट नाहीं; कारण त्यांतूनच दुसऱ्याला लुबाडण्याची प्रवृत्ति उद्भवते. त्या प्रोत्साहनामुळेंच भांडवलशाहीचें शुद्ध स्वरूप नष्ट होऊन विकृत भांडवलशाही अस्तित्वांत आली. लुबाडणुकीचा भाग सोडून देऊन प्रामाणिकपणानें मिळणारा फायदा ह्या प्रोत्साहनाचा जर विचार केला तर असें म्हणतां येईल की, आर्थिक व्यवस्थेचें आजचें स्वरूप असें आहे की त्या प्रोत्सा-

हनाची आर्थिक व्यवस्थेला आता गरज नाही. त्या प्रोत्साहनाने भांडवलशाहीची प्रगति झाली व साधनाची उत्पादनक्षमता अफाट वाढून मनुष्यजातीचा अतोनात फायदा झाला हें कबूल केलेच पाहिजे; पण ह्याचबरोबर भांडवलशाही आज अशा अवस्थेप्रत पोंचली आहे की, तिचा फायदा ज्यांना मिळतो त्यांच्याकडून तिचा गाडा चालविण्यास अजिबात मदत होत नाही. कारण उत्पादनाचे प्रत्यक्ष नियंत्रण, पगारी व्यवस्थापक व तंत्रज्ञ याच्या करवींच होतें हे एक उघड गुपित आहे हेहि कबूल केले पाहिजे. हे जर खरें असेल तर ज्याचा उत्पादनाशी संबंध नाममात्रच असतो अशांना मिळणारा फायदा नष्ट केल्यानें उत्पादनव्यवस्थेवर त्याचा थोडाहि प्रतिकूल परिणाम होणार नाही हें ओघानेच येते सारांश--धनिकवर्गाच्या बाबतीतलें आजचे प्रोत्साहन चालू ठेवणे इष्टहि नाही व जरूरहि नाही.

**समाजवाद व आर्थिक प्रगति**

समाजवाद व प्रगति ह्यासबंधात दोन शब्द लिहिले पाहिजेत. आज असा एक दावा पुढें मांडला जात आहे की, भांडवलशाहीचे तथाकथित सर्व दोष भांडवलशाहीकरवी होणाऱ्या आर्थिक प्रगतीतून उद्भवतात. हे दोष म्हणजे प्रगतीसाठीं दिलेली किंमतच होय. समाजवादानेहि आर्थिक प्रगतीचें धोरण स्वीकारले तर भांडवलशाहीचे दोष समाजवादातहि प्रत्ययास येतील. समाजवादांतहि तेच दोष प्रत्ययास येणार असले तर समाजवाद अधिक श्रेष्ठ असें म्हणण्यात कांहीच अर्थ नाही. समाजवादाला हे दोष टाळावयाचे असतील तर समाजवादाने आर्थिक प्रगतीला कायमची खीळ घातली पाहिजे. सारांश, समाजवादाला अचल आर्थिक स्थिति तरी स्वीकारली पाहिजे किंवा भांडवलशाहीचे दोष समाजवादातहि तसेच्या तसे चालू राहतील हें मान्य केले पाहिजे. ह्यातील कोणतीहि गोष्ट मान्य केली तरी भांडवलशाहीपेक्षा समाजवाद श्रेष्ठ नाही हेच सिद्ध होते. तसे असेल तर आहे ती व्यवस्था निष्कारण बदलून समाजवादी आर्थिक व्यवस्था प्रस्थापित करण्याची उठाठेव करण्याचें प्रयोजन काय? समाजवादाविरुद्ध हा मुद्दा यापुढें अधिक जोरानें मांडला जाईल. अशी चिन्हें भांडवलशाहीवरील अगदी ताज्या ग्रंथावरून (Capitalism by D. Wright--1951) दिसत आहेत; पण ह्या मुद्द्याला उत्तर देणे समाजवादी अर्थशास्त्रज्ञांना मुळीच जड जाऊ नये. कारण खरी परिस्थिति अशी आहे की भांडवलशाहीचे दोष केवळ प्रगतीतून उद्भवत

नमून कधी कधो फायद्याच्या प्रोत्साहनाने प्रगति अशक्य होते म्हणून तर कधी कधी प्रगति अनियोजित, असंबद्ध होते म्हणून हे दोष उद्भवतात. निराळ्या शब्दात असें म्हणता येईल की प्रगतीची गति कधी जास्त तर कधीं कमी असते; म्हणूनच भांडवलशाहीत दोष निर्माण होतात. ते दोष प्रगतीचे नसून प्रगतीची गति योजनाबद्ध नसते ह्या घटनेचे आहेत. ह्या दृष्टीने विचार केला तर समाजवादाचे ह्या बाबतीतले श्रेष्ठत्व ताबडतोब लक्षांत येण्यासारखे आहे. योजनाबद्ध आर्थिक प्रगति समाजवादातच शक्य आहे.

**भांडवलशाहीविरुद्ध समाजवाद हा वाद अर्थशास्त्रप्रगतीला उपकारक**

वरील सर्व विवेचनावरून आजचा आर्थिक विचार कोणत्या स्वरूपाचा आहे ह्याची स्थूलमानाने कल्पना येईल. वरील विवेचन संपूर्ण नाहीं हे वेगळे सांगावयास नको. भांडवलशाही की समाजवाद ही आजच्या आर्थिक विचाराची प्रमुख समस्या आहे. त्या समस्येतच स्वातंत्र्य कीं समता, प्रगति की स्थैर्य ह्या समस्या अंतर्भूत आहेत अशी खरी खोटी कल्पना करून दिली जात असल्यामुळे ती समस्या सर्वच दृष्टींनी महत्त्वाची ठरली आहे. ती समस्या सोडवू इच्छिणाऱ्यामध्यें भांडवलशाही व समाजवाद ह्याचे मिश्रण करून मिश्र आर्थिक व्यवस्था (Mixed Economy) प्रस्थापित करावी असें म्हणणाऱ्याचाहि एक पथ आहे. दोन भिन्न गोष्टींचे मिश्रण करून दोहोंचेहि फायदे मिळवावे ह्या कल्पनेचा मानवी मनाला नेहमीच मोह पडतो. त्या मोहाची छाप पडली की, अशा व्यवस्थेत दोहोंचेहि तोटेच अनुभवावे लागतात ह्या गोष्टीकडे सोयीस्कर दुर्लक्ष केले जाते—किंवा होतें—त्यामुळे मिश्र आर्थिक व्यवस्थेची कल्पना लोकप्रिय होत चाललेली दिसते. आपल्या देशात तर तिचा फारच उदोउदो चालला आहे. ज्यांना मनांतून भांडवलशाही हवी असते; पण राजकीय अगर अन्य कारणामुळें तसें उघड बोलणे परवडत नाही त्याना मिश्र आर्थिक व्यवस्थेची भाषा फार सोयीची वाटते. पण ती कल्पना शास्त्रमान्य होईल असें दिसत नाही. कारण कोणतीहि मिश्रित व्यवस्था तडजोडीच्या तत्त्वावर आधारलेली असल्याने फार काळ कार्यक्षम होऊं शकत नाहीं व अपरिहार्यपणे ह्या नाही तर त्या बाजूकडे झुकतेच असा अनुभव आहे. तो जमेंत धरता आर्थिक व्यवस्था प्रामुख्याने भांडवलशाही तत्त्वावर अधिष्ठित व्हावी की समाजवादी तत्त्वावर अधिष्ठित असावी हीच आजच्या जगाची प्रमुख

समस्या मानावी लागते. ही समस्या सोडवितांना आदर्श भांडवलशाही की समाजवाद असा प्रश्न नसून आजची प्रत्यक्ष भांडवलशाही कीं समाजवाद असा प्रश्न आहे हें लक्षात घेतलें पाहिजे.

वरील प्रश्नावर निर्णय घ्यावयास आर्थिक दृष्टीनें विचार करून मदत करणें हें आजच्या आर्थिक विचाराचें प्रमुख कार्य आहे. ते कार्य आपलें आहे असे आजचे प्रमुख अर्थशास्त्रज्ञ मानतात; हें ह्या प्रकरणातील विवेचनानें स्पष्ट होईल. ते कार्य पार पाडण्याच्या प्रयत्नांत अर्थशास्त्रज्ञामध्ये गट पडले आहेत; असे दृश्य दिसत असलें तरी हे स्पष्ट केलें पाहिजे की, आपली बाजू प्रबळ करण्यासबधीं जी चढाओढ त्या गटागटात चालली आहे ती अर्थशास्त्राच्या प्रगतीच्या दृष्टीने उपकारकच आहे. भांडवलशाहीचे दिवस आतां निश्चित भरले आहेत, आता भांडवलशाही कशी टिकणार ते बोला, हे समाजवादी अर्थशास्त्रज्ञाचे आव्हान भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्या अर्थशास्त्रज्ञानी स्वीकारलें असून त्यानी दिलेले समाजवाद तरी दोषरहित कुठें आहेत ते दाखव। हे प्रतिआव्हान समाजवादी अर्थशास्त्रज्ञानी स्वीकारले आहे. त्यांतून उद्भवलेलें विचारमंथन निर्णायक ठरले आहे अगर केव्हांतरी ठरेल अशा भ्रमात राहण्यात मुळीच अर्थ नाही. ते निर्णायक ठरो, अगर न ठरो; त्यामुळे अर्थशास्त्राची प्रगति होत आहे ह्यात शका नाही. मात्र अर्थशास्त्राच्या होत असलेल्या प्रगतीचा उपयोग करून घ्यावयाचा असल्यास प्रस्तुत ग्रथात सांगितलेल्या अर्थशास्त्राच्या इतिहासावरून सहजी निघणारे दोन-तीन निष्कर्ष चितनीय मानले पाहिजेत. कोणताहि आर्थिक विचार परिस्थितिसापेक्ष असतो, त्यामुळे आर्थिक धोरणाच्या बाबतीत ठोकळेबाजपणा चालत नाही. आर्थिक स्थिति एकदा बदलली की पुन: पूर्वस्थितीला जावयाचें धोरण यशस्वी ठरत नाही, ह्या दोन निष्कर्षांचा विशेष उल्लेख केला पाहिजे. ह्या दोन गोष्टी लक्षांत घेऊन जर तात्त्विक आर्थिक विचाराच्या आधारावर आपले आर्थिक धोरण निश्चित केले तर कोणत्याहि देशाला मार्गदर्शन करण्याची कुवत अर्थशास्त्रांत आहे हे इतिहाससिद्ध आहे. अर्थशास्त्राची आजपावेतोंची प्रगति जगाला उपकारकच ठरली आहे आणि पुढेंहि ती तशीच ठरणार हें अगदी निश्चित

---

# प्रमुख संदर्भ ग्रंथ


| क्रमांक | लेखकाचें नांव | ग्रंथाचें नांव |
|---|---|---|
| 1 | Abbot L. D. (Edited) | Masterworks of Economics |
| 2 | Beer M. | An Inquiry into Physiocracy |
| 3 | Gray Alexander | The Socialist Tradition |
| 4 | Harris S. E. (Edited) | The New Economics |
| 5 | Hayek ( Edited ) | Collectivist Economic planning |
| 6 | Hayek | Road to Serfdom |
| 7 | Roll Erich | History of Economic Thought |
| 8 | Schumpeter | Capitalism, Socialism and Democracy |
| 9 | Stigler George | Production and Distribution Theories |
| 10 | Sweezy Paul M. | Socialism |
| 11 | Sweezy Paul | The Theory of Capitalist Development |
| 12 | Wright D. M. | Capitalism |


वरील ग्रंथांचा प्रस्तुत ग्रंथ लिहिण्यासाठीं अत्यंत उपयोग झाला आहे.

# व्यक्तिसूचि

# विषय सूचि

# प्रस्तुत ग्रंथांत वापरलेले प्रमुख पारिभाषिक शब्द

Abstract—अमूर्त.
Abstinence—उपभोगनिग्रह.
Anarchist—अराज्यवादी.
Capital—भाडवल.
Capital, circulating—
खेळते भाडवल.
Capital, fixed } स्थिर
Capital, constant } भांडवल
Variable—चर भांडवल.
Capital, Organic Composition of—भांडवलाची घटना.
Classical School of Thought—
सनातनवाद.
Communist Manifesto—
साम्यवादी जाहीरनामा.
Consumer—उपभोक्ता.
Consumer's Surplus—
उपभोक्त्याचा वाढावा.
Cost of Production—
उत्पादनखर्च
Average—सरासरी उत्पादनखर्च.
Marginal—काठावरील उत्पादनखर्च.
Production Real—वास्तव
उत्पादनखर्च.
Prime—मुख्य उत्पादनखर्च.
Supplimentary—आनुषंगिक.
Data—सामग्री.
Dialectic—वादकलातत्त्व.
Dialectics—विरोधविकासवाद.
Disutility—असुख.
Economic Drain—
आर्थिक शोषण.
Economic Individualism—
आर्थिक व्यक्तिवाद.
Economic Interpretation of History—इतिहासाचा आर्थिक उकल.
Economic Nationalism—
आर्थिक राष्ट्रवाद.
Economic Self-sufficiency—
आर्थिक स्वयपूर्णता.
Economic Exploitation—
आर्थिक लुबाडणूक.
Effectual Demand—
परिणामकारक मागणी.
Elasticity of Demand—
मागणीचा लवचिकपणा.
Exchange—अदलाबदल, विनिमय
Exchange Value—विनिमयमूल्य.
Factory System—गिरणीपद्धत.
कारखानापद्धत.
Final Degree of utility—
अतिम-कडेची-उपभोग्यता.
Goods-Economic—आर्थिक वस्तु
Free—नार्थिक वस्तु.
Material—साकार वस्तु

Non-Material—निराकार वस्तू.
Hedonism—सुखवाद.
Historical School–इतिहासवाद.
Imperialism—साम्राज्यशाही.
Indian Economics—
भारतीय अर्थशास्त्र.
Inelastic Demand—
ताठर मागणी.
Joint Stock Company—
संयुक्त भांडवल संस्था.
Laisse faire-अनियंत्रणवादी धोरण.
Laws of Returns—
उत्पादनफल-सिद्धान्त.
Law of Constant Returns—
स्थिर फळाचा सिद्धान्त.
Law of Diminishing Returns–
घटत्या फळाचा सिद्धान्त.
Law of Increasing Returns—
वाढत्या फळाचा सिद्धान्त.
Law of Increasing cost—
वाढत्या खर्चाचा सिद्धान्त.
Law of Market—
बाजाराचा सिद्धान्त.
Medieval Social System—
मध्ययुगीन समाजरचना.
Mercantilism—व्यापारवाद.
Moral Philosophy—
नैतिक तत्त्वज्ञान.
Neo-classical Thought—
नवसनातनवाद.
No Rent land—साराविरहित
जमीन.
Over production—
अति उत्पादन.
Physiocracy—निसर्गवाद.
Protection—औद्योगिक संरक्षण.
Production Goods—
भांडवली वस्तु.
Quantity Theory of Money—
द्रव्यनिधि-सिद्धान्त.
School of Thought—संप्रदाय.
Socialism, Idealistic—
ध्येयवादी समाजवाद.
Scientific—शास्त्रीय समाजवाद
Static—स्थिर प्रकृति.
Subsistence—किमान निर्वाह
Theory—तत्त्वप्रणालि
Theory of Alternate Cost—
अन्यवस्तूवर्जन सिद्धान्त.
Theory of Circulation of
Wealth–संपत्तिसंचलन-सिद्धान्त.
Surplus Value—
वाढाव्याचा सिद्धान्त.
Trade Cycle—व्यापारचक्र.
Utilitarianism—उपयुक्तता वाद.
Wage Fund—मजुरीनिधि.
Wage Subsistence—किमान
निर्वाहवेतन
Waiting—उपभोगप्रतीक्षा.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध मजकूर | शुद्ध मजकूर |
|---|---|---|---|
| १ | ११ | करून घ्यावयाचीं आहेत. | करून घ्यावयाची आहे. |
| ६ | २१ | व्यापार वाढविणें आणि हाच | व्यापार वाढविणे हाच |
| १६ | २६ | व्यापारवाद्यांचा सपत्ति- संचलनाचा सिद्धान्त | निसर्गवाद्यांचा सपति- संचलनाचा सिद्धान्त |
| ७० | २८ | Quantityt | Quantity |
| ८७ | २ | सनातनवाद व नवसनातन | सनातनवाद व नवसनातनवाद |
| ९४ | १२ | निरतर वैचित्र्य तोचतोपणा- इतकाच | निरंत वैचित्र्य तोचतोपणा- इतकेच |
| १०७ | ११ | अचळपणापासून संरक्षण | अचपळपणापासून संरक्षण |
| १०७ | १४ | तोड द्यावे लागेल तरी | तोंड द्यावें लागलें तरी |
| ११८ | ९ | Economic Indivisualism | Economic Individualism |
| १२० | २५ | उपकारक रले | उपकारक ठरले |
| १२३ | १२ | Socislism | Socialism |
| १२४ | ९ | आर्थिक वभव | आर्थिक वैभव |
| १३९ | २५ | हाच विचार होता) हा | हाच विचार होता. हा |
| १३९ | २७ | त्याचें काम साधत होते | त्याचे काम साधत होते. |
| १४६ | १ | प्रौधन | प्रुदॉ |
| १५६ | १५ | समाजी | समाजाची |
| १५७ | २१ | उपयोग | उपभोग |
| १६५ | २७ | तर मात्र मानवी | तर मात्र म्हणजे मानवी |
| १८४ | २७ | मोमाप | मोजमाप |
| १९० | २८ | वैशिष्ट | वैशिष्ट्य |
| २०४ | ३ | तोडगा म्हणून अन्य | तोडगा म्हणून |
| २०५ | ११ | इतिहासाची आर्थिक उकल | इतिहासाचा आर्थिक उकल |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध मजकूर | शुद्ध मजकूर |
|---|---|---|---|
| २१२ | २९ | भाडवलशाहीची अतिम व्यवस्था | भाडवलशाहीची अंतिम अवस्था |
| २१६ | १९ | New classical Thought | Neo Classical Thought |
| २१६ | २५ | असें ठरले | असे म्हटले |
| २५० | १ | साकार वस्तु म्हणजे सपत्ति नव्हे | साकार वस्तु म्हणजेच सपत्ति नव्हे |
| २५५ | ६ | सनातनवाद व नवसनातनवाद | सनातनवाद व सनातनविरोध |
| २७८ | १४ | मार्शलच्या पाठींतील | मार्शलच्या पठडींतील |
| २७८ | १६ | Economise of welfare | Economics of Welfare |
| २८८ | ६ | Rood to Serfdum | Road to Serfdom |
| २९४ | ९ | १९४७ | १९४६ |
| २९५ | ४ | वेळप्रसंगी जरूर | वेळप्रसगी उपयोगी |
| ३०१ | १४ | घालव्या | घालाव्या |
| ३०१ | १६ | उत्पादन यंत्रे, अजस्र | उत्पादन, अजस्र यंत्रे |
| ३०१ | १७ | साधनांच्या उत्पादनशक्तीला थारा नाही | साधनांची उत्पादनशक्ति वाढविणाऱ्या गोष्टीना थारा नाही |

